# अशोक ते कालिदास

( हिंदुग्रीकसंघर्षाचा उत्तरार्ध )



लेखक

अ. ज. करंदीकर



मूल्य दहा रुपये

# अशोक ते कालिदास

## ( हिंदु ग्रीक संघर्षाचा उत्तरार्ध )

लेखक
अ. ज. करंदीकर



मूल्य दहा रुपये

# प्रस्तावना

१९२१ मध्यें भारतीय युद्धाचा कालनिर्णय केल्यानंतर वडिलानीं मला कालिदासाचा कालनिर्णय करण्याची सूचना केली होती. अर्थात् तेव्हा त्या विषयाचा व्यासग करण्याइतकी माझी बुद्धि परिणत झाली नसल्यानें मी तो विषय हाताळण्याचें धारिष्ट केलें नाहीं. पण तेव्हापासून कालिदासासबधीं जे जे प्रबध अवलोकनात येतील, ते ते सारे वाचून काढण्याचा उपक्रम मी आरभिला. हा अभ्यास चालू असताना १९४४ मध्यें विक्रमद्विसहस्राब्दीच्या प्रसगीं विक्रमस्मृति ग्रथात प्रबध लिहिण्याचें मला ग्वाल्हेरचें आमत्रण आलें आणि तेव्हा मी विक्रम-सजीवनी हा प्रस्तुत ग्रथात समाविष्ट केलेला प्रबध लिहिला त्यानंतर एकदोन वर्षात कालकाचार्य कथानकाची विश्वसनीयता, कालिदासाच्या ग्रथातील विक्रम-चरित्र, भास आणि कालिदास, निकुभचरित्र, त्याचप्रमाणें कालिदास आणि अश्वघोष इत्यादि लेख लिहिले. तरीसुद्धा तेव्हा माझ्या सशोधनाला स्वतत्र दिशा लाभलेली नव्हती. पुढें १९५७ मध्यें एका भाचीच्या आग्रहावरून कालिदासाचा मेघसदेश हा प्रबध लिहून मी पुन्हा एकवार या विषयात लक्ष घातलें. त्यानतर लौकरच कालिदासाने ग्रीक वाङ्मयाचे अनुकरण केल्याचे माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें आणि त्या विषयावर पूना ओरिएंटॅलिस्ट या त्रैमासिकात एक निबध लिहिला पुढें त्याच विषयावर मराठींत सविस्तर लेख लिहून तो येथील केळकर मडळात वाचला. त्यानतर कालिदासाचा अभ्यास करण्यापूर्वी शुग घराण्याचा इतिहास तपासणे आवश्यक असल्याची जाणीव होऊन मी पुष्पमित्रचरित्रावरील प्रबध लिहिला. याच वेळीं अशोक चरित्राचा पुनर्विचार या बुद्धसार्धद्विसहस्राब्दीनिमित्त लिहिलेल्या लेखात नवीन भर टाकावी लागली. देवपुत्र कनिष्कावरील लेख १९५६ च्या प्रारभीं नवभारत मासिकातून प्रसिद्ध झाला होता. तेव्हा गेल्या अठरा वर्षांतील व्यासगाचें परिणत स्वरूप प्रस्तुत ग्रथात वाचकाना पहावयास मिळेल.

कालिदास ख्रिस्तकालापूर्वी होऊन गेला, असें पुण्यातील करमरकर, देवधर, गुरू, मगरूळकर इत्यादि प्रमुख आचार्यांचेंहि मत आहे. विक्रमादित्य राजानें सवत् कालगणना प्रचलित केली, असें सर्वप्रसिद्ध इतिहासकाराचें मत झाले आहे. अशोकपर्थी राजकारणाचे भयानक परिणाम आज आपल्या देशाला भोगावे लागत

असल्यानें त्याच्यासबंधींहि दुमत होणें अवघडच आहे. अशा प्रकारें या ग्रथातील प्रमुख सिद्धाताना आधींच लोकमान्यता मिळाली असल्यानें आता ग्रथातील भाषे-सबधानें खडे फोडण्यापलीकडे प्रतिपक्षाला कामच उरलेलें नाहीं. भाषेसबधीं मला दोन गोष्टी सागितल्या पाहिजेत एक तर वृत्तपत्रासारख्या वाह्यात् व्यवसायात लेखकाचें जीवन व्यतीत झालें असल्यानें त्याला राजसभेतील भाषेचा परिचय झालेला नाहीं दुसरें असे कीं ' प्रायः स्व महिमान क्षोभात् प्रतिपद्यते हि जनः । ' या कालिदासाच्या वचनाला अनुसरून देशघातकी विचारसरणींची चीड येऊनच हें सारें लखन केलें असल्यानें शाळाशिक्षकाना तें रुचणार नाहीं, ही गोष्ट मी गृहीतच धरलेली आहे. वृत्तपत्रकाराच्या दृष्टीनें हें लेखन अगदींच सौम्य आहे, याविषयीं पत्रकारात मतभेद होणार नाहीं, अशी आशा आहे.

चद्रगुप्तानें आपल्या अतःपुरात यवनी आणल्यानतर यवनींच्या प्रभावानें अशोकाच्या काळीं मौर्य साम्राज्यात बौद्ध आणि यवन याच्या युतीचें राजकारण कसें चालू झालें आणि शुगानीं बौद्धयवनयुतीचा काटा काढल्यानतर जैनानीं शकाशीं सगनमत करून तेंच राष्ट्रघातकी राजकारण कसें पुढें व्यवहारात आणलें, याचा उलगडा प्रस्तुत ग्रथात केला असून बौद्धाच्या नेतृत्वाचा स्वीकार करून क्षत्रिय आणि जैनाच्या नेतृत्वाचा स्वीकार करून वैश्य वर्ण हिंदुधर्माचा त्याग करून गेला असता पतजलिपुष्पमित्रासारख्या ब्राह्मण राष्ट्रनेत्यानीं शूद्राच्या सहकार्यानें परकयाच्या आक्रमणापासून देशाचें सरक्षण कसें केले आणि पुराणोक्त हिंदुधर्माची स्थापना करून आपल्या सनातन धर्माला कसें नवजीवन प्राप्त करून दिलें, याचा अगदीं अभिनव पण सधार इतिहास प्रस्तुत ग्रथात समाविष्ट केला आहे. या ग्रथातील प्रत्येक पानावर प्रथमच उजेडात येत असलेल्या अपूर्व माहितीच्या आधारानें काढलेलीं अभिनव अनुमानें वाचकास भटणार असलीं तरी ' वैदिक आर्यांचें ज्योतिर्विज्ञान ' या ग्रथाच्या मानानें हा ग्रथ पुष्कळच सुबोध असल्यानें निदान खरोखरीच्या विद्वानाना तो दुर्बोध वाटणार नाहीं, अशी आशा आहे.

या दोनहि ग्रथाचें लेखन एकाच वेळीं चालू असल्यामुळे मला एकाच विषयावर लक्ष्य केंद्रित करता आलें नाहीं. त्याचा परिणाम सशोधनावर फारसा झाला नसला तरी ग्रथाच्या माडणीवर थोडाफार होतोच पण त्याला माझा निरुपाय होता. कारण ज्यावेळीं ज्या ग्रथाला प्रकाशक लाभण्याची आशा वाटत होती, त्यावेळीं त्या ग्रथाच्या लेखनाकडे मी अधिक लक्ष देत होतों त्या अपेक्षा

खोट्या ठरून या ग्रंथाच्या प्रकाशनाचें साहसहि मलाच करावें लागलें आहे या साहसाला हातभार लावण्याची इच्छा येथील सुप्रसिद्ध स्थापत्यविशारद श्री. ग. म. आपटे यानीं व्यक्त केल्यामुळें त्यांच्याकडून या ग्रंथाच्या प्रकाशनाप्रीत्यर्थ पांचशें रुपये साभार घेतले आहेत. मुद्रणालयाचें उरलेले देणें वाचकांच्या आश्रयानें फिटेल, अशी सध्या आशा करीत आहे. ही आशा सफळ करण्यासाठीं अनंताची प्रार्थना करून ही प्रस्तावना पुरी करतों.

मार्गशीर्ष वद्य षष्ठी,<br>शके १८८४.

अ. ज. करंदीकर



# अनुक्रमणिका

प्रकरण १ लें

# अशोकचरित्राचा पुनर्विचार

यदा गौतमबुद्धाच्या सार्धद्विसहस्राब्दीच्या निमित्तानें नेपाळातील लुंबिनी वनात आणि भारतात सर्वत्र बुद्धदिनाचा उत्सव मोठ्या प्रमाणावर साजरा होणार आहे. अशा प्रसर्गी ज्याच्या शिलालेखामुळें बुद्धाचें जन्मस्थान आधुनिक संशोधकाना निश्चित करता आलें आणि ज्याच्या प्रचारामुळें बौद्धधर्माचा भारतांत आणि आशियांत सर्वत्र प्रसार झाला, त्या बौद्धधर्मप्रचारक अशोक राजाच्या चरित्राचा पुनर्विचार करणें आवश्यक असल्यामुळें आज मी हा विषय हातीं घेतला आहे.

## सिद्ध-साधकांचा प्रचार

अशोक राजाचें नाव निघालें की मला नेहमी डॉ. देवदत्तराव भांडारकरांच्या अशोकावरील ग्रथातील प्रो. सेनार् या फ्रेंच पडितांच्या पत्राची आठवण होते. अशोकाच्या अहिंसावादामुळे हिंदुस्थान दुर्बळ होऊन तो पुढें परक्याच्या आक्रमणाला बळी पडला, या डॉ. भांडारकराच्या विधानाची चर्चा करतांना त्या फ्रेंच तज्ज्ञानीं म्हटलें आहे. 'It is quite possible that Buddhist pacifism in the long run has tended to weaken certain people whom it did not render more gentle except by making them less fit for action. I prefer to recognise in Ashoka, simply a spirit of idealism and of deep religiousness which animates the whole remote past of India and it has perhaps stood for a greater spiritual honour than it has deprived India of realisations of external successes for which it is doubtful whether its genius ever had made it fit.' म्हणजे "बौद्धाच्या अहिंसावादामुळें कित्येक राष्ट्रें प्रथम कृति करण्याला कमी पात्र, अर्थात् अपात्र बनलीं आणि मग स्वाभाविकपणेंच तीं सौम्य आणि दुर्बल बनलीं. (थोडक्यात सागावयाचें म्हणजे तीं बायकी किंवा तृतीय प्रकृतीचीं बनलीं.) अशोकाच्या ध्येयवादित्वामुळें आणि धर्मप्रवणतेमुळें भारत कदाचित् ऐहिक उत्कर्षापासून प्रवचित झाला असला तरी त्या गुणामुळेंच त्याला साऱ्या जगात आध्यात्मिक क्षेत्रात मान मिळतो, आणि खरें म्हणजे भारताच्या ऐहिक उत्कर्षाला

त्याची प्रतिभा अनुकूल आहे कीं नाहीं, हें संशयितच आहे. " या पत्रात प्रो. सेनार् यानीं आपलें मनोगत व्यक्त केल्याप्रमाणें अहिंसावादरूपी अफूच्या प्रभावानें हिंदुस्थान निष्क्रिय आणि असमर्थ व्हावा, आणि तो तसाच रहावा, अशी पाश्चात्यांची इच्छा असल्यामुळें आपली दिशाभूल करण्याकरिता हिंदुस्थानच्या इतिहासांत ते बुद्ध, अशोक इत्यादि अहिंसावाद्याना भलतें महत्त्व देत असतात आणि आपले परप्रत्ययनेयबुद्धि संशोधक त्याच्या स्वार्थप्रेरित स्तुतीचा अनुवाद करून आपल्या राष्ट्राची दिशाभूल करण्याला त्याना साहाय्य करीत असतात. या सिद्धसाधकाच्या प्रचाराकडे आजपर्यंत हिंदुत्वनिष्ठानीं सरसकट दुर्लक्ष केल्यामुळें आता अशोकासारख्याचीं खरीं चरित्रें लिहिणेंहि अवघड होऊन बसलें आहे. तरीसुद्धा केवळ कर्तव्य म्हणून आज मी हा लेख लिहिण्याचें साहस करीत आहे.

## हिंदुराष्ट्राच्या इतिहासाची आवश्यकता

माझ्या या उपक्रमाला साहस म्हणण्याचें कारण हें कीं आजपर्यंत शेकडों लेखकानीं भरतखंड नावाच्या भौगोलिक तुकड्याचे इतिहास लिहिले असतील. पण आजपर्यंत एकाहि इतिहासकारानें हिंदु राष्ट्राचा इतिहास लिहिलेला नाहीं. हिंदुत्वनिष्ठेच्या दृष्टीनें भारताचा साधार इतिहास लिहिला असता म्हणजे आपल्या इतिहासातील कोणताहि काळ हिंदूच्या उत्कर्षाचा होता कीं अपकर्षाचा काळ होता, हें पाहून आपण त्याचा अभिमान बाळगावा कीं नाहीं, हें ठरविणें सामान्य सुशिक्षितांना सोपें गेलें असतें. अशोकाच्या काळाचा इतिहास हिंदु-राष्ट्राच्या दृष्टीनें लिहिल्यास तेव्हाच्या हिंदुसमाजाच्या नेत्यानीं त्याच्या अहिंसावादी परराष्ट्रीय राजकारणाला आणि अनात्मवादी धर्माला कसा कसून विरोध केला; त्याचप्रमाणें त्या बौद्ध सम्राटाकडून झालेल्या हिंदुनिर्दलनाला न जुमानता हा विरोध कसा पिढ्यान् पिढ्या टिकविला, सरतेशेवटीं पुष्यमित्रानें मौर्यवंशातील शेवटच्या व्यसनी राजाला मारून अशोकाच्या राष्ट्रघातकी धोरणापासून हिंदुराष्ट्राची कशी सुटका केली आणि अशोकाच्या अंतिम वर्षांपासून भारतावर ग्रीकाचें जें आक्रमण चालू झालें होतें, तें कसें थांबविलें, या साऱ्या घटनाना योग्य ते महत्त्व द्यावें लागेल. पण चंद्रगुप्त आणि चाणक्य यानीं घालून दिलेल्या अभ्युदयनिश्रेयसाच्या मार्गापासून भारताला भ्रष्ट करून त्याला दास्याला मात्र पात्र बनविल्याबद्दल अशोकाची स्तुति करणाऱ्या प्रो. सेनार्सारख्या पाश्चात्त्य पंडिताच्या अनुकरणानेच आपले इतिहास लिहिले जात आहेत. अशा परिस्थितींत झेव्हियर महाविद्यालयाचे

दिवगत अितिहासाचार्य प्रो. हिरास यांनीं केलेलें चंद्रगुप्त आणि अशोक यांचें पुढील मूल्यमापन अज्ञात आणि अलक्षित राहून जाणें स्वाभाविक आहे. " The greatest monarch of Hindusthan during the Hindu period was Chandragupta Maurya. Ashoka was a philosopher rather than a sovereign; he wes a teacher of morals rather than an administrator " हिंदुयुगात चद्रगुप्त मौर्य हाच भारताचा सर्वश्रेष्ठ सम्राट् होऊन गेला; अशोकाला सम्राट् म्हणण्यापेक्षा तत्वज्ञानी म्हणणेंच आधिक उचित होईल, कारण राज्यकारभारापेक्षा लोकाना नीतिपाठ देण्याकडेच त्याचें लक्ष आधिक होतें. या अवतरणातील चद्रगुप्ताचें महत्त्वमापन यथार्थ असलें तरी अशोकाला अेखादा निरुपद्रवी तात्यापतोर्जी समजण्याची चूक प्रो. हिरास यानीं केलीच आहे. अशोक हा नुसता नीतिपाठ शिकविणारा एखादा शिक्षक नसून आपल्याला विरोध करणाऱ्या हिंदूचा आणि जैनाचा अमानुष सहार करणारा रक्तपिपासू धर्मशत्रु होता, याची अधुक कल्पनासुद्धा आमच्या अधिकारी अितिहासाचार्योना असलेली दिसत नाहीं. असल्या अज्ञानी आचार्यांनीं लिहिलेले इतिहास वाचून साऱ्या राष्ट्राची दिशाभूल झाली तर त्यात नवल काय!

## बौद्धांचें उच्चाटन

अशोकाच्या उदयापूर्वी मगधसाम्राज्य हें सामान्यतः सनातनी हिंदु आणि जैन यांच्या सहकार्यानें चालविलें जात असे. तेव्हां त्या साम्राज्यात बौद्धाना समाजांत मान तर काय, पण स्थानसुद्धा मिळत नसावें, असें चाणक्याच्या ' पाषडचंडालाना स्मशानान्ते वासः ' या सूत्रावरून स्पष्ट दिसतें. या निर्बंधाचा कटाक्ष बौद्ध पाषडावरच असल्यानें बौद्धधर्म स्वीकारल्यानंतर अशोकानें एक स्वतंत्र शिलाशासन प्रसिद्ध करून त्याच्यापुरता हा निर्बंध ढिला केला, ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. अनात्मवादी बौद्धांच्या उदयानतर भारतीय समाजात त्यांच्याविरुद्ध झालेली प्रतिक्रिया चाणक्यानें आपल्या ग्रथात नोंदून ठेविली होती, इतकेंच. अर्थशास्त्रांतला हा निर्बंध अशोकाने उठविला असला तरी अंतीं चाणक्याचाच विजय होऊन बौद्धाचें भारतीय समाजातूनच नव्हें तर भरतखडांतूनहि उच्चाटन झालें. हा ऐतिहासिक चमत्कार कसा घडून आला, याचा उलगडा अजूनपर्यंत एकाहि इतिहासकाराला करता आला नाहीं. याचें खरें कारण असें आहे कीं आत्मा आणि आत्म्याला प्राप्त होणारा मोक्ष याना बौद्धांच्या विचारसरणींत थाराच नसल्यानें

बौद्धमताला धर्म हें नाव देणेंच सपशेल चूक आहे. अशोक राजानें बौद्ध मताचा प्रचार आरंभिल्यानतर त्याचा भाऊ जो वीतशोक, त्याला उपदेश करताना तत्कालीन धर्माचार्यांनीं म्हटलें आहे :

‘ अस्माकमेव सद्धर्मं इहामुत्र शुभकरम् ।
सर्वधर्माधिक प्रोक्त सर्वशास्त्रेषु तद्विदैः ।।
बौद्धाना नहि सद्धर्मो यतो मोक्षो न विद्यते ।
तस्मात्तद्धर्मता नैव श्रोतव्याहि कथचन ।। ’

हे श्लोक बौद्ध सस्कृतात लिहिलेले असल्यानें त्यातील व्याकरणदोष क्षम्य मानले पाहिजेत. असो. भारतवर्ष ही धर्मभूमि असल्यानें बौद्ध मतासारख्या अधार्मिक धर्माला या देशांत थारा मिळणें शक्यच नव्हतें. या अधार्मिक धर्मवृक्षाच्या वाढीला नास्तिक पण नीतिवादी अशा चीनचीच भूमि परमेश्वरानें नेमली होती आणि एखादें भाताचें रोप ज्याप्रमाणे एका शेतातून उपटून दुसऱ्या शेतात नेऊन वाढवावें, त्याप्रमाणे केवळ मोंगोलियन समाजासाठीं निर्मिलेलें बौद्धमताचें रोपटेंहि त्यानें भारतातून उपटून नेऊन चीनमध्यें वाढविलें. याच्या उलट जैनपथ बौद्धपथाप्रमाणें वेदविरोधी असूनहि अनात्मवादी नसल्यामुळें भारतातून त्याचें उच्चाटन झाले नाहीं.

## अशोक दासीपुत्र

त्या काळीं समाजबहिष्कृत असलेल्या बौद्धाना अशोकानें जवळ करण्याचें खरें कारण म्हणजे बिंदुसार राजाच्या राजकुलात अशोकाचें स्थान बहिष्कृतासारखेंच होतें. कारण तो स्वतः देवीपुत्र नसून दासीपुत्र होता. त्याची आई बिंदुसार राजाच्या अंतःपुरात नापितानीचें काम करीत होती. ती चपा नगरींतील एका ब्राह्मणाची कन्या होती, असें दिव्यावदानादि बौद्ध ग्रथाचें मत आहे. ही त्याची माहिती यदाकदाचित् खरी असली तरी ती त्या कुलपतीची असवर्णक्षेत्रसभवा कन्या असावी, असें उपलब्ध माहितीवरून दिसते. अशोकाच्या मातेचा गुरु जैनाच्या आजीविक नावाच्या कुप्रसिद्ध पथाचा होता, असें महावंश टीकेंत सागितलें आहे. तेव्हा तिला ब्राह्मण समाजात स्थान नव्हतें, हें उघडच आहे. एके दिवशीं तिच्या हस्तकौशल्यावर राजा संतुष्ट झालेला पाहून तिनें त्याच्यापाशीं समागमाची इच्छा प्रदर्शित केली. तेव्हा राजा तिला तिरस्कारानें म्हणाला, ‘ त्व नापिणी, अह राजा क्षत्रियो मूर्द्धाभिषिक्तः कथ मया सार्धं समागमो भविष्यति ! ’ पण मगधात मौर्यांच्या पूर्वी नापितच राज्यकर्ते होते, ही गोष्ट बिंदुसार विसरला होता. नदघराण्यातला कलिपुरुष एका

नापिताचा पुत्र होता आणि त्यानें अमात्याचे पद वशपरपरेनें कल्पकाळा म्हणजे एका नापितालाच दिलें होतें. अशी नापित राज्याची परपरा मगधांत असल्यामुळें या नापितानीनेंहि आपल्या उदरीं चक्रवर्ती जन्माला येणार असल्याचें आपल्या गुरूचें भविष्य सांगून बिंदुसाराला वश करून घेतलेंच आणि कर्मधर्मसयोगानें तिला पहिला मुलगाच झाला. या पुत्रजन्मानें आनदित होऊन राजानें तिला आपल्या रक्षितामध्यें स्थान दिलें. ' नीच रतली जरी रायासी । तिसी कोण म्हणेल दासी ! ' या व्यकटेशस्तोत्रकाराच्या वचनाला अनुसरून अशोकमातेच्या या पूर्वचरित्राचा उल्लेख इतिहासकार करीत नाहींत, इतकेंच काय तें या पुत्राच्या जन्मापासून आपली नापितानीच्या हीन पदापासून सुटका झाली, या आनदाप्रीत्यर्थ तिनें आपल्या पुत्राचें नाव अशोक ठेविलें. या नावातच त्याच्या जन्मापूर्वीचा तिचा सारा शोक समाविष्ट झाला आहे, हें चिकित्सकांना कळून येईल. पुढें तिला दुसरा मुलगा झाला असता पहिल्याच्या नावाचेंच अनुकरण करून तिने त्याचे नाव वीतशोक असें ठेविलें.

## हे आजीविक कोण ?

अशोकाच्या जन्मापासून आजीविक समाजाच्या आशा पल्लवित होऊ लागल्या आणि पिंगलवत्सप्रभृति त्याच्या श्रावकांनीं हा भावी चक्रवर्ती होणार अशीं भविष्यें वर्तवून तीं राजाच्या कानावर घातलीं. या कारस्थानी लोकांनीं बिंदुसाराचें मत्रिमडळहि आपल्या पक्षाला अनुकूल करून घेतलें. देशात दुफळी होऊ नये म्हणून स्वतः चाणक्यानेंच नदाच्या वशपरपरागत मत्र्याना चद्रगुप्ताच्या मत्रिमड-ळात स्थान दिलें होतें. ' मुद्राराक्षस ' नाटकाचा विषयच हा आहे. पुढें बिंदुसार राजाचा कांहीं कारणानें चाणक्यावर रोष झाला, त्यामुळें नदपरपरेंतील मत्र्याच्या हातींच मौर्यराज्याचीं सूत्रें गेलीं. मुद्राराक्षसातील अमात्य राक्षसाचा विराधगुप्त नावाचा एक अतरग मित्र होता, हें त्या नाटकाच्या वाचकांना आठवत असेल. त्याच्या नावाशीं सदृश असें राधगुप्त हें नाव धारण करणारा एक मंत्री बिंदुसाराच्या आणि अशोकाच्याहि राजवटींत मोठ्या अधिकारावर होता. हा राधगुप्त आणि त्याचा मुख्य मत्री खल्लातक हे दोघेहि बिंदुसाराच्या औरस पुत्राचे वैरी आणि दासीपुत्र अशोकाचे कट्टे पुरस्कर्ते बनले होते. या साऱ्या माहितीचा साकल्यानें विचार केला म्हणजे अशोककाळीं झालेल्या राजकीय, सामाजिक आणि धार्मिक क्रातीची थोडी फार कल्पना येऊ लागते.

अशोकाच्या चरित्रांत आणि शिलालेखातहि पुनः पुनः भेटणारे हे आजीविक कोण, याचा येथें थोडा विचार केला पाहिजे. डॉ देवदत्तराव भांडारकरांनीं अशी एक निराधार कल्पना केली आहे कीं आजीविकाच्या दोन शाखा असून त्यातली एक शाखा वैदिकधर्मी होती आणि दुसरी जैनधर्मी होती. महावीराचा प्रतिस्पर्धी मक्खली गोशाल यानें आजीविक पंथाची स्थापना केली, अशी जैनपरंपरा आहे. या आजीविकाचा जैन लोक अत्यंत द्वेष करीत असत. अशोकानें आजीविकांना अनेक लेणीं अर्पण केल्याचे जे शिलालेख उपलब्ध आहेत, त्यांपैकीं काहीं शिलालेखातून आजीविकांचें नाव कलिंगसम्राट् खारवेलाच्या अनुयायानीं खोडून टाकल्याचें डॉ. बानर्जीशास्त्री यानीं उघडकीस आणलें आहे. खरें म्हणजे कलिंगांतील जनतेचा अमानुष संहार करणाऱ्या अशोकाचें नावच त्यांनीं खोडायला हवें होतें; पण अशोकापेक्षा आजीविकांवर त्याचा अधिक राग असल्यानें त्यानीं त्याचेंच नांव खोडलें आहे. अशोकाचा नातू दशरथ राजा याच्या शिलालेखातून आजीविकांच्या मागें भदत ही बौद्ध संज्ञाहि लाविलेली असल्याने त्या काळीं ते बौद्धाशीं समरस होण्याच्या मार्गावर असल्याचें कळून येतें. खारवेलाच्या काळानंतर आजीविकाचा इतिहासात मागमूस लागत नाहीं, असें जैन इतिहासकार श्री. चिमणलाल शहा म्हणतात. तेव्हां एक तर खारवेलानें त्याचा उच्छेद केला असला पाहिजे, नाहीं तर ते बौद्धात मिसळून गेले असले पाहिजेत. ते बौद्धातच मिसळले असावेत, असें एकंदर उपलब्ध माहितीवरून वाटतें. हें अनुमान खरें असल्यास या मीलनाचा उपक्रम अशोकाच्या राजवटीच्या आरंभींच झाला असला पाहिजे. आयुर्वेदावरील एक सुप्रसिद्ध ग्रंथकार वाग्भट हा आजीविक बौद्ध होता, असें डॉ. हर्ष सांगतात.

## अशोकलेखातून पितृपरंपरेचा अनुल्लेख

अशोक हा दिसायला कुरूप आणि स्वभावानें तामसी असल्यानें तो बिंदुसाराला आवडत नसे. आपल्या शिलालेखातून नित्य-नेमानें वाडवडिलाना मान देण्याचा उपदेश करणाऱ्या या धर्मप्रचारक राजाच्या एकाहि लेखात आपल्या पूर्वीच्या राजाविषयीं चुकूनसुद्धां आदराचा एखादा उद्गार आढळून येत नाहीं. आपल्या पुत्रपौत्रप्रपौत्राना आपलें अनुकरण करण्याचा उपदेश आणि आदेश देणाऱ्या या राजाच्या लेखातून आपल्या बिंदुसार पित्याचें नसलें तरी पितामह चंद्रगुप्ताचें तरी आपण अनुकरण करीत असल्याचे उल्लेख यावयाला हवे होते,

असेंच कोणाहि सुजाण सुजनाला वाटेल. पण मला वाटतें कीं अशोक हा चद्रगुप्ताचा नातू किंवा बिंदुसाराचा पुत्र असल्याच्या कोणत्याहि खाणाखुणा त्याच्या लेखांतून आढळावयाच्या नाहींत. ही साधी गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे अशोक राजा कुलीन होता का कुलहीन होता आणि कुलभूषण होता का कुलांगार होता, हें सामान्य विद्यार्थ्यांनासुद्धा समजून येईल. पण असले प्रश्न डॉ. राधाकुमुद मुखोपाध्याय आणि कै. डॉ. देवदत्तराव भांडारकर यांच्यासारख्या सुप्रसिद्ध इतिहासाचार्यांना कां सुचूं नयेत, हेंच कळत नाहीं.

## अशोकाचा पराक्रम

अशोक पराक्रमी नव्हता, असें कोणाचेंच म्हणणें नाहीं; पण त्याच्या पराक्रमाला पुरेसा वाव मिळावा, यासाठीं तक्षशिलेच्या राज्यपालपदावर त्याची बिंदुसारानें नेमणूक केली असता त्यानें तेथील बडवाल्यांच्या आहारीं जाण्याचा मात्र पराक्रम करून दाखविला. काहीं बौद्ध आख्यायिका असें सांगतात कीं तक्षशिलेला जातांना अशोकासह रथ, सैन्य, शस्त्रें यापैकीं कांहींच न दिल्यामुळें त्याला बंडवाल्याच्या आहारीं जावें लागलें, पण यासबधीं महाभारतकारांचा अभिप्राय अगदीं भिन्न आहे. आदिपर्वातील अंशावतरणाच्या अध्यायांत कालविपर्यास करूनहि त्यांनीं म्हटलें आहे. ‘ यस्त्वश्व इति विख्यातः श्रीमानासीन्महासुरः । अशोक इति राजाभून्महावीर्योऽपराजितः ॥ ’ म्हणजे अश्व या नावानें विख्यात असलेला महासुर, महावीर्यवान् आणि अपराजित अशा अशोकाच्या रूपानें अवतरला. मौर्य साम्राज्यांतील बाल्हीक, कांबोज इत्यादि प्रांत हे तेथील अश्वांसाठीं प्रसिद्ध असल्यानें त्या प्रांतातील असुरपूजकांना महाभारताच्या शेवटच्या संपादकांनीं अश्वासुर ही संज्ञा दिली होती आणि या अश्वासुराशीं अशोक समरस झाला होता, असा त्याचा अभिप्राय बौद्धपरंपरेशीं सुसंगतच आहे. या श्लोकावरून असें स्पष्ट दिसतें कीं, तक्षशिलेंतील निवासापासून अशोकाच्या आयुष्याला अगदीं अभिनव वळण लागलें असलें पाहिजे. अशोक तक्षशिलेंत असताना तिथें कोणत्या घटना घडल्या असतील, याची ‘ गांधी-मुस्लिम कॉन्स्पिरसी ’च्या प्रस्तावनेंतील पुढील अवतरणानें जाणत्या इतिहासकारांना पुरेशी कल्पना येऊ शकेल. “ A schism in a decaying empire regularly splits the society within its sphere of influence into the same three fractions, the ruling class, the Have-nots within the border and Have-nots on and adjoining the border.

The Have-nots within the border further split themselves into two sections, the one trying to overthrow the ruling class by violence and the other by non-violence. The violent section conspires with the frontier and trans-frontier enemies to overthrow the ruling class and the non-violent section paves the way for the foreign enemy by preaching the immorality of self-defence." " ऱ्हास पावत असलेल्या प्रत्येक साम्राज्यात सत्ताधारी वर्ग, साम्राज्यांतर्गत बुभुक्षित सत्तालोलुप आणि सीमेवरील किंवा सीमेपलीकडील बुभुक्षित सत्तालोलुप असे तीन वर्ग अस्तित्वांत येतात. साम्राज्यांतर्गत बुभुक्षितापैकीं एक वर्ग अहिंसेच्या मार्गानें अधिकार प्राप्त करून घेण्याच्या प्रयत्नात असतो, तर दुसरा वर्ग सीमेवरील आणि सीमेपलीकडील बुभुक्षिताशीं सगनमत करून हिंसेच्या मार्गानें सत्ता सपादन करण्याच्या प्रयत्नात असतो. अशा प्रसंगीं आत्मसरक्षणासाठींसुद्धा शस्त्र उचलणें असमर्थ आहे, असा प्रचार करून साम्राज्यातर्गत अहिंसावादी, बुभुक्षित परशत्रूंचा मार्ग सुलभ करून ठेवतात. " या उताऱ्यात मी काहीं इतिहासाचें अभिनव तत्त्वज्ञान सांगितलें आहे, अशांतला भाग नाहीं, ' Proletariates of all the world, unite ' म्हणजे जगांतील साऱ्या बुभुक्षित सत्तालोलुपांनो, एकत्र व्हा, या मार्क्सच्या सुप्रसिद्ध सूत्राचाच थोड्या वेगळ्या भाषेंत मीं तेथें अनुवाद केला आहे. या ऐतिहासिक प्रक्रियेचा अति कटु अनुभव अशोककालीं भारताला आला असला तरी तो आता विलुप्त आणि विस्मृतप्राय झाला आहे. यासाठीं तत्कालीन घटनांचें वास्तविक स्वरूप पुन्हा एकदां भारतीयांना समजावून सागणें आज आवश्यक झालें आहे.

## अशोकाच्या कल्याणकारी कार्यक्रमाचे परिणाम

तक्षशिलेंत असताना तेथील बडवाल्यांच्या आहारीं जाणारा अशोक हा जगांतील साऱ्या बुभुक्षित सत्तालोलुपानो, अेकत्र व्हा, या सूत्राला अनुसरूनच वागत होता. पुढें राज्य संपादन केल्यानंतर सीमेवरील आणि सीमेपलीकडील प्रांतांतूनहि राजपथ बांधणें, विहिरी खणणें, धर्मशाळा आणि नर-पशूंचीं चिकित्सालयें स्थापणें इत्यादि सत्कृत्यें करण्याच्या निमित्तानें परशत्रूंच्या भारतावरील आक्रमणाच्या मार्गावर पायघड्या पसरण्याचाच उद्योग तो करीत होता. या पायघड्या पसरीत असतांनाच आपल्या पुत्रपौत्रप्रपौत्राना नवीन देश जिंकण्याला बंदी

करून आणि भारतीय प्रजेला अहिंसेचा उपदेश करून तो परशत्रूंना भारतात मुक्तद्वार करून देत होता. अशा प्रकारें एका भारत सम्राटानें सरासरी चाळीस वर्षें आपल्या राष्ट्राचें शत्रुत्व करण्यात व्यतीत केल्यानतर त्याच्यामागें लागलींच भारताच्या राजधानीपर्यंत शत्रूंचीं आक्रमणें चालू झालीं तर त्यात नवल काय ?

## राजप्रतिनिधि म्हणून नमेणूक

असो, अशोकाच्या या तक्षशिलागमनानतरचा सारा इतिहास अजून सागावयाचाच आहे. त्याचीं सीमाप्रांतातील कारस्थानें बिंदुसाराला न रुचल्यामुळें त्यानें युवराज सुशीम याला तक्षशिलेला धाडलें आणि अशोकाला उज्जयिनीच्या राज्यपालाचें पद दिलें. राजानें रुष्ट होऊनच अशोकाला उज्जयिनीला धाडलें होतें, असा बौद्ध परंपरेमध्यें स्पष्ट उल्लेखहि आहे. तिथें असतांनाच त्यानें बौद्ध सघाशीं सबंध जोडला आणि आजीविकाचें त्याच्याशीं सख्य करून देऊन त्या दोन दलित समाजांच्या साहाय्यानें साम्राज्य-सपादनाचीं कारस्थानें चालू केलीं. कोसल देशातून अवंतीला पळून आलेल्या शाक्यांपैकीं एका बौद्ध कुमारीशीं इथेंच त्यानें शरीर-संबंध केला आणि तिच्यापासून त्याला महेंद्र आणि सघमित्रा अशीं दोन अपत्येंहि झालीं. या महेंद्रालाच पुढें त्यानें बौद्ध संघाचें प्रमुखत्व देऊन त्या संघाचें सूत्रचालकत्व स्वतःकडे घेतलें. अशोकाचा उज्जयिनींतील निवास पाचसहा वर्षें तरी झाला असावा. त्यानंतर बिंदुसाराचा अतकाळ समीप आला आणि देशांत वारसायुद्ध जुपण्याचीं सारीं लक्षणें दिसू लागलीं. तेव्हा अशोक तत्काळ उज्जयिनी सोडून पाटलीपुत्राला गेला.

## देवीपुत्र आणि दासीपुत्र

त्या राजधानींतील सारी सत्ता तेव्हा नंदपरपरेंतील राधगुप्त आणि खल्लातक या मन्त्र्याच्या हातीं होती. हे मत्री बिंदुसाराच्या औरस पुत्राचे वैरी आणि अनौरस पुत्राचे पुरस्कर्ते होते, हें वर सांगितलेंच आहे. त्या काळीं औरस पुत्र गादीवर आला म्हणजे तो स्वाभाविकपणेंच सनातन धर्माचा पुरस्कर्ता होत असे आणि त्याचा कारभारहि स्मृति आणि अर्थशास्त्र या ग्रथांतून घालून दिलेल्या नियमाप्रमाणें चालत असे. त्याच्या उलट अनौरस पुत्र अधिकारावर आला म्हणजे राजाच्या अनियत्रित सत्तेचा पुरस्कार करणाऱ्या पाखडांचा तो पुरस्कर्ता बनत असे. म्हणजे एकाच दगडानें दोन पक्षी मारून धर्मशास्त्रानें आणि अर्थशास्त्रानें राजाच्या सत्तेवर जे निर्बंध घातले होते, ते सारे धाब्यावर बसवून तो

अनियंत्रित सत्तेचा उपभोग घेऊं शकत असे. विशेषतः अशोककालीं मगधांतील चाणक्यविरोधी पक्षाचा पाठिंबा औरस-पुत्राना मिळणें अशक्यप्रायच होऊन बसलें होतें. कारण राजाच्या औरस-पुत्राला गादीवर बसवून कौटलीय अर्थशास्त्रांत घालून दिलेल्या निर्बंधाप्रमाणें राज्य चालविण्यात चाणक्यविरोधी पक्षाला स्वारस्य कसें वाटणार ! म्हणजे तत्कालीन देवीपुत्र आणि दासीपुत्र या उभयतामधील विरोध हा एका अर्थी नियंत्रित राजसत्ता आणि अनियंत्रित राजसत्ता या परस्पर-विरोधी तत्त्वातीलच विरोध होय. यासाठींच मौर्यसाम्राज्याची घटना लिहिणाऱ्या चाणक्यानें म्हटलें आहे. 'बहूनामेकसरोधः पिता पुत्रहितो भवेत् । अन्यत्रापद ऐश्वर्यं ज्येष्ठभागी तु पूज्यते ॥' ज्येष्ठ पुत्राला गादीवर बसविण्यानें देशावर अरिष्ट कोसळ-ण्याचा संभव असला, तरच त्याला राज्य न देता दुसऱ्या राजपुत्राला राज्य द्यावें, असें चाणक्याचें म्हणणें होतें. अनौरस आणि धर्मभ्रष्ट राजाला तत्काळ पदच्युत केलें पाहिजे, हाच तर चाणक्यचरित्राचा संदेश आहे. 'येन शस्त्रच शास्त्रच नंदराजगता च भूः । अमर्षेणोद्धृतान्याशु तेन शास्त्रमिदं कृतम् ॥' असें अर्थशास्त्रावर लिहिण्याचा आपला अधिकार सांगताना चाणक्यानें म्हटलें आहे. 'अधः चालितशास्त्रो वा राजा इति' म्हणजे अज्ञानी अथवा शास्त्रापासून भ्रष्ट झालेला राजा यापैकीं कोणता अधिक घातक, या प्रश्नाची चर्चा करताना कौटल्यानें म्हटलें आहे. "अंधो राजा शक्यते सहायसंपदा यत्र तत्र वा पर्यवस्थापयितुम् इति । चालितशास्त्रः तु शास्त्रात् अन्यथाभिनिविष्टबुद्धिः अन्यायेन राज्यं आत्मानं च उपहन्ति इति ।" म्हणजे अज्ञानी राजाला वेळीं अवेळीं त्याचे साहाय्यक मार्गदर्शन करून योग्य मार्गावर नेऊ शकतील; पण शास्त्रापासून भ्रष्ट झालेला राजा अति भयंकर, कारण त्याच्या डोक्यात काहीं दुर्ग्रहांनीं घर केलें असल्यामुळें तो राज्याचा आणि आपला घात केल्यावाचून रहावयाचा नाहीं. असल्या प्रश्नासंबधींचें चाणक्याचें विवेचन कितीहि मार्मिक असलें तरी पक्षद्वेषानें जे त्याचा ग्रंथच धाब्यावर बसवायला निघाले होते, त्या राधगुप्तादि मन्त्र्यांना त्याचें काय ! त्यांनीं अतिमशय्येवरील बिंदु-साराकडून अनौरस अशोकाची राजप्रातिनिधि म्हणून नेमणूक करून घेतली. अशा प्रकारें मगधसाम्राज्याची राजधानी अशोकाच्या हातीं आली.

## कलिंगविजयापूर्वींच्या घटना

बिंदुसाराच्या मृत्यूनंतर चार वर्षांनीं अशोकाला राज्याभिषेक झाला, अशी बौद्ध-परंपरा असून प्रमुख इतिहासकारांनीं ती विश्वसनीय मानली आहे. या

चार वर्षांच्या अवधींत कुलांगार अशोक हा बिंदुसाराच्या औरस संततीचा संहार करून आपलें राज्य निष्कटक करण्याच्या उद्योगात गुतला होता. या अवधींत अशोकाच्या भोवतीं एकत्रित झालेल्या बौद्ध आणि आजीविक कटवाल्यांनीं सनातन धर्माच्या अनुयायाना होतां होईल तों न दुखविण्याची काळजी घेतली होती. महावशटीकेवरून असें समजतें कीं अशोकाच्या हातीं सत्ता आल्यानतर तीन वर्षपर्यंत तो ब्राह्मणांचा परामर्श घेत होता. ही माहिती खरी दिसते. कारण तेव्हां त्याला अजून राज्याभिषेक व्हावयाचा होता आणि बिंदुसाराच्या औरस सततीचा संहारहि सपावयाचा होता. तो कार्यक्रम बहुतांशीं उरकल्यानतर त्यानें राज्याभिषेक करून घेतला आणि आपलीं नखें बाहेर काढायला प्रारभ केला.

अशोकाच्या राज्याभिषेकानतर आठ वर्षांनीं त्याने कलिंग देश जिंकला. कलिंगावरील स्वारी किती दिवस चालली होती, हें कळण्याला आज साधन नाहीं. पण बिंदुसाराच्या औरस सततींपैकीं कोणाला तरी कलिंगात आश्रय मिळाल्यामुळेंच, त्यानें त्या देशावर स्वारी केली असली पाहिजे, हें उघड आहे. ही स्वारी करण्यापूर्वीं दोन आघाड्यांवरील युद्ध टाळण्याकरिता अशोकानें वायव्यसीमेवरील ग्रीक साम्राटांची आराधना चालविली होती, हें शहाबाजगढी येथील कलिंगविजयाच्या शिलालेखनावरून स्पष्टपणें कळून येतें : ‘And what is Dharmavijaya is considered by his sacred Majesty the principal conquest. And this has been repeatedly won by his sacred Majesty both here and among all the frontier peoples, even to the extent of six hundred yojanas where (are) the yona king Aniochos by name and beyond that Antiochos four kings named Ptolemy-Autigonos, Magas and Alexander.” म्हणजे “धर्मविजय हाच मुख्य विजय आहे, असें देवांना प्रिय या पदवीला पात्र असलेल्या अशोकाचें मत आहे आणि असा विजय त्यानें भारतात आणि भारताबाहेरील अँटिओकस्, टॉलेमी, अँटिगोनस्, मगस् आणि अॅलेक्झाडर इत्यादि ग्रीक राजांच्या राज्यांतूनहि वारवार मिळविला आहे.” इथें लक्षात घेण्याजोगी गोष्ट ही आहे कीं, वर उल्लेखिलेल्या यवन राजाकडे अशोकानें जे दूत पाठविले, ते कलिंगविजयानतर नसून आपल्या राज्याभिषेकानतर एक दोन वर्षांत पाठविले असले पाहिजेत आणि या दूताच्या द्वारा त्याने त्या ग्रीक राजाना असें आश्वासन दिलें असलें पाहिजे कीं नव्या सम्राटानें आता बौद्ध मत स्वीकारलें असल्यानें चद्रगुप्त आणि बिंदुसार यांचें परराष्ट्रीय धोरण त्याज्य ठरविलें

असून यापुढें मगध सम्राट् आपल्यावर स्वाऱ्या तर करणार नाहींच, उलट आपली आणि आपल्या प्रजेची सेवा करण्याची त्याला उत्कट इच्छा असल्यानें आपण त्याला तेवढी संधि अवश्य द्यावी. या विनतीला अनुसरून ग्रीक राजांनीं मगध सम्राटाला आपल्या राजपथावर वृक्ष लावण्याचें, विहिरी खणण्याचें, रुग्णालयें स्थापण्याचें काम दिलेंहि असेल आणि त्यानें अशोकाचें समाधानहि झालें असेल. असलेच धर्मविजय त्यानें ग्रीकाच्या राज्यात अनेकदा मिळविलेले दिसतात. या साऱ्या घटना कलिंगविजयापूर्वीच्या असल्या पाहिजेत, असें डॉ. राधाकुमुद मुखोपाध्याय याच्या पुढील विवेचनावरून स्पष्ट दिसून येतें. "Ashoka's missionary activity in the foreign countries must date from an earlier time, and more so because it is described in the edict as having been already successful and borne fruit. One of the results achieved was the extension to these foreign countries of the emperor's arrangements for providing medical aid for men and animals as mentioned in Rock Edict II. Thus we must allow adequate time for the development of these results before 258 B. C." तेव्हा अशोकानें ग्रीक राजाची चालविलेली ही सेवा राज्याभिषेकानतर लवकरच चालू झाली असली पाहिजे, हें उघड आहे. तरीसुद्धा वर उतरून घेतलेलें तर्कशुद्ध विवेचन करणाऱ्या डॉ. राधाकुमुदबाबूंनीं कलिंगविजयानंतरच अशोकानें परदेशीं दूत पाठविले असले पाहिजेत, असें लिहिलेंच आहे. या अप्रयोजकपणाला काय म्हणावें, हेंच कळत नाहीं.

## ' धर्मवायु तीव्रतर झाला '

आधींच स्वजनाची हत्या करणें हें महत्पाप आहे, असें अर्जुन म्हणतो. त्यांतून हें स्वजनसहाराचें पाप निर्विघ्नपणें करता यावें, याकरिता यवनाशीं सगनमत करणें आणि आपल्या वशपरपरागत शत्रूची सेवा करण्याचें व्रत घेणें या जयचंदगिरीला जगात कोणतेंच प्रायश्चित्त नाहीं. कलिंग आणि मगध याचे हितसबध परस्परविरोधी होते, असेंहि नाहीं. कारण पूर्व भारताच्या सागरसीमाचें संरक्षण आणि मलाया, जावा, सुमात्रा इत्यादि देशातून भारतीय सस्कृतीचें सवर्धन कलिंग देश करीत होता. याकरिता चाणक्य—चद्रगुप्तासारख्या पहिल्या प्रतीच्या राजकारणी पुरुषानीं तो प्रात मगधाच्या प्रत्यक्ष सत्तेखालीं आणण्याचा उपद्व्याप केला नव्हता. त्याना इतकें कळत होतें कीं ब्राह्मण आणि श्रमण याना यथायोग्य मान

देणाऱ्या कलिंगाशीं लढण्यापेक्षा ज्याना ब्राह्मणश्रमण पाहूनहि माहीत नाहींत, अशा यवनांशीं युद्धें करून त्यांच्या देशांतून स्वकीय संस्कृतीचा प्रसार करणें हें किती तरी पटीनें अधिक पुण्यकारक आहे. पण चाणक्य-चंद्रगुप्तांच्या उलट प्रत्येक प्रसंगीं वर्तन करावयाचें अशी प्रतिज्ञा ज्यानें राज्य बळकावतानाच केली होती, त्याला असला सुविचार सुचणें शक्यच नव्हतें. उलट त्यानें असा विचार केला कीं यवनांच्या देशात ब्राह्मणश्रमणाचें म्हणजे सनातन पंथाचें आणि जैनाचें प्रस्थ नसल्यामुळें तिथें बौद्ध धर्माच्या प्रसाराला अनुकूल क्षेत्र आहे हें पाहून त्यानें एकीकडे कलिंगावर स्वारी करून बौद्धपाषंडाना चंडालांसन्निध निवास नेमून देणाऱ्या ब्राह्मण-श्रमणांचा काटा काढला आणि त्या संहारानें आपल्याला पश्चात्ताप झाला असल्याचे ढोंगी लेख सौराष्ट्र—सीमाप्रांतासारख्या सुदूर प्रांतातून कोरले. अशोकानें कलिंग प्रांतात केलेला संहार हा तैमूरलंग, नादीरशहाप्रभृतींनीं केलेल्या संहारानाहि लाजविणारा आहे. कलिंगयुद्धामुळें सरासरी पांच लक्ष लोक प्राणाला मुकले आणि दीड लक्ष राजबंदी झाले, या आकड्याचा थोडा विचार केला असता हें कळून येतें कीं रणचंडीला इतक्या मोठ्या प्रमाणावर बलिदान देण्या-इतकी कलिंगाची लोकसंख्या तेव्हा नव्हती आणि आताहि नाहीं. यावरून डॉ. राधाकुमुदबाबूंना अशी शंका आली आहे कीं, अशोकाच्या या लेखात अतिशयोक्ति असावी. पण कलिंगयुद्धाचें वास्तविक स्वरूप म्हणजे अशोकाला पुढें करून राजसत्ता बळकावून बसलेल्या बौद्ध पाषंडाच्याविरुद्ध मगधकलिंगातील हिंदुजैनांनीं केलेली संयुक्त उठावणी असें असल्यानें या युद्धात कलिंगाला मगधातील अशोक-विरोधकांनीं मोठ्या प्रमाणावर साहाय्य केलें असलें पाहिजे. कलिंगविजयापूर्वी अशोकाला बौद्ध होऊन अडीच वर्षें लोटलीं होतीं, हें ओळखणाऱ्या डॉ. राधा-कुमुदबाबूंना तरी ही वस्तुस्थिति समजायला हवी होती. पण शिक्षणाच्या धंद्यात जन्म घालविलेल्या विद्वानांना राजकीय दृष्टीनें विचार करण्याची सवयच नसते, हेंच खरें. असो. मगधातील हिंदूंनीं आणि जैनांनीं कलिंगयुद्धात मोठ्या प्रमाणावर भाग घेण्याचें एक महत्त्वाचें कारण हें कीं नंदघराणें हें मूळचें कलिंगदेशातील राजघराणें असल्यानें त्यांच्या राजवटींत मगधातील जनतेचे कलिंगातील जनतेशीं जिव्हाळ्याचे संबंध निर्माण झाले होते नंदघराणें कलिंगातून मगधांत आल्याचें माझे मित्र श्री. सदानंदराव दीक्षित यांनीं आपल्या नंदमौर्यांवरील अप्रकाशित प्रबंधात दाखवून दिलें आहे आणि त्यांच्या या संशोधनाला इतरहि अनेक विद्वा-नांनीं मान्यता दिली आहे. नंदघराणें जैन होतें आणि त्या घराण्यानें पाटली-

पुत्राला जाताना आपल्याबरोबर घराण्याच्या आराध्यदेवतेची मूर्तिहि कलिंगातून नेली होती. पाटलीपुत्रावरील स्वारीनंतर खारवेलाने परत आणलेली सुप्रसिद्ध कलिंगजिनमूर्ति ती हीच होय. अशोकाने कलिंगदेशावर स्वारी करून तिथें अमानुष सहार केल्यामुळें त्या देशाचें पुढें मगधाशीं वैर झालें. अशोकानतर एका शतकाच्या आंतच कलिंगाच्या खारवेल राजानें मगधावर लागोपाठ दोन स्वाऱ्या केल्या आणि मगधातील दुर्दैवी प्रजेला तेव्हा एकाच वेळीं यवनाच्या आणि कलिंगाच्या आक्रमणाचे आघात सोसावे लागले, असे म्हणतात.

कलिंगातील विजयानतर आपला धर्मवायु तीव्रतर झाला, असें स्वतः अशोकानेच त्या कुप्रसिद्ध शिलाशासनात म्हटलें आहे. ( लब्धेषु कलिंगेषु तीव्रतरे धर्मवायौ ) या धर्मवाताच्या भरात त्याने हिंदु-जैनाचा धर्मच्छल जेव्हा आरभिला, तेव्हा या धर्मच्छलाला तोंड देण्यासाठीं ब्राह्मणांनींहि बौद्धाविरुद्ध कडकडीत बहिष्काराची घोषणा केली. अशोकाचा भाऊ वीतशोक याला तेव्हा ब्राह्मणानीं उपदेश केला.

" वदनीया न ते बौद्धा दर्शनीया न केनाचित् ।
नापि स्पृश्या न पूज्याश्च सभाष्या नैव तैः सह ॥
न स्थातव्य न गतव्य भोक्तव्यं नापि सर्वथा ।
किंचिदपि न दातव्य बुद्धक्षेत्रे कथंच न ॥
प्रमादादपि बुद्धाना श्रृणुयुर्धर्ममादरात् ।
ते सर्वे नरकं गत्वा दुःखानि सर्वदाप्नुयुः ॥
यदि मोहाद्गुणास्तेषा दृष्ट्वा धर्मे प्रमाणयेत् ।
स इहापि परिभ्रष्टः परत्र नरक व्रजेत् " ॥

या श्लोकावरून बौद्धाच्या सकटाविरुद्ध ब्राह्मणाना तेव्हा किती निकरानें प्रचार करावा लागला, याची कल्पना येते.

## हिंदु आणि जैन यांचा छळ

अशा प्रकारें नुसता बहिष्कार पुकारून ते थाबले नाहींत. तर बौद्ध भिक्षूचें दर्शनच अशुभ असल्याची त्यानीं सर्व जनतेची समजूत करून दिली. " यतस्ते मुडिता भ्रष्टाः स्वधर्मकुलनाशकाः । मिथ्याधर्माभिवादन्ते जातिधर्मसमुज्झिताः ॥ वेद-धर्मबहिर्जाता अब्रह्मण्या विचडिकाः । अनाचारा अशुद्धागा अशुचिव्रतचारकाः ॥ " अशोकावदानातून अुतरून घेतलेल्या या साऱ्या श्लोकावरून तत्कालीन सनातनी नेत्यानीं बौद्धमतप्रचाराला का आणि कसा विरोध केला, हें सुस्पष्टपणें कळून

येतें. या साऱ्या प्रचाराच्या पार्श्वभूमीवरून अशोकाचे शिलालेख वाचले म्हणजे वरकरणीं सोज्वळ दिसणाऱ्या त्या शिलालेखाचे पर्यवसान सनातनी लोकाचा धर्मच्छळ करण्यातच झालें असलें पाहिजे; हें उघड होतें. राजकारणी लोकाचे ढोंगी लेख ज्याना नित्य वाचावे लागतात, त्यानाच अशोकासारख्या कारस्थानी राजाच्या शिलालेखाचें मर्म कळूं शकेल. असो. बौद्ध परपरावरून असें कळून येतें कीं अशोकाचा भाऊ वीतशोक हा चार वर्षेपर्यंत त्याचा युवराज होता. या अवधींत राजानें त्यालाहि दीक्षा देण्याचे अनेक प्रयत्न केले. पण राजाच्या दडपणाला बळी पडून स्वधर्मत्याग करण्याचें त्यानें सपशेल नाकारलें. त्यानतर त्याचा काटा काढण्याचें काम अशोकानें राधगुप्ताकडे सोपविलें. त्या कुटिल मत्र्याने ' अशोक भिक्षु झाला असल्याने आता राज्य तुझेंच आहे, मात्र तू बौद्धधर्माची दीक्षा तेवढी घे ' असें सांगून वीतशोकाला दीक्षा तर घ्यावयाला लाविली. त्यानतर राधगुप्तानें वीतशोकाला राजाच्या सिंहासनावरहि बसविलें असता अकस्मात् अशोक तेथें प्रकट झाला आणि ' राजद्रोहाच्या अपराधाबद्दल आपला शिरच्छेद होऊ नये अशी इच्छा असल्यास तू आताच्या आता भिक्षूची दीक्षा घे ' असें त्यानें आपल्या भावाला बजाविलें. भिक्षूची दीक्षा घेऊनहि त्या दुर्दैवी युवराजाचे प्राण वाचले नाहींतच. कारण भिक्षुवेषाने तो पाटलीपुत्रातून बाहेर पडल्यानतर लौकरच मारेकऱ्यांनीं त्याचें शिर अशोकाला भेट म्हणून दिलें. अशोकाच्या काळींच बुद्धमूर्तींची पूजाअर्चा प्रचलित करण्याचे प्रयत्न झाले; पण जिवावर उदार झालेल्या वैदिकानीं ठिकठिकाणीं त्या मूर्ति फोडून अशोकाकडून देहान्त प्रायश्चित्त घेतल्यामुळें बुद्धमूर्तींचा त्या काळीं प्रचार होऊ शकला नाहीं. त्याच काळीं काहीं जैनानीं जिनाच्या पायाशीं बुद्ध लोळण घेत आहे अशा आशयाचीं चित्रें सर्वत्र प्रसृत केल्यामुळें त्याचीं शिरें कापून आणणाऱ्याना मोठमोठ्या देणग्या अशोकानें घोषित केल्या होत्या. यावरून धर्माशोकाच्या राजवटींत हिंदु आणि जैन याचा धर्मच्छळ कसा अविरत चालू होता, याची वाचकाना कल्पना येऊ शकेल. या धर्मच्छळाचें समर्थन करताना अशोकभक्त असें म्हणू शकतील कीं राजाने आपल्या शिलालेखातून प्रतिपादिलेलें सहजीवनाचें तत्त्व न मानणाऱ्या हिंदुजैनाचा शिरच्छेद झाला तरी त्याचा दोष अशोकाला लागत नाहीं. या उत्तराला प्रत्युत्तर एवढेंच आहे कीं अशोकाने जेव्हा अर्थशास्त्रातील निर्बंध धाब्यावर बसवून आणि घटनेचा भग करून हें बौद्धाचें सहजावन मगधातील प्रजेवर लादलें, तेव्हाच त्याने धर्मच्छळाचें शस्त्र हिंदुजैनावर चालविण्याला प्रारभ केला असल्यानें धर्मच्छळाच्या दोषातून त्याची मुक्तता होऊ शकत नाहीं.

## तें ‘ रामराज्य ’ नव्हतेंच

अशोकाने बौद्ध धर्माचा केलेला स्वीकार आणि प्रचार हें हिंदुधर्मावरील ऐतिहासिक काळातलें पहिलें मोठें गंडांतर म्हणता येईल. या वेळीं नेहमींप्रमाणें परप्रत्ययनेयबुद्धि लोकांनीं आणि संधिसाधूंनीं बौद्धमताचा स्वीकार करून प्राचीन परंपरेशीं एकनिष्ठ राहिलेल्या लोकांचा उपहास आणि छळ केला. त्या सार्‍या छळाला तोंड देऊन तत्कालीन सनातनी लोकांनीं हिंदुधर्माची परंपरा अखंडित राखली आणि सरतेशेवटीं योग्य संधि साधून पुष्यमित्राने अशोकाचा वंशज बृहद्रथ याला मारून बौद्धांच्या छळापासून आणि ग्रीकांच्या आक्रमणापासून हिंदूंची सुटका केली. या काळात झालेल्या हिंदु जैनांच्या छळाची आणि त्याला तोंड देतांना बळी पडलेल्या सद्धर्मवादी नेत्यांची आठवण आपण सपशेल विसरलों असलों तरी हिंदुजैनांच्या दृष्टीने अशोकाचें राज्य हें रामराज्य नसून रावणराज्य होतें, इतपत ज्ञान अशोकवदानादि ग्रंथावरून डोळस वाचकांना आजहि होऊं शकतें. अशोकाच्या काळीं प्राचीन धर्माची परंपरागत प्रतिष्ठा राखू पाहणार्‍यांचा छळ होत होता, एवढाच आक्षेप त्या राजावर असता, तर त्याच्या चरित्राचा आजच पुनर्विचार करण्याची घाई नव्हती. पण त्याच्याच शिलालेखावरून उघडकीला येणारीं, त्यानें ग्रीकांशीं केलेलीं कारस्थानें लक्षात घेतलीं म्हणजे त्याचें खरें स्वरूप शक्य तितक्या लवकर उघडकीला आणणें आवश्यक आहे, अशी जाणीव होते. अशोकाच्या अत्यंत प्रमुख धर्मप्रचारकांमध्यें आणि त्याच्या प्रांताधिपतींमध्यें यवनांचा प्रवेश झाला होता, ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे त्या काळींच बौद्धांनीं हिंदूंवर सत्ता गाजविण्याकरितां ग्रीकांना भागीदारींत घेतलें होतें की काय अशी शंका येते. अशोककालीं बौद्धांचें यवनांशीं झालेलें संगनमत लक्षात घेतलें म्हणजेच यवनविजेत्या सेनापति पुष्यमित्रानें बृहद्रथ मौर्याला मारून त्याच्या कुलाचा उच्छेद कां केला, याचा उलगडा होतो. पुष्यमित्राला बाणभट्टासारख्या बौद्ध राजाच्या आश्रिताने अनार्य ही संज्ञा लाविली असली तरी त्या अविस्मरणीय सेनापतीविषयीं कालिदासाला किती आदर वाटत होता, हें सर्वांना माहीत आहेच.

अशोकाच्या चरित्रासंबंधीं अजूनहि अनेक अभिनव कथा सांगतां येण्याजोग्या आहेत. पण अलीकडे गुजराथेंतील जैन भांडारांतून एक नवीनच अशोकचरित्र उपलब्ध झाल्याची वार्ता आली असल्याने तो ग्रंथ शक्य तितक्या लवकर प्रकाशित करण्याची आमच्या जैनबंधूंना विनंति करून लेखणीला इथेच अर्धविराम देणें श्रेयस्कर होईल

---

प्रकरण २ रें

# शुंगेतिहासाची प्रस्तावना

भारताला स्वातंत्र्य प्राप्त झाल्यापासून पहिलें दशक उलटून गेलें असलें तरी इतर अनेक क्षेत्राप्रमाणेंच इतिहास-संशोधनाच्या क्षेत्रातहि आपण पूर्वीप्रमाणेंच पराधीन राहिलों आहोत. भारतीय इतिहासाचें संशोधन करितानासुद्धा हिंदुसमाजातील न्यूनगंड नाहींसा झाल्यास इंग्रजी राज्याला धोका उत्पन्न होईल या भीतीनें ग्रस्त झालेले इंग्रज इतिहाससंशोधक आणि इतिहासलेखक, होता होईल तों हिंदूंना हीनता देण्याच्या हेतूनें आपलें लेखन करीत आणि त्या धूर्तांचें शिष्यत्व स्वीकारल्यास आपल्या जीविकासंपादनाचा आणि प्रतिष्ठासंपादनाचा प्रश्न सहज सुटेल, अशा अपेक्षेनें ' विद्वान् भाड्यानें देणे आहेत ' या कोटींतील भाडोत्री भारतीय विद्वान् आपल्या आंग्लप्रभूंच्या कृपाप्रसादाला पात्र होण्याकरिता त्यांच्या भूमिकेचें आग्रहानें समर्थन करीत. कलियुगातील मानवाचा हा स्वभावधर्मच असल्याने असल्या वर्तना-करिता कोणाला दोष देण्यात अर्थ नाहीं. पण त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, हिंदु इतिहासाच्या प्रत्येक प्रश्नावर हिंदूंच्या परंपरेविषयीं संशय व्यक्त करणें आणि प्रत्येक संशयित प्रकरणात हिंदूंना प्रतिकूल अशीं अनुमानें काढणें हीच त्यांच्या इतिहाससंशोधनाची इतिकर्तव्यता होऊन बसली होती. ही वस्तुस्थिति कोणा कोणा राजकारणी नेत्याना सुविदित असली तरी त्याना स्वतःला प्राचीन इतिहास-संशोधनात लक्ष घालण्याला सवड नसल्याने या कटु सत्याचा प्रकट उच्चार ते करीत नसत. त्यामुळे हें स्फुट-रहस्य माझ्यासारख्या एखाद्या राजवाड्यांच्या एकलव्यानें बोलून दाखविलें असता आंग्लप्रभूंच्या कृपेने प्रतिष्ठा आणि पदव्या संपादिलेल्या विद्वानाना करदीकराच्या भाषेला नाकें मुरडण्याला अवसर मिळतो. तरी सुद्धा स्वतंत्र भारतातील भावी संशोधकाना या पूर्वेतिहासाचा परिचय करून देणें आवश्यक असल्यानें मी या स्फुटरहस्याचा प्रकट उच्चार करीत आहे.

## पाद्रीप्रेरित इतिहाससंशोधन

हिंदूंना हीनता देण्याच्या हेतूने लिहिलेले, खिस्तचरित्राच्या अनुकरणानें श्रीकृष्णचरित्राची पुराणकारानीं रचना केली असावी, असें प्रतिपादणारे पाद्र्यांचे

...२

आणि पाद्रीपेरित विद्वानाचे ग्रंथ पाहून स्कॉटलंडमधील सुप्रसिद्ध बुद्धिवादी तत्वज्ञ जे. एम्. रॉबर्टसन हे इतके चिडून गेले कीं त्याना स्वत.ला संस्कृत येत नसतानाही ‘ ख्रिस्त आणि कृष्ण ’ या विषयावर एक सुदीर्घ प्रबंध लिहून त्यानीं त्या सान्या संशोधकाचें कातडें पांघरलेल्या ख्रिस्ती प्रचारकाचे दात त्यांच्याच घशात घातले. आपल्या प्रबंधाच्या अतीं ते म्हणतात ‘The present research ought of course to have been undertaken in England by a Sanskritist. There did not seem however the slightest prospect of its being undertaken in England, since the few sanskritists are mostly in the universities, which in this country do almost no scholarly work that would be unwelcome to the church. We are still in the thick of bought scholarship, bought silence, bought orthodoxy; and even where our scholarship is not perverted by religious or paralysed by ecclesiastical control of endowment it is too often vitiated by the temper of conformity. In matters connected with religion you can not as a rule trust an English scholar to say what he knows ’ म्हणजे कृष्ण आणि ख्रिस्त याच्या पौर्वापर्याची चर्चा करणारा हा संशोधनात्मक प्रबंध वस्तुतः एखाद्या संस्कृतज्ञानें लिहायला हवा होता. पण इग्लंडातील कोणी संस्कृतज्ञ हा उद्योग हातीं घेतील ही कल्पनाच अगदीं असभवनीय होती. कारण या देशांत जे मुष्टिमेय संस्कृतज्ज्ञ आहेत, ते सारे विश्वविद्यालयातून गुतलेले आहेत आणि आमच्या विश्वविद्यालयातून धर्मगुरूंना न रुचणारें संशोधन सहसा कोणी हातीं घेत नाहींत. अजूनहि आमच्या देशात विकत घेतलेल्या विद्वानाचें, विकत घेतलेल्या मौनाचें आणि विकत घेतलेल्या पुराणप्रियतेचें प्रस्थ आणि प्राबल्य आहे. जेव्हा आमच्या विद्वानाचें संशोधन धर्मगुरूंच्या प्रभावानें विकृत अथवा विकलाग झालेलें नसतें, तेव्हासुद्धा अधिकारी संशोधकानीं आपल्या श्रेणींतील ( ट्रेड यूनियनमधील ) अन्य विद्वानाच्या विरुद्ध लेखन करावयाचें नाहीं या अलिखित संकेतानें तें दूषित झालेलें असतें. स्वधर्माच्या प्रतिष्ठेचा प्रश्न उद्भवला असता कोणीहि इंग्रज विद्वान् प्रामाणिकपणाने आपलें मत प्रकट करील, असा भरवसा बाळगणें सपशेल चूक आहे. जे. एम् रॉबर्ट्सन यानीं गेल्या शतकाच्या अंतीं हे उद्गार काढल्यानतर परिस्थिति थोडी बदलली असली तरी भारतीय इतिहास—

संशोधनाला तेव्हा लागलेलें वळण अद्यापि टिकून राहिलें आहे. ' वह रफ्तार बेढगी जो पहले थी सो अब भी है. '

जे. एम्. रॉबर्ट्सन यानीं सागितलेली ही वस्तुस्थिति सामान्य व्यवहारज्ञान असणाऱ्या कोणाहि हिंदूला सहज समजण्याजोगी आहे. पण इग्रजाच्या भारतीय इतिहाससशोधनाच्चीं सूत्रें लडनमधील भारतसाचिवाच्या कार्यालयातून कशीं हलत असत. याची एकतर आमच्या व्यवहारशून्य सस्कृतज्ञाना जाणीव नसे, किंवा आग्ल-प्रभूच्या कृपाकटाक्षासाटीं लोलुप झालेल्या विद्वानांना आपण स्वदेशबाधवाची प्रवचना करीत आहोत कीं काय या प्रश्नाचा गभीरपणाने विचार करण्याला कधीं सवडहि मिळत नसे. यापैकीं कोणत्या कोटींत कोणी पडावें, याचा निर्णय त्याचा त्यांनींच करावा. पण खिस्ती धर्मगुरूच्या प्रभावाने भारतीय इतिहास-सशोधनाला किती अनिष्ट वळण लागलें आहे, हें भावी इतिहासकारानीं लक्षात घेतल्यावाचून त्याना आपल्या देशाचा प्रामाणिक इतिहास लिहिणें अशक्य आहे. जे. एम्. रॉबर्ट्सन यानीं स्पष्ट शब्दात सागितलें आहे. ' It has been one of the most serious drawbacks to our knowledge of Indian antiquities that not only are the missionaries, to such a large extent, in possession of the field of research, but the scruples of English pietism, especially during the present century, tend to keep back all data that could in anyway disturb orthodoxy.' म्हणजे आधींच भारतीय सशोधनाचें फार विस्तृत क्षेत्र प्रत्यक्ष किंवा पर्यायानें खिस्ती धर्मप्रचारकाच्या तावडींत सापडलें आहे, त्यातूनहि इग्लडातील धर्मनिष्ठाना न रुचणारी ( अर्थात् हिंदुधर्माला भूषणभूत होणारी ) काहीं माहिती चुकून उपलब्ध झालीच, तर ती उजेडांतहि येत नाहीं.

## विक्रमादित्याचा अक्षम्य अपराध

प्राचीन भारतीय सम्राटापैकीं विक्रमादित्याने खिस्तजन्मापूर्वीच आपला सवत् प्रचलित केला, इतकेच नव्हे तर त्याच्या पुण्याईने अद्यापि तो टिकून राहिला आहे. या त्याच्या अक्षम्य अपराधाकरिता, पहिल्याप्रथम तो सवत् खिस्तकाला-पूर्वी प्रचलितच नव्हता, त्याचा प्रारभ खिस्तोत्तर ५४४ या वर्षीं झाला, असें प्रतिपादण्याचें साहस फर्ग्युसनसारख्या पाद्याच्या तत्रानें वागणाऱ्या अधिकाऱ्यानें कसें केले आणि त्याचा तो साहसी प्रयत्न फसल्यानंतर विक्रमसवत् हा खिस्तकाला-

पूर्वी अभावरूपानेंच अस्तित्वांत असलेल्या विक्रमादित्यानें स्थापिला नसून तो कदाचित् मालवगणाने, पण बहुतकरून शकपार्थवादि विदेशी सम्राटांपैकीं कोणी तरी स्थापिला असल्याचा प्रचार अद्यापि कसा चालू आहे, याचा प्रथमपासून परिचय असणाऱ्याना जे. एम्. रॉबर्ट्सन याची स्पष्टोक्ति पटल्यावाचून राहणार नाहीं. खिस्तापूर्वी संवत् चालू करण्याच्या अपराधामुळे खिस्त्याना ज्याचें ऐतिहासिकत्वसुद्धा खपत नाहीं, अशा विक्रमाचा राजकवि कालिदास असल्याचें त्याच्या प्रथावरून सुव्यक्त होत असल्यानें हिंदुद्वेष्ट्या खिस्त्याची वक्रदृष्टि त्याच्याकडेहि वळली आणि भिक्षु अश्वघोषाचीं काव्यें उपलब्ध झाल्यानंतर त्या भिक्षूच्या कवितेचें अनुकरण केल्याचा आळ कविकुलगुरूवर लादून त्यांनीं त्याचाहि काळ चारशें वर्षांनीं अलीकडे ओढला. कालिदासाने कोणाचें अनुकरण केलेंच असलें तर जगातील अत्यत नामांकित ग्रीक कवींचें अनुकरण केलें असल्याचें मी ' पूना ओरिएंटॅलिस्ट ' या त्रैमासिकाच्या एका अकात १९५८ मध्येंच दाखवून दिलें आहे आणि त्यामुळे चुकीच्या देशभक्तीला दुखविण्याच्या भीतीने प्रकाशक लोक प्रस्तुत प्रबध हातीं धरावयाचेंसुद्धा नाकारतात. पण हें विषयांतर विसरून कालिदासकालीन इतिहासाचा अभ्यास करावयाचा म्हणजे विक्रमपूर्वकालीन शुग राजाच्या इतिहासाकडे वळावें लागतें. कारण शुगाच्या इतिहासांतील अत्यत अभिमानास्पद अशा यवनविजयानतरच्या अश्वमेधानें त्याच्या मालविकाग्निमित्र या नाटकाची समाप्ति झाली आहे.

## इतिहासशास्त्रांतील क्लीब

शुगांच्या इतिहासासंबधीं मी जें विवेचन करणार आहे, तें शक्य तितकें सत्याला अनुसरून असलें तरी हिंदुत्वाच्या अभिमानानें प्रेरित असल्याने सकृद्दर्शनीं अनेकांना अनैतिहासिक वाटेल. पण अधिक अभ्यासानतर त्यांना स्वत.लाच त्याच्या सत्यतेचे प्रत्यतर पुरावे सुचू लागतील. अशा प्रकारें हिंदुत्वाच्या अभिमानानें प्रेरित होऊन इतिहासलेखन करण्यावरच कोणाचा आक्षेप असल्यास त्याच्या समाधानाकरिता सुप्रसिद्ध तत्वज्ञ बेनेदेत्तो क्रोचे याचे एक वचन इथें उतरून घेणें आवश्यक आहे. ' If the historian is to escape from this inevitable necessity of taking a side, he must become a political and scientific eunuch and history is not the business of eunuchs. ' म्हणजे प्रत्येक इतिहासकाराला त्याची स्वतःची काहीतरी भूमिका असतेच आणि अशी भूमिका

नसावीच असा जर कोणी आग्रह धरला तर त्यांना राजकीय आणि शास्त्रीयदृष्ट्या क्लीब बनण्यावांचून गत्यतंर नसतें. पण इतिहास हा असल्या क्लीबाचा विषय नव्हे. ' क्लैब्य मा स्म गमः पार्थ । '

## शुंगांची परंपरा

शुंगांच्या इतिहासांतील अज्ञानतिमिराला त्या कुलाच्या नांवापासूनच प्रारंभ होतो. कारण पुराणांनीं त्या कुलाचें नाव शुंग असें दिलें असलें तरी मालविकाग्निमित्रांतील अग्निमित्रानें ' दाक्षिण्य नाम बिंबोष्ठि बैंबिकाना कुलव्रतम् । ' या वचनांत आपल्या कुलाला बैंबिक ही संज्ञा लाविली आहे. पण या वचनाचा अर्थ असा करतां येईल कीं प्राचीन काम-देशातील ( अर्वाचीन काफिरिस्थान ) अलिशुंग या नदीतीरीं निवास करण्यामुळेंच बहुधा, ज्या कुळाला शुंग हें नाम लाभलें होतें, त्याचीच एक शाखा भारत येथील एका शिलालेखात उल्लेखिलेल्या बिंबिका नदीतीरावर स्थायिक झाली, तेव्हां त्या शाखेला बैंबिक हें नांव प्राप्त झालें. डॉ. हेमचंद्र रायचौधरी यानीं असें दाखविलें आहे कीं बौधायन श्रौतसूत्रांत बैंबिकि हे काश्यप असल्याचा उल्लेख आहे. त्याच्या उलट पाणिनींनीं शुंगाचें गोत्र भारद्वाज असल्याचा निर्देश केला आहे. पण बिंबिका नदीतीरावरील काश्यप स्वतःला बैंबिकि म्हणवीत असले तरी त्याच नदीच्या परिसरांत निवास करणारे भारद्वाज शुंग स्वतःला बैंबिक म्हणवू शकतील. अशी कल्पना केल्यास बैंबिकि आणि बैंबिक या नामसादृश्यामुळें शुंगाना केव्हां केव्हा काश्यप कां म्हणतात याचा उलगडा होऊ शकेल. ' औद्भिज्जो भविता कश्चित् सेनानीः काश्यपो द्विजः । अश्वमेध कलियुगे पुनः प्रत्याहरिष्यति ।। ' या हरिवंशाच्या भविष्यपर्वातील श्लोकावरून कलियुगात पुनश्च अश्वमेध प्रचलित करणारा पुष्पमित्र सेनानी काश्यप गोत्री असावा, असा अनेकांनीं तर्क केला आहे. पण या श्लोकातील काश्यप शब्दाचा काश्यपदेशीय अर्थात् काश्मिरी असाहि अर्थ करणें शक्य आहे असा अर्थ केल्यास शुंग भारद्वाजगोत्री असल्याच्या अष्टाध्यायींतील विधानाशीं विरोध येणार नाहीं आणि काश्मिरी कालिदासाला शुंगाचें इतकें प्रेम का, याचाहि उलगडा होईल. प्राचीन चरित्रकोशावरून असें समजतें कीं आंगिरसकुलोत्पन्न शुंग ऋषीच्या पुत्राला विश्वामित्र कुलातील शैशिर ऋषीनें आपला पुत्र मानलें, म्हणून हा द्वामुष्यायण म्हणजे द्विगोत्री आहे. पण हीं दोन गोत्रें अनुक्रमें भरद्वाज आणि कौशिक असल्याने शुंगाना कोठें कोठें काश्यप का म्हटलें आहे, याचा उलगडा होत नाहींच. तेंव्हा वंशब्राह्मणांत ' मद्रगारः

शौंगायनि: ' असा उल्लेख असल्यानें ' स्थितस्य गति: चिंतनीया ' या न्यायानें ते काश्मीर आणि मद्रदेश या मार्गाने विदिशेला आले होते, असें मानणें हाच या ब्रह्मघोटाळ्यातून सुटण्याचा मार्ग दिसतो. व्यक्तिश: पुष्यमित्राला काश्यप ही संज्ञा त्याच्या जन्मनक्षत्रावरूनहि लाभली असेल. कारण त्याच्या नावावरून तो पुष्प अथवा पुष्य नक्षत्रावर जन्मला होता, असें म्हणावें लागतें. त्याच्या कुळातील अग्निमित्र, वसुमित्र, बृहत्स्वातिमित्र इत्यादि नावें नक्षत्रावरूनच ठेविलीं आहेत. तेव्हा पुष्प अथवा पुष्य नक्षत्राचा अधिपति जो काश्यप प्रजापति, त्याच्या नक्षत्रावर जन्मलेला म्हणूनहि त्याचा पुत्र या नात्यानें पुष्पमित्र काश्यप होऊ शकतो. आर्य चाणक्यांच्या काळीं दक्षिणायन पुष्य नक्षत्रावर होत असल्याने पर्जन्यवृष्टि होण्याकरिता इंद्र आणि महाकच्छ यांची उपासना करावी, असें त्यानीं लिहून ठेविलें आहे. तेव्हा कच्छरूपी कश्यपाचा इंद्र हा पुत्र असल्याचा नेहमीच प्रत्यय येत असल्यानें त्या काळीं काश्यप ही संज्ञा इंद्र या संज्ञेच्या योग्यतेचीच असावी. महाभारतातील धर्म हा यमधर्माच्या नक्षत्रावर जन्मलेला म्हणून धर्मपुत्र, भीम हा वायूच्या स्वाति नक्षत्रावर जन्मला म्हणून वायुपुत्र, अर्जुन हा इंद्राच्या फाल्गुनी नक्षत्रावर जन्माला म्हणून इंद्रपुत्र, याच परंपरेंतील पुष्पमित्राचें काश्यप हें नाव असू शकेल. बृहत्संहितेंत मगधावर पुष्य नक्षत्राचा प्रभाव असल्याचा उल्लेख असून बुद्ध आणि अशोक यांचा जन्म त्याच नक्षत्रावर झाल्याची परंपरा ज्याना परिचित असेल, त्यानाच पुष्पमित्र या नावाचें ऐतिहासिक महत्त्व समजेल. कलियुगाला पुष्ययुग अथवा तिष्ययुग अशीहि एक संज्ञा आहे. ही संज्ञा बुद्ध, अशोक, अशोकाची कृत्या राणी तिष्यरक्षिता, पुष्पमित्र इत्यादींच्या जन्मनक्षत्रानें सार्थ ठरते ' धर्मः पादविहीनस्तु त्रिभिरंशैः प्रतिष्ठितः । त्रेतायां द्वापरेऽर्धेन व्यामिश्रो धर्म इष्यते ।। त्रिपादहीनस्तिष्ये तु सत्तामात्रेण तिष्ठते असें पराशर स्मृतींत म्हटलें असून ' तिष्ये मायामसूयाच वधचैव तपस्विनाम् । साधयन्ति नरास्तत्र तमसा व्याकुलेंद्रियाः ।। ' असें लिंगपुराणकर्त्यांनीं स्पष्ट सांगितलें आहे. असो. पुष्य नक्षत्रावर जन्मून मगध देशावर प्रभाव प्रस्थापित करणाऱ्या प्रभावसंपन्न व्यक्तींपैकीं पुष्पमित्र हा कालानुक्रमानें अंतिम असून त्याच्या कुलाच्या समाप्तीसहच तिष्ययुगाची अर्थात् कलियुगाची समाप्ति झाली. अशी विक्रमयुगाच्या प्रारंभीं सार्वत्रिक समजूत असल्यानें विक्रमसंवताला त्याच्या प्रारंभींच्या शतकातून कृत ही संज्ञा लाभली होती. या साऱ्या ऐतिहासिक परंपरा आमच्या अधिकारी इतिहासकाराना अद्यापि अविदित असल्यानें त्याना पुष्पमित्र नावाचें ऐतिहासिक महत्त्वहि समजत नाहीं आणि पुष्पमित्रानंतर लौकरच कृतयुग कसें चालू झालें, याचा उलगडाहि होत नाहीं.

## शुंगांची यवनविरोधी परंपरा

प्राचीन कामदेशातील, अथवा अर्वाचीन काफिरीस्थानांतील अलिशुग या नदीनामांत 'शुग' उपलब्ध होत असल्यानें त्या प्रदेशात त्याचें मूळचें निवासस्थान असू शकेल, अशी कल्पना वर केलीच आहे ती कल्पना खरी मानल्यास त्या दुर्गम प्रदेशाचा त्याग करून त्यानीं भारतातील सपाट प्रदेशात केव्हां प्रवेश केला असावा, असा प्रश्न उपस्थित होतो. खि. पू. ३२७ च्या सुमाराला ॲलेक्झाडरनें भारतावरील स्वारीच्या प्रपर्गी अलिशुग नदीच्या खोऱ्यातील आश्वायन आणि स्वात नदीच्या खोऱ्यातील त्याचे शेजारी अश्वकायन या गणांचा फार मोठ्या प्रमाणावर संहार केला. या युद्धात चाळीस सहस्र अश्वायनाना यवनांनीं युद्धबंदी करून त्याना दास म्हणून विकून विपुल धन मिळविलें. पण ॲलेक्झाडर भारतत्याग करून गेल्यानतर लगेच आश्वायनानीं यवनांवर असिलता उचलून त्याच्यावर लादलेला ग्रीक सत्रप नाकानोर याला मारून यवनविरोधी क्रांतियुद्धाचें रणशिंग फुकलें. त्याच्या उदाहरणानें प्रोत्साहित होऊन वायव्यसीमेवरील इतर गणांनींहि यवनसत्ता झुगारून दिली. या स्वातंत्र्ययुद्धाच्या काळात पुष्पमित्राच्या पूर्वजाचा चद्रगुप्त मौर्याशीं परिचय होणें शक्य आहे. त्यानतर महाभारतकारानीं ज्या अशोकाला अश्वनामक असुराचा अशावतार मानलें आहे, त्याच्या काळांत आश्वायन गणातील शुगाना त्याच्या सामतपरिवारात प्राधान्य लाभणें शक्य आहे. बिंदुसाराच्या राजवटींत अशोक हा राज्यपाल म्हणून अवती आणि विदिशा नगरींत निवास करीत असतांना पुष्पमित्राच्या एखाद्या पूर्वजावर अशोकाची कृपादृष्टि झाली असेल. त्यामुळें अशोकाच्या राजवटींत त्याला विदिशेच्या सामंतराज्याचा लाभहि झाला असेल. अशोकाच्या धर्मप्रचारकात सुपिंडोल भरद्वाजाचा उल्लेख येतो. त्याचा कदाचित् भारद्वाजगोत्री शुगाशीं संबंध असेल.

## दशार्णाचें बौद्ध मौर्याशीं वैर

अशोक कलिंगयुद्धात गुतला असताना त्याला इतर कोणत्याहि प्रांतांपेक्षां दशार्णप्रांताच्या सरक्षणाची चिंता करावी लागणें स्वाभाविक होतें. कारण मध्यभारतांतील दशार्णांचा एक बलिष्ठ उपनिवेश अर्वाचीन ओरिसा प्रातातील कटक नगरासनिधच होता. बृहत्सहिता, मार्कंडेयपुराणादि ग्रथातून पूर्वेकडील दशार्णांचा शबर आणि कटकस्थल यांच्यासह उल्लेख आला आहे. या पूर्वेकडील दशार्णांचा टॉलेमीनेंहि प्राचीन भारताच्या भूगोलात उल्लेख केला आहे; त्यामुळें कलिंगांतील

सनातनी हिंदूंचा संहार चालूं असतांना दशार्ण प्रांत शांत ठेवण्याचें कार्य अशोकानें अतिशय विश्वासांतील अधिकाऱ्यावर सोंपविलें असावें. अशोकाच्या निधनानंतर मौर्य साम्राज्याची जेव्हां पाटलीपुत्र आणि अवंती या राज्यांत वाटणी झाली, तेव्हांच्या सत्तासंक्रमणाच्या प्रसंगीं शुंगांनीं पाटलीपुत्रांतील केंद्रसत्तेचा पक्ष उचलून धरल्यामुळें त्यांना अवंतीशेजारच्या दशार्णाचें राज्य लाभलें असावें. संप्रती मौर्यावर रुष्ट झालेल्या व्यक्ति दशार्णभद्राच्या आश्रयाला गेल्याची कथा जैन परंपरेंत प्रसिद्ध आहे. ही बहुधा याच काळातील घटना असावी. अशा प्रकारें साम्राज्यसत्तेशीं एकनिष्ठ राहून शुंगकुलानें दशार्ण देशाचें राज्य संपादिलें असलें तरी अल्पावधींतच दशार्णदेशांतील पौरजानपदांशीं समरस होऊन त्या कुलाला मौर्यसाम्राज्याचा उच्छेद करावा लागला. शुंगकुलाच्या कर्तृत्वाला मुख्यतः दशार्ण देशाचा आधार असल्यानें प्रथम त्या देशाचा परिचय करून घेतला पाहिजे.

## दशार्ण देश

धृतराष्ट्रपत्नी गांधारी हिला दशार्णा असेंहि नांव असल्याने गांधार देशाकडूनच दशार्णनिवासी मध्यभारताकडे आले असावेत, असें अनुमान निघतें. या नांवातील अर्णांचा ऋग्वेदातील 'अर्णांचित्ररथावधीः' (४–३०–१८) या वचनांत उल्लेख आला असून याच्यापैकीं चित्ररथ हा चित्रळ प्रांत असल्यानें अर्णांची वस्तीहि त्याच प्रांताच्या आसपास असावी. काश्मीरच्या परिसरातील भाषागणनेंत ग्रीयर्सननीं अर्णी आणि चित्रळी या भाषांचा समावेश केला आहे. त्यावरून ऋग्वेदकालापासून आतापर्यंत हे दोन समाज त्या भागात टिकून राहिले आहेत, असें दिसतें. या अर्णांनींहि काश्मिरातून खालीं उतरून दशार्णासह मध्यभारतांत उपनिवेश स्थापिले असावेत. दशार्णांतील आर्यांच्या राज्याचा रामाच्या काळापासूनचा उल्लेख आढळतो. रामाच्या स्वर्गारोहणसमयीं शत्रुघ्नानें आपल्या दोघा पुत्राची अनुक्रमें मथुरा आणि वैदिश या नगरींच्या सिंहासनावर स्थापना केली. दशरथपुत्रांनीं दशार्ण देश जिंकण्यापूर्वीं तेथे काक या द्राविडी भाषा बोलणाऱ्या कुळाची वस्ती होती. या प्रांतातील काकांनीं रावणाच्या सीताहरणापूर्वींच सीतेला उपद्रव दिल्याची कथा सुंदरकांडात तिने स्वतःच हनुमंताला सांगितली आहे. या काकांना जिंकून दशरथकुलाने त्यांच्यावर आर्यांची सत्ता स्थापिली. दशार्णांच्या विदिशा राजधानीपासून अनतिदूर असलेल्या सांची नगरीचें मूळचें नाव काकनाड असेंच होतें, हें डॉ. भाऊ दाजी यांनीं दाखवून दिल्यापासून सर्व

संशोधकाना सुविदित झालें आहे दशार्णातील द्रविडभाषाभाषी काकाची सत्ता नष्ट झाल्यानंतर काही शतकें कुढत राहून पुढें त्यांनीं जैनांच्या दिगंबर पंथाची दीक्षा घेतली आणि ते दक्षिण भारतात आपल्या भाषाबधूंच्या भेटीला निघून गेले कालिदासकालीं दशार्णात काकदिगबरांची मोठी वस्ती असल्यामुळें त्यानें मेघदूतातील दशार्णवर्णनात ' नीडारभैः गृहबलिभुजा आकुलग्रामचैत्याः । ( नीडारभीं निरत बलि जे भक्षिती ग्रामचैत्यीं ) ' असा पर्यायानें काक दिगंबराचा उल्लेख केला आहे. इतकेंच नव्हे तर दशार्णात दिगबरांचें प्राबल्य असल्यानें त्या देशात श्वेताबर हंस परिमित दिवसच निवास करतात, असेंहि त्याने सागितलें आहे. ' संपत्स्यन्ते कतिपयदिनस्थायिहंसा दशार्णाः । ' ( त्यायोगे कीं परिमित दिनीं हंस सोडी दशार्ण. ) कालिदासाच्या या श्लोकात तत्कालीन दिगबर आणि श्वेताबर जैनांच्या कलहाचा सदर्भ आला असल्याची माहिती कर्नाटकातील महाकवि बेंद्रे यानीं मला वीस वर्षांपूर्वींच सागितली होती. त्यानतर दशार्णातील काकाचा उल्लेख निदर्शनाला आल्यानें तिची सत्यता मनाला पटली. दशार्णांच्या उत्तरेलाहि काकाची वस्ती होती, असें जेसलमीरच्या आसपास काक नदी असल्याच्या रजपुताच्या इतिहासातील उल्लेखावरून कळून येतें. श्वेत आर्यांचा काकांशीं सकर दशार्णातच घडून आला, अशा आशयाच्या कथा योगवासिष्ठांत आल्या आहेत. अवंतीच्या प्रद्योत राजाचा एक दास काक असल्याचें धर्मानद कोशाबींच्या बुद्धचरित्रावरून समजतें. असो. जैनातील दिगबर आणि श्वेताबर याच्या कलहाचा पुष्पमित्रचरित्राशीं संबंध येत असल्याने त्याचा इथें थोडा विचार केला पाहिजे.

## पुनर्जन्म–सिद्धांताचा सदुपयोग

' जैन धर्माचें हृदय ' या ग्रथात मिसेस सिंक्लेयर स्टीव्हन्सन यानीं लिहिलें आहे. ' Samprati tried to spread Jainism by every means in his power, but unfortunately, he quite demoralised the monks with the rich food he showered upon them. So the old leader of the community Mahagiri, saw all his hopes of winning the monks to lives of sterner asceticism overturned; and finding that remonstrance with Suhastin was of no avail he separated from him and withdrew to Dasharnabhadra where he committed suicide by voluntary starvation. ' या अवतरणाचा पूर्वापारसदर्भासह अर्थ

असा होतो कीं अशोकाच्या घराण्यातील सप्रती राजा उज्जयिनींत राज्य करीत असताना आर्य सुहास्तिन् नावाच्या जैन श्रमणाच्या प्रभावानें बौद्ध पाखडाचा त्याग करून जैन बनला आणि अशोकाशीं स्पर्धा करण्यासाठीं त्यानें जैन पथाच्या प्रसारार्थ विश्वप्रयत्न केले. पण त्यानें स्वतःच्या पक्तीलाच जैन श्रमणाना जेवायला बोलावण्याची प्रथा चालू केल्यामुळें नित्य घृतकुल्या आणि मधुकुल्या याचें सेवन करून ते सारे श्रमिण नीतिभ्रष्ट झाले. सुभाषितकारानीं म्हटलेंच आहे. ' शाल्यन्न सघृतं पयोदधियुतं भुंजन्ति ये मानवाः । तेषाम् इद्रियनिग्रहो यदि भवेत् विंध्यः तरेत् सागरे ॥' या साऱ्या भ्रष्टाचाराला आळा घालण्याकरिता महावीर सप्रदायाचे तेव्हाचे महागुरु महागिरि यानीं सुहस्तीला पुष्कळ उपदेश करून पाहिला. पण राजाश्रयाची चट लागलेल्या त्या चेल्यानें गुरूना असें उत्तर दिलें कीं पूर्वजन्मीं मी सप्रतीला पोट फुटेपर्यंत मिठाई चारली होती; त्या पूर्वकर्माचा परिपाक म्हणून आता मला राजाच्या पचपक्वान्नाचा आदर करणें आणि आस्वाद घेणें अपरिहार्य आहे. पुनर्जन्माच्या सिद्धाताचा हा सदुपयोग पाहून वृद्ध आचार्य महागिरि थक्कच झाले आणि आपल्या शिष्यवराना सुबुद्धि सुचण्याची आशा सोडून दशार्णभद्राला निघून गेले. या गुरुशिष्यापैकीं सुहस्तीचें देहावसान खि. पू. १८७ या वर्षीं झालें, असें जैन परपरा सागते. यावरून असें दिसतें कीं महागिरि दशार्णाला गेले, तेव्हा त्या देशात पुष्पमित्रच राज्य करीत असावा. त्यानें त्या तपस्वी महागिरीचें यथोचित स्वागत केलें असावें, असें त्यानें आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात दुर्वर्तनी बौद्ध भिक्षूचा उच्छेद केल्याच्या आख्यायिकेवरून वाटतें. सप्रती राजाच्या पचपक्वान्नाना झिडकारणारे महागिरि दिगबर होते, हें सागायला नकोच. श्वेताबर पथाची परपरा सागते कीं एकदा सप्रती राजा राणीसह विहारार्थ बाहेर पडला असताना राणीला समोर दिगबराचें दर्शन झालें. तेव्हा तिने त्या साऱ्या दिगंबराना तत्काळ सीमापार करण्याचा आग्रह धरल्यानें सप्रतीनें त्याना अवती प्रातातून घालवून दिलें. या दोनहि कथाचा निष्कर्ष एकच आहे. तो हा कीं अवंती प्रातात तेव्हा श्वेताबराचें प्राबल्य होते आणि दशार्णात दिगबराचें माहात्म्य होतें.

## द्विविध दिगंबरांचा गिरिविहार

मेरुतुगाच्या थेरावलीवरील प्रबधात डॉ. भाऊ दाजी यानीं असें दाखवून दिलें आहे कीं दिगबर आणि श्वेताबर याच्या परपरा महागिरि आणि सुहस्तिन् यांच्यापासूनच विभिन्न होतात. पादलिप्ताचार्यांच्या निर्वाणकलिका या ग्रथाच्या प्रस्ता-

वर्नेत श्री. मोहनलाल जव्हेरी यानींहि या उभयताच्या कलहापासूनच त्या दोन पथातील अतर वाढत गेलें, असा अभिप्राय व्यक्त केला आहे. या कलहातील जैन श्रावकाच्या नीतिभ्रष्टतेचा पुष्पमित्राच्या चरित्रावर परिणाम झाला असल्यानें त्याच्या इतिहासाकडे इथें इतकें लक्ष पुरवावें लागतें. असो. दशार्णभद्राकडे म्हणजे विदिशेला आल्यानतर महागिरींनीं त्या नगरीसन्निध ' नीचैः आख्य गिरिम् अधिवसेः तत्र विश्रामहेतोः । ' ( नीचैः नामें निकटचि गिरि तेथ विश्राति घेणें. ) या कालिदासाच्या भावी उपदेशाला अनुसरून तेथेंच निवास केला असावा आणि त्याच्या निवासामुळेंच विरोधप्रिय जनानीं त्या गिरीला त्याची कालिदासकालीन सज्ञा दिली असावी. त्या दिगबरमुनींच्या प्रायोपवेशनानतर विदिशेच्या कामदेवाच्या आराधनेला वाहून घेतलेल्या दिगबर नागरानीं त्या गिरीवर पण्यस्त्रीरतिपरिमल पसरविण्याला प्रारभ केला. हा सारा इतिहास लुप्त झाल्यानतर गुप्त कालात त्या गिरीला उदयगिरि हें नाव प्राप्त होऊन तेथें वेरूळच्या जातीची सुदर लेणीं खोदलीं जाऊ लागलीं.

## श्वेतांबरांचे कलहंससूरी

सुहस्तीच्या काळींच श्वेताबर पथात कलहससूरि नावाचे एक आचार्य असून प्रसगविशेषीं ते सुहस्तीच्या शिष्यगणाचाहि निग्रह करू शकत, असें प्रभावकचरित्रातल्या विजयसिंहसूरि प्रबधातील पुढील आर्यावरून दिसून येते.

" सकलकुसुमावचाय विचिन्वति प्रतिदिन जिनाचार्यैः ।
परसुरपूजनविघ्न विदधे सतापद लोके ।।
श्रीसघप्रार्थनया श्रमित् कलहससूरय. ता च ।
आर्य सुहस्तिविनेया सस्तभ्य निवारयामासुः ।। "

या आर्याचा साराश हा कीं नित्य सकाळीं उमलतील ती सारीं फुलें आपणच तोडून इतराच्या देवतार्चनात विघ्न आणण्याचें सतापजनक कृत्य जैनमुनि करूं लागल्यामुळें लोकात प्रक्षोभ होऊ लागला असता जैनसघाच्या विनतीवरून कलहससूरींनीं आर्यसुहस्तीच्या अनुयायाच्या या लुटालुटीला आळा घातला. श्वेताबरपथात या सूरींचा इतका प्रभाव असल्यानें त्याच्या नावावरूनहि त्या पंथाला हस हें नाव मिळणें शक्य आहे.

## दशार्णातील तीक्ष्ण धारेच्या असिलता

परलोकसाधनेच्या पथाला लागलेल्या जैनाचें हे पुष्पकलह अथवा शुष्क-

कलह चालू असतांना विदिशेचे राज्यकर्ते आपल्या देशाला सर्वोत्कृष्ट असिलता बन-विणाऱ्यांचें केंद्रस्थान करण्याच्या व्यवसायाला लागले होते. भारतांतील उत्खननां-तून उपलब्ध झालेल्या पोलादात विदिशेतील पोलाद अत्यत प्राचीन आणि अत्यंत उत्कृष्ट होतें, असा तज्ज्ञांचा अभिप्राय आहे. मध्ययुगीन आणि अर्वाचीन भारतांत ज्या सिरोहीच्या तरवारी सर्वोत्कृष्ट म्हणून प्रसिद्धीला आल्या, तें सिरोही संस्थान दशार्णाला लागूनच होतें. बौद्धजातकातून ' दशण्णकम् तिखिणधार असिम् । ' असा तेथील तिखट तलवारींचा उल्लेख आला आहे पुष्पमित्र, वसुमित्र यांच्या-सारख्या पोलादी पुरुषाना असल्या तीक्ष्ण धारेच्या असिलता उपलब्ध असल्यानंतर त्यानीं अजिंक्य यवनासकट सर्व शत्रूंवर विजय मिळवून अश्वमेधाचें पुनरुज्जीवन घडवून आणलें, यांत नवल काय ? दशार्णातील हत्तींचीहि प्राचीनकाळीं बरीच प्रसिद्धि होती. अर्थशास्त्रात अग आणि कलिंग येथील हत्ती पहिल्या प्रतीचे, कारूष, दशार्ण आणि अपरान्त येथील हत्ती दुसऱ्या प्रतीचे आणि सौराष्ट्र, पचजन-प्रदेशातील हत्ती तिसऱ्या प्रतीचे असल्याचा उल्लेख केला आहे. महाभारतांत दशार्णाचा राजा क्षत्रदेव हत्तीवर बसून भगदत्ताशीं लढल्याचा उल्लेख येतो. पुष्प-मित्राच्या चरित्रात हस्तियुद्धाचा सदर्भ कोठे भेटत नाहीं. पण महाभारतातील भगदत्त हा यवनराज आपोलोदोतुस् असावा, अशी कल्पना काहीं सशोधकांनीं पुढें मांडली आहे. ती खरी असल्यास त्याला दशार्णातील श्रेष्ठ गजदलाकडून मार खाऊन प्राणत्याग करावा लागला, असें म्हणता येईल. पुरु राजाच्या हत्तींचा अलेक्झाडरनें पराजय केला असला तरी ते केवळ पचजनप्रदेशातील तिसऱ्या प्रतीचे गज होते. याच गजाची सेलेउकुसच्या राज्यांत निर्यात करून चाणक्य–चद्र-गुप्तानीं त्याला त्याच्या पश्चिमेकडील शत्रूशीं लढण्याला प्रोत्साहन दिले. अति परि-चयानें या हत्तींचे सारे गुणदोष कळून आल्यानतरच बाल्हीक प्रातांतील यवन राजानीं मौर्य साम्राज्यावर मोठ्या प्रमाणावर आक्रमण केलें. पण त्याना माध्यमिकेच्या वेढयात दशार्णातील दुसऱ्या प्रतीच्या हत्तींची आणि साकेत येथील वेढयात, तसेंच पाटलीपुत्रावरील स्वारींत अगकलिंगातील पहिल्या प्रतीच्या हत्तींची युद्ध-कुशलता आणि युद्धप्रियता यांचा अनुभव आल्यामुळेच पुष्पमित्राला पाठ दाख-वावी लागली असेल. महाभारतांत एके ठिकाणीं दशार्णाचा माध्यमिकांसह उल्लेख येतो. या माध्यमिकाशीं पुष्पमित्राचें सख्य असून त्या नगरीला यवनांचा वेढा पडला असताना तेथील नागरिकानीं निकराचा प्रतिकार करून दशार्णावर यवनाना आक्रमण करू दिलें नाहीं.

## दशार्णांत कृष्णभक्तीचें केंद्र

दशार्णांची राजधानी विदिशा ही रघुकुलानें स्थापिली असल्यानें आणि या स्थापनेचा दिन श्रावण शुक्ल पक्षांत पाळण्याची तेथे प्रथा असल्यानें त्या नगरींत रघुकुलाचें गुणगान प्रामुख्यानें होत असलें तरी त्या प्रांतात सात्वत कुलाची वसती मोठ्या प्रमाणावर असल्याने दशार्ण हें कृष्णभक्तीचें एक प्रमुख केंद्र बनलें होतें. मध्यभारतांतील दशार्णांनीं विदिशेला आलेल्या यवनराजदूतालाहि ( हेलिओडोरस् ) भागवत धर्माची दीक्षा दिली, यावरून त्या प्रांतातील कृष्णभक्तीच्या प्रभावाची कल्पना येते. मौर्यशातवाहनकालाच्या इतिहासकारांनींहि त्या कालात शूरसेन आणि दशार्ण हीं कृष्णभक्तीचीं प्रमुख केंद्रें असल्याचा उल्लेख केला आहे. विदिशेशेजारच्या अवंती नगरींत गोविंदस्वामी आणि विक्रमस्वामी नांवाचीं नामांकित देवालयें असल्याचा उल्लेख ब्रह्मपुराणात येतो.

## पुरीचा जगन्नाथ आणि प्रेतपुरीचा नाथ

मध्यभारतातील दशार्णांनीं उत्कलकालिंग प्रांतातून जेव्हा आपला उपनिवेश स्थापिला, तेव्हा त्यांनीं तेथें पुरुषोत्तम या नावानें श्रीकृष्णाची उपासना रूढ केली, त्यामुळें जगन्नाथपुरीला ब्रह्मपुराणादि ग्रंथांतून पुरुषोत्तमक्षेत्र अशी संज्ञा दिली आहे. भगवद्गीतेच्या पंचदश अध्यायाला पुरुषोत्तमयोग हें नाव असून त्यावरूनच कृष्णाचें पुरुषोत्तम हें नाव रूढ झालेलें दिसतें. पुढें अजापाळ बुद्धानें जेव्हा गोपालकृष्णाचें अवतारपद आत्मसात् केलें, तेव्हा त्याच्या अनुयायांनीं त्याला कृष्णाप्रमाणेंच भगवान् आणि पुरुषोत्तम या नावांनीं संबोधण्याला प्रारंभ केला. श्री. दामोदरपंत कोशाबींनीं वरील विधानाच्या उलट प्रतिपादन केलें आहे. पण अलेक्झांडरच्या आगमनापूर्वींच भगवद्गीता हा सनातनधर्माचा पूज्य ग्रंथ बनला असल्याचें सिद्ध झालें असल्यानें त्या ग्रंथाला तेव्हा इतकी मान्यता प्राप्त होण्याला तो तत्पूर्वीं कित्येक शतकांपासून प्रचलित असावा, हें उघड आहे. कृष्णाच्या भगवान् आणि पुरुषोत्तम या दोनहि पदव्यांचा भगवद्गीतेंत उल्लेख असल्यानें त्या बुद्धाला मागाहून लाविल्या, हें निश्चित आहे. पुरुषोत्तमक्षेत्रातील संकर्षण, कृष्ण आणि सुभद्रा यांच्या मूर्ति अनुक्रमें श्वेत, श्याम आणि पीत वर्णांच्या असाव्यात, असाहि संकेत ब्रह्मपुराणानें सांगून ठेविला आहे. तेव्हा गोरे आर्य, काळे द्रविड आणि पिवळे किरात या तीनहि वर्णांना वर्णविद्वेष विसरून पुरुषोत्तमाच्या उपासनेंत समरस होतां येत असलें पाहिजे. पुरी येथील सुभद्रेच्या उपासनेवर श्री. जोगेंद्रचंद्र घोष

यांनीं बंगाल्यातील रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुखपत्रांत ( खंड दुसरा ) एक महत्त्वाचा लेख लिहून एकानंशा या यदुकुलाच्या कुलदेवतेचें सुभद्रेच्या उपासनेंत कसें रूपांतर झालें, याचें विवरण केलें आहे. तेव्हां पुरी येथील संकर्षण, श्रीकृष्ण आणि सुभद्रा यांची उपासना त्या प्रांतांत उपनिवेश स्थापिणाऱ्या यदुकुलाच्या एका शाखेनेंच प्रचलित केली असावी, हें उघड आहे. या देवतात्रयीवरूनच कृष्णोपासनेला एकमेवाद्वितीयम् असें स्वरूप महाभारत, हरिवंशादि ग्रंथांनीं प्राप्त करून देण्यापूर्वी ही उपासना प्रचलित झाली असल्याचें कळून येतें. या उपासनेचें केंद्र जें पुरी, येथील पुरुषोत्तमक्षेत्र, हें शाक्यसिंहाच्या अनुयायांना नित्याचें आव्हानच होतें. कारण शाक्यपंथी लोक बुद्धाला भगवान् आणि पुरुषोत्तम या पदव्या लावीत. पण ' हरिर्यथैकः पुरुषोत्तमः स्मृतः महेश्वरस्त्र्यंबक एव नापरः । ' या वचनांत कालिदासानें घोषणा केल्याप्रमाणें पुरुषोत्तम शब्द भलत्यासलत्यांना वापरू न देण्याचा वृष्णींचा निर्धार होता. गया येथील बोधिवृक्षाप्रमाणेंच पुरी येथील पुरुषोत्तमाचा एक न्यग्रोध वृक्ष असून त्याला नुसती प्रदक्षिणा केल्यानेंहि मुक्ति मिळते, अशी कृष्णभक्तांची भावना होती. पुरी येथील पुरुषोत्तमाच्या दर्शनानें आणि तेथील न्यग्रोध वृक्षाच्या प्रदक्षिणेनें सर्वांनाच मुक्ति मिळू लागल्यामुळें चिडून प्रेतपुरीचा नाथ पुरीच्या जगन्नाथाकडे आला आणि त्यानें त्याला लतावृक्षांत लुप्त होण्याची सूचना केली, अशी आख्यायिका ब्रह्मपुराणकर्त्यांनीं सांगितली आहे. या आख्यायिकेचा ऐतिहासिक अर्थ अगदीं उघड आहे. ओरिसांतील प्रजेचा अतिशय मोठ्या प्रमाणावर आपण संहार केल्याचें वर्णन ज्या अशोक राजानें शिलाशासनांतून कोरून ठेविलें आहे, आणि ज्यानें आपल्याला अनिष्ट असलेल्या व्यक्तींचा नरकतुल्य छळ करण्याकरितां पृथ्वीवरच नरक स्थापला होता, असें अशोकावदान, दिव्यावदान इत्यादि बौद्ध ग्रंथांवरून सुविदित झालें आहे, त्या अशोक राजाचेंच हें कृत्य अशोकाच्या कलिंगावरील स्वारींत पूर्वेकडील दशार्णांनीं त्याला प्राणांतिक प्रतिकार केल्यामुळेंच त्याच्या शकयवनपल्लवप्रधान सैन्यानें त्या दशार्णांसहच त्यांच्या पुरुषोत्तमक्षेत्राचा संपूर्ण विध्वंस केला होता, ही गोष्ट लक्षांत घेतल्यावाचून मध्यभारतांतील दशार्णांचा राजा पुष्पमित्र सुदूर मगध देशांतील सिंहासनावर कसा सुस्थिर होऊं शकतो, याचा उलगडा होत नाहीं. पूर्वेकडील दशार्णांचा बलिष्ठ आधार असल्यामुळेंच पुष्पमित्राला मगध साम्राज्याचा अधिपति होतां आलें. पूर्वेकडील दशार्णांचे पुष्पमित्रकुलाशीं किती निकटचे संबंध होते, हें त्याच्या वंशजांतील ओद्रक या राजाच्या नांवावरून कळून येतें. हा राजा ओरिसाच्या घराण्यांतून कदाचित् दत्तक घेतला असेल, अथवा त्या प्रांतांत

जन्मल्यामुळें त्याला तें नाव प्राप्त झालें असेल. या नावानें दोन दशार्णांचें भावानात्मक ऐक्य सुव्यक्त होतें, हें उघड आहे. उज्जयिनीच्या इंद्रद्युम्न राजानें जगन्नाथपुरीला येऊन एका काकाच्या साहाय्यानें पुरुषोत्तम क्षेत्राची पुनः प्रतिष्ठा केली, या ब्रह्मपुराणातील आख्यानावरूनहि अशोकाच्या कलिंगसंहारानंतर तेथील कृष्णोपासनेचा ' पुनश्च हरि ओम् ' झाला असल्याचें कळून येतें.

## एकानंशेची उपासना

वरील विवेचन लिहून झाल्यानंतर १९५९ च्या इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्लीतील एकानंशा देवीच्या उपासनेवरील श्री. श्यामचंद्र मुखोपाध्याय यांचा लेख अवलोकनांत आला. या लेखांतील संदर्भांच्या अनुरोधानें शोध केला असतां असें कळून येतें कीं, कृष्णाचा पिता वसुदेव आणि त्याचा गोकुळांतील पिता नंद हे उभयतां कश्यपाचे अवतार. कश्यप हा पुष्य नक्षत्राचा अधिपति. यामुळें यशोदेच्या उदरीं जन्माला आलेल्या एकानंशा देवीचा रथोत्सव आषाढ शुद्ध द्वितीयेला पुष्य नक्षत्रावर करीत असत. या तिथीला कधीं पुनर्वसु नक्षत्र येतें, तर कधीं पुष्य नक्षत्र येतें. पतंजलींच्या महाभाष्यांत ' यस्तिष्यस्तौ पुनर्वसू येषां त इमे तिष्यपुनर्वसव उन्मुग्धाः । ' असें एक वचन येतें. या वचनांत जें पुष्य नक्षत्र तेंच पुनर्वसु नक्षत्र होय, असें जे मूढ लोक समजतात, त्यांना तिष्यपुनर्वसवः अशी संज्ञा असल्याचें सांगितलें आहे. ज्यांना आकाशाचें अवलोकन करण्याची सवय आहे, ते कधींच तिष्य आणि पुनर्वसु एकच होत, असें म्हणणार नाहींत. तेव्हां असें असूनहि हा शब्दप्रयोग प्रचारांत आला असला तर त्याचें मूळ एकानंशेच्या वर उल्लेखिलेल्या रथोत्सवांत असावें, असें वाटतें. हा रथोत्सव मागें पडल्यानंतर त्या वाक्प्रचाराचा मागमूसहि उरलेला नाहीं. एकानंशेची उपासना ही शक्तिउपासनेंतूनच उद्‌भवली असावी, असं वरील लेखकाचें मत मलाहि मान्य आहे. ही गोष्ट भासाच्या बालचरित या नाटकांत स्पष्ट सांगितलीहि आहे. ' शुंभ निशुंभ महिषं च हत्वा । कृत्वा सुरान् तान् हतशत्रुपक्षान् ॥ अहं प्रसूता वसुदेववंशे कात्यायनी कंसकुलक्षयाय ॥ ' या वचनावरून शुंभनिशुंभ आणि महिषासुर यांचा वध करणाऱ्या देवीची उपासना रूढ झाल्यानंतर कृष्णभगिनी कात्यायनीची उपासना जन्माला आली, असें कळून येतें. कात्यायनी हीच कात्यायनी देवी असून तें एकानंशेचेंच एक नाव आहे. या नावासंबंधीं माझी अशी एक कल्पना आहे कीं, प्राचीन काळीं साबरमती नदीला कृतवती असें नाव होतें आणि तेव्हां कृत नामक कुलाचे लोक त्या नदीच्या

सभोवतालच्या प्रदेशांत रहात असावेत. या कृताचा कृतवीर्य आणि कार्तवीर्य या राजाच्या नावात संदर्भ येतो. याच परपरेंतील कात्यायनी हें नाव असून त्याचेंच परिवर्तन कात्यायनी नांवात झालें. बलरामाच्या सहोदर बधूत एक कृत असून त्याच्या सावत्र भावात एक कृतक होता. यादवातील कृतवर्मा हा भारतीय युद्धामुळें अमर झालाच आहे. यदुकुलाचा अंगिरसाशीं निकटचा संबंध असून त्याच्यात कृतयशस् आणि कृतवाच् हे मंत्रकार होऊन गेले. कात्यायनी एकानशा ही यदुकुलाची कुलदेवता असल्याचा उल्लेख हरिवंशात स्पष्टच येतो. ' ही देवी प्रजापतीचे अंशापासून पूर्वीं योगबलानें निर्माण झाली असून ती केशवाच्या रक्षणार्थ पुनरपि भूतलावर अवतीर्ण झाली होती. ती जन्मानंतर पुनश्च स्वर्गात जाऊन दिव्य शरीर धारण करून कृष्णाचें संरक्षण करीत असते. यामुळें यादवरूपानें निर्माण झालेले देव तिची पूजा करीत असतात. हीच योगमाया स्वर्गांत इंद्राची भगिनी होऊन कौशिकी या नावानें ओळखली जाते. ' म्हणजे कुशिक कुळात कौशिकी, यदुकुळात यादवी, कृतात कात्यायनी इत्यादि तिचींच नावें होतीं. मूलतः ही आकाशातील कन्याराशि असून ग्रीक–रोमन समाजांत जूपिटरची भगिनी म्हणून प्रसिद्ध होती. तिची परंपरा अशी अति प्राचीन असल्यानें श्री. मुखोपाध्यायाप्रमाणें खिस्तोत्तर काळात तिचीं आख्यानें प्रचलित झालीं, असें समजणें चूक आहे. उलट माझें म्हणणें असें आहे की, कृष्ण, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध, या चतुर्व्यूहाची अथवा त्याच्यात सांबाचा समावेश करून पंचवृष्णिवीराची उपासना भागवत पंथात रूढ होण्यापूर्वीं एकानंशेची उपासना प्रचलित झाली असली पाहिजे. पांचाल मित्र राजांपैकी घोष मित्राच्या नाण्यावर एकानंशा देवीचीं चित्रें असल्याचें प्रतिपादन डॉ. जे. एन्. बानर्जी यानीं भारतीय मूर्तिविज्ञानावरील ग्रंथात केलें असून तो त्याचा महत्त्वाचा शोध आहे. पुष्यमित्राच्या जन्मनक्षत्रावरच एकानंशेचा रथोत्सव करीत आणि त्याच्या वंशातील राजाच्या नाण्यावर या देवीचीं चित्रें आढळतात, या गोष्टी लक्षात घेतल्या म्हणजे तो सेनापति भगवद्गीतेचा अभ्यासक होता, या भविष्यपुराणांतील विधानाला विशेष महत्त्व द्यावें लागतें. ' कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन । ' या गीतावचनाला धरून त्याचें वर्तन असल्यानें त्यानें मौर्यांच्या सम्राट्पदाचा अभिलाष केला नाहीं, ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. पुष्यमित्र हा सामवेदी ब्राह्मण असून सामवेदाच्या छांदोग्योपनिषदातच देवकीपुत्र कृष्णाला घोर आंगिरसाने उपदेश केल्याचा अतिप्राचीन उल्लेख येतो. एकानंशा ही प्रथम अंगिरा महर्षींची कुहूनामक कन्या होती, असें महाभारताच्या आरण्यक पर्वावरून समजतें.

## यम आणि धर्म

अशोकराजाच जगन्नाथपुरीचा यम असल्याचा पुरावा पाहून अधिकारी इतिहासकारांचें पित्त खवळण्याचा संभव आहे. पण त्यांनीं ही गोष्ट लक्षांत घ्यावी कीं यम हा नुसता यम नसून यमधर्मही असतो. अशोकाचें यमस्वरूप आणि धर्म-स्वरूप हीं एकाच नाण्याचीं दोन अंगें आहेत. आपल्या बौद्ध राज्यकर्त्यांना नावडणाऱ्या घटनाचा इतिहासात उल्लेख करावयाचा नाहीं, असा अधिकारी इतिहासलेखकांचा संकेत आहे. तो संकेत त्यानीं अवश्य पाळावा. त्यांच्या संकेत-पालनामुळें ऐतिहासिक साधनाच्या आधारानें मी जें विवेचन करीत आहे, तें निराधार असल्याचा पूर्वग्रह वाचकानीं करून घेऊं नये, एवढेंच माझें त्याना सांगणें आहे. ब्रम्हपुराणात वर्णिल्याप्रमाणें जगन्नाथपुरीला यम या नात्यानें आलेला अशोकराजा हा भिक्षुसंघाच्या हातांतील केवळ बाहुलें बनला होता. भारतीय पुरातत्व विभागाचे पहिले प्रमुख जनरल कनिंगहॅम लिहितात. 'The large monastic establishments instituted by Ashoka, possessed all the learning and much of the wealth of the land. Their influence was everywhere superior to the power of the king, and the people deposed and accepted their monarchs at the bidding of the monks' म्हणजे अशोकानें देशभर स्थापलेल्या विहारातून समाजांतील पुष्कळशी विद्वत्ता आणि संपत्ति एकत्रित झाली होती. त्यामुळें साऱ्या देशात राजाच्या प्रभावापेक्षा भिक्षुसंघाचा प्रभाव बलवत्तर ठरला होता आणि भिक्षूंच्या आदेशाप्रमाणें लोक राजाना मान्यता देत, अथवा त्यांना पदच्युत करीत. हें वातावरण शाक्येतर पंथांच्या छळाला कारणीभूत झालें असलें पाहिजे, याविषयीं शंका नाहीं. पं. जवाहरलाल नेहरूंनींहि आपल्या ।।च्या इतिहासांत असाच निष्कर्ष काढला आहे.

## अहिंसा, आलस्य आणि आक्रमण

अशोकासारख्या एकेकाळीं आत्यंतिक हिंसेला वाहिलेल्या राजांनीं पुढें पश्चात्ताप पावून आत्यंतिक अहिंसेचा पुरस्कार आरंभिला आणि अजापाळ बुद्धाला आपलें आराध्यदैवत बनावेलें तरी तेवढयानें त्याच्या पूर्वकर्मांचा विपाक थांबत नाहीं. अशोकासंबधीं माझ्यासारख्या हिंदुत्वनिष्ठानें केलेलें विवेचन पूर्वग्रहदूषित

...३

दिसण्याचा संभव असल्यानें असल्या प्रश्नासंबंधीं इतिहासाचार्य टॉयनबींनीं केलेलें क्लिष्ट पण बोधपर विवेचन उतरून घेणेंच सोयीचें होईल. 'So it is with a society that has once sought salvation through the sword. Its leaders may repent of their butcher's work, they may show mercy on their enemies like caeser, and demobilise their armies like Augustus, and as they ruefully hide the sword away they may resolve that they will never draw it again except against criminals at large within the borders, or barbarians who attack the borders. .. exposed or buried these bloodstained weapons will retain their sinister charge of Karma and this means that they cannot really turn into inanimate foundation-stones. Under its serene mask of effortless supremacy the oecumenical peace of a universal state is fighting all the time a desperate loosing battle against an unexorcised demon of violence in its own bosom and we can see this moral struggle being waged in guise of a conflict of Policies'. म्हणजे एखाद्या समाजातील राज्यकर्त्यांनीं सीझरप्रमाणें आपल्या वैयक्तिक शत्रूंना दया दाखविली, अथवा ऑगस्टसप्रमाणें आपल्या बहुसंख्य सैन्याचें विसर्जन केलें आणि स्वसमाजातील मोकाट सुटलेल्या अपराध्यांविरुद्ध किंवा सीमेपलीकडील रानटी शत्रूंच्या आक्रमणाविरुद्धच तेवढें शस्त्र उचलण्याचा त्यांनीं संकल्प केला तरी त्या शस्त्राचा कर्मविपाक कांहीं त्यांना चुकविता येत नाहीं. अथवा त्यांनीं आपलीं शस्त्रें खोल पुरलीं तरी त्याचें साम्राज्य-प्रासादाला आधार देणाऱ्या पायाच्या पाषाणांत परिवर्तन होत नाहीं. असल्या साम्राज्यात वरकरणीं शांतते नांदत असली तरी त्या शांतीचा हिंसेच्या पुरस्कर्त्यांशीं गुप्त पण अखंड, हताश संग्राम चालू असतोच आणि हा संग्राम धोरणातील प्रभेदाच्या स्वरूपांत लोकांत प्रकटहि होत असतो. या सतत संग्रामात शांततावाद्यानाच कां हरावें लागते, याची मीमांसा वाल्टर सॅव्हेजलँडोर यानीं मोठ्या मार्मिकपणानें केली आहे. 'The interest of such men requires that the spirit of arms and of arts be extinguished. They will predicate peace so that the people may be tractable to them, but a religion all-

together pacific is the fomenter of wars and the nurse of crimes alluring sloth from within and violence from afar. म्हणजे समाजातील लढाऊ वृत्ति आणि कलाची आवडहि नष्ट होण्यांतच (अशोकपंथी) राज्यकर्त्यांचें हित असते. लोकाना ' मुकीं बिचारीं कुणी हका ' असीं मेंढरें बनविण्याकरिता ते अहिंसा आणि शाति याचा पुरस्कार करीत असतात. पण सर्वस्वीं शातिप्रधान आणि अहिंसाप्रधान धर्मामुळेच अतर्गत अत्याचार आणि बाह्य युद्धें याना उत्तेजन मिळतें. कारण शातीच्या तत्त्वज्ञानापासून एकाच काळीं देशातील आलस्याचीं आणि विदेशातील आक्रमणाचीं पिशाचें आकर्षिलीं जातात. अशोकपथी राज्यकर्त्यांसबधीं चर्चा करिताना सेनापति जे. एफ् सी. फुल्लर यानींहि म्हटलें आहे. ' This policy of containment in contradistinction to expansion had a profound moral effect on the legions. As their purpose was now to maintain peace , and not to make War, their valour which formerly was stimulated by patriotism or plunder, gradually deteriorated. First the growth of pacifism through loss of fear, led to the recruitment of fewer and fewer citizens and of more and more barbarians in order to keep the legions upto establishment Secondly a most pernicious form of militarism crept in the dependence of the emperors' political status on the will of the army.' आक्रमणाच्या धोरणाचा त्याग करून आत्मसरक्षणाच्या धोरणाचा अगीकार केला म्हणजे आत्मसरक्षणाची नेमकी मर्यादा कोणती, यासबधीं अनत मतभेद होऊन सैन्याची एकी आणि विश्वास नष्ट होतो आणि त्याच्या पराक्रमाला देशभक्तीच्या भावनेनें आणि कनककामिनींच्या अपेक्षेनें जी धार येते, तीहि नष्ट होते. शातीच्या तत्त्वज्ञानानें देशात सुरक्षिततेची भावना दृढमूल झाली म्हणजे सुसस्कृत नागरिक सैन्यात प्रवेश करीत नाहींत मग शाततावादी महामूर्खांचें साम्राज्य आत्मसात् करण्याच्या इच्छेनें सीमेवरील अथवा सीमेपलीकडील रानटी लोकच साम्राज्यसेनेंत प्रवेश करून लौकरच सम्राटाचें अस्तित्व केवळ आपल्या लहरीवर अवलबून असल्याचा प्रत्यय त्या शाततावाद्याना आणून देतात. अशोकानतर मौर्य घराणें पाटलीपुत्रात सरासरी चाळीस ते पन्नास वर्षें राज्य करीत होतें. एवढ्या अवधींत त्या कुळांत विष्णुपुराणाच्या मताप्रमाणें सात आणि कै. देवदत्तराव

भांडारकराच्या मताप्रमाणें सहा सम्राटांनीं राज्य केलें. या संख्येवरूनहि त्याचें अस्तित्व मौर्य सैन्यांतील केशीदानवांच्या लहरीवर अवलंबून होतें, असाच निष्कर्ष निघतो. सरतेशेवटीं त्या साम्राज्यातील सुसंस्कृत नागरिकाच्या सेनेचा प्रमुख पुष्प-मित्र यानें रानटी सेनेच्या हातातील बाहुलें बनलेल्या बृहद्रथाचा वध करून या अराजकाची परिसमाप्ति केली.

## देवसेनेचें आक्रंदन

पुष्पमित्राच्या उदयापूर्वी मौर्य सेनेंतील स्वदेशी सैनिकांची जी केविलवाणी परिस्थिति झाली होती, तिचें वर्णन महाभारताच्या आरण्यकपर्वातील स्कंदाख्या-नाच्या प्रस्तावनेंत आलें आहे. तिथें एका सुंदर स्त्रीला केशी दैत्य ओढून नेत असलेला पाहून इंद्रानें तिची विचारपूस केली असता तिने सांगितलें, ‘ अहं प्रजापतेः कन्या देवसेनेति विश्रुता। भगिनी मे दैत्यसेना सा पूर्वं केशिना हृता॥ नित्यं चावां प्रार्थयते हर्तुं केशी महासुरः। इच्छत्येन दैत्यसेना न चाहं पाकशासन॥ ’ या अर्थपूर्ण रूपकावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं त्या काळीं भारतीय सैन्यांत सीमे-वरील अरण्यपर्वतवासी जनांची आणि सीमेपलीकडील शकयवनपल्लवादिकांची मोठ्या प्रमाणावर भरती झाली होती. या साऱ्या सैनिकाचे सेनापति त्यांच्यातीलच केशी दानव असणें स्वाभाविक आहे. पण एकदा ते साम्राज्यसेनेंत बद्धमूल झाल्या-नंतर त्यांना देशी सेनेच्याहि सेनापतिपदाचा अभिलाष उत्पन्न झाला. तेव्हा देव-सेनेनें अर्थात् भारतीय सुसंस्कृत नागरिकाच्या सेनेने आक्रंदन करून इंद्राला अर्थात् मौर्यसम्राटाला आपलें संकट निवारण करण्याची प्रार्थना केली. इराणात ग्रीक राज्य प्रस्थापित होण्यापूर्वीं तेथील हखामणी राजाच्या सैन्यात भाडोत्री ग्रीक सैनिक मोठ्या प्रमाणावर प्रथम प्रवेश करीत आणि मग त्या देशांतील राज्यक्रांतीच्या कारस्थानां-तून प्रामुख्यानें भाग घेत असत. पुढें अलेक्झांडरच्या काळीं इराण देश यवनांच्या पचनीं पडल्यानंतर कालांतरानें त्यांनीं मौर्य भारतावरहि हाच प्रयोग आरंभिला असला पाहिजे. कलिंगयुद्धाच्या प्रसंगींच अशोकानें आपल्या सैन्यात सीमेपली-कडील शत्रुराष्ट्रातील शकयवनपल्लवादिकांची मोठ्या प्रमाणावर भरती करण्याची राष्ट्रघातकी नीति अवलंबिली असली पाहिजे. अशोकानें प्रथम भ्रातृसंहार करून राज्यसंपादन केलें आणि त्यानंतर त्या भ्रातृसंहाराचाच उर्वरित भाग म्हणून कलिंगसंहार करून त्याचें संरक्षण केलें. कलिंगातील घोर संहारांत शकयवनपल्ल-वादिकांच्या भाडोत्री सेनेनें आसुरी लालसेनें आणि उत्सुकतेनें भाग घेतला असावा.

तेव्हा त्या सेनेचें ऋण फेडण्याकरितांहि अशोकानें सीमेवरील आणि सीमेपलीकडील प्रातातून राजपथ बाधणें, विहिरी खणणें, धर्मशाळा आणि नर-पशूंची चिकित्सालयें स्थापणें यासारखीं कृत्यें करून त्या परशत्रूंच्या भारतावरील आक्रमणाच्या मार्गावर पायघड्या पसरण्याचा उद्योग केला असावा. कलिंगयुद्धापूर्वीच बौद्ध होऊन त्यानें यवनांची आराधना आरंभिली होती, हें मी अन्यत्र दाखविलें असल्यानें त्याची येथें पुनरावृत्ति करीत नाहीं. ( अशोकचरित्राचा पुनर्विचार 'सह्याद्रि मे १९५६ ) पी. एगेरमोंट यांच्या ' अशोकचरित्राची कालगणना ' या ग्रंथातहि कलिंगयुद्धापूर्वी अशोक बौद्ध झाला, असेंच प्रतिपादन केलें आहे.

## बौद्धयवनांची युति

मौर्य साम्राज्याचें बौद्ध साम्राज्यात परिवर्तन झाल्यापासूनच बौद्धांनीं यवनांवर अधिकाधिक अवलबून राहण्याचा उपक्रम आरंभिला होता. याकरिताच अशोकानें आपल्या पुत्रपौत्रप्रपौत्राना परशत्रूविरुद्ध शस्त्र न उचलण्याची शपथ घालून यवनांना अनाक्रमणाचें आश्वासनच देऊन ठेविलें होतें. अशोकाच्या धर्मप्रचारकांमध्यें धर्मरक्षितासारखे आणि प्राताधिपतींमध्यें तुषास्पासारखे यवन समाविष्ट झाले होते. बौद्ध साम्राज्य चालविण्याकरिता अशोकाने यवनाना भागीदारींत घेतलें असावें, असें साधार अनुमान यावरून निघत असल्यामुळें अशोकाच्या अतानतर तुषास्प सौराष्ट्राचा प्राताधिपति बनला असावा, असा श्लेष डॉ. बरुआ यांनीं काढला होता. त्याला प्रो. नीलकंठ शास्त्री यांनीं थोडक्यांत उत्तर दिलें आहे. " That does not improve the matter. "

## शालिशूक कां सेलेउकुस् ?

चद्रगुप्तानें यवन राजकन्या हेलेनशीं विवाह केल्यापासूनच मौर्यांच्या अतःपुरसंरक्षणाचा भार यवनींच्यावर सोंपविला होता. तेव्हापासून हे राजे यवनीपरिवृत अशा अवस्थेंतच प्रजेला दर्शन देत. अशा या मौर्यकुळात अशोकानतर उघडपणें स्वराष्ट्राला पीडा देणारा शालिशूक नावाचा राजा झाला. ' स्वराष्ट्रम अर्दते घोरं धर्मवादी अधार्मिकः । ' असें याचें वर्णन युगपुराणकारानीं केलें आहे. याचें नाव सेलेउकुस् या ग्रीक नावाशीं सदृश असल्यानें हें नाव भारतीय नसून यवनांच्या अनुकरणानें ठेविलें असावें, असा अभिप्राय कै. देवदत्तराव भाडारकरानीं व्यक्त केला आहे. या शालिशूकाच्या काळींच मौर्य साम्राज्यात तीर्थिकांनीं ( सनातन धर्माच्या अनुयायानीं ) बडें केलीं, असें लामा तारानाथानें त्याच्या इतिहासात

लिहिलें आहे. पुष्पमित्राचा यवन प्रतिस्पर्धी मिनांडर यानें बौद्ध धर्म स्वीकारल्यानंतर प्रथम बौद्ध-यवनाची युति झाली नसून ही युति अशोकाच्या राजवटीच्या प्रारंभापासूनच झाली असली पाहिजे.

## क्षत्रियांना भिकेचे डोहाळे

चंद्रगुप्ताच्या ज्या सेनेनें पाटलीपुत्र राजधानी जिंकली, त्या सेनेंत मुख्यतः सीमेवरील अथवा सीमेपलीकडील शकयवनबाल्हीकपह्लवपारसीकाची भरती झाली होती, असें मुद्राराक्षसावरून समजतें. पण हे सारे सैनिक मुख्यतः चंद्रगुप्ताचा सहकारी पर्वतेश्वर याच्या राज्यातील असावेत आणि यापैकीं पुष्कळसे सैनिक अलेक्झांडरच्या शत्रुसैनिकांपैकीं असावेत. त्यामुळें मगधराज्य जिंकल्यानंतर या विदेशी सैनिकाच्या आणि देशात उभारलेल्या क्षत्रिय सैनिकाच्या साहाय्यानें चंद्रगुप्ताला सेल्युकसच्या यवनसेनेचा सपशेल पराभव करून भारताच्या उत्तरसीमेला एक शतकभर तरी स्वास्थ्य मिळवून देता आलें. मगधात राज्यक्रांति घडवितांना चाणक्यचंद्रगुप्तानीं विदेशी सैन्याचा उपयोग केला असला तरी वंशपरंपरेनें राज्याची सेवा करीत आलेलें क्षत्रियप्रधान सैन्यच श्रेष्ठ, असा अभिप्राय चाणक्यानीं अर्थशास्त्रात व्यक्त केला आहे. चाणक्य-चंद्रगुप्तानीं आपल्या सैन्यात क्षत्रियांना यथायोग्य स्थान दिलें असलें तरी त्यांच्या कर्तृत्वानें एक दोन पिढ्यातच नंदमौर्यसाम्राज्याच्या विस्ताराची परमावधि होऊन चातुर्वर्ण्य परंपरेंतील क्षत्रिय वर्ण हा निष्कर्मा आणि निष्प्रभ बनला. कारण या साम्राज्याच्या स्थापनेपूर्वी देशभर अगदीं लहान राज्यें असून प्रत्येक राज्य शस्त्रोपजीवी संघाच्या साहाय्यानें परस्पराना जिंकण्याचा प्रयत्न करीत असल्यानें, तेव्हा 'जागजागीं आहेत वीरकोटि । भले झुंजारहि शक्ति जया मोठी ।' अशी परिस्थिति होती. या साऱ्या वीराच्या अंतःकलहाचा इतर तीन वर्णांना न्यूनाधिक प्रमाणात उपद्रव होत असे, हें उघड आहे. त्यामुळें साम्राज्याच्या स्थापनेनंतर चाणक्यानीं वर्णिलेल्या विजिगीषूंच्या युद्धाची परिसमाप्ति होताच इतर तीन वर्णांना आपला उत्कर्ष करून घेण्याची संधि मिळाली आणि त्याच वेळीं लक्ष, लक्ष क्षत्रियाना तरवारीचा त्याग करून कृषि, गोरक्ष, वाणिज्य अथवा लेखनिक असल्या व्यवसायाकडे वळावें लागलें. साम्राज्यामध्यें इतर वर्णापेक्षा वैश्य वर्णाचा उत्कर्ष फार मोठ्या प्रमाणावर होतो. आणि साम्राज्याचा कारभारहि पुष्कळ अंशीं त्यांच्या तंत्रानें चालू लागतो. साम्राज्याचीं सूत्रें सर्वस्वीं वैश्यांच्या हातीं जाऊन त्याचा घात होऊ नये आणि त्यातील

प्रजेची पिळवणूक होऊ नये, याकरिता आर्य चाणक्यांनीं नरेंद्र चंद्रगुप्ताकरितां रचलेल्या अर्थशास्त्रात मुख्य, मुख्य उत्पादक व्यवसाय केंद्रसत्तेच्या हातात ठेवून मौर्यसाम्राज्यात वैश्यांचें प्राबल्य होऊ नये या दृष्टीनें त्यांच्यावर अनेक निर्बंध लादले होते. वैश्याना चाणक्यानें चोर ही संज्ञा नसणारे चोर म्हटलें आहे. 'एवं चोरान् अचोराख्यान् वणिक्कारुकुशीलवान् । भिक्षुकान् कुहकान् चान्यान् वारयेत् देशपीडनात् ॥' वैश्याच्याकडून देशपीडन होऊ नये, याकरिता अर्थशास्त्रात किती काळजी घेतली आहे, याचें सविस्तर विवेचन श्री. कोसांबींनीं त्यांच्या ग्रंथात केलें आहे. याच महत्त्वाच्या कारणाकरिता वैश्यवर्णानें अर्ती अशोकाला हाताशीं धरून बिंदुसाराच्या औरसपुत्राची हत्या करविली आणि ज्याला आपल्या शिलाशासनातून पूर्वजाच्या नावाचा चुकूनसुद्धा उल्लेख करावा असें कधीं वाटलें नाहीं, असल्या अकुलीन अशोकाच्या हातानें अर्थशास्त्राची जानपदहितकारक आणि साम्राज्य-शक्तिवर्धक शासनपद्धति उलथून पाडली. यानतर या महाधूर्त वैश्यानीं बौद्ध धर्माच्या प्रभावानें भारतीय क्षत्रियाना क्षात्रधर्मापासून, अतःकरणापासून परावृत्त करण्याचा उद्योग आरंभिला. बुद्धाच्या अनुयायात थोडेफार ब्राह्मण असले तरी क्षत्रियाच्या श्रेष्ठत्वाचा पुरस्कार करणाऱ्या शाक्यसिंहाच्या उपदेशाचा आणि चरित्राचा प्रभाव त्याच्या क्षत्रियवर्णावर विशेष झाला असला पाहिजे, हें उघड आहे. त्यामुळें अनाथ-पिंडिकासारख्या अति धनाढ्य श्रेष्ठीचा हस्तक असलेल्या बुद्धाच्या उपदेशानें आणि त्यानतर समकालीन वैश्याच्या हातचें बाहुलें बनलेल्या अशोकाच्या प्रचारानें भारतां-तील बरेचसे क्षत्रिय 'श्रेयो भोक्तु भैक्ष्यमपीहलोके ।' अशी घोषणा करून क्षात्र-धर्मापासून च्युत, राष्ट्रसरक्षणाच्या व्यवसायापासून पराङ्मुख, सनातन वैदिक धर्मा-पासून भ्रष्ट आणि सरतेशेवटीं सनातन धर्मद्वेष्ट्या बौद्ध पाखडाच्या (पाखंड हा अशोकाचाच शब्द आहे.) प्रभावानें साऱ्या आक्रमक परशत्रूचे हस्तक बनले. अशोकानतर भारतावरील परशत्रूच्या स्वाऱ्याना जी अधिकाधिक यशःप्राप्ति होऊं लागली, तिचें मुख्य 'श्रेय' बुद्ध आणि अशोक याच्या अविरत उद्योगामुळें भारतीय क्षत्रियाना भिक्षेचे डोहाळे लागले होते, याच घटनेला दिलें पाहिजे. बुद्ध आणि अशोक याना राष्ट्रघातकी पुरुष म्हटलें असता साऱ्या परप्रत्ययनेयबुद्धि-जनाचा प्रक्षोभ होतो, हें मला सुविदित आहे. पण त्यानीं ही उघड उघड गोष्ट तरी लक्षात घ्यावी कीं ते स्वतःला ज्या क्षत्रिय वर्णाचे म्हणवीत असत, त्या वर्णाचे ते सर्वात मोठे शत्रू होऊन गेले. बुद्ध आणि अशोक याचें नेतृत्व स्वीकारून

क्षत्रियांनीं भारताच्या राष्ट्रीय जीवनात, विशेषतः संरक्षणक्षेत्रात जी पोकळी निर्माण केली होती, ती ' शस्त्र द्विजातिभिर्ग्राह्य धर्मो यत्रोऽपरुध्यते । ' या मनूच्या उपदेशाला अनुसरून ब्राह्मणानाच भरून काढावी लागली. चाणक्याच्या काळीं ब्राह्मणच राष्ट्रीय दृष्टीनें विचार आणि कृति करीत असत, ही गोष्ट श्री. दामोदर-पंत कोशाबींनींहि त्यांच्या ग्रथांत मान्य केली आहे. चाणक्योत्तर काळांतहि ब्राह्मणानीं हें आपलें कुलव्रत सोडलें नव्हतें.

## रथींचा अस्त-गजांचा उदय

चाणक्य–चंद्रगुप्ताच्या काळींच युद्धशास्त्रांतील एका महत्त्वाच्या परिवर्तना-मुळें क्षत्रियाचें महत्त्व नष्ट होण्याची प्रक्रिया अति त्वरेनें होऊ लागली. अलेक्झाड-रच्या इराणातील आणि भारतातील लढायातून गजसेनेचा जो उल्लेख येतो, तो त्या सेनेच्या युद्धक्षेत्रातील प्रयोगाचा पहिलाच ऐतिहासिक उल्लेख असल्याचें सेना-पति जे. एफ्. सी. फुल्लर यांनीं निदर्शनाला आणलें आहे. या गजसेनेच्या उदया-सहच रथसेनेचा रणांगणावर अस्त झाला. युद्धशास्त्रातील या क्रातीमुळेंहि क्षत्रि-यांचें भारतांतील प्राधान्य नष्ट होण्याला साहाय्य झालें. कारण क्षत्रिय हे प्राधान्यतः रथी होते. त्यामुळें रथाचें युद्धक्षेत्रातील प्राधान्य नष्ट होताच क्षत्रियाचेंहि समाजातील प्राधान्य नष्ट झालें. अशोकाला त्याच्या पित्यानें तक्षशिलेला पाठविलें, तेव्हा त्यानें त्याच्यासह रथसेना मुळींच दिली नव्हती, असें अशोकावदानासारख्या बौद्ध ग्रंथांतून स्पष्ट सागितलें आहे. याप्रमाणें रथसेना लुप्त झाल्यानतर रथी क्षत्रियासहच त्याचा आश्रित सूतवर्गहि जेव्हा लुप्त होऊ लागला, तेव्हाच शौनकांनीं नैमिषारण्यात सूतांच्या साऱ्या परपराचा सग्रह करून इतिहासपुराणाचें संपादन केलें. सूतांनीं शौनकाना सागितलेली महाभारतसंहिता म्हणजे एका अर्थी रथयुद्धाचा आणि रथी क्षत्रियांचा मृत्युलेखच म्हणावयाला प्रत्यवाय नाहीं. चीनमध्यें मात्र याच काळीं रथसेनेचें स्थान अश्वदलाने घेतलें, कारण त्या देशात गजसेना उभारण्याइतके गजच नव्हते. अशा प्रकारें मौर्ययुगांत क्षत्रियवर्णानें सहस्रावधि वर्षांपासून युद्धात वापरलेलें रथतत्र एकाएकीं निरुपयोगी ठरल्यामुळें त्या विशिष्ट तंत्राचे पिढयान्‌पिढया दास बनलेले क्षत्रिय तत्क्षणीं किंकर्तव्यतामूढ होऊन गेले आणि ' मूर्ध्नि वा सर्व लोकस्य विशीर्येत वनेऽथवा । ' या कविवचनाला अनुसरून वनांत थवा करून राहूं लागले.

## रथयुद्धाची भीषणता

क्षत्रियांचें महत्त्व सपशेल नष्ट होण्याला सिद्धार्थ महावीरादिकांनीं केलेलें सनातन

धर्मावरील आक्रमण त्याच्या एका अनपेक्षित परिणामामुळेंहि कारणीभूत झालें असावें. या नवधर्मप्रणेत्यांच्या आक्रमणामुळें लोकाचा सनातन धर्मावरील विश्वास जसा नष्ट झाला, तसाच त्या धर्मांतील धर्मयुद्धावरील विश्वासहि नष्ट झाला आणि अधर्मयुद्धाचा काळ चालू झाला. तेव्हा 'रथचक्र उद्धरू दे, श्रुतिशास्त्रज्ञा, महारथा, कुलजा, ।' साधु न हाणिति अरिला पाहति अधृतायुध व्यथाकुल ज्या ।। अशा प्रकारे प्रतिपक्ष्याच्या केविलवाण्या विनवण्या करण्याचा काळहि उलटून गेला. रथाचा उपयोग धर्मयुद्धा-करिता निवडलेल्या सपाट रणागणातच होऊ शकतो, विषम भूमींत होऊ शकत नाहीं. सपाट रणागणात पुरातन काळचे रथ हे अद्यतन काळच्या रणगाड्याप्रमाणेंच प्रभावी होते. रथयुद्धाच्या भीषणतेचें वर्णन करतांना रोमचा कवि लुक्रेशियस म्हणतो, 'Reeking with indiscriminate slaughter, they lop off limbs instantaneously so that what has been cut away is seen to quiver on the ground before any pain is felt. one man perceives not that wheels and the devouring scyths have carried off among horse's feet his left arm shield and all; another while pressing forward sees not that his right arm has dropped from him; a third tries to get up after he has lost a leg, while the dying foot quivers on the ground close by.' हें अर्थात् संकुलयुद्धाचें वर्णन आहे. एका इराणी वीरानें केवळ दोन रथाच्या साहाय्यानें ग्रीक कवाइती सैन्याच्या सहार्शे सैनिकांच्या तुकडीचा सहार केल्याचा उल्लेखहि इतिहासांत आढळतो. पण युद्धामध्ये एकच तंत्र सतत लाभदायक होऊ शकत नाहीं. अलेक्झांडरच्या काळापासून रथांचा प्रतिकार करण्याच्या, तसेंच त्यांना निकामी करण्याच्या क्लृप्त्या बहुतेक साऱ्या सेनापतींना सुविदित झाल्या आणि त्यामुळें चद्रगुप्त मौर्याच्या सैन्यातच रथाचें प्रमुख स्थान गजसेनेनें घेतलें. या काळा-नंतर ब्रह्मा महेश्वराचा, किंवा कृष्ण विजयाचा सारथि झाल्याच्या कथा रचण्याचा काळ सपला. त्यापुढें रथसेनेचें प्रधानपद ज्या गजसेनेला लाभलें, तिच्याशीं सदृश असलेल्या गजवदनाचीं आख्यानें कनिष्ककाळापासून पुढें रचलीं जाऊ लागलीं. एकेकाळीं भारतीय जीवनात रथाना किती महत्त्व होतें, हें वसतग्रीष्मवर्षा ऋतुतील मासाना अनुक्रमें रथगृत्स, रथौजस्, रथस्वन, रथेचित्र, रथप्रोत आणि असमरथ अशीं नावें शतपथात दिलेलीं आढळतात, ( ६–१–१६ ते २१ ) यावरून कळून

येईल. पारशी लोकामध्ये रथेस्तार नावाची एक जातच असून आमचे अवेस्ताचार्य के. तारापोरवाला हे त्याच जातींत जन्मले होते. असो.

## ब्राह्मण सैन्यच श्रेष्ठ

क्षत्रिय रथभ्रष्ट झाल्यानंतर चाणक्याच्या काळींच ब्राह्मण सैन्य श्रेष्ठ की क्षत्रिय सैन्य श्रेष्ठ असा प्रश्न उपस्थित झाला होता. 'ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्रसैन्यानां तेजः प्राधान्यात् पूर्वं पूर्वं श्रेयः सनाहयितुम् इति आचार्याः नेति कौटल्यः– प्रणिपातेन ब्रह्मबलं परोऽभिहारयेत् । प्रहरणविद्याविनीतं वा क्षत्रियबलं श्रेयः । बहुलसारं वा वैश्यशूद्रबलं इति । ' म्हणजे चार वर्णांच्या सेनेंत तेजस्वितेच्या गुणानें ब्राह्मण सेना श्रेष्ठ आणि क्रमाक्रमानें इतर सेना कनिष्ठ असें आचार्यांचें मत होतें. पण ब्राह्मणांना नमन करून शत्रु लोक आपल्या पक्षाला वळवून घेतील, अशी भीति वाटून चाणक्यानीं शस्त्रविद्या शिकलेलें क्षत्रिय सैन्यच श्रेष्ठ आणि त्याच्या खालोखाल सख्याबली वैश्यशूद्र सैन्ये श्रेष्ठ असा स्वतःचा अभिप्राय व्यक्त केला होता. हा अभिप्राय पूर्वपरंपरेला आणि यवनागमनापूर्वींच्या परिस्थितीला अनुसरून असला तरी त्यांच्या आगमनानंतरच्या आगामी काळाची चाहूल त्याच्या आचार्यांच्या कानांनाच ऐकूं आली होती, असें म्हणावें लागतें. कारण चाणक्याच्या हातून मौर्यसाम्राज्याचीं सूत्रें सुटल्यानंतर लौकरच रथभ्रष्ट झालेल्या क्षत्रियानीं आणि मोठ्या प्रमाणावरील आंतरराष्ट्रीय व्यापाराची चटक लागलेल्या वैश्यानीं सनातन धर्माचा त्याग करून सिद्धार्थ, महावीर आणि मखली गोशाल यांच्या अहिंसक पंथाचा स्वीकार केला. या काळीं बुद्धिमान् क्षत्रियानीं वैश्यांचें नेतृत्व स्वीकारून आंतरराष्ट्रीय व्यापारापासून धनार्जन करण्यावर भर दिला आणि त्यामुळें ब्राह्मणांना शूद्रांचें सहकार्य संपादून सनातन धर्माची आणि भारतीय साम्राज्याची धुरा आपल्या शिरावर घ्यावी लागली. याच काळांत क्षत्रियांचें भय उरलें नसल्यामुळें परशुरामानें एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केल्याची कथा महाभारताचें पुनःसंस्करण करीत असलेल्या भार्गवांनी त्या ग्रंथांत सर्वत्र पेरून लोकप्रिय केली.

## वाजिनिराजनाविधि

वर वर्णिल्याप्रमाणें रथ आणि रथी क्षत्रिय या उभयतांचेंहि महत्त्व नष्ट होऊं लागल्यामुळें स्वारीवर निघण्यापूर्वी ऐतरेय ब्राह्मणांत सांगितलेले रथारोहणाचे विधि करून प्रथम ईशान्य दिशेला आणि नंतर इतर साऱ्या दिशांना रथ नेण्याचा समारंभ मागें पडला आणि त्याच्या ठिकाणीं अर्थशास्त्रांत उल्लेखिलेला वाजिनी-

राजनाविधि प्रचलित झाला. रघुदिग्विजयाच्या सर्गांत कालिदासानें म्हटलेंच आहे; ' तस्मै सम्यक् हुतो वह्निः वाजिनीराजनाविधौ । प्रदक्षिणार्चिर्व्याजेन हस्तेनेव जय ददौ ॥' या श्लोकातील वाजि शब्दाचा अर्थ अश्व आणि गजहि होत असल्यानें चतुरंगदलापैकीं याच दोन दलाना कालिदासकालीं प्राधान्य प्राप्त झाले होतें, असें या विधीवरून व्यक्त होतें. अश्वाध्यक्ष आणि गजाध्यक्ष या दोनहि प्रकरणात चाणक्यांनीं वाजिनीराजनाविधीचा उल्लेख केला आहे. ' तिस्रो नीराजनाः कार्याः चातुर्मास्यर्तुसंधिषु ।' कालिदासकालीं रथाचें युद्धक्षेत्रातील महत्त्व नष्ट झालें होतें, ही गोष्ट प्राचीन भारतातील युद्धपद्धतीवर प्रबंध लिहिणाऱ्या श्री. विमलकांति मुजुमदारानींहि मान्य केली आहे ' We learn from Raghuvamsha canto IV that each horse-man was equipped with a coat of mail going down to knees, a long lance, a powerful bow and a quiver of arrows The cavalrymen marched in well ordered lines. Chariot formations of earlier days were conspicuous by their absence.' म्हणजे कालिदासाच्या काळात अश्वारूढ धनुर्धारी सैनिकांनीं पूर्वीच्या रथींचीं कर्तव्यें स्वतःकडे घेतलीं होतीं, ही गोष्ट श्री. विमलकांति मुजुमदार यानाहि मान्य आहे. चीन देशाच्या सामरिक इतिहासावरून असें कळून येतें कीं, ख्रिस्तपूर्व ३२९ ते २९९ या काळीं राज्य करणाऱ्या चीनच्या वू लिंग या राजानें आपल्या सैन्यातील रथींचें प्रस्थ नष्ट करून त्याच्या स्थानीं अश्वदलाची स्थापना केली. मास्पेरोंच्या प्राचीन चीनच्या इतिहासात ३८५ पानावर ही माहिती आहे. अशाच प्रकारची उत्क्रांति भारतीय सैन्यातहि त्याच काळीं चालू होती. वैदिक काळातील सैन्यात पत्ति आणि रथी हीं दोनच दलें दिसतात पुढें महाभारत-कालात या द्विदलसेनेचें चतुरंगदलात परिवर्तन झालें. त्यानंतर ' यस्त्वश्व इति विख्यातः श्रीमान् आसीत् महासुरः । अशोक इति राजाऽभूत् ।' असें ज्या अशोकाचें आदिपर्वांत वर्णन आलें आहे, त्या अश्वासुराच्या राजवटींत रथींच्या स्थानीं अश्वदलाची स्थापना झाली असली पाहिजे. तेव्हापासून मानी क्षत्रियानीं सामान्य सैनिकाच्या पातळीवरून लढण्यापेक्षा वनात यत्रा करून राहण्याचा पंथ स्वीकारणें स्वाभाविक आहे. हें सारें विवेचन मीं दिग्दर्शनापुरतेंच केलें असल्यानें इतर इतिहासाभ्यासकानीं या स्थित्यंतराचा अधिक अभ्यास केल्यास ' अधिकास्याधिक फलम् ' या न्यायानें लाभच होईल. पुष्पमित्रानें ' बृहद्रथ '

मौर्यांचा वध करून रथयुगाची अक्षरशः समाप्ति केली असली तरी तत्त्वतः ती क्रांति अश्वासुर अशोकाच्या राजवटींतच पूर्ण झाली असली पाहिजे. 'Specialisation exposes a specis to extinction when its environment alters' एकांगी प्रावीण्य संपादणाऱ्या जातींचा, परिस्थितींत परिवर्तन होऊन त्या प्रावीण्याचें महत्त्व नष्ट झालें कीं अपरिहार्यपणें विनाश होतो, या प्राणिशास्त्रांतील नियमाला अनुसरून भारतीय क्षत्रियाच्या इतिहासाचा अभ्यास करणें आवश्यक आहे.

## क्षत्रियांचें अजापाळांत परिवर्तन

युद्धशास्त्रातील परिवर्तनामुळें बुद्धाचें अनुयायित्व स्वीकारून भिक्षु बनलेल्या भारतीय क्षत्रियाचा सत्ताभिलाष कांहीं नष्ट झाला नव्हता. त्यामुळें सशस्त्र राजकारणाचा त्यानीं त्याग केला असला तरी त्याच्या भिक्षुसघातून निःशस्त्राचें राजकारण खेळविण्याचा व्यवसाय त्यानीं आरंभिला. या भिक्षुसघाचा सर्वांत प्रसिद्ध पुढारी जो अशोक राजा, त्याची देवानाप्रिय ही पदवीच मुळीं या निःशस्त्राच्या राजकारणाची द्योतक होती. सस्कृत साहित्यात देवानाप्रिय म्हणजे देवाना अत्यत प्रिय असल्यामुळें यज्ञातून बलिदान करण्यास सुयोग्य ठरलेला बोकड असा संकेत आहे. म्हणून दुसऱ्याकरितां बळी जाण्याला सुयोग्य, अर्थात् महामूर्ख असा त्याचा पर्यायानें अर्थ होतो. ही अवातर गोष्ट झाली. अशोकानें देवानाप्रिय ही जी पदवी धारण केली होती, ती देवप्रिय अजापुत्राची यज्ञयागात होणारी हत्या थांबविण्याकरिताच स्वीकारिली होती, असें म्हटलें तरी चालेल. आपला आठवा अवतार कृष्ण हा गोपाळ असला तर त्याच्या नतरच्या नवव्या अवताराचें स्थान सपादणारा बुद्ध हा प्रधानतः अजापाळ होता. बुद्धचरित्रात गोवंशाला कांहींच महत्त्व नसून त्यानें अजापुत्रांचें पालन केल्याच्या कथा मात्र अनेकदा येतात. 'अश्वं नैव गज नैव व्याघ्रं नैव च नैवच । अजापुत्रं बलिंदद्यात् देवो दुर्बलघातकः ।।' या सुभाषितात सांगितल्याप्रमाणें यज्ञयागातून प्रधानतः अजापुत्रांचा बळी जात असल्यानें बुद्धाचा यज्ञ–विरोध हा वस्तुतः अजापुत्राच्या सरक्षणाच्या हेतूनें प्रेरित झाला होता, हें उघड आहे. बुद्धानें यज्ञविरोधी पंथ सुसघटित केल्यानतर दोन सव्वादोन शतकानीं मगधाच्या सिंहासनावर आरूढ झालेल्या अशोकानें आपल्या विस्तीर्ण साम्राज्यात यज्ञ–बंदी पुकारून आणि ती मोडणाऱ्याना देहात शासन करून स्वतःची 'देवानाप्रिय' अर्थात् अजापुत्र ही पदवी सार्थ केली.

## अजापालनाची आर्थिक मीमांसा

तक्षशिलेंत राज्यपाल या नात्यानें कारभार पहात असताना अशोकाला असें आढळून आलें होतें कीं मौर्यसाम्राज्याच्या उत्तर सीमेवरील आणि सीमेपलीकडील गाधार, बाल्हीक, काबोज इत्यादि प्रातातील अर्थकारणात अश्वपालन आणि अजापालन हे व्यवसाय अत्यत महत्त्वाचे आहेत. त्या काळच्या भारतीय अर्थशास्त्रज्ञांपैकीं एक पक्ष या उत्तर सीमेवरील मुख्यतः प्राणिज द्रव्याच्या व्यापाराला महत्त्व देत असे, तर दुसरा चाणक्यपक्ष दक्षिणेकडील प्रधानतः खनिज पदार्थांच्या उत्पादनाला आणि व्यवसायाला महत्त्व देत असे. अर्थशास्त्राच्या सातव्या अधिकरणातील बाराव्या अध्यायात म्हटलें आहे. 'हैमवतो दक्षिणापथात् श्रेयान्, हस्ति–अश्व–गध–दंत–अजिन–रूप्य–सुवर्णपण्याः सारवत्तराः। इत्याचार्याः। नेति कौटल्यः। कबल–अजिन–अश्वपण्यवर्जाः शखमणिमुक्ताः सुवर्णपण्याश्च प्रभूततराः दक्षिणापथे।' म्हणजे अर्थशास्त्रकाराच्या आचार्यांच्या मतें व्यापाराच्या स्थलपथातहि सीमा प्रदेशातील पर्वतपथ हे दक्षिणापथातील मार्गापेक्षा श्रेष्ठ. उत्तरेच्या व्यापारी मार्गांवर हत्ती, घोडे, हस्तिदंत, सुगधी पदार्थ, कातडीं, रुपें, सोनें, यांचा मोठ्या प्रमाणावर व्यापार होतो. पण चाणक्याचें म्हणणें असें होतें कीं, लोकरीच्या घोंगड्या, कातडीं, आणि घोडे याच्या व्यतिरिक्त इतर व्यापारी वस्तु-उदाहरणार्थ, शख, रत्नें, मोतीं याची दाक्षिणेलाच विपुलता आहे. तें कसेंहि असो. या दोन व्यापारी मार्गांपैकीं उत्तरापथाच्या मार्गाला चाणक्याच्या आचार्यांप्रमाणेंच अशोकराजाहि आतिशय महत्त्व देत असे आणि या मार्गांवरील व्यापारांत घोंगड्या, घोडे आणि कातडीं, याच वस्तूंना प्राधान्य होतें. अशा प्रकारें घोंगड्याची आणि कातड्याची निर्यात करण्यावर ज्या तक्षशिला प्रांतांतील व्यापाराची भरभराट मोठ्या प्रमाणावर अवलबून होती, त्या प्रांतातील समाज अजापालनाचा पुरस्कार करणारा आणि यज्ञ-विरोधक असणें अगदीं स्वाभाविक होतें.

## अजापुत्रांच्या उदरांत मानव

अशा प्रकारें परदेशी व्यापाराप्रीत्यर्थ मोठ्या प्रमाणावर अजापालनाचा व्यवसाय चालू झाला म्हणजे पूर्वीं अगदीं नम्रपणें मानवाच्या उदरांत प्रवेश करणारे अजापुत्र एकाएकीं मानवावर उलटून त्याचा प्राण घेऊ लागतात. कारण निर्यात व्यापाराकरिता अजापालनाचा व्यवसाय वाढविणारे धनिक व्यापारी गाईवासरांचीं चरण्याचीं रानें आणि शेतकऱ्याचीं शेतें सारींच हस्तगत करून घेऊन त्याचीं

मेंढ्या चारण्याचीं अथवा अश्वपालनाचीं कुरणें बनवितात. यांना इंग्लंडच्या आर्थिक इतिहासांतून ‘ enclosures ’ ( म्हणजे फार मोठे कोंडवाडे म्हणून ) असें नांव दिलें आहे. असल्या कोंडवाड्याच्या वाढीमुळें शेतीचें क्षेत्र नष्ट होऊन शेतकऱ्याचा धंदा बुडतो आणि देशाचें अजापुत्राच्या नंदनवनांत रूपांतर होऊन तो जवळ-जवळ जनशून्य होऊं लागतो. अशीच परिस्थिति इंग्लंडांत प्रोटेस्टंट पंथाच्या उदयकालीं झाली होती. तिची चर्चा करतांना एका इतिहासकारानें म्हटलें आहे, “ It was part of a movement to turn sheepfarming into a large-scale industry and involved the end of smallscale farming. Sir Thomas More wrote against enclosure in a white heat of protest. He said quite literally that the sheep formerly won't to be so meek and tame now, eat up and swallow down the very men themselves ” इंग्लंडांत मानवांवर उलटलेल्या अजापुत्रांना बौद्ध युगांतील भारतीय अजापुत्रांप्रमाणें एखाद्या अहिंसावादी अवताराचा आणि त्याच्या अहिंसेच्या नांवानें वैदिक आर्यांवर अत्याचार करणाऱ्या एखाद्या धर्मवादी अधार्मिक सम्राटाचा आश्रय नव्हता. तरीसुद्धा सर थॉमस मोर याच्यासारख्या मानवप्रेमी ध्येयवाद्याच्या अंतःकरणाला अत्यंत चीड आणणाऱ्या घटना इंग्लंडांतील अजापालाकडून घडत होत्या. हे उदाहरण डोळ्यांपुढें आणलें म्हणजे बुद्धभक्तीच्या भावनेनें भिक्षुसंघाच्या हातचें बाहुलें बनलेल्या अजापाळ अशोकाकडून वैदिक आर्यांवर किती अत्याचार घडले असतील, याची सहज कल्पना येईल. अशोकाच्या पितामहाच्या काळींच तक्षशिला प्रांतांत कृषीचें महत्त्व लुप्त होऊन पशुपालाचें प्रस्थ प्रस्थापित झालें होतें, असें अलेक्झांडरच्या स्वारीच्या इतिहासावरून समजतें. प्लूटार्कनें अलेक्झांडरच्या चरित्रांत तक्षशिलेचें वर्णन करतांना असें विधान केलें आहे कीं त्या प्रांतांत विपुल कुरणें आणि उत्कृष्ट फळें होतीं. या वर्णनांत कृषीचा उल्लेख नाहीं, इकडे इतिहासाभ्यासकांनीं अवधान द्यावें, असें प्रो. दामोदरपंत कोशांबींनीं त्याच्या ग्रंथांत सांगितलेंहि आहे. अशा तक्षशिलेंतच अशोकानें राजकारणाचे पहिले पाठ घेतले असल्यानें तेथील अर्थकारणानें त्याच्या विचारसरणीला विशिष्ट वळण लागणें स्वाभाविक आहे.

## अवघड आर्थिक परिस्थिति

अशोकाच्या काळीं मौर्य साम्राज्याची आर्थिक परिस्थिति बरी असावी,

अशी सार्वत्रिक समजूत आहे. पण तो अधिकारी इतिहासकारानीं निर्मिलेला लोकभ्रम मात्र आहे. चंद्रगुप्त-बिंदुसार यांच्या राजवटींत मौर्यांच्या नाण्यात भेसळ करीत नसत. त्यामुळें शेजारच्या सेलेउकुस्च्या साम्राज्यात त्याच्या नाण्याना फार मान मिळत असे. सेलेउकुस्चा पुत्र आंतिओकुस् हा आपल्या पित्याचा सहकारी सम्राट् बनल्यानंतर त्यानें बाल्हीकप्रभृति प्रांताच्या व्यापारी सोयीसाठीं मौर्य नाण्याच्या वजनाचीं नाणीं पाडलीं होती, असें रोस्टोफट्झेफ याच्या हेलेनिक साम्राज्याच्या आर्थिक आणि सामाजिक इतिहासावरून समजते. ' It may be mentioned that in order to faciliatate Bactrian trade with India Antiochus I at the time of his Joint rule with Seleucus made a special issue of coins of the Indian instead of the Attic standard. ' ( खंड पहिला पान ४६१ ) या उभयतांच्या संयुक्त राजवटीचा काळ खि. पू. २८५ ते २८० हा असल्यानें बिंदुसाराच्या राजवटीच्या उत्तरार्धांतहि मौर्य नाण्याची कीर्ति किती सुदृढ होती, याची कल्पना येते. अशा प्रकारें आंतरराष्ट्रीय कीर्ति प्राप्त करून घेतलेल्या चलनात अशोकानें फार मोठ्या प्रमाणावर भेसळ करून त्याचें वाटोळें केलें, असें प्रो. दामोदरपंत कोशाबींनींच सिद्ध केलें आहे. कोशाबींच्या विवेचनावर श्री. रोमिला थापर यानीं ' अशोक आणि मौर्यसाम्राज्याचा-ऱ्हास ' या अभिनव ग्रंथात काहीं आक्षेप घेतले आहेत. पण ते उल्लेख करण्याच्याहि योग्यतेचे नाहींत, म्हणून त्याची चर्चा करीत नाहीं. अशा प्रकारें मौर्य घराण्याच्या नाण्यांत अशोकानेंच भेसळ केली असल्याचें उपलब्ध नाण्यावरून सिद्ध होत असलें तरी चाणक्यानें चांदीच्या एका कार्षापणात भेसळ करून त्याचे आठ कार्षापण केल्याची बनावट कथा बौद्ध लेखकानीं लिहून ठेविली आहे. आपण केलेल्या पापाचा आरोप दुसऱ्यावर केला, म्हणजे स्वतःला त्या पापापासून मुक्ति मिळते, अशीच बहुधा त्याची समजूत असावी. डॉ. वासुदेवशरण आग्रवाल यानींहि बहुसंख्य मौर्य नाण्यातील भेसळीचें ' भारतीय मुद्राओंका सविशेष अध्ययन ' या प्रबंधांत वर्णन केलें आहे.

## धर्मातील भेसळीचें पर्यवसान

अशोकानें नाण्यात केलेल्या भेसळीचे परिणाम समकालीन समाजालाच भोगावे लागले असतील. पण त्यानें धर्मांत केलेल्या भेसळीचे परिणाम अजून भारतखंडाला भोगावे लागत आहेत. वैदिक यज्ञयागातून आणि नित्यभोजनातून

अजापुत्राचा तेव्हां जो मोठ्या प्रमाणावर संहार होत होता, तो ठराविक ऋतूंत पर्जन्यवृष्टि होणाऱ्या आपल्या देशांतील भूमीच्या संरक्षणाला अतिशय उपकारक होता. शेळ्यामेंढयाची देशांत अनिर्बंध वृद्धि होऊ दिली, तर हे प्राणी नुसत्या लतावृक्षांचाच नव्हे तर सर्व हिरवळीचा विध्वंस करून नंदनवनाचेंहि सहारासारख्या मरुभूमींत परिवर्तन करू शकतात. वैदिक आर्यांच्या भरभराटीच्या काळीं अत्यंत सुपीक असलेल्या सिंधु, सौवीर, गांधार इत्यादि प्रांताचें मरुभूमींत परिवर्तन होण्याचें एक प्रमुख कारण म्हणजे बौद्ध धर्माच्या प्रभावानें वैदिक यज्ञातून अजा-पुत्राचा जो कुलक्षय होत असे, तो थांबला; आणि अहिंसेच्या प्रभावानें अन्नासाठीं त्याची जी हत्या होत होती, तिचें प्रमाणहि शून्यासन्निध येऊं लागलें, हें होय. शेळ्यामेंढयाच्या हावरटपणामुळें ज्या हिरवळीच्या आणि लतावृक्षाच्या मुळ्यांच्या आधारानें धुळीच्या आणि वाळूच्या वादळापासून, तसेंच महापुराच्या वेळीं धुपणीपासून धरेचें संरक्षण होतें, तें संरक्षण मिळणें अशक्य झालें कीं तिचें कालां-तरानें मरुभूमींत रूपांतर होतें. या क्रमानेंच सिंधु, सौवीर, गांधार इत्यादि पश्चिम सीमेवरील प्रांताचा सर्वनाश झाला असल्यानें अर्वाचीन पाकिस्तानच्या सरकारानें अजापुत्राचाच नव्हे तर त्याच्या जातभाईचाहि सार्वत्रिक संहार करण्याचा पंच-वार्षिक कार्यक्रम हातीं घेतला आहे. अशा प्रकारें धरेचा आधार नष्ट होऊन तिचें मरुभूमींत परिवर्तन होण्याला कालावधि लागत असला तरी मोठ्या प्रमाणावरील अजापालनाच्या व्यवसायानें कृषीसहच कृषकांचा लोप होऊन देश जनशून्य होतो. या व्यवसायांत श्रम आणि बुद्धि यांचा फारसा व्यय होत नसल्यानें तो दासाकडून करवून घेणें सोपें जातें. अशोकाच्या शिलालेखातून दासांना चांगल्या प्रकारें वागविण्याचा आदेश आला असल्यानें मेगॅस्थेनिसच्या काळीं जवळ जवळ अभा-वानेंच अस्तित्वात असलेला दासव्यवसाय अशोककाळात वाढीला लागला असावा, असें अनुमान निघतें. आर्थिक व्यवहारांत नाण्यांना महत्त्व प्राप्त झाल्यानंतरच रोम अथवा अमेरिका या देशातील पद्धतीचा दासव्यवसाय वृद्धिंगत होण्याला अनुकूल परिस्थिति निर्माण होते.

## क्षत्रियांचा अपकर्ष आणि शूद्रांचा उत्कर्ष

भारतांत नंद मौर्यसाम्राज्याच्या काळींच कृतत्रेतायुगातील विनिमयाची वहिवाट मागें पडून लहानमोठ्या प्रमाणावरील आर्थिक व्यवहार नाण्यामध्यें होऊं लागले. आर्थिक व्यवहार नाण्यांत होऊं लागल्यानंतर क्षत्रियांची आणि जानपदांची सारी

संघातील नगरनिवासी शिल्पी आणि त्यांचें शिल्प विकण्याचा व्यवसाय करणारे व्यापारी यांच्या हातीं एकत्रित होऊं लागते. अशा प्रकारें पौरजानपदांपैकीं पौर श्रीमत होत जातात आणि जानपद अधिकाधिक दरिद्री होतात. ऐश्वर्यवृद्धीमुळें नगरनिवासी शिल्पी आणि वैश्य, अधिकाधिक विलासी बनून विलासाच्या व्यवसायाचेंच समाजात महत्त्व वाढत जातें आणि अत्यावश्यक वस्तूंचें उत्पादन करणाऱ्या धंद्याचें महत्त्व नष्ट होत जातें. विलासाच्या वस्तूंचें उत्पादन मुख्यतः विदेशात निर्यात करण्याकरितां होत असलें तर त्याचा देशातील आर्थिक परिस्थितीवर फारसा परिणाम होत नाहीं. तसें न होता वैश्य आणि शिल्पी याच्या अनुकरणानें क्षत्रिय वर्णातहि विलासाच्या वस्तूंचा मोठ्या प्रमाणावर खप होऊं लागला तर लौकरच त्याच्या हातातील धन नष्ट होऊन प्रथम तो ऋणकरी बनतो आणि नतर तो क्रमश शूद्रात समाविष्ट होतो या अध.पत पावणाऱ्या क्षत्रियापेक्षा अधिक बुद्धिमान् क्षत्रिय वैश्यातच समाविष्ट होतात. ज्या समाजात क्षत्रियाचा अपकर्ष होत जातो, त्यातच शूद्राचा मात्र उत्कर्ष होतो. साम्राज्याचा अर्थच क्षत्रियानीं देशात चालविलेल्या अखड युद्धाची समाप्ति असा असल्यानें त्या युद्धांच्या योगानें सपशेल नामशेष होऊं घातलेल्या क्षत्रियाना प्राणधारणाची सधि मिळाली तरी तिचा प्रथम, प्रथम त्याना तादृश उपयोग होत नाहीं. कारण युद्धकाळांत दबलेलीं त्याचीं आपसातलि वशपरपरागत वैरें शाततेच्या काळांत उसळून वर येतात आणि या वैरवन्हीच्या वणव्यात क्षत्रिय वर्ण पूर्णपणें दहन पावूं नये, याकरिता कोणी तरी अधिकारी पुरुषानें त्या वर्णाला अहिंसेची दीक्षा द्यावी लागते. या दीक्षाविधीनतर क्षत्रिय कुळाचें प्राणधारण झालें तरी तीं कुळें इतःपर क्षत्रिय राहूं शकत नाहींत, हें उघड आहे. असो. त्याच्या उलट अतर्गत युद्धांची परिसीमा होण्यापूर्वी खेड्याना खिळलेल्या शूद्राचें प्रथम युद्धामुळें आणि नतर साम्राज्यस्थापनेच्या अनुषगानें उद्भवणाऱ्या व्यवसायामुळें सचारक्षेत्र जसजसें वाढत जातें, तशी त्याची अधिकाधिक उन्नति होऊं लागते. इतिहासाचार्य टॉयनबी म्हणतात, ' During the armistice inaugurated by the establishment of a universal state the proletariate must increase, but the dominant minority must decrease. ' या साऱ्या विवेचनावरून मौर्य साम्राज्यात क्षत्रियवर्ण कसा नष्टप्राय झाला आणि वैश्यशूद्राचा अभ्युदय कसा झाला, याची वाचकांना कल्पना येईल. या काळीं क्षत्रियवर्ण नष्टप्राय झाल्यानें आणि वैश्यांच्या अनुकर-

...४

णानें शेषक्षत्रियांनीं अहिंसेचा अवलंब करून सनातन धर्माचा त्याग केल्यानें तेव्हां सनातन धर्मांत ब्राह्मण आणि शूद्र हे दोनच वर्ण राहून गेले. यामुळेंच 'कलावाद्यंतयोः स्थितिः' हें वचन तेव्हा रूढ झालें.

## शूद्रांना आर्यत्वाचा अधिकार

इथें आपण असें गृहीत धरू कीं नंद साम्राज्याच्या स्थापनेपासून भारतातील शूद्रांच्या उत्कर्षाला प्रारंभ झाला होता. नंद साम्राज्यात वाढलेल्या आर्य चाणक्यांनीं दास म्हणून शूद्राची विक्री करणाऱ्याला शिक्षा सांगितली आहे 'न त्वेवार्यस्य दासभावः।' म्हणजे आर्य हा केव्हांहि दास होता कामा नये, असा त्याचा दंडक असून त्यांच्या आर्य शब्दाच्या व्याख्येंत शूद्राचाहि समावेश होत होता. अर्थशास्त्रांतील दासकल्पांत 'म्लेच्छानाम् अदोषः प्रजाम् विक्रेतुम् आधातुम् वा।' म्हणजे म्लेच्छानीं म्लेच्छप्रजेचा क्रय-विक्रय केला तर त्यात दोष नाहीं, असाहि संकेत सांगितला आहे. असल्या म्लेच्छ दासांनाच त्यांनीं उदरदास ही संज्ञा दिलेली दिसते. 'उदरदासवर्जम् आर्य-प्राणम् अप्राप्तव्यवहारम् शूद्रम् विक्रयाधानम् नयतः स्वजनस्य द्वादशपणो दंडः, वैश्यम् द्विगुणः, क्षत्रियम् त्रिगुणः ब्राह्मणम् चतुर्गुणः, परजनस्य पूर्वमध्यमोत्तमवधा दंडाः क्रेतृश्रोतृणाम् च।' म्हणजे जन्मतः दास नसलेली आणि चातुर्वर्ण्यांत समाविष्ट झालेल्या आर्य नागरिकांच्या कुळात जन्मलेली अज्ञान शूद्र संतति विकणाऱ्या, अथवा गहाण ठेवणाऱ्या स्वजनांना बारा पण दंड करावा. वैश्य, क्षत्रिय, ब्राह्मणाची अज्ञान संतति विकणाऱ्या, किंवा गहाण ठेवणाऱ्या स्वजनांना अनुक्रमें दुप्पट, तिप्पट आणि चौपट दंड करावा. परजनांनीं अनुक्रमें शूद्र, वैश्य, क्षत्रिय, ब्राह्मण अज्ञानांना विकल्यास अथवा गहाण ठेवल्यास त्यांना क्रमानें पूर्व, मध्यम, उत्तम साहस दंड आणि वध या शिक्षा कराव्यात. याच शिक्षा विकत घेणाऱ्यांना आणि त्यांना साहाय्य करणाऱ्यांनाहि कराव्यात. एखाद्या आर्यानें स्वतःला विकलें तर त्याला दास्यमुक्त करणें हें त्याच्या ज्ञातिबांधवांचें कर्तव्य आहे, असेंहि चाणक्यांनीं सांगितलें आहे. त्याची सुटका झाली नाहीं तरी त्याची संतति स्वतंत्रच राहील. 'आत्मविक्रयिणः प्रजाम् आर्याम् विद्यात्।' आर्य चाणक्यांच्या दासकल्प या प्रकरणावरून ही गोष्ट उघड होते कीं तेव्हा भारतात सनातन वैदिक धर्मी जनांचा दास-प्रथेला विरोध करणारा समाज आणि त्यांच्या उलट त्या प्रथेचा पुरस्कार करणारा म्लेच्छ समाज असे दोन समाज असून त्यांच्यामध्यें अमेरिकेच्या संयुक्त संस्थानातील उत्तरेचीं स्वतंत्र संस्थानें आणि

दक्षिणेचीं दास पद्धतीचा पुरस्कार करणारीं संस्थानें यांच्याप्रमाणेंच तीव्र अंतः-कलह उत्पन्न झाले होते. चाणक्याच्या काळीं आर्य आणि म्लेंच्छ हे शब्द सद्यःकाला-प्रमाणें केवळ स्तुति–निंदावाचक नव्हते. त्या उभयतांमध्यें फार मोठा सामाजिक प्रभेद होता. त्या काळीं आर्य समाजांतून दास–प्रथेचें उच्चाटन होत आलें होतें. त्याच्या उलट ज्या मोंगोलियन म्लेंच्छ समाजांत बौद्ध धर्म प्रथम प्रस्थापित झाला, त्या समाजात ती प्रथा जारीनें चालू होती. अनुशासन पर्वाच्या ४५ व्या अध्यायांत म्हटलें आहे. ' अन्योऽप्यथ न विक्रेयो मनुष्यः किं पुनः प्रजाः । ' पण ही सुसंस्कृत समाजाची भावना झाली. त्या काळीं आपल्या आर्य समाजाच्या उत्तरेला पर्वतवासी जनाचा संस्कृतीनें म्लेंच्छ आणि व्यवसायानें दस्यु असा जो समाज होता, त्याला असल्या भावनाचें वावडेंच होतें.

## हिमालयाच्या पायथ्याशीं म्लेंच्छ वस्ती

हिमालयाच्या पायथ्याच्या प्रदेशातील समाज म्लेंच्छ असल्याचे उल्लेख महा-भारतात अनेकवार आले आहेत. उदाहरणार्थ शांतिपर्वाच्या १६८ व्या अध्याया-तील हे श्लोक पहा. ' हन्त ते वर्तयिष्येऽहम् इतिहास पुरातनम् । उदींच्यां दिशि यद्वृत्तम् म्लेंच्छेषु मनुजाधिप ।। ब्राह्मणो मध्यदेशीयः कृष्णागो ब्रह्मवर्जितः । ग्राम दस्युगणाकीर्णम् प्राविशत् धनतृष्णया ।। ' या उद्गारावरून असें दिसून येतें कीं मध्य देशाच्या उत्तरेकडील, वंशानें म्लेंच्छ आणि व्यवसायानें दस्यु असलेल्या समाजांत कांहीं पतित ब्राह्मण प्रवेश करून प्रमुख पद प्राप्त करून घेत. असल्याच एका पतित गोतमाचें चरित्र वरील अध्यायांत सांगितलें असून अशाच प्रकारें गोतमवसिष्ठा-सारखीं गोत्रेंहि त्या म्लेंच्छ दस्युगणात रूढ झालीं असलीं तरी त्यांच्या सामाजिक संस्कृतींत कांहीं उत्क्रांति झाली नव्हती. बुद्ध ज्या शाक्यामध्यें जन्माला आला, त्या शाक्याचीं गोतम, लिच्छवी, मल्ल, नाग, बलि, कोलिय इत्यादि कुळें होतीं. या सर्व कुळात बुद्धाला लिच्छवींच्या विषयीं अतिशय आदर वाटत होता. महापरि-निर्वाण सूत्रात दुरून येणाऱ्या लिच्छवींच्या समुदायाकडे पाहून बुद्धानें भिक्षूना म्हटलें. ' भिक्षूनो, ज्यानीं तावत् त्रिंशत् देव पाहिले नसतील, त्यानीं या लिच्छवींच्या समुदायाकडे पहावें. ' याच्या उलट कौमुदी–महोत्सव नाटकाच्या आर्य लेखिकेनें लिच्छवींचा म्लेंच्छ आणि मगधकुलाचे वैरी म्हणूनच उल्लेख केला आहे. ( मगध-कुलवैरिभिः म्लेंच्छैः लिच्छविभिः सह ) गौतमबुद्धाच्या कुळाच्या संस्कृतीसंबंधीं स्वतः कै. धर्मानंद कोशांबींनींच लिहिलें आहे, ' गौतम क्षत्रिय कुळांत जन्मला.

शाक्य क्षत्रियांचे शेजारी आणि आप्त कोलिय क्षत्रिय. या दोघामध्यें रोहिणी नदीच्या पाण्यासंबधानें वारवार मारामाऱ्या होत....या क्षत्रियाच्या एका टोळींत जन्मलेल्या गौतमानें आपल्या शेजाऱ्याचा आणि आप्ताचा सूड उगविणें साफ नाकारलें आणि एकदम तपस्वी लोकात प्रवेश केला. ' या उताऱ्यावरून वशपरंपरेच्या वैरांत वाढलेल्या टोळीवाल्यांत गौतमाचा जन्म झाला होता, हें कळून येऊन त्याच्या सस्कृतीची पुरेशी कल्पना येते. त्याचप्रमाणें ' न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे । ' या अर्जुनाच्या विचारसरणीला अनुसरून तो तपाला गेला, यावरून त्याचें गोपाळकृष्णविरोधित्वहि सुव्यक्त होतें. बुद्धाच्या प्रव्रज्येसबधीं बौद्ध पुराणें रचणाऱ्यानीं अनेक मनोहर आख्यानें रचलीं असलीं तरी यादवी युद्धाच्या भीतीनेंच तो सन्यासी झाला, असें डॉ. आंबेडकरांनींहि आग्रहानें प्रतिपादिलें आहे. म्हणजे वर्तमानकाळच्या, सीमागाधी अबदुल गफारखानासारखी त्याची सस्कृति आणि परिस्थिति होती, हें उघड आहे. या रानटी लोकांच्या गणराज्याचे गोडवे कै. जायस्वालप्रभृति विद्वानानीं गायिले असले तरी त्या गणराज्यांतील अत्याचाराना विटून जनतेनें एकतंत्री राज्यांचा पुरस्कार केला, असेंच कै. धर्मानंद कोशाबींनींहि आपलें मत दिलें आहे.

## क्रीतदासांच्या जिवावर आरामविहार

गौतम बुद्ध ज्या प्रदेशात जन्मला, तो प्रदेश म्लेंच्छाचा होता आणि म्लेंच्छ समाजांत दासप्रथा प्रचलित होती, या गोष्टी सिद्ध झाल्यानतर या रोगाचा उपद्रव भारतीयाना कोणत्या प्रकारानें झाला, याचा विचार केला पाहिजे. चीनचा प्रवासी युआन च्वाग ( ह्युएनत्सँग ) याच्या सागण्यावरून समजून येतें कीं बौद्धभिक्षूच्या साऱ्या आरामविहारातून त्याच्या सेवेसाठीं क्रीतदास ठेविलेले असत आणि त्या क्रीतदासाच्या जिवावर तेथील बौद्ध भिक्षूचे आरामविहार चालत असत एकट्या पाटलीपुत्र नगरातच असे शेकडों विहार होते. विहारांच्या प्राचुर्यामुळें मगध देशाचें नावच बिहार पडलें, यावरून तेथील आरामविहारांच्या प्राचुर्याची आणि त्यासहच तेथील दासप्रथेच्या उत्कर्षाची कल्पना येते. काश्मीर प्रातातहि असाच आरामविहाराचा प्रकर्ष झाला होता. त्या प्रातातील ' आरामिक ' क्रीतदासांनीं आरामविहारातील भिक्षूविरुद्ध वारंवार बडें केल्याचा उल्लेख युआनच्वागनें केला आहे. या दासप्रथेला चाणक्यपथी आर्यांचा तीव्र विरोध असल्यामुळें त्या प्रथेचा पुरस्कार करणाऱ्या बौद्धानीं अशोकाच्या काळापासूनच देशोदेशींच्या प्रजाजनांना दास करून

विकावयाला निघालेल्या यवनांशीं युति केली होती. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या-वाचून पुष्पमित्रानें पतजलींच्या साहाय्यानें केलेल्या कार्याचा बोध व्हावयाचा नाहीं.

## बौद्ध प्रचारानें सामाजिक स्फोट

बौद्ध धर्माच्या प्रचारानें सनातन धर्मी समाजाचे अणुपरमाणु विलग होऊन जो प्रचड सामाजिक स्फोट झाला, त्याचे दुष्परिणाम देशाला बौद्धांच्या समाज-घातकी चरित्रांच्या रूपानें शेकडों वर्षे भोगावे लागले. व्यक्तिप्रणीत आणि व्यक्ति-वादी धर्मांचा समाजावर किती भीषण परिणाम होतो, याचें विवेचन सर जे. गॉर्डन फ्रेझर यांनीं त्याच्या 'गोल्डन बाऊ' या नामांकित ग्रथात पुढीलप्रमाणें केलें आहे— 'Greek and Roman society was built on the conception of the subordination of the individual to the community, of the citizen to the state, it set the safty of the commonwealth as the supreme aim of conduct, above the safty of the individual whether in this world or in a world to come. Trained form infancy in this unselfish ideal, the citizens devoted their lives to the public service, and were ready to lay them down for the common good, or if they shrank form the supreme sacrifice, it never occurred to them that they acted otherwise than basely in preferring their personel existence to the interests of their country. All this was changed by the spread of oriental religions which inculcated the communion of the soul with God and its eternal salvation as the only object worth living for, objects in comparison with which the prosperity and even the existence of the state sank into insignificance The inevitable result of this selfish and immoral doctrine was to withdraw the devotee more and more from the public service, to concentrate his thoughts on his own spiritual emotions, and to breed in, a contempt for the present life which he regarded merely as a probation for a better and an eternel. The saint and the recluse disdainful of earth and wrapt in ecstatic contemplation of heaven became in popular opinion the highest ideal of humanity dis-

placing the old ideal of patriot and hero who, forgetful of self lives and is ready to die for the good of his country. The earthly city seemed poor and contemptible to men whose eyes beheld the city of God coming in the clouds of heaven.

Thus the centre of gravity, so to say, was shifted from the present to the future life, and however much the other world may have gained, there can be little doubt that this one lost heavily by the change. A general disintegration of the body politic set in. The ties of the state and the family were loosered; the structure of the society tended to resolve itself into its individual elements and thereby relapse into barbarism; for civilisation is only possible through the active co-operation of the citizens and their willingness to subordinate their private interests to the common good, men refused to defend their country and even to continue their kind, in their anxiety to save their own souls and the souls of others, they were content to leave the material world, which they identified with the principle of evil, to perish around them.'

हा उतारा मोठा असला तरी महत्त्वाचा आहे. यात वर्णिलेल्या ग्रीक-रोमन समाजांप्रमाणेंच वैदिक आर्यांचा समाजहि समाजाच्या हितासाठीं व्यक्तीनें आपल्या सर्वस्वाचा यज्ञ करण्याच्या भावनेवरच आधारलेला होता. कोणाहि प्राणभीरु व्यक्तीनें हें कर्तव्य पार पाडण्यात हयगय केली तर त्या व्यक्तीला आपल्या कृतीचा पश्चात्ताप होत असे. आपलें कर्तव्य चुकवून तप करायला गेल्याची ऐट कोणी मिरवीत नसे. पण बौद्ध किंवा ख्रिस्ती धर्मासारख्या व्यक्तिप्रणीत धर्मांच्या उदयानंतर ही परिस्थिति पालटली. जीवात्म्यानें परमात्म्याची प्राप्ति करून घेणें अथवा बौद्धांच्या अनात्मवादाप्रमाणें भवचक्राच्या फेऱ्यांत भ्रमत असलेल्या मानवानें पुनर्भवापासूनच आपली मुक्ति करून घेणें यांसारख्या ध्येयाच्या पुढें समाजाची भरभराटच काय, पण त्याचें अस्तित्वसुद्धा कवडीमोलाचें भासू लागलें. असल्या स्वार्थी आणि अनैतिक विचारसरणीमुळें सामाजिक कर्तव्याची अवहेलना करून मानव आपल्या आत्मिक आनंदातच दंग होऊन इहलोकातील जीवनाचाच तिरस्कार करूं लागला. त्यामुळें देशभक्त आणि वीर याचे आदर्श मागें पडून साधुसंतांचेच आदर्श समाजासमोर झळकू लागले. अशा

प्रकारें जीवनाचा गुरुत्वमध्यच ढळून इहलोकातून परलोकात गेल्यानें परलोकाचा कितीहि लाभ झाला असला तरी इहलोकाची अतिशय हानि झाली, याविषयीं संशय नाहीं. त्यामुळें समाजाचें आणि राष्ट्राचें सर्वतोपरी विघटन होऊं लागलें. राष्ट्रीय आणि कौटुंबिक जीवनाचीं बधनें शिथिल झालीं. समाजाचे सारेच घटकावयव परस्परापासून पृथक् होऊ लागल्यानें सस्कृतीचा लोप होऊन समाज परत रानटी बनू लागला. कारण समाजाच्या घटकावयवामध्यें मनःपूर्वक सहकार्य होत असलें आणि सामाजिक हिताच्या मानानें वैयक्तिक हिताला गौण स्थान मिळत असलें, तरच सस्कृति टिकू शकते. पण या नव्या व्यक्तिप्रणीत धर्मांच्या प्रभावानें लोकांनीं स्वदेशाचें परशत्रूच्या आक्रमणापासून सरक्षण करावयाचें नाकारलें; इतकेंच नव्हे तर त्यानीं सतत्युत्पादन करून मानवजात जिवत ठेवावयाचेंहि नाकारलें. आपल्या आणि इतर लोकाच्या मुक्तिलाभासाठीं त्यानीं या पापी जगाची विनाशाच्या दिशेनें होणारी प्रगति शांत मनानें पाहिली. दिक् तत्वाला विसरून कालतत्वाची उपासना करण्याचे हे स्वाभाविक परिणाम आहेत.

## समाजसंघटनेला अशोकाचा विरोध

लोकाचें लक्ष इहलोकावरून उडून परलोकाकडे लागल्यानें समाजाची जी विघटना होते, त्या विघटनेंत भर टाकण्याकरिता अशोकानें ‘ समाजा ’लाच बंदी केली होती. अशोकलेखातील ‘समाज’ शब्दाचा अर्थ जत्रा असावा, असें कै. धर्मानद कोशाबींनीं सुचविलें आहे. ही त्याची सूचना सार्थ असल्यास हिंदूंच्या साऱ्या धार्मिक उत्सवाना अशोकानें बदी केली होती, हें ऐतिहासिक सत्य उघडकीला येतें कारण जत्रा भरतात, त्या धार्मिक उत्सवाच्या निमित्तानेंच भरतात. मुद्राराक्षस नाटकात चाणक्यांनीं कौमुदीमहोत्सवाला बदी केल्यामुळें त्याचें चंद्रगुप्ताशीं अटीतटीचें भांडण झाल्याचें वर्णन आलें आहे. तें भांडण नाटकी असलें तरी चंद्रगुप्तोत्तर काळांत त्याच्या कुलांगार नातवानें जेव्हा सर्व धार्मिक उत्सवाना आणि संमेलनाना बदी केली, त्या वेळीं जनतेचा किती प्रक्षोभ झाला असेल, त्याची त्या कलहावरून चांगली कल्पना येते. अर्थशास्त्रात यात्रा, समाज, उत्सव आणि प्रवहण हे सारे समारभ राजानीं करावेत, असा निर्देश आहे. यावर टीकाकारांनीं ‘ यात्रा देवतानाम्, समाजो लोकसमुदयः, उत्सवः इद्रवसंतोत्सवादिः, प्रवहणमुद्यानभोजनादि । ’ अशी टीका लिहिली आहे. या टीकेवरून समाज म्हणजे अर्वाचीन काळचीं समेलनें असावींत, असें दिसतें.

---

प्रकरण तिसरें

# सेनापति पुष्पमित्र

विदिशेंत प्रथम राज्यारूढ झालेल्या पुष्पमित्रानें बौद्धांच्या राजवटींत मागें पडलेल्या दिक् तत्त्वाचा पुनरुद्धार केला, हा एक इतिहासातील योगायोगच आहे. विदिशेंत राज्य करीत असताना पुष्पमित्र ज्याप्रमाणें सप्रतीसारख्या बलिष्ठ मौर्य-राजावर रुष्ट झालेल्या महागिरि या महान् दिगबर मुनींचें स्वागत करीत होता, त्याप्रमाणेंच 'को वेदान् उद्धरिष्यति' या यक्षप्रश्नाचें उत्तर शोधत असलेल्या पतजलींसारख्या महाब्राह्मणाचेंहि अगत्यानें आदरातिथ्य करीत असला पाहिजे. अशोकाच्या काळापासून इतर सर्व वैदिक यज्ञ बद पडले असले तरी स्वतः वैदिक परपरेंतील प्रथाचे यज्ञच धूमधडाक्यानें चालू होते. मुहम्मदी धर्माच्या उदयानतर उमर नामक खलिफानें अलेक्झाड्रिया येथील विश्वविख्यात ग्रथालयाची राखरागोळी केली, म्हणून अनेक इतिहासकार त्याला दोष देत असतात. पण अशोक राजा-संबधीं असलीच माहिती उपलब्ध झाली असता तिच्याकडे मात्र पद्धतशीरपणें दुर्लक्ष केलें जातें. १९३० मध्यें ओरिसातील हाथीगुंफा शिलालेखासबंधीं लिहि-ताना श्री. नारायण त्रिपाठी यानीं बिहार ओरिसा प्राच्यविद्यासशोधन सस्थेच्या मुखपत्रात ( खंड १६ पान १८९ ) त्या प्रातातील पुरातन हस्तलेखातून उपलब्ध झालेली ही परपरागत माहिती प्रकाशात आणली आहे अशोकाच्या समकालीन चीनमध्येंहि असले प्राचीन ग्रथाचे यज्ञ समारभानें चालू होते. स्वतः देवानाप्रिय राजाच्या काळींच असले अत्याचार चालू असले तर 'स्वराष्ट्रमर्दते घोरः धर्म-वादी अधार्मिकः' असें ज्या शालिशूक राजाचें युगपुराणात वर्णन आलें आहे, त्याच्या राजवटींत वैदिक धर्माभिमान्यांची कशी ससेहोलपट झाली असेल, याची वाचकाना सहज कल्पना करता येईल. या कालचक्राच्या फेऱ्याला कलाटणी देण्याच्या उद्देशानें पतंजलींनीं चित्रकूट पर्वतावर उपासना आरभिली होती. 'चित्रकूटे गिरौ रम्ये नानाधातुविचित्रिते। तत्रावसन् महाप्राज्ञः उपाध्यायः पत-जलिः ॥ असें भविष्यपुराणात सागितलें आहे. पतजलि हा शेषाचा अवतार होता, अशी परंपरा आहे. या परपरेचा अर्थ इतकाच कीं पुष्पमित्राच्या पुष्य नक्षत्राच्या

आश्रित असलेल्या आश्लेषा नक्षत्रावर त्याचा जन्म झाला होता. हें अनंत शेषाचेंच नक्षत्र आहे. या पुण्य आणि आश्लेषा नक्षत्रावर जन्मलेल्या राज आणि ज्ञान योग्याची युति प्रथम पाटलीपुत्रात झाली नसून ती उभयतांच्या शैशवात विदिशेच्या परिसरातच झाली असली पाहिजे. कलकत्ता विद्यापीठाचे सर्वोत प्रसिद्ध कुलगुरु आशुतोष मुखोपाध्याय याच्या सन्मानार्थ प्रसिद्ध झालेल्या ग्रंथावलींत प्रो. सिल्व्हें लेव्ही यानीं ' गोनर्द, ल बेर्सो द्यु गोनर्दीय ' हा लेख लिहून पतजलींचें निवासस्थान गोनर्द हें उज्जयिनीहून विदिशेला जाण्याच्या वाटेवर असल्याचें सिद्ध केलें आहे. इतकेंच नव्हें तर विदिशेशेजारच्या साचीच्या स्तूपाला महिष्मती, विदिशा, तुंब-वन, उज्जयिनी इत्यादि ठिकाणच्या नागरिकानीं देणग्या दिल्याचे उल्लेख आढळत असूनसुद्धा या दात्याच्या नाममालेंत गोनर्दच्या नागरिकाचीं नावें अभावानेंच झळकत असल्याचाहि त्यानीं विस्मयचकित होऊन उल्लेख केला आहे. ' On s' etonne be n'y pas rencor trer des gens de gonarda. ' माझ्या गुरुजींच्या गुरुजींना विस्मयजनक वाटणारी ही घटना माझ्यासारख्या हिंदुत्वनिष्ठ ब्राह्मणाला अगदीं स्वाभाविक वाटते. गोनर्द ही पतजलींची मातृभूमि, त्याच्या पूर्वजाच्या आणि वशजांच्या पुण्याईमुळें बौद्ध पाखडापासून सर्वस्वीं अकलुषित आणि अकलंकित राहिली असल्यानें हिंदुत्वापासून न्यूनाधिक प्रमाणात च्युत झालेल्याच्या साचीच्या शिलालेखातील नाममालेंत गोनर्दीयाचीं नामें आढळत नाहींत या अनुल्लेखावरूनच गोनर्द हें तेव्हा बौद्धविरोधी विचारसरणीचें एक प्रमुख केंद्र असल्याचें कळून येतें. या बौद्धविरोधी केंद्राच्या प्रभावकक्षेंत पुष्यमित्र वाढला असल्यानें विद्यार्थीदशेंतच त्याची पतजलींशीं मैत्री जुळली असावी पुष्प-मित्र हा समाज आणि धर्म याचा रक्षक, तसेंच गीतेचा अभ्यासक होता, असें भविष्यपुराणात सांगितलें आहे.

## पुष्पमित्रपतंजलींचा शास्त्रालाप

इतिहास विसरून इथें आपण कल्पना करू कीं युद्धशास्त्राचा अभ्यास आटोपल्यानतर पुष्पमित्र पतजलींसह महाभारतांतील राजधर्मपर्वाचें अध्ययन करीत आहे, आणि त्या महान् ग्रथातील विवेचन आणि बौद्ध सम्राटाचें राजकारण याच्यातील विरोध पाहून त्या उभयताचें अतःकरण एकाच क्षणीं विषादानें व्यथित होत आहे. ' भूमिरेतौ निगिरति सर्पो बिलशयानिव । राजान चाविरोद्धार ब्राह्मण चाप्रवासिनम् ॥ ' म्हणजे सर्प ज्याप्रमाणें बिळांत दडून राहणाऱ्यांना गिळून टाकतो,

त्याप्रमाणें शत्रूंना विरोध न करणाऱ्या राजाला आणि प्रवास न करणाऱ्या ब्राह्मणाला भूमि गिळून टाकते. हा श्लोक पाहून त्या दोघा मित्रांनीं एकमेकाचें मुखावलोकन केलें असेल, आणि कदाचित् पाटलीपुत्रांत व्याकरणाची परीक्षा देण्याकरितां जाण्याचा पुष्पमित्रानें आपल्या मित्राला आग्रहहि केला असेल. तेव्हा पतंजलींनीं त्याला पुढील श्लोक वाचून दाखविले असतील. ' उत्थान हि नरेन्द्राणा बृहस्पतिरभाषत । राजधर्मस्य तन्मूल श्लोकाश्चात्र निबोध मे ।। उत्थानेनामृत लब्ध उत्थानेनासुरा हताः । उत्थानेन महेंद्रेण श्रैष्ठयं प्राप्त दिवीह्च ।। उत्थानवीरः पुरुषो वाग्वीरान् अधितिष्ठति । उत्थानवीरान् वाग्वीरा रमयन्त उपासते ।। उत्थानहीनो राजाहि बुद्धिमान् अपि नित्यशः । प्रधर्षमाणः शत्रूणाम् भुजग इव निर्विषः ।। क्षममाण नृप नित्य नीचः परिभवेज्जनः । हस्तियता गजस्येव शिर एवारुरुक्षति ।। '
हे श्लोक वाचताना पुष्पमित्रानें वाग्वीर पतजलींची चेष्टा केली असेल, उलट पक्षीं अंगठीच्या खड्यावरील राज्यासमान आकर देशाचा राजा होऊन बसण्यामुळें पतजलींनीं पुष्पमित्राचा सस्नेह उपहास केला असेल.

## पुष्पमित्राचें पाटली पुत्रासप्रयाण

अवतारी पुरुषाचें अलौकिक कर्तृत्व आणीबाणीच्या प्रसंगींच प्रकट होतें. तसा प्रसग येईपर्यंत त्याना बहुधा प्रचलित घडामोडींपासून अलिप्त राहूनच काळ कंठावा लागतो. या नियमाला अनुसरून पुष्पमित्राचें जीवन अलिप्तपणें चाललें असताना मौर्य साम्राज्यावर यवनाची स्वारी झाली. ही स्वारी त्यानीं मथुरा आणि पाचाल येथील राजाच्या सहकार्यानेंच केली होती, असें प्रतिपादन युगपुराणाच्या नव्या प्रतीचे संपादक श्री. माकड आणि इडोग्रीक्स या ग्रंथाचे कर्ते डॉ. ए. के. नारायण यानीं केलें आहे. पण तें तत्कालीन परिस्थितीशीं आणि स्वतः युगपुराणाच्या पुराव्याशीं विसगत आहे. या स्वारीच्या प्रसगीं मध्यभारतातील सैन्यें मध्यवर्ती सत्तेच्या साहाय्याला जाऊ नयेत, या हेतूने यवनानीं अर्वाचीन राजस्थानांत प्रवेश करून चितोडगडाजवळच्या माध्यमिका नगरीला वेढा घातला. पण त्याच क्षणीं यवनाचे मुख्य सैन्य बौद्धाच्या साहाय्याने मथुरा, पाचाल, साकेत इत्यादि प्रात जिंकीत पाटलीपुत्राकडे धाव घेत होतें. पुष्पमित्र पाटलीपुत्रात सत्ताधारी बनण्यापूर्वीं मौर्य साम्राज्यात तीर्थिकाचीं म्हणजे सनातन धर्माच्या अनुयायाचीं बडें झालीं होतीं, असे लामा तारानाथानीं भारतांतील बौद्ध धर्माच्या इतिहासांत लिहिलें आहे. या वैदिक धर्मानुयायी तीर्थिकाचे नेतृत्व अर्तीं पुष्पमित्राकडे आलें

असलें तरी मगधेश्वरावर यवनांची स्वारी होतांच त्याच्या तांतडीच्या पत्रांना मान देऊन पुष्पामित्रानें विदिशा राजधानींत अग्निमित्राला अधिष्ठित करून त्या अगठीच्या खड्यावरील राज्याचा त्याग केला आणि स्वतः मौर्यसम्राटाच्या एका सेनाविभागाचा सेनापति बनून पाटलीपुत्राकडे प्रयाण केलें. पुष्पमित्रानें पाटलीपुत्रात प्रवेश केल्यापासून जे सेनानीत्वाचे गुण प्रकट केले, त्यामुळें सेनानी शब्दाचा अर्थच स्कंददेवाप्रमाणेंच पुष्पामित्र असाहि बनून गेला आहे. स्कंददेवाचीं प्रचलित आख्यानें अंशतः पुष्पमित्रचरित्राच्या अनुरोधानें लिहिलीं असल्यानें या मानव सेनापतीच्या चरित्रात त्या देवसेनापतीच्या चरित्राचाहि उपयोग करणे आवश्यक आहे.

## प्रतिज्ञादुर्बल बृहद्रथाचा वध

यवनांच्या भारतावर अनेक स्वाऱ्या झाल्या असल्या तरी केवळ एका स्वारींतच त्याना पाटलीपुत्रापर्यंत धडक मारता आली, असें उपलब्ध इतिहासावरून समजतें. त्या स्वारीच्या पूर्वी बौद्ध शालिशूकाच्या अत्याचारांना विटलेल्या तीर्थिकाचीं देशात बंडें चालू झालीं होतीं आणि अहिंसावादी अशोकाचे वशज बहुतकरून एकमेकाच्या हत्या करून अंतःपुरातील क्षणभगुर राज्यक्रात्या घडवून आणण्यात दग झाले होते. एका रोमन साम्राटानें आपल्या पुत्राना असा अतिम उपदेश केला होता कीं एकोप्यानें रहा, सैनिकाना श्रीमत करा आणि इतर सर्वांना तुच्छ माना. त्याच्या उलट अशोकानें आपल्या वशजाना उपदेश केलेला दिसतो, कीं विभक्त व्हा, भिक्षूना श्रीमंत करा आणि साऱ्या शस्त्रधाऱ्याना शरण जा. असो। अतःपुरातील क्रात्यामुळेंच अशोकापासून बृहद्रथापर्यंतच्या राजाचो सख्या निष्कारण फुगलेली दिसते. पुष्पमित्रानें पाटलीपुत्रात प्रवेश केल्यानतर झालेल्या बृहद्रथाच्या हत्येनें या अस्थिर राजकारणाचा आणि मौर्य घराण्याचाहि अत झाला. पाटलीपुत्रांतील राजकारणात प्रथमच प्रवेश करणाऱ्या पुष्पमित्राला मौर्य सम्राटाच्या कांहीं मत्र्यांनीं कसून विरोध केला असला पाहिजे. त्यापैकीं एका मत्र्याची पुष्पमित्राच्या दुसऱ्या अश्वमेधाच्या निमित्तानें सुटका झाल्याचा उल्लेख मालविकाग्निमित्रांत येतो. हा सारा विरोध ध्यानात घेऊन पुष्पमित्रानें प्रथमच बृहद्रथाकडून कोणत्याहि परिस्थितींत सैन्याचा विश्वासघात न करण्याची प्रातज्ञा करविली असावी. या प्रतिज्ञेचा भग केल्यामुळेंच बृहद्रथाची हत्या अपरिहार्य झाली. पुष्पमित्राचें सेनापतित्वाचें कर्तृत्व नेत्र दिपविणारें असलें तरी सेनेच्या श्रद्धेचा दुरुपयोग करून साम्राज्यसत्ता सपादन केल्याच्या निमित्तानें त्याला नावें ठेवणारे लोक त्या काळींहि होते आणि पुढेंहि बाणभट्टापर्यंत

तरी त्याची परंपरा टिकून राहिली. शुंग घराण्याचे आदि, मध्य, अंत यांचा इतिहास बाणभट्टानें हर्षचरितातील तीन वाक्यांत सांगितला आहे. “ प्रतिज्ञादुर्बलंच बलदर्शनव्यपदेशदर्शिताशेषसैन्यः सेनानीः अनार्यो मौर्यं बृहद्रथं पिपेष पुष्पमित्रः स्वामिनम्। अति दयितलास्यस्य च शैलूषमध्यमध्यास्य मूर्धानम् असिलतया मृणालमिव अलुनात् अग्निमित्रात्मजस्य सुमित्रस्य मित्रदेवः। ( मूलदेव ) अतिस्त्रीसंगरतम् अनंगपरवशं शुंगं अमात्यो वसुदेवो देवभूति दासीदुहित्रा देवीव्यंजनया वीतजीवितम् अकारयत्।” हर्षराजाच्या हस्तिसेनेचा अधिपति स्कंदगुप्त यानें शत्रूंनीं केलेल्या राज्यवर्धनवधानंतर नवीनच सिंहासनाधिष्ठित झालेल्या आपल्या प्रभूला अप्रमादित्वाचा उपदेश करतांना उदाहरणार्थ उल्लेखिलेल्या एकंदर अठ्ठावीस आख्यायिकांमधून शुंगेतिहासाशीं संबद्ध असलेल्या तीनच आख्यायिका वर उतरून घेतल्या आहेत. स्कंदगुप्ताच्या सविस्तर भाषणावरून त्या काळीं उपलब्ध असलेल्या नाट्यपूर्ण आणि रोमांचपूर्ण ऐतिहासिक वाङ्मयाची यथार्थ कल्पना येते. पण बाण आणि दंडी यांच्यानंतर अर्थशास्त्र या विषयाचीच कुचेष्टा प्रचलित होऊन त्या शास्त्राच्या अध्ययनासहच इतिहासाध्ययनाचाहि लोप झाला आणि त्यामुळें आतां आपल्याला ऐतिहासिक माहितीच्या एकेका कणाकरितां तडफडतांना कणादाच्या ‘ कणाः कणाः ’ या वचनाचें स्मरण करावें लागत आहे. त्यामुळेंच पुनः पुन. मनांत येतें कीं शुंग घराण्याचा आदि, मध्य, अंत या विषयावर बाणभट्टानें एक नाटकत्रयीच लिहायला हवी होती. पण ग्रीक नाटककाराप्रमाणें संस्कृत नाटककारांना अशी त्रयी लिहिण्याची कल्पना परिचित नसल्यानें त्यानें तें काम करून ठेविलें नाहीं. असो. पहिल्या ब्राह्मण सम्राटाच्या वंशजानीं भावी काळांतील दुसऱ्या बाजीरावाच्या करितां आदर्श निर्माण करण्याचे जे उद्योग चालविले होते, त्याचें कोणींच समर्थन करू शकत नाहींत पण अखिल मगधसेनेसमक्ष पुष्पमित्रानें प्रतिज्ञादुर्बल बृहद्रथाचा जो वध केला अथवा करविला असेल, तो त्याच्या प्रतिज्ञाभंगानें न्याय्य ठरत असल्यानें पुष्पमित्राला अनार्य हा शब्द लावण्यांत कांहींच अर्थ नाहीं पण एकीकडे वैदिक धर्माभिमानी असलेला बाणभट्ट हा हर्षवर्धनासारख्या बुद्धानुयायी सम्राटाचा सभाकवि असल्यानें त्याला असलीं परस्परविरोधी विधानें करावीं लागलीं आहेत. वरील वचनांतील प्रतिज्ञादुर्बल हा पाठ प्रो. कोवेल यांच्या प्रतींत असून व्हिन्सेंट स्मिथसारख्या इतिहासकारांनींहि तोच पाठ मान्य केला आहे. अलीकडे कांहीं विद्वानांनीं प्रज्ञादुर्बल असा पाठ स्वीकारिला असला तरी प्रज्ञादुर्बलाला प्रकटपणें मारून त्याच्या बुद्धिमांद्याचें प्रायश्चित्त देण्याची कांहींच आवश्यकता नसल्यानें तो पाठ

अग्राह्य आहे. वर उतरून घेतलेल्या तीन वाक्यांतील शुंगापैकीं शेवटच्या देवभूतीलाच बाणभट्टानें शुंग म्हटलें असल्यानें पुष्पमित्र, अग्निमित्र, सुमित्र हे शुंग नसावेत, अशीहि कल्पना एका विद्वान् इतिहासकारानीं केली आहे. पण या कल्पनेला शब्द-च्छलापेक्षा अधिक महत्त्व देतां येत नाहीं. कारण त्यामुळें देवभूतीचा वध करविणाऱ्या अमात्य वासुदेवाला बाणभट्टानें काण्व म्हटलें नसल्यानें तोहि काण्व नसावा, असे प्रतिपादन करण्याचा अनवस्थाप्रसंग येईल

## बाण विरुद्ध कालिदास

अखिल मगधसेनेसमक्ष पुष्पमित्रानें प्रतिज्ञादुर्बल बृहद्रथाचा जो वध केला असेल अथवा करविला असेल, त्याचें धर्मशास्त्राच्या आधारानें कालिदासानें समर्पक समर्थन करून ठेविलें आहे. 'पराभिसंधानपरं यद्यप्यस्य विचेष्टितम् । जिगीषोरश्वमेधाय धर्म्यमेव बभूव तत् ।।' (रघु १७–७६) (परप्रतारणापूर्ण राजकारण तत्त्वता । तरीहि धर्म्य तें होई अश्वमेधार्थ जिंकिता. ) अशोकापासूनचे बौद्ध सम्राट् देशाच्या घटनेचा भंग करून आणि जनमताविरुद्ध वर्तन करूनच पाटलीपुत्रांत राज्य करीत होते. या आर्यसमाजांत अधर्म्य ठरलेल्या दासप्रथेचा पुरस्कार करणाऱ्या सम्राटाचा वध करून पुनश्च सनातन धर्माधिष्ठित साम्राज्याची प्राणप्रतिष्ठा करताना हिंसेचा आणि परप्रवचनेचा काहीं अल्पस्वल्प दोष लागला तरी अश्वमेध केल्यानें म्हणजे देशात एकछत्री साम्राज्य स्थापून परचक्राचें निवारण केल्यानें त्याचें पूर्ण क्षालन होतें, असे बहुतकरून महाभारताच्या आधारानेंच कालिदासानें प्रतिपादिलें आहे. याच विचारसरणीनें प्रेरित होऊन पुष्पमित्रानें सनातन धर्माधिष्ठित साम्राज्यस्थापनेची सांगता म्हणून एक आणि परचक्रनिवारणाच्या सांगतेप्रीत्यर्थ दुसरा असे दोन अश्वमेध केले. पण आमच्या अर्वाचीन इतिहासकारांना बौद्ध प्रचाराची कावीळ झाल्यानें अश्वमेधातील पशुहत्या तेवढी दृग्गोचर होते आणि त्या यज्ञानें राष्ट्रैक्याचा होणारा मूर्तिमंत साक्षात्कार आणि परशत्रूच्या आक्रमक सेनांना आपल्या घोड्याच्या टापाखालीं तुडविण्याची तत्परता याची मात्र कल्पना येत नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट आहे

## मौर्य अंतःपुरांतील यवनी

अशोकादि बौद्ध सम्राटांनीं घटनाभंग करूनच राज्यकारभार चालविल्याचा वर जो उल्लेख आला आहे, त्याचें इथें थोडें स्पष्टीकरण केलें पाहिजे. कौटलीय अर्थशास्त्र हीच मौर्य साम्राज्याची घटना होती आणि ही घटना धाब्यावर बसवूनच

अशोकादि बौद्ध सम्राटांनीं यवनांच्या साहाय्यानें आपलें साम्राज्य चालविलें होतें. तुषास्पासारखे यवन अशोकानें राज्यपालपदावर नेमले होते, इतकेंच नव्हें तर चंद्रगुप्तानें ग्रीक राजकन्येचा स्वीकार केल्यापासून मौर्यांच्या अंतःपुरात यवनींचा जो चचुप्रवेश झाला होता, त्याला त्याच्या वंशजांच्या काळीं मुसलप्रवेशाचेंच स्वरूप प्राप्त झालें होतें. कालिदासाचा दुष्यंत बाणासनधारी यवनींनीं परिवृत अशा परि-स्थितींत रंगभूमीवर ज्या अर्थीं प्रवेश करतो, त्या अर्थीं तो त्या कविकुलगुरुच्या काळापूर्वीच्या प्रमुख राजघराण्याचें ' महाजनो येन गतः स पंथाः । ' या न्यायानें अनुकरण करीत असला पाहिजे, हें उघड आहे. ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे मौर्य सम्राट् आपल्या संरक्षणाकरिता यवनींवर अवलंबून रहात होते, हें अलिखित रहस्य व्यक्त होतें, या यवनींच्या पाठोपाठच त्या बौद्ध सम्राटांनीं आणि त्यांच्या समानधर्मी वरिष्ठ अधिकाऱ्यांनींहि आपल्या संरक्षणाकरिता यवन गारदी ठेविले असतीलच. त्याकरिताच अशोकानें आपल्या शिलाशासनांतून भावी मौर्य सम्राटांना मौर्य साम्राज्याच्या एकमेव शत्रूविरुद्ध केव्हाहि शस्त्र न उचलण्याची शपथ घालून ठेविली असली पाहिजे. बौद्ध आणि यवन यांच्या या कौटल्यकृत घटनाविरोधी कटाचा पुष्यमित्रानें बीमोड केला आणि अर्थशास्त्राला अनुसरून आपल्या साम्राज्याची पुनर्घटना केली. त्यामुळें तोंपर्यंत बौद्धसाम्राज्याविरोधी म्हणून बहुधा भूमिगत असलेला चाणक्याचा ग्रंथ शुंगकाळीं सर्वसाधारण अभ्यासक्रमाचाच एक विषय बनला. अर्थशास्त्राचा कालिदासासारख्या कवीनेंहि किती सूक्ष्म अभ्यास केला होता, हें कै. हिरालाल अमृतलाल शहा, डॉ. दशरथ शर्मा, डॉ. राघवन् इत्यादि विद्वानांनीं सविस्तर दाखवून दिलेंच आहे. दिव्यावदान, जातकमाला इत्यादि पहिल्यादुसऱ्या शतकात उदयास आलेल्या बौद्ध ग्रंथातूनहि चाणक्याच्या अर्थशास्त्राचे कसे संदर्भ येतात, हें डॉ. जॉन्स्टन यांनीं प्रकाशात आणलें आहे. असो.

## बृहद्रथ बृहन्नडा बनला

मौर्यांच्या अंतःपुरातील यवनींचा प्रभाव लक्षात घेतल्यानंतर वर बाण-भट्टाच्या अवतरणांतून बृहद्रथाच्या प्रतिज्ञादुर्बलत्वाचा जो उल्लेख आला आहे, त्याचा अर्थ लावणें शक्य होतें. पतंजलींच्या महाभाष्यांतून अल्पकाळापूर्वीं घडून गेलेल्या घटनांचीं उदाहरणें म्हणून साकेत आणि माध्यमिका येथील वेढयाचा उल्लेख आला असून वर्तमानकाळीं घडत असलेल्या घटनेच्या उदाहरणाकरिता पुष्पमित्राच्या यज्ञाचा उल्लेख आला आहे. यावरून यवनांचें आक्रमण परतवून

साकेत आणि माध्यमिका येथील वेढे उठविल्यानंतर पुष्पमित्राचा अश्वमेध झाला, असें दिसतें. तत्पूर्वी, ' ततः साकेतमाक्रम्य पांचालान् माथुरास्तथा । यवना दुष्टविक्रांताः प्राप्स्यति कुसुमध्वजम् ।। ' या वृद्धगर्गाच्या युगपुराणातील वचनावरून मथुरा, पांचाल आणि साकेत हे तीन प्रांत तुडवून दुष्टविक्रांत यवनांची सेना कुसुमपुरापाशीं येऊन थडकली असल्याचें कळून येतें. या आणीबाणीच्या प्रसंगीं यवनांना प्रतिरोध करून त्यांचा भीषण रोष ओढवून घेतल्यास पाटलीपुत्रासारख्या समृद्ध आणि सांस्कृतिक जीवनाचें अतिप्रमुख केंद्र असलेल्या राजधानीचा इराणच्या पर्सिपोलिस् राजधानीप्रमाणेंच संपूर्ण विध्वंस होण्याचा पूर्ण संभव असल्यानें या अपयशाचे धनी व्हावयाला मौर्य सम्राट् बृहद्रथ आणि त्याचे सचिव स्वाभाविकपणेंच कचरू लागले. पण यवनांची टोळधाड पुष्पपुराकडे त्वरेनें येऊं लागली, त्याच वेळीं सम्राटाच्या निकडीच्या निमंत्रणावरून विदिशेच्या राज्यावर अग्निमित्राची स्थापना करून पुष्पमित्रानेंहि स्वतःचेंच नांव धारण करणाऱ्या राजधानीकडे धांव घेतली होती पुष्पमित्राचा पुष्पपुरांत प्रवेश झाल्यानंतर तेथील आर्य नागरिकांना काळरात्रीनंतर मित्रोदय झाल्याचाच भास झाला आणि त्याच्या आगमनानें उत्साहित झालेल्या जनमताच्या दुर्निवार प्रभावामुळें बृहद्रथाला प्रतिकारवादी पक्षाचा प्रमुख पुष्पमित्र याला सेनापतिपदावर अभिषिक्त करून आपल्या शरणागतीचा पुरस्कार करणाऱ्या सचिवांना बंदींत टाकावें लागलें. या प्रसंगीं पुष्पमित्रानें भाऊसाहेबाच्या इब्राहिमखान गारद्याप्रमाणेंच आपल्या धन्याकडून शत्रूशीं शेवटपर्यंत लढण्याचें आणि सैन्याचा विश्वासघात न करण्याचें अभिवचन घेतलें असलें पाहिजे. त्यानंतर राजसभेंतून अंतःपुरांत परत जातांच त्या यवनीपरिवृत बौद्ध बृहद्रथाचें बृहन्नडेंत रूपांतर झाल्यानें त्यानें वचनभंग करून अंतःपुरांतील यवनींच्या द्वारा यवनांशीं बोलणीं आरंभिलीं असावींत. अशा परिस्थितींत पुष्पमित्रानें पुष्पपुरांतील संपूर्ण सेनेचें संचलन दाखवून त्या बृहन्नडा बनलेल्या सम्राटाला धीर देण्याचा प्रयत्न केला असावा. पण तेवढ्यानें त्याला धीर न येतां उलट चंद्रगुप्तसेनेच्या मानानें आपलें सैन्य किती अल्प आहे, याचीच त्या प्रतिज्ञादुर्बल राजाला जाणीव होऊन त्यानें आपले तुच्छ प्राण वाचविण्याकरितां आणि राजधानीचा विध्वंस टाळण्याकरिता त्या साऱ्या सैन्याला संन्यस्तखड्ग होऊन यवनांना शरण जाण्याची आज्ञा केली असली पाहिजे. पण यवनांना शरण जाण्याकरितां कांहीं पुष्पमित्रानें मगध सेनापतींची परंपरापुनीत यवनसंहारकर्त्री असिलता आपल्या हातीं घेतली नव्हती. त्यामुळें त्याच्यापुढें त्या क्षणीं आत्महत्या करणें,

अथवा सम्राटाची हत्या करणें याव्याचून अन्य पर्यायच उरला नव्हता. किंबहुना, पुष्पमित्राच्या नेतृत्वानें प्रभावित झालेल्या मगधसेनेनें त्याला इतर पर्यायांचा कोणत्याहि प्रकारें विचार करण्याला सवडहि दिली नसेल.

## महीपाल विरुद्ध पुष्यमाणव

'महीपालवचः श्रुत्वा जुघुषुः पुष्यमाणवाः।' म्हणजे महीपालाचें वचन ऐकून पुष्पमित्राच्या तरुण अनुयायानीं घोष केला, असें एक वचन महाभाष्यांत आलें आहे. अशोकाच्या काळापासून यवन आणि बौद्ध यांचें वैदिक धर्माच्या अनुयायांविरुद्ध जें सगनमत झालें होतें, त्याच्या भीषण अतिम परिणतीचीं चित्रें पुष्पमित्राच्या तरुण अनुयायाच्या नेत्रापुढें प्रत्यक्ष उभीं राहिलीं, तेव्हां त्या तरुण सैनिकात आणि सेनाधिकाऱ्यात पराकाष्ठेचा प्रक्षोभ झाला आणि त्या प्रक्षोभाच्या भरात यवनीपरिवृत बौद्ध सम्राट् बृहद्रथाची हत्या करून, पुष्पपुरातील सेना शरण येण्याचा क्षण सन्निध आला असल्याच्या भ्रमानें अ-सावध असलेल्या यवनसैन्यावर ती सनातनी क्रांतिकारकाची सेना तुटून पडली. त्या प्रसंगीं पाटलीपुत्राच्या रणांगणावर प्रतापगडच्या युद्धाचीच एक प्राचीन आवृत्ति निघाली असेल. मगध युद्धात पराजित झालेल्या यवनसेनेचा पुष्पमित्राच्या सेनेनें अटकेपलीकडील स्वात नदीच्या खोऱ्यापर्यंत जो अविरत पाटलाग केला, त्याला केवळ मॉस्कोपासून परत फिरलेल्या नेपालियनच्या सेनेचा रशियाच्या सेनेनें जो अविस्मरणीय पाठलाग केला, त्याचीच उपमा साजेल.

## बृहद्रथ–वध यवनपराजयापूर्वी

अनेक इतिहासकारानीं असा अभिप्राय व्यक्त केला आहे कीं यवनाचा पराजय करून पुष्पपुराला परतल्यानतर पुष्पमित्रानें बृहद्रथ–वध केला. पण ही कल्पना मला पटत नाहीं. कारण तेव्हा या हत्येचें काहीं प्रयोजनच उरलें नव्हतें. प्रतिज्ञादुर्बल बृहद्रथानें यवनींच्या प्रभावामुळें यवनाशीं संगनमत करण्याची आणि सैन्याचा विश्वासघात न करण्याची अनिच्छेनेंच केलेली प्रतिज्ञा अतित्वरेनेंच मोडली असावी. त्यामुळें पुष्पमित्राच्या पाटलीपुत्रातील आगमनानतर लौकरच बृहद्रथवध झाला असावा. सध्या प्रचलित असलेल्या स्कदाख्यानात सात दिवसांच्या स्कदबालानें तारकासुराचा वध केला, अशी कथा आहे. या कथेवरून ऐतिहासिक अनुमान काढण्यास इतिहासशास्त्राची अनुज्ञा असल्यास असें कळून येतें कीं सेनापतिपदाचा अभिषेक झाल्यापासून सात दिवसानींच पुष्पमित्रानें तारकासुराचा

वध केला म्हणजे अशोककालापासून स्वतःला जगाचा तारक समजणाऱ्या बौद्ध सम्राटाचा वध आणि आपल्या नाण्यांवर 'सोतेर' (Soter) अर्थात् तारक ही पदवी अंकित करणाऱ्या ग्रीक राजाचा सपशेल पराजय केला. पौराणिक कथांचा ऐतिहासिक चिकित्सेंत सदुपयोग कसा करावा, याचा एक धडा पी. एगेरमोंट यानीं 'अशोकराजाची शकावली' या ग्रथांत भारतीय सशोधकांना शिकविला आहेच, असें श्री. रोमिला थापर यांच्या 'अशोक आणि मौर्यांचा ऱ्हास' या ग्रथावरून समजतें. मत्स्यपुराणातील स्कंदाख्यानांत तारकासुरानें इद्राला नुकतेंच कोणाचें तरी साहाय्य लाभल्याचा उल्लेख केला आहे. 'जितः स शक्रो नोऽकस्मात् जायते सश्रयाश्रयः।' आम्ही जिंकलेला शक्र अकस्मात् कोणाच्या तरी आश्रयानें पुनर्जन्म पावत आहे. वेढा घातलेल्या शत्रूला अनपेक्षितरीत्या बाहेरून साहाय्य मिळाल्यानंतर त्याचा असा अकस्मात् पुनर्जन्म होऊ शकतो. ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे पाटलीपुत्राची यवनानीं कोंडी केल्यानंतर पुष्पमित्रानें त्या नगरींत प्रवेश केला असला पाहिजे. पुष्पमित्राच्या सेनेसहच पाटलीपुत्राला अन्नधान्याचा पुरवठा करणाऱ्या सार्थवाहानीं त्याच्या पण्यद्रव्यासह नगरींत प्रवेश केल्यामुळें तेथील नागरिकात उत्साहाचें वातावरण उत्पन्न होऊन त्यांच्या मताच्या प्रभावामुळेंच पुष्पमित्राची सेनापतिपदावर स्थापना झाली. अशा परिस्थितींत नवीन सेनापतीनें सुसघटित केलेल्या सेनेची मानवंदना सम्राटानें स्वीकारणें स्वाभाविकच आहे. डॉ. सुधाकर चट्टोपाध्याय यानीं नवीनच लिहिलेल्या उत्तर भारताच्या प्राचीन इतिहासांतहि यवनांना तोंड देण्यासाठींच पुष्पमित्रानें आपल्या सेनेचें संचलन सम्राटाला दाखविलें असावें, असें अनुमान केलें आहे. असो. त्या सचलनाच्या प्रसंगीं बृहद्रथाचा वध झाल्यानतर पुष्पमित्रानें यवनांचें निर्दलन करून अयोध्या, मथुरा, पांचाल इत्यादि प्रातांतून आपल्या कुळांतील कर्तृत्ववान् पुरुषाची स्थापना केली आणि त्या सर्व यवनदलित प्रांताच्या संरक्षणाची सुव्यवस्था लावून दिली.

## सत्यप्रतिज्ञ पुष्पमित्र

डॉ. सुधाकर चट्टोपाध्याय यांनीं बाणानें पुष्पमित्राला अनार्य हा शब्द लाविला असल्यानें तो शूद्र असावा, असेंहि प्रतिपादन केलें आहे. चाणक्यांच्या अर्थशास्त्राचें अध्ययन केलेल्या बाणभट्टाला शूद्र हा चातुर्वर्ण्यांत समाविष्ट असल्यानें अनार्य नसून आर्यच आहे, ही वस्तुस्थिति सुविदित असावी. पुष्पमित्राला शूद्र

ठरविण्यासाठीं त्यानीं दिव्यावदान या बौद्ध पुराणाचाहि आधार घेतला आहे. त्या ग्रंथात पुष्पमित्र हा मौर्य घराण्यातील अंतिम सम्राट् मानला आहे. हा भ्रम पसरण्याचें कारण हें आहे कीं प्रतिज्ञादुर्बल बृहद्रथाचा वध करणाऱ्या सत्यप्रतिज्ञ पुष्पमित्रानें मौर्य घराण्याचा अंत होऊन शुंग घराण्याची स्थापना झाल्याची घोषणा कधींच केली नव्हती. ‘ The king is dead, long live the King ’ या न्यायाला अनुसरून आपण मारून टाकलेल्या सम्राटासमक्ष पुष्पमित्रानें सेनापति या नात्यानें जी शपथ घेतली होती, त्या शपथेशीं तो शेवटपर्यंत एकनिष्ठ राहिला होता. ही परंपरा सुविदित असल्यानें भागवत–पुराणानें अग्निमित्रापासून शुंग घराण्याची वंशावळ दिली आहे.

## शुंगराज्यांचा संघ

पौराणिक परंपरेप्रमाणे पुष्पमित्राची पत्नी अष्टपुत्रा सौभाग्यवती होती आणि तिचे सारे पुत्र पित्याच्या देखतच राज्यपदावर आरूढ झाले. पुष्पमित्रानें स्थापिलेलीं त्याच्या बहुतेक साऱ्या पुत्राचीं राज्ये इतकीं चिरस्थायी झालीं कीं पाटलीपुत्रांतील शुंगसत्ता काण्वानीं नष्ट केल्यानंतरसुद्धा कित्येक दशकें या स्थानिक राजानीं आपापलीं राज्यें राखिलीं होती, आणि तींसुद्धा निजामाप्रमाणें शत्रूला शरण जाऊन नव्हे तर आपल्या असिलताच्या प्रभावानें देशीविदेशी शत्रूचा प्रतिकार करून राखिलीं होतीं. या साऱ्या शुंगराज्यांचा एक संघ असावा, असें अनुमान कै. रायबहादुर रमाप्रसाद चांद यानीं शुंगसाम्राज्यावरील त्यांच्या अभ्यासपूर्ण लेखात केलें आहे. ( इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली १९२९ ). ते म्हणतात कीं भारुत येथील धनभूतीच्या शिलालेखात शुंगसम्राटाचें नाव न घेता आणि त्याच्या राजवटीचें वर्ष न सांगतां, नुसता शुंगाच्या राजवटींत ( सुगानाम् राज्ये ) असा उल्लेख आला आहे. त्यावरून असें दिसतें कीं तेव्हा पाटलीपुत्रातील शुंगाचें राज्य बुडाल्यामुळें त्या घराण्यात कोणी वंशपरंपरेचा सम्राट् उरला नव्हता, तरीसुद्धा उरलेल्या राज्यांचा संघ करून साकेत, मथुरा, पांचाल, विदिशा येथील शुंगराजे आपल्या विलीयमान साम्राज्याचें संरक्षण करण्याचा प्रयत्न करीत होते. म्हणजे त्या काळीं मराठ्यांच्या साम्राज्याच्या अंतिम दिवसासारखेच दिवस आले होते. वर उल्लेखिलेल्या राज्यांपैकीं अयोध्येच्या एका राजानें आपण पुष्पमित्रापासून सहावे असल्याचा उल्लेख केला असल्यानें तें राज्य पुष्पमित्रानेंच स्थापिलें होते आणि निदान सहा पिढ्यापर्यंत तें टिकून राहिलें, ही गोष्ट निश्चित आहे. पांचाल आणि मथुरा

येथील राज्येंहि तेव्हाच स्थापिलीं असावींत. दशार्ण देशातील राज्य मात्र पुष्यमित्राचें वंशपरंपरागत राज्य दिसतें. मालविकाग्निमित्रातील अग्निमित्र आपल्या विदर्भातील प्रतिपक्ष्याला अचिराधिष्ठित म्हणतो, त्यावरून तो स्वतः पाळेमुळें रुजलेला राजा असला पाहिजे, हें उघड आहे. पुष्यमित्र स्वतःला सम्राट् म्हणवीत नसल्यानें शुंग घराण्यातील पहिला सम्राट् बनण्याचें भाग्य अग्निमित्रालाच लाभलें. मथुरेच्या शुंग-कालीन नाण्यापैकीं पुरुषदत्त आणि रामदत्त याच्या नाण्यावर सुगो म्हणजे शुंग हीं अक्षरें स्पष्ट वाचतां येतात, असें कुमारी भ्रमर घोष यानीं ऑक्टोबर १९३८ च्या इंडियन कल्चरच्या अंकात प्रसिद्ध केलें होतें. तेव्हां मथुरेंत शुंगानीं राज्य स्थापिलें नव्हतें, असे जें प्रतिपादन श्री माकड आणि डॉ ए के. नारायण यानीं चालविलें आहे, त्यात कांहीं स्वारस्य दिसत नाहीं. वृद्ध गर्गाच्या युद्धपुराणाची एक नवीन आवृत्ति अलीकडे श्री. माकड यानीं प्रसिद्ध केली असून तिच्या आधारानें ते असें सांगतात कीं मथुरा आणि पांचाल येथील राजानीं यवनाशीं संगनमत करूनच पाटलीपुत्रावर चढाई केली होती. या प्रतींतील पाठ मला विश्वसनीय वाटत नाहींत. पण ते विश्वसनीय मानल्यास ' इंद्राय तक्षकाय स्वाहा ' या न्यायानें यवनाचा पूर्ण पराजय केल्यानंतर पांचाल आणि मथुरा येथील राजघराण्यांचा कांटा काढून त्याच्या सिंहासनावर आपल्या पुत्राची स्थापना करणे पुष्यमित्राला अपरिहार्यच झालें असेल.

## पुष्पपुर यवनांनीं जिंकलें नाहीं

पाटलीपुत्रावरील यवनाच्या स्वारींत मौर्य साम्राज्याची ती राजधानी त्यांना जिंकता आली होती कीं नाहीं, हा एक वादग्रस्त प्रश्न आहे. या स्वारीसंबंधींच्या युगपुराणातील दुर्बोध श्लोकाचे अनेकानीं अनेक अर्थ अथवा अनर्थ केले असल्यानें त्या श्लोकाचा मॅक्समुल्लर यानीं केलेला आणि व्हिन्सेंट स्मिथ यानीं आपल्या इतिहासात आधारासाठीं उतरून घेतलेला अर्थच इथे उद्धृत करणें सोईचें होईल. म्हणजे प्रस्तुत लेखकावर पक्षपाताचा आरोप यावयाला नको. ' When the viciously valient greeks, after reducing Saketa, the Panchala country and Mathura, will reach Kusumadhwaja, then all provinces will be in disorder ' या ठिकाणीं यवन कुसुमध्वजाला पोंचल्या-नंतर सर्व प्रांतात अराजक माजेल, एवढाच उल्लेख आहे. यवनांनीं कुसुमध्वज जिंकल्याचा उल्लेख नाहीं. कै. काशीप्रसाद जायस्वाल आपल्या भाषांतरात म्हणतात,

'Then the thick mud fortification at Pataliputra being reached, all the provinces will be in disorder. Ultimately a great battle will follow with tree ( like ) enignes.' म्हणजे पाटलीपुत्राला यवन येऊन पोंचल्यानंतर तेथील मातीच्या तटापाशीं निकराची लढाई झाली. या लढाईत यवनांचा सेनापति मेनांद्र याचा जय झाला, असें बार्नेट, टार्नप्रभृति इंग्रज इतिहासकाराचें मत आहे. या मताला ते युगपुराणातील पुढील वचनाचा आधार देतात. 'The tama elders of Dharmamita will fearlessly devour the people. The Yavanas will command. The kings will disappear. The yavanas intoxicated with fighting will not stay in Madhyadesha. There will be undoubtedly a civil war among them, arising in their own country, a very terrible and ferocious civil war.' या अवतरणांत स्वतःला धर्ममित्र म्हणविणाऱ्या देमेत्रियुस्चे हस्तक लोकाना लुटतील, यवन सत्ताधारी होतील, राजे नष्ट होतील, या घटनाचा उल्लेख करून मग यवनांना मध्यदेशातून जावें लागेल, असा उल्लेख आला आहे. मध्यदेशातून गेल्यानतर यवनाच्या देशांत अत्यत भयानक यादवी युद्ध होईल, असेंहि या अवतरणांत सांगितलें आहे. या अवतरणावरून यवनांकडून मथुरा-पांचालप्रभृति देशांतील राजे नष्ट झाल्याचें कळत असलें तरी तेवढयानें पाटली-पुत्रांतील राजसत्तेचा त्यानीं नायनाट केला, असा निष्कर्ष निघत नाहीं. त्याच-प्रमाणें यादवी युद्धामुळें यवनांना मध्यदेश सोडावा लागला, असें या उताऱ्यावरून दिसत नसून ते मध्यदेशांतून निघून गेल्यानतर त्यांच्यांत यादवी युद्ध होईल, असाच बोध होतो. यवनापुढें अवनत झालेल्या, अथवा अवनत होण्याकरिता आतुर झालेल्या मथुरा, पांचाल, साकेत आणि पाटलीपुत्र येथील राजाचा पुष्य-मित्रानें निःपात केला आणि त्यांच्या स्थानांवर शुंग कुलातील पराक्रमी पुरुषांची स्थापना केली. या ब्राह्मण राजाना मान्यता मिळेपर्यंत देशांत राजे उरले नाहींत, अशी भावना होणें स्वाभाविक होतें. पाटलीपुत्राचें सिंहासन तर पुष्पमित्रानें प्रतिज्ञाभंगाचा अपवाद टाळण्याकरिता शून्यच ठेविलें होतें. बृहद्रथाला मारून त्याच्या साम्राज्याचें सरक्षण करावें लागलें, ही केवळ दैवाची विचित्र लीला होती. या विचित्र लीलेचा स्वतः सम्राट् बनण्याकरिता त्यानें उपयोग करून घेतला नव्हता.

## यवननिर्गमन यादवीमुळें नव्हें

विजयी ग्रीक सेना पाटलीपुत्राला पोंचल्यानंतर यवनाच्या मध्यें यादवी युद्ध

निर्माण झालें आणि त्यामुळें मौर्यसाम्राज्याचें पिकलें फळ त्यांच्या तोंडांत न पडतां पुष्पमित्राच्या तोंडात पडलें, असा भ्रम जाणत्या इतिहासकारांनाहि झाला आहे. मौर्यशातवाहन कालाच्या इतिहासात प्रो. जगन्नाथ लिहितात. 'Fortunately for India the invader was unable to reap the fruit of his military successes as he had to hasten back to his home on account of a 'dreadful war having broken out among themselves.' पण हा सारा चुकीचा इतिहास आहे. कारण पुराणातील वंशावळींवरून पुष्पमित्राच्या अधिकारग्रहणाचा काळ खि. पू. १८७ च्या सुमारास, किंवा १८४ च्या सुमारास येतो. मौर्य साम्राज्याच्या पिकल्या फळाचा उपभोग घेण्याकरिता तत्पूर्वीच देमेत्रियुस्नें पाटलीपुत्रावर चढाई केली होती, असें प्रो. टार्नप्रभृति बाल्हीक देशांतील यवनाचा इतिहास लिहिणारे तज्ज्ञ सांगतात. याच तज्ज्ञाच्या मताप्रमाणें यवनातील यादवीयुद्ध खि. पू. १६५ च्या सुमारास उद्भवलें. तेव्हा पाटलीपुत्राच्या साम्राज्याचें पक्व फळ यादवीयुद्धामुळें यवनाच्या ओठाखालीं जाऊ शकलें नाहीं, असा जो आभास पाश्चात्य इतिहासकारानी निर्माण केला आहे, त्याचा हिंदु इतिहासकारानीं वस्तुतः स्पष्ट शब्दानीं निरास करावयाला पाहिजे होता. पण हिंदूंना हीनता देण्याच्या हेतूनेंच इतिहास लिहिणाऱ्याच्या प्रचाराला बळी न पडण्याचा सावधपणा आमच्या अधिकारी इतिहासकारानीं दाखविला असता, तर पुष्पमित्राचा इतिहास आजपर्यंत अज्ञात राहिलाच नसता. पाटलीपुत्रावर यवनाची सत्ता प्रस्थापित होण्याची गोष्ट तर दूरच राहिली. त्यानीं वेढलेलीं साकेत आणि माध्यमिका हीं नगरेंहि बहुधा त्याना जिंकता आलीं नसावीत. इतिहासात एखाद्या वेढ्याची प्रसिद्धि होते, ती मुख्यतः त्या वेढ्यात सापडलेल्याच्या पराक्रमामुळें होते. हे दोनहि वेढे बहुधा पुष्यमित्र आणि अग्निमित्र यानीं उठविले असावेत. माध्यमिकेला वेढा घालण्यापूर्वीं यवनानीं उज्जयिनी नगरीहि जिंकली असावी, असें प्रो. टार्न यानीं प्रतिपादन केलें आहे. या प्रतिपादनाला आधार काय तर पुढच्या शतकात शकानीं उज्जयिनी जिंकली, ती बहुधा ग्रीकानीं पूर्वीं जिंकून दाखविल्यामुळेच जिंकली असावी. असलीं दिव्य अनुमानें काढण्याचा अधिकार अधिकारी इतिहासकारानाच असू शकतो. प्रो. टार्न याना असा आभास उत्पन्न करावयाचा आहे कीं तक्षशिला, उज्जयिनी आणि पाटलीपुत्र या मौर्यसाम्राटाच्या आणि त्याच्या राजकुमार राज्यपालाच्या साऱ्या राजधान्या जिंकून त्याच्या प्रचंड त्रिकोणातील प्रदेशावर बाल्हिकमधील ग्रीकाचा 'अनिकेतोस्' (अजिंक्य)

आणि कृत्तिवास सम्राट् देमेत्रियुस् हा तक्षशिलेंतून अधिकार चालवीत असतांना 'आत्मैव रिपुरात्मनः' या न्यायानें बाल्हीकांतील ग्रीकानींच त्याच्याविरुद्ध बडाचा झेंडा उभारल्यामुळें या यवन त्रिविक्रमाचे शत्रू पाताळांत गाडले न जाता त्याला स्वतःलाच त्रिविक्रमाच्या भूमिकेवरून बळीच्या भूमिकेवर कोसळावें लागलें. पण हा त्यांचा प्रयत्न व्यर्थ आहे.

## ग्रसन आणि तारक

पुष्पमित्र चरित्राच्या उत्तरार्धाची चर्चा करिताना कै. प्रबोधचंद्र बागची यानीं दिव्यावदान, मञ्जुश्रीमूलकल्प इत्यादि बौद्ध पुराणांची कसून चिकित्सा केली आहे. पण असल्या चिकित्सक विद्वानाचें आपल्या पुराणांतील आख्यानाची ऐतिहासिक दृष्ट्या चिकित्सा करण्याकडे लक्ष गेलें नाहीं, याचें नवल वाटतें. पुष्पमित्र-चरित्राचा विचार करताना अशी कल्पना मनात आली कीं महाभारतांतील आरण्यक पर्वांत स्कंदाचें जे सनातन आणि सविस्तर आख्यान सांगितलें आहे, त्यात मागाहून पडलेली भर सेनानी पुष्पमित्राच्या चरित्रावरून आणि त्याच्या वंशजाच्या पुढील इतिहासावरून पडली असावी. आरण्यकपर्वांतील स्कंदाच्या आख्यानात प्रसूतीनंतर त्यानें विशेष कांहींच पराक्रम केल्याचा उल्लेख नाहीं. त्या कथेंत त्याच्या हातून महिषासुराचा वध करविला आहे. पण महिषासुर हा सार्वत्रिक समजुतीप्रमाणें महिषासुरमर्दिनीचा वांटा असल्यानें त्याला स्कंदाकडून मारविण्यात कांहींच स्वारस्य नाहीं. आरण्यकपर्वांतल्या स्कंदाख्यानातील ही उणीव शुंगयुगातील महाभारताच्या संपादकाना जाणवल्यामुळेंच सध्या स्कंदावताराचें प्रयोजन म्हणून गणलेल्या तारकासुरवधाचा उल्लेख गदापर्वांत सरस्वतीतीरावरील बलरामाच्या यात्रावर्णनातील स्कंदाख्यानात प्रथम प्रविष्ट केलेला दिसतो. तरीसुद्धा तारकवधा-प्रीत्यर्थ हरपार्वतींनीं त्याला जन्म दिल्याची कथा, अथवा तारकसुराला ब्रह्मदेवाचा वर लाभल्याचा वृत्तांतहि त्या आख्यानात नाहीं 'तदिच्छामो विभो स्रष्टुं सेनान्यं तस्य शांतये।' अशी आपली मनीषा इंद्रानें ब्रह्मदेवाला बोलून दाखविली असतां शंकराचा पुत्र तुमचे सैनापत्य स्वीकारून तारकासुराला मारील, असा ब्रह्मदेवाकडून त्याला आशीर्वाद मिळाल्याचा उल्लेख कुमारसंभवात आहे. तेथेंहि साता दिवसाच्या बालकाकडून तारकाला मृत्यु येणार असल्याचें भविष्य अथवा संकेत सांगितला नाहीं. या आख्यानाचें आजचें परिणत स्वरूप प्रथम मत्स्यपुराणात प्रकट झालें आहे. हें पुराण त्यातील आंध्र कुलाच्या ऐतिहासिक भागाबद्दल प्रसिद्ध असून त्याचा थोरल्या

भांडारकरांपासून साऱ्या प्राचीन इतिहासाच्या संशोधकांनीं सदुपयोग केला आहे. याच इतिहासज्ञ पुराणकारांनीं प्रसन हा तारकासुराचा सेनापति असून तारकासुराच्या इंद्रावरील स्वारींत तो विष्णूच्या हातून मारला गेला, असा अति महत्त्वाचा उल्लेख केला आहे. हा प्रसन या एका प्रसंगाव्यतिरिक्त अन्यत्र कोठें भेटत नाहीं. या नावाचा क्षणभर विचार केला असतां निदर्शनास येतें कीं आयोनियातील ग्रीकांच्या नांवावरून जसा यवन हा शब्द बनविला आहे, तसाच ग्रीसमधील ग्रीकांच्या नावावरून प्रसन हा शब्द बनविलेला आहे. इंग्रजींत ग्रीक या अर्थीं ग्रेशियन हा शब्द वापरतातच. हा अपरिचित शब्द वापरून मत्स्य पुराणकारानीं तारकासुरवधाख्यानाचें ऐतिहासिकत्व न लोपवितां त्याला अलौकिक आणि पौराणिक स्वरूप प्राप्त करून दिलें आहे. बाल्हीक देशातून भारतावर आक्रमण करणारे आपोलोदोतुस् आणि मेनाद्र (मिनाडर) हे ग्रीक राजे स्वतःला 'सोतेर' ही पदवी लावून आपण भारतीय बौद्धांचे तारणकर्ते असल्याचा प्रचार करीत. मेनाद्रनें या पदवीचे त्राता हें संस्कृत स्वरूप आपल्या नाण्यावर अंकित केलें आहे. यामुळेंच त्याच्या स्वाऱ्यांचें पुराण रचणाऱ्या कवींनीं त्याना तारकासुर ही संज्ञा दिली आहे. प्रसन आणि तारक या दोनहि असुरांचा भारतावर आक्रमण करणाऱ्या ग्रीकांच्या इतिहासाशीं संबंध येत असल्यानें त्यांचा वध करणारे विष्णु आणि सेनानी स्कंद कोण होते, याचा ऐतिहासिकदृष्ट्या विचार केला पाहिजे. यापैकीं तारकासुराचा वध करणारा सेनानी स्कंद स्वतः पुष्यमित्रच होता, असें त्याच्या चरित्रावरून स्पष्ट दिसतें. उत्तरापथाचा अधिपति या नात्यानें अश्वमेध करीत असतानासुद्धा तो स्वतःला सेनानी म्हणवून घेत होता. या सेनानीपदानें त्याची नम्रता व्यक्त होते कीं स्वतः स्कंदाचा अवतार असल्याची जाणीव व्यक्त होते, याचा अधिकारी इतिहासकारानीं विचार करावा. स्कंदाचा एक पिता अग्नि हा ब्राह्मण असल्यानें तो स्वतः ब्रह्मण्यदेव आहे. त्यामुळेंहि ब्राह्मण सेनानी पुष्यमित्राचें ब्रह्मण्यदेवाशीं समीकरण होणें स्वाभाविक आहे. पुष्यमित्र हाच तारकांतक असल्यानें त्याच्या तारकवधापूर्वीं भारतावर स्वारी करणारा तारकासुराचा सेनापति प्रसन, हा स्वतः विश्वग्रासी अलेक्झांडर असला पाहिजे. अखिल ग्रीक नगर राज्याचा सेनापति या नात्यानेंच अलेक्झांडरनें आशियावर स्वारी केली होती. तेव्हा मत्स्य पुराणांतील प्रसनाप्रमाणेंच तोहि सेनापति होता, हें सुप्रसिद्धच आहे. या विश्वग्रासी प्रसनाच्या भारतातील सत्तेचा उच्छेद करणारा त्याचा काळ विष्णु अर्थात् अर्थशास्त्राचे आचार्य विष्णुगुप्त कौटल्य हेच असले पाहिजेत. विष्णुगुप्ताच्या शिष्यानें

अलेक्झांडरची समक्ष भेट घेतली होती, आणि त्याचा स्वतःवर प्राणातिक रोष ओढवून घेतला होता, ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. अलेक्झांडरविरुद्ध सीमाप्रातात झालेल्या उठावण्याचें नेतृत्व ब्राह्मणाकडे असून ब्राह्मणसैन्यें त्याच्याशीं अत्यत निकरानें लढलीं, असें स्वतः ग्रीक इतिहासकारच सागतात. अलेक्झाडरच्या आक्रमणापूर्वीच औदीच्य भारतांतील ब्राह्मणसैन्यें प्रसिद्धीला आलीं होतीं, असें अर्थशास्त्रकारांनीं आपल्या आचार्यांच्या मताप्रमाणें ब्राह्मण सैन्येंच श्रेष्ठ असल्याचा जो उल्लेख केला आहे, त्यावरून कळून येतें. तेव्हा मत्स्यपुराणातील ग्रसना-सुराचा काळ विष्णु, स्वतः विष्णुगुप्त कौटल्यच असल्याचें अनुमानानें तितक्या प्रमाणांत सिद्ध होणें शक्य आहे, तितक्या प्रमाणात तें सिद्ध झालें आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नसावा. या दृष्टीनें आजपर्यंत कोणीच विचार केला नसल्यानें ग्रसन म्हणजे ग्रीक सम्राट् अलेक्झांडर आणि त्याचा काळ विष्णु म्हणजे विष्णुगुप्त कौटल्य या समीकरणाना आजचे इतिहासकार हसतील, हें मलाहि समजतें. पण कै. काशीप्रसाद जायस्वाल यांच्या पश्चात् त्यांची परपरा चालविणारा स्वतत्र प्रतिभेचा एकहि इतिहासकार भारतात उरला नसल्यानें पुराणाची स्वतः चिकित्सा करण्याची सवय नसलेल्या इतिहासलेखकांकडून उपहास होण्याच्या भीतीनें स्वतःच्या ऐतिहासिक दृष्टीला दिसेल, तोच इतिहास लिहिण्याचें कर्तव्य मला टाळता येत नाहीं. याकरिता मत्स्यपुराणादि ग्रंथांच्या आधारानें पुष्पमित्रचरित्राची पुनर्रचना करण्याचा मी प्रयत्न करीत आहे.

## राजधानी न सोडण्याची प्रतिज्ञा

मत्स्यपुराणाप्रमाणें तारकासुराला इद्रानें युद्धाचें आव्हान केलें असतां त्याला शंका आली कीं आपल्या शत्रूला नवीनच कोणाचें तरी साहाय्य मिळालें असलें पाहिजे. या उल्लेखावरून आणि साता दिवसाच्या सेनानी स्कदानें तारकाचा वध केल्याच्या आख्यानावरून बृहद्रथाला पुष्पमित्राची नव्या उत्साहाची सेना येऊन मिळ.त्यानतर त्यानें त्याला सैनापत्याचा अधिकार अर्पण केला आणि त्यानतर साता दिवसांतच ग्रीक तारकासुराचा सपशेल पराभव झाला, या गोष्टी कळून येतात. हा पराक्रम घडून येण्यापूर्वी पाटलीपुत्रात कांहीं महत्त्वाच्या घटना घडल्या असतीलच. या घटनाचे दोन प्रतिध्वनि दोन सस्कृत महाकवींच्या ग्रथातून आपल्या कानावर आले आहेत. मौर्य साम्राज्याच्या या नवोदित सेनापतीशीं मौर्य सचिवाचा बहुधा शत्रूशीं बोलणें करावयाचें का युद्ध करावयाचें या प्रश्नावरून तीव्र मतभेद होऊन

त्याला सेनापतीनें बदींत ठेविलें, असें मालविकाग्निमित्र नाटकावरून समजतें आणि बाणभट्टाच्या हर्षचरितावरून कळून येतें कीं यावेळीं प्रतिज्ञादुर्बल बृहद्रथानें शेवटची कोणती तरी प्रतिज्ञा करून ती मोडली, त्यामुळें सैन्यसचलनाचा प्रसगींच पुष्प-मित्राला त्याचा वध करावा लागला. राजधानीच्या वेशीपर्यंत शत्रुसैन्य येऊन पोंचल्यानंतर आपल्या नागरिकाना धीर देण्यासाठीं राजांना प्रजेचा विश्वासघात न करण्याच्या प्रतिज्ञा कराव्या लागतात. तशा प्रतिज्ञाच्या प्रभावानें प्रोत्साहित होऊन राजधानींतील नागरिक प्रसंगविशेषीं शत्रूना यशस्वी रीतीनें तोंडहि देऊ शकतात. उदाहरणार्थ, कॉन्स्टॅटिनोपलच्या एका रोमन सम्राटावर एकीकडून रानटी युरोपियनानीं आणि दुसरीकडून धर्मवेड्या मुसलमानानीं स्वाऱ्या केल्या असता त्यानें ती राजधानी सोडून आफ्रिकेंत कार्थेजला राजधानी नेण्याचा विचार केला. तेव्हा कॉन्स्टॅटिनोपलच्या धर्मगुरूनें त्याच्याकडून आपली नगरी न सोडण्याची शपथ घेवविली. या शपथेमुळें लोकाचा उत्साह इतका उचबळून आला कीं त्यांनीं दोनहि स्वाऱ्याना यशस्वी रीतीनें तोंड दिलें सेनापति जे. एफ्. सी. फुल्लर म्हणतात. 'These disasters so overwhelmed Heraclius that he resolved to transfer the capital to Carthage, and was only prevented from doing so by the patriarch who exacted from him an oath that he would never abandon Constantinople. The relief caused was so great that a sudden outburst of religious enthusiasm seized the people, and crusade was preached to reseue the Holy city and the Holy cross.' या अवतरणावरुन राजधानीवर आणीबाणीचा प्रसंग आला असताना राकज्यर्त्यांनीं नागरिकाना योग्य मार्गदर्शन केलें म्हणजे त्याच्या शौर्यासहच त्याच्या धर्मभावनेलाहि कशी भरती येते आणि 'धर्मो रक्षति रक्षितः' या सूत्राला अनुसरून तो धर्म त्याचे सरक्षण करण्याला कसा समर्थ होतो, याची कल्पना येईल.

## यवनांची युद्धपद्धति

पाटलीपुत्रावर तेव्हा आक्रमण करणाऱ्या यवनाच्या युद्धपद्धतीचा अल्पपरि-चय जे. एफ्. सी. फुल्लर या सेनापतींनीं खिस्तपूर्व दुसऱ्या शतकातील रोमन लोकाच्या युद्धपद्धतीचें जें वर्णन केलें आहे, त्यावरून होऊ शकतो. 'Obliteration of cities had now become the seal of Roman power. Yet

as Polibyus remarks, 'to destroy that for which war is undertaken seems an act of madness, and madness of a very violent kind.' Corinth, Carthage and later Numantia were destroyed to show the might of Rome and also to sate her greed for plunder. Also the sale of their citizens as slaves was profitable, and many of these rebellions and socalled wars were little more than slave-hunts.' म्हणजे इंद्र आणि शिव याच्याप्रमाणें पुरंदर आणि त्रिपुरारी बनण्यात रोमच्या राज्यकर्त्यांना पुरुषार्थ वाटू लागला होता कॉरिंथ, कार्थेज, न्युमान्शिया याच्यासारख्या विशाल आणि समृद्ध नगराचा संपूर्ण विध्वंस करून रोमनें आपल्या सामर्थ्याच्या प्रदर्शनासहच आपल्या नागरिकांच्या लुटीच्या लालसेचीहि तृप्ति केली होती. या मान्या दुर्दैवी नगरांतील नागरिकांची विक्री करूनहि रोमन लोकांना चांगलाच द्रव्यलाभ झाला होता. रोमच्या नागरिकांनीं अनेकदां बंडें मोडण्याच्या निमित्तानें केलेल्या लढाया आणि इतर राज्यांशीं उकरून काढलेलीं युद्धें हीं वस्तुतः युद्धे नसून त्या केवळ दास पकडण्यासाठीं केलेल्या शिकारी होत्या या सेनापतींनीं रोमन लोकांच्या युद्धकारणाचें हें जें विदारक वर्णन केलें आहे, तें ग्रीक लोकांच्या युद्धकारणालाहि तितकेंच लागू पडतें. स्वतः अॅलेक्झांडरनें ग्रीसमध्येच थीब्ससारख्या विख्यात नगरावर गाढवाचा नांगर फिरवून तेथील तीस सहस्र नागरिकांना दास म्हणून विकलें होतें पाणिनीच्या काळीं अस्तित्वांत असलेल्या पंजाबातील एक दोन नगरांचा त्यानें असाच विध्वंस केला असल्यानें त्या नगरांशीं परिचित असलेल्या पाणिनीच्या काळाची अंतिम मर्यादा ठरविण्याला एक प्रमाण उपलब्ध झालें आहे. या सार्‍या अनुभवाच्या प्रकाशांत आपल्याला मिनांडरप्रभृति यवनांच्या आक्रमणाचा विचार करणें प्राप्त आहे. असल्या निदारुण युद्धकारणापुढें अशोकाच्या वंशजाच्या स्थविर भिक्षुनेत्यांचीं प्रवचनें म्हणजे अजापुत्रांच्या मुखातून निघणारे केविलवाणे उद्गारच होत.

## स्थविरवादी शनैश्चरांचें राज्य

अशोकाच्या काळीं मौर्य साम्राज्य अतिशय विस्तीर्ण असलें तरी दिग्विजयाच्या तत्वावर आधारलेल्या यज्ञयागांना विरोध केल्यामुळें तें दिक्‌तत्वाच्या विरुद्ध टोंकाला असलेल्या कालतत्वाच्या अधीन होऊन अतिशय त्वरेनें जराजीर्ण होऊं लागलें होतें. रोमचा नामांकित इतिहासकार लिव्ही यानें म्हटलें आहे कीं कोणतेंहि

साम्राज्य शांतितत्त्व चा अवलंब करून दीर्घजीवी होऊं शकत नाहीं; कारण त्यानें बाह्य शत्रूवर लक्ष केंद्रित करण्याचे आणि प्रसंगानुरोधानें त्याच्याशीं युद्धें करण्याचें धोरण सोडून दिलें, म्हणजे अंतर्गत विरोध बलवत्तर होऊन त्या साम्राज्याला यादवी युद्धांना तोंड द्यावें लागतें. परशत्रूशीं होणारीं युद्धें आणि अंतर्गत शत्रूशीं होणारीं यादवी युद्धें, या लंबकाच्या दोन विरुद्ध दिशाकडील आंदोलनांनींच साम्राज्याचा इतिहास घडविला जातो. यासाठीं जे. एफ्. सी. फुल्लर यांनीं म्हटलें आहे. 'Thus it comes about that in the life-history of every virile nation two events control its destiny, inner and outer conflicts, which are called revolutions and wars. Not until nations grow old is peacefulness established, and what ages them the more rapidly is the feeling of security.' म्हणजे वर उल्लेखिल्याप्रमाणें प्रत्येक पौरुषपूर्ण राष्ट्राचें जीवन मुख्यतः यादवी युद्धें आणि परशत्रूशीं होणारीं युद्धें या दोनच घटनांनीं नियंत्रित केलें जातें. कोणत्याहि राष्ट्रावर वार्धक्याची अवकळा पसरल्यावाचून तें शांततावादी बनू शकत नाहीं. इतकेंच नव्हे तर शांततावादांत अंतर्भूत असलेल्या सुरक्षिततेच्या भावनेनेंच राष्ट्राला झपाट्यानें वार्धक्य येतें. शांततावादी अशोकाच्या काळापासून मौर्य साम्राज्यावर तर स्वतःला स्थविरवादी म्हणविणाऱ्या भिक्षूंनींच साम्राज्य प्रस्थापित झालें होतें, ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. पण या स्थविरवाद्यांचें राज्य म्हणजे राष्ट्राला अतित्वरेनें वार्धक्य आणणाऱ्या रोगाचेंच राज्य असल्याची मात्र आमच्या अधिकारी इतिहासकारांना अद्यापि जाणीव झालेली दिसत नाहीं.

## शनैश्चरांविरुद्ध शुक्रमंगळांची प्रतिक्रिया

या स्थविरवादी शनैश्चराच्या प्रभावाविरुद्ध जी प्रतिक्रिया होते, ती निसर्गनियमाप्रमाणें मंगळ आणि शुक्र यांनीं प्रभावित झालेल्या व्यक्तींकडून होते. मौर्यसाम्राज्याचा अंत घडवून आणणारा सेनापति हा व्यक्तिशः मंगळानें प्रभावित झाला असला तरी तो सामवेदी ब्राह्मणाच्या कुळांत जन्मला असल्यानें त्याच्यावर शुक्राचाहि प्रभाव असलाच पाहिजे. त्याच्या अग्निमित्रादि वंशजाच्या चरित्रांत तर मंगळापेक्षां शुक्राचेंच प्राधान्य होतें, असें कालिदासाच्या मालविकाग्निमित्रावरून आणि बाणभट्टानें संग्रहीत केलेल्या आख्यायिकांवरून सुव्यक्त होतें. मंगळानें प्रभावित झालेल्याच्या प्रिया जगणेंहि दुष्कर असल्यानें त्याच्या जीवनावर शुक्राचा

तादृश प्रभाव पडत नाहीं. उलटपक्षीं शुक्रानें प्रभावित झालेल्या व्यक्तींचें जीवितच स्त्रियावर अवलंबून असल्यामुळेंच शेवटच्या शुंग राजाच्या काण्व प्रधानानें राणीचा वेष घेतलेल्या दासीदुहितेकडून त्याची हत्या करविली. इथें आणखी एका योगायोगाचा उल्लेख करण्याजोगा आहे. तो म्हणजे शुक्र हा भार्गव असल्यामुळेंच शुंग-युगात भृगुकुळाच्या कर्तृत्वाला जणू भर आला होता. याच काळात सुमति भार्गवानें मनुस्मृतीला तिचें आजचें स्वरूप दिलें. याच काळीं कै. डॉ. सुकथन-करानीं दाखवून दिल्याप्रमाणें भृगुकुळानें महाभारताचें पुनः सस्करण करून त्याला भृगूच्या विजयगाथेचें स्वरूप दिलें. रामायणाचें प्रचलित सस्करण याच काळचें असून तेंहि कार्य भृगुकुळाकडूनच पार पडलें आहे. या परिच्छेदात शुक्र–मगळाचा उल्लेख करून मी इतिहासकाराच्या व्रताला बट्टा लाविला, असाच बहुधा साऱ्या अधिकारी इतिहासकाराचा अभिप्राय पडेल. पण मला त्याना इतकीच आठवण द्यावीशी वाटते कीं आणीबाणीच्या युद्धप्रसंगातहि ‘ Venus victrix ’ म्हणजे व्हीनसचा विजय होवो, हेंच जूलियस् सीझरचें घोषवाक्य होतें, आणि त्याचा काळ काहीं शुंगकाळापासून फार दूर नाहीं. भेद इतकाच कीं जूलियस् सीझरच्या हत्येनंतर ऑगस्टस् झीसरनें आपलें राज्य सुस्थिर झाल्यानतर रोममध्यें शनैश्चराचें राज्य चालू झाल्याची घोषणा केली. ( खि. पू १७ ) त्याच्या उलट ‘ महीपालवचः श्रुत्वा जुघुषुः पुष्यमाणवाः । ’ या महाभाष्यांतील वचनात सुचविल्याप्रमाणें स्थविरवादी सम्राट् बृहद्रथाचे उद्गार ऐकून पुष्पमित्राच्या तरुण अनुयायानीं जेव्हा घोषणा केल्या, तेव्हाच मौर्य शनैश्चराचें राज्य सपून शुंगकुलारूच शुक्र मगळाचें साम्राज्य चालू झालें आणि त्यामुळेंच विदिशेसन्निध असलेल्या नीचैः गिरीवर पण्यस्त्रीरतिपरिमल पसरू लागला.

## शुंगेतिहासावर ब्रह्मपुराणाचा प्रकाश

शुक्र आणि मगळ याची युति राष्ट्रीय जीवनावर परिणाम करू लागली म्हणजे देशात व्यभिचार–बलात्कारासारख्या पापाची वृद्धि होते. शुगाच्या इति-हासाची स्कदाख्यानावर छाया पडली आहे, ही कल्पना ग्राह्य मानली तर विजयानें उन्मत्त होऊन कार्तिकस्वामीनें देव स्त्रियावर बलात्कार केल्याचें ब्रह्मपुराणातील आख्यान ( अध्याय ८१ ) पुष्पमित्राच्या वशजाच्या इतिहासावर आधारलेलें दिसतें. या आख्यानात असेंहि सागितलें आहे कीं आपल्या पुत्राला या पापापासून परावृत्त करण्याकरिता पार्वतीनें स्कंदाची वासना ज्या ज्या स्त्रीवर जाई, त्या त्या स्त्रीच्य

ठिकाणीं त्याला आपल्याच स्वरूपाचा साक्षात्कार घडविण्याचा उपाय योजला. या युडिपस् कॉम्प्लेक्सच्या प्रभावामुळेंच आर्यभारतांतील स्कंद ब्रह्मचारी राहून गेला, हें आधुनिक मानसशास्त्राच्या अभ्यासकांना सहज कळून येईल. रोमन लोकातहि हींच पापें अति प्रचलित झालीं असता रोमच्या सेनेटनें हानिबालशीं निर्वाणीचें युद्ध चालूं असतांनाच आशियामायनर प्रांतातील कुबेल या मातृदेवतेची उपासना रोममध्यें रूढ केली. मध्यभारतात विंध्यवासिनीच्या उपासनेला जें महत्त्व प्राप्त झालें, तें कदाचित् अशाच कांहीं कारणानें प्राप्त झालें असावें. शुग युगातील पापें म्हणजे अशोकापासून प्रस्थापित झालेल्या भिक्षुराज्याविरुद्ध झालेली प्रातिक्रियाच होय. अशीच प्रातिक्रिया दुसऱ्या चार्लस् राजाच्या काळीं इंग्लंडांत क्रॉम्वेलच्या सतराज्या-विरुद्ध झाली होती.

## स्तूप कां विहार

पुष्पमित्र पाटलीपुत्रांत सत्ताधीश झाल्यानतरच्या त्याच्या चरित्रासबधीं अमूल्य माहिती दिव्यावदान या बौद्ध पुराणातील एकोणतिसाव्या कथेच्या अंतीं उपलब्ध होते. त्या बौद्ध पौराणिकाच्या सागण्याप्रमाणें पुष्पमित्राने एकदा आपल्या मन्त्र्याला अजरामर कीर्ति संपादन करण्याचा उपाय काय असा प्रश्न केला असतां त्यानें उत्तर दिलें कीं आपल्या पूर्वीं अशोक राजानें ८४००० स्तूप उभारून अमर कीर्ति सपादिली आहे, कारण त्या स्तूपाच्यामुळें बौद्धधर्म अस्तित्वात असे-पर्यंत त्याचें नाव अमर राहील. मौर्यपरपरेतील मन्त्र्याचें हें उत्तर ऐकून पुष्पमित्र उद्गारला, ‘ अशोकानें केलेल्या कृत्याचें अनुकरण करून मला कीर्ति सपादावयाची नाहीं. मला अन्य उपाय सुचवा. ’ तेव्हां राजपुरोहितानें ( पतंजलीने ? ) सुचविलें कीं अशोकाचें अनुकरण न करता विरुद्धाचरण करूनहि अमर कीर्ति सपादन करता येईल. ही कल्पना पुष्पमित्राला पटली आणि तो राजपुरोहिताला म्हणाला ‘ चतुरंग दल सिद्ध करून बौद्ध धर्माचा मी उच्छेद करीन. ’ त्याप्रमाणें चतुरग दल सिद्ध झाल्यानतर पुष्पमित्रानें विहारनिवासी भिक्षूंची एक परिषद बोलावून त्याना प्रश्न विचारला. ‘ तुम्हाला स्तूप हवेत का विहार ? ’ तेव्हां भिक्षूंनीं राजाचे म्हणणें मान्य केलें. म्हणजे तुमच्या स्तूपाना मी स्पर्श करू नये, असे तुम्हाला वाटत असल्यास तुम्ही तुमच्या विहाराची आशा सोडा; या पर्यायाला भिक्षूंनीं मान्यता दिली. त्या-नंतर पुष्पमित्रानें विहारांचा उच्छेद आरभिला. ‘ पुष्पमित्रो यावत् सघारामान् भिक्षूंश्च प्रघातयन् प्रस्थितः । स यावत् शाकलम् अनुप्राप्तः । तेनाभिहितम् । यो

मे श्रमणशिर दास्यति तस्याह दीनारशत दास्यामि।' पण सरतेशेवटीं पुष्यमित्राचा प्रयत्न फसला आणि स्थूलकोष्ठ अथवा कोष्ठक येथील बुद्धपक्षीय राजानें कृमीश अथवा कृमिसेन याला आपली कन्या देऊ करून त्याच्याकरवीं पुष्यमित्राचा वध करविला. या आख्यायिकेंतील दीनाराचा उल्लेख अनैतिहासिक आहे. कारण त्या काळीं दीनार हें नाणें प्रचलित झाले नव्हतें. तसेंच पुष्यमित्र हा आपल्या टांकसाळींत नाणीं पाडणारा पहिलाच भारतीय सत्ताधीश असून तो इतरांचीं नाणीं बहुधा वापरीत नसावा.

## पुष्पमित्राचा विहारविनाश

पण दिव्यावदानातील या आख्यायिकेंतून इतिहासाचीं बीजें सहज शोधून काढता येतात. बौद्ध धर्मासारख्या मोंगल वंशाच्या म्लेच्छ धर्माचें संरक्षण आणि संवर्धन करून अशोकानें जी अमर अपकीर्ति संपादिली आहे, तिच्या तुलनेनें किती तरी अधिक अकलंक कीर्ति देशद्रोही बौद्धांच्या तावडींतून देशाची सुटका करून आणि त्यांनीं आमन्त्रणें करून आणलेल्या तारकासुर यवनाच्या आक्रमणापासून स्वसंस्कृतीचें संरक्षण आणि संवर्धन करून पुष्पमित्रानें संपादिली आहे, हें ऐतिहासिक सत्य आज नाहीं उद्यां सर्वांनाच मान्य करावें लागेल. चतुरंग दल सिद्ध करून पुष्पमित्रानें बौद्ध धर्माचा नसला तरी त्याच्या साम्राज्याचे आधारस्तंभ बनलेल्या बौद्ध विहारांचा उच्छेद केलाच. भारतातील एक उपासनेचा पंथ या नात्यानें त्याला बौद्ध धर्माच्या वाटेला जावयाचे नव्हतें. पण त्या धर्माच्या समाजघातकी आणि राष्ट्रघातकी वर्तनाचा समाचार घेण्याचा त्याने संकल्प केला होता आणि स्तूप का विहार असा पर्याय बौद्ध भिक्षूंपुढें ठेवून त्यांच्याकडून निकराचा विरोध न होऊ देता सामाजिक आणि राष्ट्रीय पापाचीं आगरें बनलेल्या विहारांचें विलीनीकरण करून त्यानें तो संकल्प तडीस नेला. पुष्पमित्र बौद्धविरोधी होता तर त्याच्या विदिशेच्या शेजारींच सांची आणि भारूत येथील प्रचंड बौद्ध स्तूप शुंगांच्या राजवटींतच कसे बांधले गेले, असा प्रश्न अनेक इतिहासकारांनीं विचारला आहे. पण असला प्रश्न उपस्थित करणाऱ्या इतिहासकारांनीं दिव्यावदानातील आख्यायिकेचा काळजीपूर्वक विचार केला नव्हता, म्हणून त्यांना त्या साध्या घटनेचा उलगडा झाला नाहीं. पुष्पमित्रानें विहार नष्ट केल्यामुळे तेथील भिक्षूंच्या सेवेसाठीं बौद्ध समाजाचें जें धन नष्ट होत होतें, त्याचा स्तूपाच्या रूपानें सद्व्यय करण्याला सवड देऊन शुंगांनीं भारतीय शिल्पकारांना उदार आश्रय मिळवून दिला. पण त्यांनीं

विहाराचा उच्छेद करून भारतीय समाजवृक्षावरील तीं बाडगुळें कापून काढलीं. पं. जवाहरलाल नेहरूनींहि म्हटले आहे. ' बडे बडे बौद्धसंघ, शक्तिशाली संस्थाएँ थीं, और बहुतसे शासक उनकी राजनैतिक शक्ति से डरते थे, इसलिये उन्होंनें उनको कमजोर करनेकी कोशिश की ' ( विश्व इतिहासकी झलक )

## पुष्यमित्र आणि आठवा हेन्री

विहारविनाशाच्या एका वैशिष्टयापुरती पुष्यमित्राची इंग्लंडच्या आठव्या हेन्रीशीं तुलना करण्याजोगी आहे. आठव्या हेन्रीच्या काळीं इंग्लंडात कॅथॉलिक भिक्षुभिक्षुणींचे सहासातशें विहार तरी अस्तित्वात होते त्यापैकीं निदान चार-पाचशे विहाराचा तेथील आश्रिताच्या दुराचरणानीं अतिशय दुर्लौकिक झाला होता. या सार्‍या समाजकंटकाच्या पापाची प्रकट चौकशी करण्याचा धमकी देऊनच आठव्या हेन्रीनें विहाराच्या विलीनीकरणाला त्याची मान्यता मिळविली. पुष्यमित्रानें समकालीन बौद्ध भिक्षूवर हाहि प्रयोग केला असेल. पण आपल्या पंथाच्या दुर्लौकिकाला कारणीभूत होणार्‍या असल्या घटनाचा उल्लेख बौद्धभिक्षु कशाला करतील ! दिव्यावदानातील आख्यायिकेंत पुष्यमित्रानें बौद्धाच्या स्तूपाचें संरक्षण करण्याचें आमिष भिक्षूना दाखविल्याचा जो उल्लेख आला आहे, तो ऐतिहासिकदृष्टया खरा असल्याचें वर विवेचन केलेंच आहे. शुंगाच्या राजवटींत स्तूपाचा विध्वंस तर झाला नाहींच, उलट भारूत येथील प्रचंड बौद्ध स्तूपासारखे स्तूप त्या काळीं नव्यानें बांधले गेले, अथवा त्याचा मोठ्या प्रमाणावर जीर्णोद्धार झाला, यांवरून विहाराचा विनाश करिताना स्तूपसंरक्षणाचें दिलेलें अभिवचन पुष्यमित्रानें पाळल्याचे सिद्ध होतें आणि त्याच्या सत्यप्रतिज्ञ चरित्राचें आणखी एक आदर्श उदाहरण उपलब्ध होतें. बौद्ध विहाराचीं बाडगुळें कापून टाकून भारतीय समाजवृक्षाला नवजीवन प्राप्त करून देण्याची अत्यावश्यकता पुष्यमित्रा-सारख्या मगधातून साम्राज्यसूत्रें चालविणार्‍या राज्यकर्त्याला जाणवणें किती स्वाभाविक होतें, हें प्राचीन मगधाला अर्वाचीन बिहार हें नाव कसें प्राप्त झालें, याची क्षणभर आठवण करणार्‍याना सहज कळून येईल. धर्म आणि समाज याच्या अधःपातास कारणीभूत होणार्‍या आणि परशत्रूंच्या हस्तकाचें प्रमुख संकेत-स्थान बनलेल्या या पुराणकालीन कुटुंबनियोजनकेंद्राचें उच्चाटन करण्याचें साहस करणारा इतिहासातील पहिला राज्यकर्ता कदाचित् पुष्यमित्रच असेल. त्याच्या-नंतर सोळासत्राशें वर्षांनीं उदयास आलेल्या आठव्या हेन्रीनें दुर्वर्तनाच्या निमित्तानें

कॅथॉलिक भिक्षूंच्या विहाराचा उच्छेद केला असला तरी तो स्वतः काहीं सद्‌गुणांचा पुतळा नव्हता. राणीच्या सखीशीं विवाह करण्याकरितां एका राणीला घटस्फोट देणें, किंवा त्याच हेतूनें दुसऱ्या राणीला व्यभिचारिणी ठरवून मारून टाकणें असलीं दुष्कृत्यें तो स्वतः करीत होताच. पण पुष्पमित्राचें चरित्र असल्या दुष्कृत्यांनीं कलुषित झालेलें दिसत नाहीं. त्याचा पुत्र अग्निमित्र हा राणीच्या सखीशीं चोरट्या प्रणयाची रंगपंचमी खेळण्यांत दंग झाला असला तरी स्वतः पुष्पमित्राला असले चाळे करण्याला कधीं सवडच मिळाली नसावी. त्यानें असले कारभार केले असते तर कालिदासानें आपल्या आद्य नाटकाचा नायक म्हणून अग्निमित्राच्या स्थानीं त्याचीच निवड केली असती.

## बौद्धभिक्षूंचें पापी जीवन

बौद्धभिक्षूंच्या निवासस्थानाना लावण्यांत येणाऱ्या आराम आणि विहार या संज्ञांचा ऋषिनिवासाच्या आश्रम या संज्ञेशीं जितका विरोध आहे, तितकाच विरोध ऋषींच्या पवित्र जीवनात आणि भिक्षूंच्या पापी जीवनात होता. पण या विरोधाचा बोध होण्याकरिता मालवीयसत्कारग्रंथात श्री. भट्टाचार्य यांनीं बौद्ध भिक्षूंच्या जीवनाचें जें विदारक चित्र रेखाटलें आहे, त्याची रूपरेखा तरी इथें वाचकांना सादर करणें आवश्यक वाटतें. विहार, अध्याययोग, प्रासाद, हर्म्यं आणि गुहा या पाच प्रकारच्या निवासस्थानांतून वसती करण्याची स्वतः बुद्धानेंच भिक्षूंना अनुज्ञा देऊन ठेविली होती. त्या ठिकाणीं भिक्षूंनीं आपलें वर्तन कसें ठेवावें, याविषयींचे नियम प्रातिमोक्षसूत्रांतून सांगितले असून त्या सूत्राचा ठराविक दिवशीं पाठ म्हणावा लागे आणि त्यानंतर प्रत्येक भिक्षूला त्यापैकीं कोणत्याहि नियमाचें आपण उल्लंघन केलें असल्यास त्याचा उल्लेख करावा लागे. एकदां या कार्यक्रमाकरितां एका विशिष्ट मठांतील सारे भिक्षू एकत्र जमले असतां त्यांनीं शीर्षक नांवाच्या एका श्रेष्ठ भिक्षूला प्रातिमोक्षाचा पाठ सांगण्याची सूचना केली. तेव्हा तो भिक्षुश्रेष्ठ उद्गारला 'नाककान कापलेल्याना जशी आरशाची आवश्यकता नाहीं, तशीच तुम्हालाहि प्रातिमोक्षपाठाची आवश्यकता नाहीं.' या त्याच्या उद्गाराना सुरत या सार्थ नावाच्या भिक्षूनें आक्षेप घेतला. त्यावरून तेथें भांडण होऊन सारे भिक्षू परस्परांकडून मारले गेले. पण समाजाच्या दृष्टीने शुभ असलेल्या या घटनेची आवृत्ति क्वचित् निघत असे. भिक्षुप्रातिमोक्ष, भिक्षुणीप्रातिमोक्ष, महावग्ग, चुल्लवग्ग इत्यादि बौद्ध धर्मग्रथावरून विहारजीवनातील

नरकाची पुरेशी कल्पना येते. व्यभिचार, भ्रूणहत्या, बालहत्या, त्याचप्रमाणें भिक्षूंच्या पापी जीवनासबंधीं मौन न पाळणाऱ्यांची हत्या या साऱ्या विहार-जीवनातल्या अगदीं सामान्य घटना असतात. श्री. भट्टाचार्य म्हणतात. ‘ The monks and nuns commit crimes after crimes Buddha censures them mildly, and frames rules for their future guidance. It happens that chastity ordained by Buddha had gone to the dogs. Buddha tried his level best to separate the monks and the nuns, but he failed ’ म्हणजे भिक्षुभिक्षुणींचीं पापावर पापें उघडकीला येत होतीं आणि त्यांच्या वर्तनाचा सौम्य निषेध करून बुद्ध त्यांना भविष्यकाळाकरिता नवे नियम घालून देत होता. पण भिक्षूंना ब्रह्मचर्य पाळायला लावण्याचें सामर्थ्य त्याच्या यमनियमात नव्हतें भिक्षू आणि भिक्षुणी याना अलग ठेवण्याचा बुद्धानें आपल्याकडून शक्य तितका प्रयत्न केला, पण तो सपशेल फसला.

## अशोक–मंत्र्याकडून भिक्षूंचा संहार

बुद्धाच्या काळींच इतके भ्रष्ट झालेले भिक्षू अशोकाच्याकाळीं अधिकच चेकाळले असल्यास त्यात नवल काय, बिहारचे पूर्वीचे राज्यपाल दिवाकर यानीं संपादिलेल्या ‘ Bihar through the Ages ’ या ग्रथात म्हटलें आहे, ‘ The harmony of the monasteries was disturbed by strife, and the therawadins having refused to participate in the various religious ceremonies with the dissenters, even the uposatha rites and been stopped. The emperor deputed a responsible minister to settle the causes of dispute and resstore the uposatha ceremony which had not been convened for seven years. The minister consulted his colleagues who advised him to deal with the affairs in the manner of summery criminal trial. The minister ordered the monks to restore the uposatha The Therawadins refused to sit with the heterodox monks and there followed a general massacre in which many of the traditional monks were killed.’ म्हणजे अशोकाच्याकाळीं भिक्षूमध्यें काहीं सुधारक निघाले होते आणि त्याच्यादेखत

प्रातिमोक्षाचा पाठ म्हणून आपल्या पापाचा उच्चार करावयाला थेरवादी भिक्षू सिद्ध नसल्यानें उपोसथाचा कार्यक्रमच सात वर्षें बंद पडला होता. अशा वेळीं सम्राटानें एका अमात्याला या वादांचा निर्णय करण्याचा अधिकार दिला. त्यानें जेव्हा आपल्या सहकाऱ्याचा विचार समजावून घेतला, तेव्हा त्यानीं त्या अमात्याला आशुनिर्णयाच्या पद्धतीनें या अपराध्याना शासन करण्याची सूचना केली. ही सूचना ऐकून त्यानें भिक्षुसंघाची तातडीची सभा बोलावून त्याना उपोसथाचा कार्यक्रम नेहमीप्रमाणें करण्याची आज्ञा केली. या आज्ञेला थेरवादी भिक्षूंनीं विरोध केल्यामुळें त्यांच्यापैकीं पुष्कळाना प्राणाना मुकावें लागलें. अशोकाच्या या मन्त्र्याच्या चरित्राचा ' अथेन्सच्या कवींचा कालिदासावरील प्रभाव ' या प्रकरणात पुन्हा संदर्भ येणार आहे. असो. हे भिक्षु केवळ व्यभिचार करून, किंवा बुद्धाचे खोटेनाटे अवशेष दाखविण्याच्या निमित्तानें विहारातील विलासाकरिता नागरिकाकडून द्रव्य उकळून स्वस्थ रहात नसत. यांच्यापैकीं पुष्कळसे भिक्षू मूळचे क्षत्रिय असल्यानें ' येन केन प्रकारेण ' अधिकार आणि सत्ता बळकावण्यासाठींहि यांचीं कारस्थानें चालू असत. या भिक्षुसंघानींच भारतात मोठ्या प्रमाणावर दासप्रथा प्रचारात आणली. कारण यांचे आराम आणि विहार व्यवस्थितपणें चालावेत, याकरिता त्यांना आरामिक या संज्ञेनें ओळखले जाणारे क्रीतदास अर्पण करीत असत. हे आरामिक वेळोवेळीं ' आरामात ' राहणाऱ्या भिक्षूविरुद्ध बंडेंहि करीत. या सर्व कारणाकरिता पुष्यमित्रासारख्या राजधर्मपरायण अधिपतीला आरामाच्याकडे आणि विशेषतः त्या आरामातील आरामिकाच्या दास्याकडे दुर्लक्ष करणें अशक्यच होतें. पुष्यमित्राच्या काळीं प्रथमच अस्तित्वात आलेल्या ब्राह्मणी राज्याचा मुख्य आधार शूद्र वर्णाचें सहकार्य हाच असल्यानें त्याला बौद्धधर्मामुळें वृद्धिंगत झालेल्या दासप्रथेचा उच्छेद करण्याकरितांहि बौद्ध भिक्षूच्या आरामविहाराचा उच्छेद करणें अपरिहार्य झालें होतें. मंजुश्रीमूलकल्प या बौद्धाच्या पुराणात पुष्यमित्राविषयीं लिहिलें आहे. ' प्राचीं दिशिमुपादाय काश्मीरद्वारमेव तु । नाशयिष्यति तदा मूढः विहारान् धातुवरान् तथा ।। भिक्षव शीलसंपन्नाः घातयिष्यति दुर्मतिः । उत्तरा दिशिमाश्रित्य मृत्युस्तस्य भविष्यति ।। ' प्राची दिशेपासून काश्मीरद्वारापर्यंत हा पुष्यमित्र विहाराचा आणि धातुवराचा म्हणजे त्या विहारातून बुद्धाचे जे बनावट अवशेष जनप्रवंचनेकरिता ठेविले असत, त्याचा नाश करील. शीलसंपन्न भिक्षूचा हा वध करील. शेवटीं उत्तर दिशेला याचा मृत्यु होईल. या श्लोकात उल्लेखिलेल्या काश्मीर विभागातच आरामिकाचीं बंडें वारंवार होत असल्याचा युआनच्वागनें

उल्लेख केला आहे, इतकें सांगितले म्हणजे या गालिप्रदानाला पुरेसें उत्तर दिल्यासारखे होईल. बौद्ध लेखकाच्या असल्या गालिप्रदानामुळेंच चीन जपानमधील बौद्ध हि पुष्पमित्राला स्वधर्माचा छळ करणारा पहिला शत्रू समजतात. परराष्ट्रातील विधर्मी लोक एखाद्या भारतीय राज्यकर्त्याला आपला वट्टा शत्रु मानत असले तर त्यानें निदान आमरण स्वधर्माचें आणि स्वदेशाचें कल्याण करण्याचा प्रयत्न केला असल्यानें विदेशी आणि विधर्मी लोकात मान्यता पावलेल्या अशोकापेक्षा त्याची योग्यता अधिक असू शकेल, इतके ओळखण्याचा विवेकहि आज आमच्या अधिकारी इतिहासकाराना उरलेला दिसत नाहीं.

## चाणक्यपुष्पमित्रांना नरक

पुष्पमित्राच्या काळीं चाणक्याच्या अर्थशास्त्रात घालून दिलेल्या नियमाची कडकपणें बजावणी होत असे. प्रजोत्पादनाची शक्ति नष्ट झाल्यावाचून संन्यास घेण्याला अर्थशास्त्रानें निरपवादपणें बंदी केली होती. 'लुप्तव्यवायः प्रव्रजेत् अ पृच्छय धर्मस्थान् । ' जनपदामध्यें आराम आणि विहार यांना थारा देऊ नये ' न च तत्र आरामाविहारार्थाः शालाः स्युः ।' आरामविहाराना जनपदात स्थान दिल्यास त्याच्यावर कर लादावेत ' नच बाहिरिकान् कुर्यात पुरराष्ट्रोपघातकान् । क्षिपेत् जनपदे चैतान् सर्वान् वा दापयेत् करान् ।।' पुढे अशोकाला अतिप्रिय झालेल्या शाक्य ( म्हणजे बौद्धच, पण बुद्धिप्रधान आचार्य विष्णुगुप्त बुद्धाच्या निर्बुद्ध अनुयायाना त्याच्या टोळीच्या नावानेंच ओळखतात. ) आणि आजीवक या दोन पाखडावर चाणक्याचा विशेष कटाक्ष असल्यामुळें देवपितृकार्यांच्या प्रसगीं त्याना भोजन घालण्यालासुद्धां आचार्यांनीं बदी केली आहे. ' शाक्याजीवकादान् वृषलप्रव्रजितान् देवपितृकार्येषु भोजयतः शत्या दडः ।' या वृषलप्रव्राजिताचे आराम आणि विहार हे सारे दासप्रथेवर प्रतिष्ठित असल्यानें आचार्य विष्णुगुप्तानीं दासप्रथेलाच कसून विरोध केला होता. कारण त्याची प्रतिज्ञाच ही होती कीं ' न त्वेवार्यस्य दासभावः ।' आर्यांमध्यें दासभाव मुळीं नसावाच. या सूत्रातील आर्य शब्दात शूद्राचाहि समावेश होतो, असेंहि आचार्यांनीं आवर्जून सागितलें आहे. ज्या देशात शुद्ध सस्कृत बोलतात तो आर्यावर्त; अशी महाभाष्यकाराची समजूत असली तर जिथें दासप्रथा नाहीं तो आर्यावर्त अशी अर्थशास्त्रकाराची भावना होती. दासाचा क्रयविक्रय केल्यास म्लेंच्छांना दोष लागत नाहीं, पण आर्यांना लागतो, असेंहि अर्थशास्त्रकारांनीं लिहून ठेविलें आहे. या सर्व कारणाकरिता पुष्पमित्राप्रमाणेंच अर्थशास्त्रकारानाहि बौद्धाच्या नरकात अनत

काळपर्यंत निवास करण्याचा मान मिळाला आहे. या सन्मानामुळेंच अर्थशास्त्रकार हे कोणी पुस्तकी पंडित नसून मौर्य साम्राज्याच्या संस्थापकाचे आचार्य आणि अमात्य होते, ही गोष्ट सिद्ध होते आणि त्याचीच परंपरा पुष्पमित्रानें पुढें चालविली असल्याचें बौद्ध ग्रंथावरूनच निश्चितपणें कळून येतें. सनातन पंथी आर्यांच्या दासप्रथाविरोधी धोरणामुळेंहि विहारवासी, भिक्षूंचे ते अहिनकुलवत् शत्रू बनले होते आणि त्याच कारणाकरिता त्या भिक्षूंना दासव्यवसाय करणाऱ्या हिमालयातील स्वदेशी म्लेच्छांप्रमाणेंच विदेशातील यवनांविषयीं आत्मीयता वाटू लागली होती. अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांतील प्रजा सामान्यतः एका वंशाची आणि धर्मांची असतानाहि केवळ दासप्रथेच्या प्रश्नावरून उत्तरेकडील संस्थानें आणि दक्षिणेकडील संस्थानें यांच्यात किती निकराचें यादवी युद्ध झालें, हा इतिहास सुविदित असणाऱ्यांना तरी पुष्पमित्रकालीन परिस्थितीचा बोध होण्याला अडचण पडू नये.

## पुष्पमित्राचे बौद्धधर्मावरील उपकार

पुष्पमित्रानें विहाराचा उच्छेद केल्यानंतर त्या विहारातील धर्मनिष्ठ भिक्षू इतर पापी भिक्षूंपासून आपोआपच विभक्त होऊन मौर्यसाम्राज्याच्या सीमेपलीकडील प्रांतांत धर्मप्रचाराप्रीत्यर्थ गेले असले पाहिजेत. बौद्धधर्माचा भारताच्या सीमेपलीकडील प्रदेशातून जो प्रसार झाला, तो पुष्पमित्रोत्तर कालातच झाला. अशोकानें जरी परदेशांतून धर्मप्रचारक पाठविले होते आणि आपण त्या देशातून धर्मविजय संपादन केल्याची प्रौढी त्यानें प्रारंभींच्या शिलाशासनातून जरी मिरविली होती, तरी ते सारे धर्मविजय बौद्धधर्मातील क्षणिकवादाच्या प्रतीतीप्रमाणेंच क्षणभंगुर ठरले असले पाहिजेत. प्रो. ब्लोक यांच्या Les inscriptions d' Asoka या ग्रंथाच्या आधारानें श्री. रोमिला थापर या लेखिकेनें आपल्या ग्रंथात म्हटले आहे. ' It is of interest to note that in the 7 th pillar Edict when summing up as it were the achievements of Dhamma, Ashoka speaks with great satisfaction about the results within his empire. However, on this occaison not a single reference is made to relations with the neighbouring countries, whereas the early edicts proclaim in no uncertain terms that converts to the Dhamma include the neighbouring countries of the north-west. It is possible, ten years after the issuing of the edict, the hosti-

ility of the Greeks along north-west border was beginning to be felt.' म्हणजे 'सातव्या स्तंभलेखात अशोकानें आपल्या साम्राज्यांत बौद्ध प्रचाराला प्राप्त झालेल्या यशाविषयीं समाधान व्यक्त केलें असलें तरी त्या लेखात दहा वर्षांपूर्वीच्या लेखांप्रमाणें शेजारच्या यवनराज्यातून बौद्ध धर्माच्या प्रचाराला यश येत असल्यासंबधीं चकारशब्दहि काढलेला नाहीं. अर्थात् त्या दहा वर्षांच्या अवधींत यवन हे आपले प्रकृत्यमित्र म्हणजे नैसर्गिक शत्रु असल्याचा अशोकालाहि अधिकाधिक अनुभव आला असला पाहिजे ( अशोक आणि मौर्यकुलाचा ऱ्हास पान १८९ ).' अशोकाच्या काळीं बौद्ध लोक यवनाच्या आलिंगनात आरूढ होण्याला आतुर असले तरी तेव्हा सेलेउकुसच्या वंशजाचा वैदिक धर्मसम्राटाच्या कडून सपशेल पराजय झाला नसल्यामुळें त्याना बौद्ध बनून भारतवर्षांतील देशद्रोह्यांशीं एकजीव होण्याची आवश्यकता जाणवत नव्हती. पुष्पमित्रानें मिनांडरचा पूर्ण पराभव केल्यानंतर बौद्ध आणि यवन हे समानशील आणि समानव्यसन याच्या प्रभावानें परस्पराच्या भावबंधनात बांधले गेले. या समयापासून पुष्पमित्रानें शुद्धीकरण केलेल्या बौद्ध धर्माच्या प्रचाराला नवजीवन प्राप्त झालें. कॉन्स्टँटिनोपलच्या पाडावानंतर तेथील ग्रीक ग्रंथ जसे देशांतरीं आश्रय शोधू लागले, तसे पुष्पमित्रकालीन विहारविनाशानंतर त्या विहारांतील बौद्ध ग्रंथ आणि त्यांचे पाठक नवीन आश्रय शोधण्याकरिता देशोदेशीं संचार करू लागले. या संचारामुळेंच जावा, सुमात्रा ब्रह्मदेश, चीन, मध्य आशिया इत्यादि देशांतून बौद्ध धर्माचें नवें कृतयुग निर्माण झालें. ' कृतं संपद्यते चरन् ' असें इन्द्रानें सांगितलेंच आहे. पुष्पमित्राच्या काळीं झालेल्या विहाराच्या उच्छेदाचा आघात मुख्यत: स्थविरवादी पंथाला अनुभवावा लागल्यामुळें त्याच्या मागून महायान पंथाच्या अभ्युदयाचा मार्ग मोकळा झाला असावा. थेरवाद्यांचा सर्व कलेला विरोध होता, ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे पुष्पमित्र स्वतःला न कळत शुंगोत्तर काळांतील बौद्ध-कलेची सुईण बनला असल्याचें कळून येतें. पुष्पमित्राच्या काळापासून बौद्ध हे ज्या विदेशी परशत्रूचे उघडपणें हस्तक बनले, त्याना भारतातील कोणत्याहि प्राकृत भाषेविषयीं आत्मीयता वाटत नसल्यामुळें बौद्ध धर्माच्या पुष्पमित्रोत्तर प्रचारकांना मुकाट्यानें संस्कृत भाषेंतच आपली ग्रंथरचना करावी लागली. मिलिंदप्रश्न हा बौद्ध संस्कृतातील सर्वांत प्राचीन ग्रंथ आज पालींत उपलब्ध असला तरी बौद्ध संस्कृताचा उदयहि मिनांडरनंतर झाला, असें म्हणावें लागतें.

## वसुमित्राचें राजपुत्रशतक

याप्रमाणें बौद्ध भिक्षूंना त्याच्या इच्छेविरुद्ध संचाराच्या कृतयुगाची दीक्षा देणाऱ्या पुष्पमित्रानें अश्वमेधाच्या निमित्तानें आपल्या वाजिराजाला निरर्गल सोडून त्याच्यासह आपल्या आणि सामंतांच्या कुलांतील राजपुत्रांना दिग्विजयाप्रीत्यर्थ संचाराला जाण्याची आज्ञा केली. समकालीन इतिहासचें अनुसंधान ठेवून, पुष्पमित्रानें अग्निमित्राला अश्वमेधाला येण्याविषयीं लिहिलेल्या पत्रांतील पुढील वाक्यांचा विचार केला असता पुष्पमित्राच्या इतिहासावर अपूर्व प्रकाश पडतो, असें वाटतें. 'योऽसौ राजयज्ञदीक्षितेन मया राजपुत्रशतपरिवृतं वसुमित्र गोप्तारमादिश्य वत्सरोपात्तनियमो निरर्गलस्तुरंगो विसृष्टः स सिंधोर्दक्षिणरोधसि चरन् अश्वानीकेन यवनेन प्रार्थितः। तत उभयोः सेनयोः महान् आसीत् समर्दः। 'ततः परान् पराजित्य वसुमित्रेण धन्विना। प्रसह्य ह्रियमाणो मे वाजिराजो निवर्तितः ॥' इथें लक्षांत घेण्याजोगी पहिली गोष्ट ही कीं वसुमित्रासह अश्वसंरक्षणासाठीं पाठविलेलें राजपुत्रशतक हें आयत्या वेळीं देशातून गोळा करून आणलेलें नसून शुंगसाम्राज्यातील राजाचें आणि सामंतांचे जे पुत्र वसुमित्रासह पाटलीपुत्रासंनिध पुष्पमित्राच्या आणि त्यानें नेमलेल्या आचार्यांच्या देखरेखीखालीं विद्याध्ययन करीत असत, त्याचें हें राजपुत्रशतक असलें पाहिजे. स्वतः अलेक्झांडरच्या संरक्षकांत असेंच राजपुत्रशतक असावें, असें प्रो. टार्न यांनीं अनुमान केलें आहे. इराणातील हखामणी साम्राज्यांतहि हीच रूढी प्रचलित होती. हें राजपुत्रशतक आणि त्याचे अनुचर मिळून जें घोडदळाचें पथक होत असे, त्या साऱ्या पथकाला राजाच्या मित्राचें पथक असेंच म्हणत. या साऱ्या राजपुत्राचें आहारनिद्राविहार सम्राट्पुत्रासह होत असत. हें राजमित्राचें पथक म्हणजे अलेक्झांडरच्या सैन्यातील अमोघ अस्त्रच होतें. अश्वदलाच्या या सर्वोत्कृष्ट पथकाचा आघात सहसा वाया जात नसे. ही परंपरा लक्षांत घेतली म्हणजे पुष्पमित्रानें आपलें सर्वोत्कृष्ट अश्वदल वसुमित्राच्या स्वाधीन केलें होतें, ही वस्तुस्थिति लक्षात येते. अश्वमेधाच्या अश्वासह राजपुत्रशतक असावें असा नियम धर्मग्रंथात असला तरी समकालीन इतिहासाचा विचार केल्यावांचून पुष्पमित्रानें आपल्या पौत्रासह दिलेल्या राजपुत्रशतकाचें महत्त्व कळणें शक्य नाहीं. असो. ग्रीक अश्वदलाचीं प्रमुख शस्त्रें असिलता आणि भाला हीं होतीं. पण पुष्पमित्राच्या पत्रातील 'वसुमित्रेण धन्विना' या पदावरून शुंगाच्या अश्वदलाचें प्रमुख शस्त्र धनुष्यबाण हेंच असल्याचें निर्देशनास येतें. त्या काळीं घोड्यावर बसतांना तंग

वापरीत नसल्यानें अश्वदलात धनुर्विद्येचा उपयोग करणें फार अवघड होतें. या दुष्कर विद्येंत प्रावीण्य संपादन केल्यामुळेंच वसुमित्राच्या अश्वदलानें यवनांच्या अश्वदलाचा सिंधु नदीच्या उत्तरेला पराभव केला. 'दक्षिणरोधसि' या पदाचा अर्थ इथें उत्तर तीरावर असाच होतो, हें तज्ज्ञांना सुविदित आहे. ज्या प्रांतात रथी पोरस अथवा पुरु राजाचा यवनांनीं पराजय केला होता, त्याच प्रांतांत पुष्पमित्राच्या अश्वदलानें त्या अजिंक्य शत्रूचा पराभव केलेला पाहूनच पुराणकाराना बुद्धानंतरच्या कलकी अवताराला अश्वारोही बनविण्याची कल्पना सुचली असावी.

## पुष्पमित्राचें मूळचें पत्र

कालिदासानें मालविकाग्निमित्रात उतरून घेतलेल्या पुष्पमित्राच्या पत्राचें काळजीपूर्वक अध्ययन केल्यानंतर ही गोष्ट स्पष्ट होते कीं तें पत्र कविकालिदासकपोलकल्पित नसून स्वतः सेनापति पुष्पमित्रानें पुष्पपुराहून लिहिलेलें अतिमहत्त्वाचें ऐतिहासिक पत्र आहे. त्या पत्रात पुष्पमित्राचा साधा सेनापति असा उल्लेख आलेला पाहून विस्मयचकित झालेल्या अर्वाचीन इतिहाससंशोधकांनीं प्रथम कालिदासाच्या अकलेचे वाभाडेहि काढले होते. पण पुढें साकेत येथील पुष्पमित्राच्या वंशजांच्या शिलालेखातून द्विरश्वमेधयाजी पुष्पमित्राचा सेनापति असाच उल्लेख आलेला पाहून त्याना आपले शब्द परत घ्यावे लागले. याच पत्रांत आपल्या सान्या राण्यासह यज्ञाला येण्याचें अग्निमित्राला आमन्त्रण करितांना सेनापतीनें 'विगतरोषचेतसा' म्हणजे मनांतील राग टाकून यज्ञाला अवश्य यावें असा जो आग्रह केला आहे, त्याचा नाटकातील कोणत्याहि घटनेशीं संबंध नसून केवळ शुंगघराण्याच्या इतिहासाशीं संबंध असण्याचा संभव दिसतो. मागच्या परिच्छेदात राजपुत्रशतक आणि वसुमित्रेण धन्विना या पदाची चिकित्सा करून त्याचा तत्कालीन इतिहासावर कसा अभिनव प्रकाश पडतो, हें दाखविलें आहेच. या सर्व गोष्टींचा साकल्यानें विचार केला असता असें अनुमान निघतें कीं मालविकाग्निमित्रातील पुष्पमित्राचें पत्र हें ऐतिहासिक पत्र असून समकालीन प्रेक्षकांना तें सुपरिचित असल्यानें, कवीनें आपल्या नाटकाच्या अंतिम अंकात संधि साधून त्याचा सदुपयोग करून त्याला अजरामर केलें आहे. यावरून ही गोष्ट सिद्ध होते कीं ज्या काळीं शुंग घराण्यातील महत्त्वाचीं पत्रेंहि आकर अवंतीतील सुबुद्ध नागरिकाना उदयनकथेइतकींच सुपरिचित होतीं, अशा काळात कालिदासानें

आपलें आद्य नाटक लिहिलें असलें पाहिजे. हें पत्र ऐतिहासिक असल्याचें व्हिन्सेंट स्मिथ यानींहि मान्य केलें आहे.

## ब्राह्मण सम्राटांची परंपरा

पुष्पमित्राच्या चरित्राचें एक महत्त्वाचें वैशिष्ट्य हें आहे कीं तो भारतीय इतिहासांतील पहिला ब्राह्मण साम्राज्यसूत्रधार असून त्याच्यापासून ब्राह्मण सम्राटाची जी परंपरा चालू झाली, ती गुप्तपालमौखरीप्रभृतींनी मधून मधून खंडित केली असली तरी तुर्की साम्राज्याच्या स्थापनेपर्यंत तरी तशीच चालू राहिली. अर्थात् बुद्धाच्या उपदेशानें, अशोकाच्या प्रचारानें आणि पूर्वी दाखविल्याप्रमाणें युद्धपद्धतींतील परिवर्तनानें क्षत्रिय कुलांनीं आपल्या परंपरागत कर्तव्याचा त्याग केल्यानें राष्ट्रीय जीवनात जी पोकळी निर्माण झाली होती, ती ब्राह्मणानीं आपल्या कर्तृत्वानें भरून काढली, म्हणूनच ही ब्राह्मणसम्राटांची परंपरा चालू झाली, ही गोष्ट उघड आहे. बुद्ध आणि अशोक यानीं याप्रमाणें क्षत्रियवर्णाला समाजातील वैभवशाली पदावरून खालीं ओढून भिक्षाप्रवण बनविलें, ही वस्तुस्थिति व्हिन्सेंट स्मिथसारखे आंग्ल इतिहासकार आणि त्याचे अनुयायी यांनीं देशांतील ब्राह्मणेतरांपासून काळजीपूर्वक लपवून ठेविली असल्यानें आतापर्यंत ती अविदितच राहून गेली आहे. पुष्पमित्राच्या नेतृत्वाखालीं ब्राह्मणानीं साम्राज्याचा भार आपल्या शिरावर घेतला आणि अश्वमेधादि यज्ञाचें पुनरुज्जीवन केलें, ही गोष्ट पुष्कळशा पुराणप्रिय ब्राह्मणांना रुचली नाहीं, असें ब्रह्मपुराणातील कलियुगवर्णनातल्या पुढील श्लोकावरून कळून येतें. 'अशास्त्रविहितो यज्ञ एवमेव भविष्यति। अप्रमाणाः करिष्यन्ति नराः पंडितमानिनः ॥ अश्वमेधेन यक्ष्यन्ते युगान्ते द्विजसत्तमाः। याजयिष्यत्ययाज्यांस्तु तदाभक्ष्यस्य भक्षिणः ॥' कलियुगाच्या अंतीं स्वतःला पंडित म्हणविणारे नेते अशास्त्रविहित यज्ञ करतील. ज्याना अश्वमेधाचा अधिकार नाहीं अशाच्याकडून अश्वमेध करवून अभक्ष्यभक्षणहि करतील. पण सूतवर्गाच्या साऱ्या परंपराचा संग्रह करून पुराणें रचण्यात दंग झालेल्या पुराणप्रिय ब्राह्मणांना हें कळत नव्हतें कीं वैश्याच्या अनुकरणानें क्षत्रियानींहि बौद्धजैनपंथाचा स्वीकार केल्यानें निराश्रित झालेल्या राजलक्ष्मीला शकयवनपारदकुषाणासारख्या परदेशी आक्रमकांच्या स्वाधीन करण्यापेक्षा स्वदेशातील ब्राह्मणानीं सनाथ करणें हेंच आपद्धर्माच्या दृष्टीनें अधिक श्रेयस्कर होतें. इतपत सुबुद्धि त्या पुराणाच्या प्रणेत्याना सुचणें दुष्करच होतें.

## पुष्पमित्रकालीन सामाजिक क्रांति

पुष्पमित्रानें क्षत्रियांच्या रथयुगाची समाप्ति होऊन अश्वदलाला अग्रस्थान प्राप्त झाल्याचे प्रतीक म्हणूनहि अश्वमेधाचा पुनरुद्धार केला असेल त्यानें अश्वमेधाचा पुनरुद्धार केला, म्हणून इतिहासाचार्य टॉयनबी हे त्याला सनातनपथाचा पुरस्कर्ता समजतात. त्याच्या (Archaism) सनातनीपणावर इतिहासाचार्यांनीं एक परिच्छेदहि लिहिला आहे. पण हा त्यांचा समज भारतीय परंपरेच्या अज्ञानावर आधारलेला आहे. सनातनी ब्राह्मणाच्या मतानें कोणाहि ब्राह्मणाला अश्वमेध करण्याचा अधिकार नसल्यानें त्यांच्या मताप्रमाणें पतंजलींनीं पुष्पमित्राकडून करविलेला अश्वमेध हा शुद्ध अधर्म आणि अनाचार होता. शुंगोत्तरकालीन हरिवंशादि पुराणातून सनातनी ब्राह्मणानीं कलियुगवर्णनात लिहिलें आहे. ‘ कुडावृष ’, नैकृतिक, (अधिकार नसताना यज्ञादि क्रिया करणारे ) सुरापान करणारे, मिथ्यावेदाभिमानी होणारे ब्राह्मण अश्वमेध यज्ञ करतील. ’ वस्तुस्थिति अशीच होती कीं पतंजलिपुष्पमित्राच्या काळापूर्वींच क्षत्रिय आणि वैश्य या वर्णांनीं सनातन धर्माचा त्याग करून स्वधर्म आणि स्वराष्ट्र यांच्या संरक्षणाच्या कार्यांत ब्राह्मणाशीं सहकार्य करण्याचें नाकारलें, तेव्हा त्यांच्या असहकाराला आणि राष्ट्रद्रोहाला उत्तर म्हणून पतंजलिपुष्पमित्रांनीं शूद्रवर्णाचें सहकार्य संपादण्यावर सर्वस्वीं भर दिला. यामुळें हरिवंशातील कलियुगवर्णनात म्हटलें आहे. ‘ ब्राह्मण शूद्रावर उपजीविका करू लागतील आणि शूद्र ब्राह्मणाच्या आचारानें वागतील. हे जनमेजया, या शेवटच्या युगात ब्राह्मण हातीं बाण घेतील. यज्ञक्रिया विधिहीन होतील आणि सर्व जाती एके पंक्तीस भोजन करतील. ’ हें सारें वर्णन पतंजलि आणि पुष्पमित्र यांच्या नेतृत्वाखालीं झालेल्या अश्वमेधाला अनुलक्षून आहे, हें ऐतिहासिक दृष्टीनें पाहणाऱ्याना सहज समजून येईल. याच वर्णनात पुढें म्हटले आहे. ‘ सर्वच तोंडानें ब्रह्म बोलू लागतील. शूद्रहि भो हा शब्द परस्परसंबोधनात वापरू लागतील. क्षत्रिय वैश्याचा आचार करू लागतील आणि ब्राह्मण स्वतःच भलतें कर्म करू लागून ( म्हणजे क्षत्रियकर्म ) क्षत्रियाना स्वकर्मांचे ठायीं प्रवृत्त करीनासे होतील. वेदाचें एक अक्षर कोणी पढणार नाहींत. भो असें बहुमानार्थी संबोधन मात्र वाटेल ते उपयोगात आणतील. मांसाशन सोडल्यामुळें ज्यांचे दात शुभ्र झाले आहेत आणि नेत्र सूक्ष्म झाले आहेत, असे मुंडन केलेले, काषाय वस्त्रें धारण करणारे, त्याचप्रमाणें शाक्यमत आणि बुद्धमत यावर उपजीविका करणारे शूद्र धर्माचरण करू लागतील ’ या शेवटच्या वाक्यावरून बौद्ध भिक्षु

बनलेल्या शूद्रानाहि परत सनातन धर्माकडे वळविण्यात तेव्हा ब्राह्मणाना यश आलें असावें, असें दिसतें असो. हरिवंशातील कलियुगवर्णनातून वेचलेल्या या साऱ्या उल्लेखांचा ऐतिहासिक दृष्ट्या अर्थ केला असता त्याकाळीं शूद्रांना त्रैवर्णिकांचे बहुतेक अधिकार अर्पण करून स्वधर्म आणि स्वराष्ट्र याच्या संरक्षणाच्या कार्यात ब्राह्मणांनीं त्यांचें सहकार्य संपादिलें आणि क्षत्रियवैश्यांनीं वैदिक परंपरेचा त्याग केल्यानें निर्माण झालेली पोकळी भरून काढली, हें ऐतिहासिक सत्य स्पष्ट होतें. याचवेळीं संस्कारसौकर्याकरिता सुलभसंस्कृतात पुराणोक्त संस्कार प्रचलित करून ब्राह्मणांनीं शूद्रांच्या अंतःकरणात स्वधर्माविषयीं आणि स्वराष्ट्राविषयीं आत्मीयता निर्माण केली. त्या काळीं पुराणोक्त संस्कृतातील संस्कार शूद्रानासुद्धा समजत होते, ही गोष्ट इतिहासाभ्यासकांनीं तरी विसरू नये. ब्राह्मण शूद्रावर उपजीविका करतील आणि शूद्र ब्राह्मणाच्या आचारानें वागतील, या वर उतरून घेतलेल्या वचनाचा अर्थ हाच आहे. ब्राह्मण क्षत्रियाना स्वकर्माचे ठायीं प्रवृत्त करीनासे होतील, या वचनावरून त्या काळीं भगवद्गीतेलाहि भीक न घालणाऱ्या क्षत्रियापासून कोणतीहि अपेक्षा करण्याचें ब्राह्मणानीं सोडून दिलें होतें, ही गोष्ट स्पष्ट होते. रथभ्रष्ट झालेल्या क्षत्रियाना तेव्हा ब्राह्मणापेक्षा वैश्याचें मार्गदर्शन अधिक प्रिय झालें होतें, आणि त्यांच्या अनुकरणानें वैश्यव्यवसाय पतकरून धनार्जन करण्यात सौख्य वाटू लागलें होतें. रोममधील क्षत्रियवर्गहि याच काळीं वैश्यव्यवसायांत शिरूं लागल्यानें रोमच्या राज्यसभेनें त्याना व्यापारात शिरण्याला बंदी केली. तरीसुद्धा ते आपल्या मुक्तदासांच्या नांवानें व्यापारव्यवसाय करीतच असत. वरील अवतरणातून कुंडावृष असा जो शब्द आला आहे, त्याचाहि इथें उलगडा केला पाहिजे. नपुंसक पतीच्या पत्नीला जारापासून झालेल्या कन्येला कुंडा म्हणतात. अशा कन्यांना औरस संततीप्रमाणें मानून त्यांच्याशीं विवाह करणाऱ्यांची हरिवंशकारांनीं कुंडावृष या शब्दानें संभावना केलेली दिसते. पतिसान्निध्यात असताना पत्नीला झालेली संतति, त्यानें आपली म्हणावयाचें नाकारलें नसल्यास त्याची औरस संतति मानली पाहिजे, असा व्यवहारशास्त्राचा नियम आहे. या व्यवहाराला अनुसरून शुंगसाम्राज्यातील नेत्याचें वर्तन असल्याचें हरिवंशांतील निंदेवरून दिसून येतें.

## अश्वमेधाचा पुनरुद्धार कां केला ?

एकीकडे शूद्रवर्णाकरिता सुलभ पौराणिक धर्माची निर्मिति करीत असतानाच पतंजलिपुष्यमित्रांनीं अश्वमेधाचा पुनरुद्धार इतक्या आग्रहानें का केला, याचा

आतां सविस्तर विचार केला पाहिजे. केवळ व्यावहारिक दृष्टीनें विचार केला असता असें दिसून येतें कीं रोमचे सम्राट् आपल्या राजधानींतील उच्छृंखल प्रजेला संतुष्ट ठेवण्याकरिता अन्नदानासह प्राणिहत्येचे जे खेळ करीत असत, त्याचें कार्य तरी अश्वमेधानें निश्चितपणें होत असले पाहिजे. अश्वमेधाच्या प्रसंगीं ३४९ ग्राम्य आणि २६० आरण्य पशू मंडपात आणावे लागतात. यापैकीं ग्राम्य पशूंची हत्या होत असून आरण्यपशू हे परत अरण्यात सोडून दिले जात. हा सारा देखावा, अश्वमेधाच्या निमित्तानें होणारें अपरिमित अन्नदान, वर्षभर नियमितपणें होणारे गायनाचे कार्यक्रम आणि एकंदर समारंभाच्या निमित्तानें होणारें राज्यश्रीचें प्रदर्शन या सर्वांची प्रजारंजनाच्या दृष्टीनें असलेली उपयुक्तता रोमन सम्राटाच्या अन्नदानापेक्षा, अथवा प्राणिहत्येच्या खेळापेक्षा काडीमात्र उणी नव्हती, हें सर्वांनाच मान्य करावें लागेल. पण या प्रजारंजनाच्या अवांतर दृष्टीनें अश्वमेध पुनरुद्धाराचें समर्थन करण्यापेक्षा भारताच्या एकराष्ट्रीयत्वाची ज्वलंत जाणीव जनतेच्या अंतःकरणात उत्पन्न करण्याच्या दृष्टीनें पुष्पमित्राच्या दोन अश्वमेधाचा पुनः विचार करणें अधिक उचित होईल. अश्वमेधाचा पुनरुद्धार म्हणजे वस्तुतः आर्यांचा सर्वांत प्राचीन आणि प्रमुख देव जो इंद्र, त्याच्या दिग्विजयी उपासनेचा पुनरुद्धार. या पुनरुद्धाराचा भारतीय इतिहासावर कोणता परिणाम झाला, याचें थोडें विस्तारानेंच विवेचन केलें पाहिजे.

## अश्वमेधविरोधी कालतत्व

अर्जुनाचा पणतू जनमेजय याच्या काळापासून लुप्त झालेल्या अश्वमेध–राजसूयादि यज्ञाचा पुष्पमित्रानेंच पुनरुद्धार केला, असें हरिवंशाच्या भविष्यपर्वांतील दुसऱ्या अध्यायावरून समजतें. या अध्यायात कालाच्या प्रभावाचें वर्णन करताना व्यास जनमेजयाला सांगतात कीं कालकृत नियम तुमच्या आटोक्यात राहणार नाहींत आणि क्षत्रियांना सर्वश्रेष्ठ म्हणून नेमून दिलेल्या अश्वमेध यज्ञाचा स्वतः इंद्रच विध्वंस करील. पण पुढें कोणी काश्यपद्विज सेनापति उदयाला येऊन कलियुगात पुनश्च अश्वमेध यज्ञ करील आणि त्याच्याच कुळात जन्मलेला दुसरा एक राजेंद्र राजसूय यज्ञ करील. तो क्रतु मानवाच्या श्रद्धाबलानुरूप त्यास फल देऊन युगान्तद्वारात प्रवेश करील. व्यासाच्या या निवेदनावरून ही महत्त्वाची गोष्ट कळून येते कीं युगयुगाच्या समाप्तीच्या काळात एक युग अर्थात् कलियुग संपून अन्य युगाचा म्हणजेच कृतयुगाचा प्रारंभ व्हावयाचा होता. ही परंपरा लक्षात घेतली म्हणजे

विक्रम संवताला कृतयुग हें नाव कसे प्राप्त झालें, याचें कारण कळून येतें. खि. पू. ५७ च्या सुमाराला आपल्या देशात कृतयुग चालू झाल्यानंतर 'एतद्देशप्रसूतस्य सकाशात् अग्रजन्मनः । स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्याः सर्वं मानवाः ॥' या मनुवचनाला अनुसरून रोममध्यें ऑगस्टस् सीझरनें खि. पू. १७ या वर्षापासून आपल्या साम्राज्यात सुवर्णयुग चालू झाल्याची घोषणा केली. व्यासाच्या वरील वचनावरून आणखी एक गोष्ट लक्षात येते. ती ही कीं जनमेजयाच्या काळीं कृष्ण आणि शुक्ल यजुर्वेदाच्या अनुयायांमध्यें कलह होऊन जनमेजयाला पदभ्रष्ट व्हावें लागलें. याचीच पुनरावृत्ति शुंगकाळात होऊन शेवटच्या शुंग सम्राटाच्या काण्व अमात्यानें त्याची हत्या केली कीं काय, याचा एकवार विचार व्हावयाला पाहिजे. पण या गोष्टींचा इथें नुसता निर्देश करून अश्वमेधाचा कालतत्वाशीं विरोध का येतो, या प्रश्नाची थोडी तात्त्विक चर्चा केली पाहिजे. त्यावाचून पुष्यमित्रानें केलेल्या अश्वमेधाची महती आणि या युगाला अश्वमेधपुनरुद्धाराचें युग अशी संज्ञा श्री. जयचंद्र विद्यालंकारासारख्या सुप्रसिद्ध इतिहासकारांनी का दिली, हें आजकालच्या वाचकाना कळावयाचें नाहीं.

## दिक्पालांची उपासना

अश्वमेध–राजसूयादि यज्ञ दिग्विजयावर आधारलेले असल्यानें दिक् या तत्वावर त्याचा सारा भर असतो आणि काल या तत्वाशीं त्याचा स्वाभाविकपणेंच विरोध येतो. भारतीय इतिहासातील एका असंशोधित आणि अनिश्चित युगात वेदकालीन इंद्रादि देवतांच्या उपासनेचा लोप आणि यज्ञसंस्थेचा ऱ्हास होऊन वैदिक धर्म व्यवहारांतून गेल्यासारखाच झाला. या धर्मक्रांतीचा वास्तविक अर्थ काय, याची आमच्या इतिहासकाराना यत्किंचित् तरी जाणीव असल्याचें त्यांच्या ग्रंथावरून दिसत नाहीं. ही गोष्ट खरी कीं ऐतिहासिक घटनांत कांहीं अर्थ असतात आणि त्याचा उलगडा करण्याच्या दृष्टीनें इतिहास लिहावयाचे असतात, ही कल्पनाच पुष्कळशा इतिहासकारांना पटत नाहीं. तेव्हा त्यांना असल्या घटनांचा अर्थ न समजून घेतल्याबद्दल दोष देण्यात कांहींच अर्थ नाहीं. पण त्यांच्या अनुल्लेखामुळें मानवोत्पत्तीपासूनच्या घटनांचा अर्थ सांगण्याचा प्रसंग ओढवतो, म्हणून या परिस्थितीचा उल्लेख करावा लागतो, इतकेंच. आपल्या उत्पत्तीनंतर मानव जेव्हा जगात संचार करू लागला तेव्हा आत्मसंरक्षणाच्या उपजत बुद्धीनें त्याला असें दिसून आलें कीं जगातील दाही दिशाकडून आपल्यावर संकटें ओढवू शकतात.

या संकटापासून आत्मसंरक्षण करून घेण्याकरिता आपल्या आर्य पूर्वजांनीं दिक्पालाची कल्पना केली आणि त्याची उपासना आरंभिली. ही उपासना प्रथमपासूनच आक्रमक स्वरूपाची होती म्हणजे इंद्रादि दिक्पालांनीं आपापल्या दिशांकडून आर्यांवर संकटें ओढवू देऊं नयेत, इतक्यापुरतेंच या उपासनेचें स्वरूप मर्यादित न राहता, या दिक्पालांनीं आपल्या दिशांचें आधिपत्य आर्यांना प्राप्त करून द्यावें, असें आक्रमक स्वरूप या उपासनेला प्रथमपासूनच लाभलें होतें. अश्वमेध–राजसूयादि क्षत्रियांना नेमून दिलेले वैदिक यज्ञ या व आक्रमक उपासनेचे प्रतीक होतें.

## अश्वमेधराजसूय, राष्ट्रीयत्वाचे आधार

या यज्ञांची आणि त्यांतील पशुहत्याची प्रत्यक्ष बौद्धांनीं आणि त्यांच्या अनुकरणानें प्रच्छन्न बौद्धांनीं इतकी निरर्गल निंदा केली आहे कीं दिक्पालाच्या उपासनेचें प्रतीक म्हणून त्यांचा निर्देश करताना मनाला संकोचच वाटावा. पण हे यज्ञ आर्यांच्या राष्ट्रीय जीवनात कोणती महत्त्वाची कामगिरी बजावीत होते, याची आमच्या इतिहासकारांना कांहींच कल्पना नाहीं. प्रत्येक राष्ट्राच्या नेत्यांना आपल्या राष्ट्रबांधवांची कूपमंडूकवृत्ति नष्ट करून स्वकीय संस्कृतीच्या विस्तीर्ण क्षेत्राविषयीं आत्मीयता आणि जिव्हाळा निर्माण करावा लागतो. भौगोलिक राजकारणाचे ( जिओपॉलिटिक्सचे ) पितामह फ्रीड्रिश राट्झेल यांनीं म्हटलें आहे. ' Every people has to be educated up from smaller to larger space-conceptions and the process has to be repeated again and again to prevent the people from sinking back into the old small scale conceptions. The decay of every state is the result of declining space concptions.' म्हणजे सर्व समाजांना आपली कूपमंडूकवृत्ति टाकून अधिकाधिक विशाल क्षेत्राविषयीं आपलेपणा वाटून घेण्याचें शिक्षण द्यावें लागतें, इतकेंच नव्हे तर या शिक्षणाची वारंवार आवृत्ति करावी लागते. नाहींतर योग्य मार्गदर्शनाच्या अभावीं अप्रबुद्ध समाज लौकरच आपल्या मूळच्या कूपमंडूक वृत्तींत रमू लागतो. विशालक्षेत्राविषयीं आपलेपणा न वाटतां कूपमंडूक वृत्तींत रमण्यांत समाजाला सुख वाटू लागलें, म्हणजे अपरिहार्यपणेंच त्या समाजाचा अधःपात होतो. आपल्या वैदिक धर्माभिमानी आर्य समाजाचें असल्या अधःपातापासून संरक्षण करण्याचें महत्कार्य, अश्वमेधराजसूयादि यज्ञांच्या निमित्तानें घडणाऱ्या राजकीय यात्रांनीं होणाऱ्या भावनामीलनानें सहस्रावधि वर्षेंपर्यंत केलें

आणि सरतेशेवटीं काल तत्वाला प्राधान्य देणाऱ्याच्या शिकवणीमुळे आर्यांनीं जेव्हा यज्ञाचा आणि इद्रादि दिक्पालाचा अव्हेर केला, तेव्हाच त्याचा अधःपात झाला. 'धर्मो रक्षति रक्षितः ।' या सिद्धाताच्या सत्यतेचा हा सर्वोत्कृष्ट पुरावा आहे. दिक्पालाच्या उपासनेचा लोप म्हणजे आर्यांच्या अतःकरणातील प्रभुत्वाकाक्षेचाहि लोप, आपल्या जीवनक्षेत्रातील सारें विश्व आर्य करण्याच्या आकाक्षेचाहि लोप होय.

## दिशावंदनालाहि बुद्धाचा विरोध

आर्यांच्या जीवनात दिक् या तत्वाचे महत्त्व नष्ट करून कालतत्वाला प्राधान्य देणाऱ्या प्रेषितात भारतामध्ये बुद्ध हा अत्यत राष्ट्रघातकी पुरुष होऊन गेला. बुद्धानें केवळ यज्ञयागाचाच निषेध केलेला नसून सध्यावदनातील दिशावदनाचाहि त्याने निषेध केला होता. ही वस्तुस्थिति आजपर्यंत आमच्या इतिहासज्ञाच्या ध्यानात तर आली नाहींच; आणि आता मी तिच्याकडे त्याचें लक्ष वेधले तरी तिचें महत्त्व त्याना पटेल, अशीहि मला आशा नाहीं. पण विवेचनपूर्तीच्या दृष्टीनें बुद्धानें दिशावदनालाहि विरोध केल्याचा उल्लेख करणें आवश्यक असल्यानें तें कार्य इथें उरकलें पाहिजे बौद्धाच्या दीघनिकाय या ग्रथातील सिगालसुत्तात असा प्रसग आला आहे कीं प्रभातसमयीं नदींत स्नान करून ओलेत्यानें दिशावदन करणाऱ्या सिगालाला पूर्वदिशा म्हणजे मातापिता, दक्षिण दिशा म्हणजे गुरु, पश्चिम दिशा म्हणजे पत्नी, उत्तरदिशा म्हणजे आप्तमित्र, खालची दिशा म्हणजे सेवक आणि वरची दिशा म्हणजे साधुसत हे ओळखून त्याप्रमाणें वागण्याचा बुद्धाने उपदेश केला. या सूत्रात लक्षांत घेण्याजोगी गोष्ट ही कीं दिशाच्या आणि दिक्पालाच्या उपासनेचें राष्ट्रीय स्वरूप नष्ट करून तिला कौटुबिक आणि कूपमडूकपणाचे स्वरूप देण्याचा बुद्धाने किती कुशलपणानें प्रयत्न केला आहे. बौद्ध धर्मासारखे सारे व्यक्तिप्रणीत धर्म वैयक्तिक आणि सकुचित भावनानाच उत्तेजन देतात. कारण मानव आणि विश्व याच्यामधील राष्ट्रीयत्वाची शिडी काढून टाकली कीं सामान्य मानवाला वरच्या पायरीवर जाताच येत नाहीं. त्यामुळे व्यक्तिप्रणीत धर्मातील प्रार्थनासुद्धां वैयक्तिक सुखासबधींच असतात. खिस्त्याची नित्य प्रार्थना आणि आपला गायत्री मत्र याच्यामधील प्रभेदाचा विचार केला असता व्यक्तिप्रणीत धर्म आणि सनातन धर्म, विशेषतः दिक्पालांच्या उपासनेवर आधारलेला सनातनधर्म यांच्यामधील प्रभेद कोणाच्याहि ध्यानात येईल व्यक्तिप्रणीत धर्म हे रोग, जरा, मृत्यु याच्यासारख्या वैयक्तिक सकटात व्यक्तीला धीर देण्याला उपयोगी पडत असतील पण सनातन

धर्म राष्ट्रीय संकटातून राष्ट्राला तारून त्याचें तारुण्य टिकविण्याला कारणीभूत होतात राष्ट्रावर येणारीं संकटें हीं मुख्यत दिशांच्या द्वारानीं राष्ट्राना ग्रासतात आणि व्यक्तींवर येणारीं संकटें हीं सामान्यतः कालाच्या द्वारानें त्याना ग्रासतात. यामुळें दिशाच्या देवाची उपासना ही नेहमी सामाजिक आणि सामुदायिक असते. उलटपक्षीं काल हेच ज्या दैवताचें विशिष्ट तत्त्व आहे, अशा दैवताची उपासना वैयक्तिक असते. यज्ञ ही सामुदायिक उपासना आहे, तर तप ही वैयक्तिक उपासना आहे. १९६२ च्या आरंभीं अष्टग्रहीमुळें कोणत्याहि दिशेने समाजावर अरिष्ट कोसळेल, या भावनेने ग्रासलेल्या समाजानें यज्ञाचा आणि सामुदायिक उपासनेचा कसा आश्रय केला होता, याचें स्मरण केल्यास वरील विवेचनाचा भाग सर्वांनाच सुबोध होईल. असो. यज्ञ ही सामुदायिक उपासना आहे, आणि तप ही वैयक्तिक उपासना आहे. तप करणाऱ्यानीं आपली असामाजिक, किंबहुना समाजविघातक उपासना सोडावी, असाच प्रयत्न इंद्र नेहमी करीत असल्याचे उल्लेख इतिहास-पुराणातून आढळतात. कारण असल्या उपासनानीं इंद्राला जितपत धोका होता, त्यापेक्षा अनेकपटींनीं अधिक धोका इंद्रोपासकाच्या समाजाला होता. तपाची आणि संन्यासाची समाजविघातक उपासना सर्व वर्गांना आणि वर्णांना, जीवनाचा परिचय न झालेल्या बालकाना आणि जीवनाचें दायित्व शिरावर घेतलेल्या तरुणाना उपदेशण्याचें पाप क्षणिकवादी म्हणजे वर्तमानकालाचें अस्तित्व नाकारून अव्यक्त काल तत्वाचें महत्त्व वाढविणाऱ्या बुद्धानेंच केलें. बुद्धाच्या पूर्वीं क्षत्रिय जे असत, ते क्षतापासून समाजाचें परित्राण करण्याकरिता सतत आणि सर्वत्र संचार करीत युरोपातसुद्धा शिव्हल्रीच्या काळात अनाथपरित्राणाचें व्रत घेतलेले क्षत्रिय सर्वत्र संचार करीत असत. अशा संचाराच्या युगात मानवाच्या पुढें मुख्यत. कुठें हा एकच प्रश्न उपस्थित होतो. उदाहरणार्थ, रावणानें सीतेला कुठें नेली, स्यमंतक मणि कुठें आहे, देवकीचा आठवा मुलगा कुठें आहे, किंवा अगदीं नेहमीचा प्रश्न म्हणजे अश्वमेधाचा घोडा कुठें आहे? या संचाराच्या युगात नाहीं म्हणावयाला इंद्रपुत्र अर्जुनानेंच एकवार तप केल्याचा उल्लेख आढळतो. पण अर्जुनाचें हें तप, नेहमीच्या हेतूनें केलें नसल्यानें आणि सशस्त्र तप असल्यानें अगदीं अपवादात्मक होतें. याकरिता स्वतः अर्जुनानेंच किरातार्जुनीयात म्हटलें आहे. ‘न सुख प्रार्थये नार्थम् उदन्वत्वीचिचंचलम् । नानित्यताशनेः त्रस्यन् विविक्त ब्रह्मणः पदम् ॥’ सुख, धन किंवा ब्रह्मपद याचा अभिलाष न करता केवळ आपलें सामाजिक कर्तव्य पार पाडण्याच्या हेतूनें तेव्हा पार्थ तपाला बसला होता. सामाजिक कर्तव्यें चुकविण्याच्या हेतूनें नव्हे.

दिक् तत्त्वाच्या उपासनेनें आपल्या संस्कृतीचा विस्तार करण्याच्या काळात वैयक्तिक सुखदुःखाच्या प्रश्नांना कधींच प्राधान्य मिळत नाहीं त्या काळांत धर्माधर्मांच्या प्रश्नावर सर्व श्रेष्ठ व्यक्तींचीं मनें केंद्रित झालेलीं असतात. अधर्माचें प्राबल्य कुठें आहे आणि त्याचा उच्छेद कसा करावयाचा हा एकच प्रश्न तेव्हां सर्वांच्या मनात घोळत असतो अधर्माच्या उच्छेदाचें उद्दिष्ट साध्य करण्याकरितां स्वाभाविकपणेंच सचार करावा लागतो धर्माच्या कल्पनेनें मनें भारून गेलीं म्हणजे जीवनात सचाराचें कसें प्राधान्य होतें, हें खिस्ती लोकांनीं मुसलमानांविरुद्ध केलेल्या धर्मयुद्धाच्या इतिहासावरुन सहज कळून येण्याजोगे आहे. याच्या उलट वैयक्तिक सुखदुःखाच्या सुधारकी प्रश्नांना लोकांच्या मनात अवास्तव महत्त्व प्राप्त झालें असलें म्हणजे आपल्याला सुख कधीं प्राप्त होईल, हा प्रश्न उपस्थित होतो आणि त्यामुळें लोक कालतत्त्वाच्या देवताच्या आराधनेला लागतात. सुख हें दैवाधीन असतें, हें सर्वांनाच सुविदित आहे ' सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता परो ददातीति कुबुद्धिरेषा । अहं करोमीति वृथाभिमानः स्वकर्मसूत्रग्रथितो हि लोकः ।। ' हें सत्य असल्यास मानवानीं सुखासाठीं धडपडण्याचें तरी कारण काय ? सुखवादी लोकांचें सचारक्षेत्र कसें सकुचित होत जातें, हें वराहमिहिराचार्यांनीं सांगितलेंच आहे. ' जयं धरित्र्याः पुरमेव सारं पुरे गृहं सद्मनि चैकदेशः । तत्रापि शय्या शयने वरा स्त्री रत्नोज्वला राज्यसुखस्य सारम् ।। ' भर्तृहरि राजानेंहि ' किं सुखम् अप्रवासगमनम् ' असाच सिद्धान्त सांगितला आहे सुखवादी लोकांची ही प्रवृत्ति पाहिली म्हणजेच ' कलिः शयानो भवति कृतः सपद्यते चरन् ।। ' या ऐतरेयातील वचनाचें खरें महत्त्व कळून येतें.

## कालतत्त्वाचा इंद्रविरोध

' चरैवेति ' ' चरैवेति ' असें सांगणाऱ्या दिक्पाल इंद्राच्या उपासनेला ज्यानीं, ज्यानीं विरोध केला, त्यानीं, त्यानीं तो कालतत्त्वानें प्रभावित होऊनच केला, याविषयीं शंका नाहीं. गोवर्धनोद्धाराच्या प्रसगीं कृष्णानें इंद्रपूजेला केलेला विरोध त्याच तत्वानें प्रेरित होऊन केला होता, हें भागवतातील ' कालात्मना भगवता शक्रदर्पं जिघांसता ' या वचनावरून स्पष्टच आहे. महाकालाची उपासना तर बोलून चालून कालतत्त्वावरच प्रतिष्ठित झाली आहे स्वतः बुद्ध हा दिक् तत्वाचा विरोधक आणि क्षणिकवादाचा म्हणजे कालतत्वाचाच पुरस्कर्ता होता, हे वर दाखविलेंच आहे. हिंदुस्थानात जेव्हा कालतत्वाचें माहात्म्य वाढत होते, तेव्हा इराणातहि झर्वन् ( शर्वन् ) या कालदेवतेचा प्रादुर्भाव झाला होता, असें इराणच्या

इतिहासावरून समजतें. हिंदुस्थान आणि इराण या दोनहि देशांतून एकाच वेळीं कालतत्वाला प्राधान्य का आलें, हें आता सागतां येत नाहीं. या काळांत भारतीय आर्यांचें सचार करण्याचें धैर्य खचत चाललें होतें, असें दर्शविणारा एक पुरावा उपलब्ध आहे; त्याचा आतां थोडा विचार करू.

## यौगंधरायणाची दिशानिंदा

उदयन राजा दिग्विजयाला जाण्याचा विचार करीत असतांना यौगंधरायणानें त्याला केलेला उपदेश कथासरित्सागरानें पुढील शब्दात ग्रथित केला आहे.

'एतत् श्रुत्वा जगादेन पुनर्यौगंधरायणः। स्फीतापि राजन् कौबेरी म्लेच्छससर्गगर्हिता ॥
अर्काद्यस्तमये हेतुः पश्चिमापि न पूज्यते। आसन्नराक्षसा दुष्टा दक्षिणाप्यतकाश्रना ॥
प्राच्यामुदेति सूर्यस्तु प्राचीमिंद्रोऽधितिष्ठति। जाह्नवी याति च प्राचीं तेन प्राची प्रशस्यते ॥'

उत्तरेला म्लेच्छ फार म्हणून ती वर्ज्य, दक्षिणेला राक्षस असल्यानें ती वर्ज्य, पश्चिमेला सूर्यास्त होतो म्हणून ती वर्ज्य. या साऱ्या दिशादूषणाचा एकच अर्थ होऊ शकतो. तो हा कीं ज्या काळीं उत्तरप्रभृति दिशाविषयीं आर्यांच्या मनात अनासक्ति उत्पन्न झाली, त्यावेळीं त्या साऱ्या दिशाकडून आर्यांवर सकटें येत असलीं पाहिजेत. विशेषतः 'अस्माक वीरा उत्तरे भवन्तु' अशी प्रार्थना इद्रध्वजारोपणानतर करावयाची असताना उत्तरेला म्लेच्छससर्गगर्हिता म्हणण्याची बुद्धि होणें हें फारच वाईट लक्षण आहे. कारण पाणिनीच्या काळीं गाधारकंबोजादि प्रदेश औदीच्य भारतांत समाविष्ट होते, इतकेंच नव्हे तर त्या प्रदेशातील सस्कृत हें काहीं अपवाद वगळलें असतां शिष्ट सस्कृत मानलें जात असे. त्या काळीं भारताचे औदीच्य आणि प्राच्य असे दोनच भाग मानले जात असून तेव्हा कुरुक्षेत्राच्या उत्तरेपासून औदीच्य भारताचा प्रारभ होत होता आणि पूर्वेपासून प्राच्य भारताचा प्रारभ होत होता. पण अश्वमेध यज्ञ लुप्त झाल्यापासून पतंजलिपुष्पमित्रानीं त्याचें पुनरुज्जीवन करीपर्यंतच्या काळात सारा औदीच्य भारत सस्कृत भाषा बोलणाऱ्या भारतीय आर्यांच्या हातून गेला होता, इतकेंच नव्हे तर म्लेच्छ, मोंगल वशात उत्पन्न झालेल्या बौद्ध धर्माच्या प्रभावामुळें प्राच्य भारताचा भागहि भारतीय सस्कृतीला मुकण्याच्या मार्गावर होता, हें पतजलीनें दिलेल्या शिष्ट सस्कृत भाषेच्या जीवनक्षेत्रावरून सहज कळून येण्याजोगें आहे. अशा अवघड परिस्थितींत पतंजलिपुष्पमित्रानीं संस्कृत भाषेचें, वैदिक धर्माचें आणि यज्ञसंस्थेचें पुनरुज्जीवन घडवून आणलें यावेळीं झालेल्या

...७

यज्ञसंस्थेच्या पुनरुज्जीवनामुळें इंद्र आणि इंद्रध्वज यांची आक्रमक परंपरा निदान वराहमिहिरोत्तर काळापर्यंत तरी टिकून राहिली. त्यानंतर तिचा क्रमशः लोप झाला तरी कंबोजगांधारादि औदीच्य भारताचे भाग सबक्तगिनाच्या काळापर्यंत तरी भारताच्याच हातीं राहिले.

## कपब्राह्मणसंवाद

पुष्यमित्राच्या प्रभावानें शुंगोत्तर काळातील ब्राह्मणांची राष्ट्रनिष्ठा किती प्रखर बनली होती, याचें एक अकल्पित उदाहरण अनुशासनपर्वांतील वायु आणि सहस्रार्जुन यांच्या संवादांत अंतर्भूत असलेल्या कपब्राह्मणसंवादावरून माझ्या निदर्शनाला आलें आहे. या संवादांत कपनामक असुरांनीं स्वर्ग अर्थात् चित्ररथ=चित्रळ, कामदेश=काफिरिस्थान आणि काश्मीर हा प्रदेश जिंकल्यानंतर त्यांचीं आणि ब्राह्मणांचीं जीं बोलणीं झालीं, त्यांचा सारांश दिला आहे. ब्राह्मणांनीं कपासुरांच्या नाशार्थ कर्मानुष्ठान आरंभिलें, तेव्हा कपांनीं ब्राह्मणांकडे दूत पाठवून त्यांच्याशीं बोलणीं आरंभिलीं कीं तुमचा धर्म आणि संस्कृति यांचा संपूर्ण स्वीकार आम्हीं पूर्वीच केला आहे; मग तुम्हीं आम्हाला विरोध कां करतां ? तेव्हा ब्राह्मणांनीं त्यांना उत्तर दिलें कीं तुम्हीं जिंकलेल्या प्रांतांतील जनतेनें आमचें साहाय्य मागितलें आहे, तेव्हा तुमचा धर्म किंवा संस्कृति यांचा विचार न करतां आम्हीं त्या प्रांतांतून तुमचें उच्चाटन करणार. म्हणजे आमचा धर्म स्वीकारलात तरी आमच्या देशावर राज्य करण्याचा अधिकार आम्ही तुम्हाला समर्पण करणार नाहीं. इथें ब्राह्मणांची समजूत करण्याचा प्रयत्न करणारे कप हे कुजुल खडफिस आणि वेम खडफिस हे राजे असून ते शिवोपासक होते, ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. असल्या परदेशी शिवोपासकांपासून आपल्या वैशिष्ट्याचें संरक्षण करण्याकरिता पतंजलि-पुष्यमित्रांच्या परंपरेंतील ब्राह्मणांनीं स्कंदालाच ब्रह्मण्यदेव या नावानें आपलें दैवत बनविलें आणि या ब्रह्मण्यदेवाच्या नावानेंच त्यांनीं शकपारदकुषाणप्रभृति परकीय राज्यकर्त्यांशीं अखंड संग्राम करून अंतीं त्यांचा उच्छेद केला. या प्रभावाची अधिक चर्चा कुमारसंभवावरील प्रकरणांत केली असल्यानें इथें केवळ दिग्दर्शनापुरताच तिचा संदर्भ दिला आहे. शुंगोत्तर काळांत पुष्यमित्राला ब्रह्मण्यदेवाशीं सायुज्यमुक्ति प्राप्त झाल्यानंतर त्यानें विदेशांतील शिवभक्तांना भारताच्या सीमेंत शिरण्याला विरोध केला आणि या विरोधाला न जुमानतां जे आंत शिरून राज्यें करूं लागले, त्यांच्याशीं शतकानुशतकें अविरत संग्राम चालवून त्यांचा उच्छेद केला. अशा

प्रकारें या शिवपुत्रानें विदेशी शिवभक्ताशीं विरोध आरंभिला, तेव्हां स्वदेशातील शिवभक्ताची भूमिका कोणती होती, याचा विचार करावयाला हवा. पण हा प्रश्न आयत्या वेळीं सुचला असल्यानें त्याचा नुसता निर्देश करून ठेविला आहे. पुष्पमित्रप्रभावित स्कंदोपासकाच्या उलट बुद्धाचे उपासक आपल्या देवाला जे वंदन करतील आणि आपल्याला जे राजाश्रय देतील, त्याचें स्वागत करावयाला सर्वदा सिद्ध असत, असें इतिहास सांगतो.

## ग्रीक राजेच तारकासुर

या ठिकाणीं, भारतावर आक्रमण करणाऱ्या ग्रीक राजांना आपल्या पौराणिकांनीं तारकासुर ही संज्ञा का दिली आणि पुष्पमित्र तारकांतक कसा बनला, याचा थोडा विस्तारानें विचार केला पाहिजे. भारतावर आक्रमण करणारे आपोलोदोतुस् आणि मेनाद्र हे ग्रीक राजे स्वतःला सोतेर म्हणजे त्राते अर्थात् तारक म्हणवून घेत असत. या पदवीसंबधीं विवेचन करतांना प्रो. टॉर्न यानीं म्हटलें आहे. 'Apollodotus and Menander, the former exclusively, the latter down to his last issue, called themselves Soter' the savior. The title still had its full value in the Hellenic world; it had only been used twice before in history Ptolemy I had been 'soter' because he had helped to save Rhodes from Demetrius the besieger, and Antiochus because he had saved Asia-Minor from barbarians; in the same way Apollodotus and Menander were soters because they professed to come to Indians as 'Saviors' to save them from Psuhpamitra. It was entirely a political matter, but it happened that the people to be saved, were in fact usually Buddhists, and the common enmity of Greek and Buddhist to Shung king threw them into each other's arms.' म्हणजे आपोलोदोतुस् आणि मेनाद्र हे दोघेहि आपल्या नाण्यावर सोतेर अर्थात् तारक ही पदवी लावितात. यापैकीं पहिल्या राजानें ती एकच पदवी आमरण वापरली असून मेनाद्रनें अगदीं अंतिम नाण्यांपर्यंत तीच पदवी आपल्या नाण्यावर अंकित केली होती. या उभयतांच्या पूर्वीं टॉलेमी आणि अंतिओकुस् हीं नावें धारण करणाऱ्या पहिल्या

राजानीं मात्र अनुक्रमें ऱ्होडस् आणि आशिया मायनर येथील प्रजेला प्राणांतिक संकटांतून तारल्यानंतर ती पदवी स्वतःला लाविली होती. तेव्हां पुष्पमित्राच्या काळीं ती पदवी अर्वाचीन संस्थानिकांच्या बिरुदावलीइतकी निरर्थक बनली नव्हती, हें सागायला नकोच. आपोलोदोतुस् आणि मेनाद्र हे भारतीय बौद्धांचे तारक म्हणून त्यांचें पुष्पमित्रापासून परित्राण करण्याकरिता स्वाऱ्या करीत होते. या स्वाऱ्या केवळ राजकीय हेतूनीं चालल्या असल्या तरी राष्ट्रद्रोही बौद्ध हे शुगाच्या राजवटीपासून परित्राण करून घेण्याकरिता पर्याकुल झाले असल्यानें समानशत्रुत्वाच्या भूमिकेवरून ग्रीकाना आलिंगनें देऊं लागले बौद्धाच्या दिव्यावदान या पुराणाताल आख्यायिकेवरूनहि बौद्धानीं ग्रीकाशीं सगनमत केल्याची माहिती उपलब्ध होते. शाकल नगरापासून वायव्येकडे चाल करून पुष्पमित्र कोष्ठक देशाच्या सीमेवर येऊन पोंचला. तेव्हा त्या देशात दंष्ट्रानिवासी यक्ष राज्य करीत असून त्यानें बौद्धधर्माची दीक्षा घेतली होती. या आख्यानाची कै प्रबोधचद्र बागची यानीं १९४६ मध्यें इडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली या सुप्रसिद्ध त्रैमासिकात सविस्तर चर्चा करून कोष्ठक देश म्हणजे स्वात नदीचें खोरें आणि तेथील दृष्ट्रा-निवासी यक्ष म्हणजे बौद्धाना पवित्र असलेल्या त्या नदीच्या खोऱ्यातील दतपर्व-ताच्या परिसरात राज्य करणारा ग्रीक राजा मेनाद्र असल्याचें निर्विवाद पुराव्यानें सिद्ध केलें होतें. याच दंतपर्वताचा आणि त्याच्यावरील दतस्तूपाचा पद्मपुराणातील तारकासुराच्या आख्यानातहि कुत्सितपणानें उल्लेख केलेला आढळतो. त्या उल्लेखा-वरून त्या पुराणातील तारकासुरआख्यान दतपर्वताच्या परिसरात राज्य करणाऱ्या ग्रीकाना अनुलक्षून लिहिलें असल्याचेंहि स्पष्ट होतें.

## कृत्वा भगांतरे दन्तम्

तारकासुराचा वध करण्याला समर्थ असा पुत्र निर्माण करण्याचा संकल्प करून शंकरानें उमेशीं विवाह कला असला तरी आपली कार्यसिद्धि होईपर्यंत जिभेला लगाम लाविण्याचें अवधान स्वतः उमापतीलाहि राहिलें नाहीं आणि एके दिवशीं उमेची चेष्टा करिताना त्यानें तिच्या काळेपणाचा मर्मभेदक रीतीनें उल्लेख केला. त्याक्षणीं गौर तनु प्राप्त करून घेण्याकरितां उमा शकराला टाकून तपश्चर्या करण्याकरितां निघून गेली. स्वात नदीच्या खोऱ्यातील गौरी नदीला अनुलक्षून पुराणकारानीं ही कल्पना केली आहे. अशा प्रकारें उमा तपश्चर्येला निघून गेल्यानतर बक दैत्याच्या भावानें उमेचें रूप धारण करून शंकराला मोहित करून मारण्याचा विचार केला.

या कथेतील बक हा ग्रीकाचा बॅकुस् देव असून त्याचे उपासक पुष्कळदां स्त्रीरूप धारण करीत. पद्मपुराणकार म्हणतात, ' उमारूपी रमयितु गिरीश मूढचेतनः । कृत्वा मायामय रूप अप्रतर्क्यं मनोहरम् ।। सर्वैरवयवैःपूर्णं सर्वाभिज्ञानबृंहितम् । कृत्वा भगांतरे दन्त दैत्यो वज्रमयोदृढम् ।। तीक्ष्णाग्र बुद्धिमोहेन गिरीश हन्तुम् उद्यतः ।। ' ( प. पु सृष्टिखड अ. ४१ श्लोक ५९ ते ६१ ) आपल्या गुह्येंद्रियात वज्रमय दंत लपवून बक दैत्याचा बधु उमारूपानें शकराकडे गेला; या आख्यानातील वज्रमय दंत हा स्वात नदीच्या खोऱ्यातील दतस्तूपयुक्त दतपर्वत असला पाहिजे, हें तत्कालीन इतिहासभूगोलाचा परिचय करून घेतल्यास सहज समजू शकेल. ग्राम्य मराठींत म्हणतात त्याप्रमाणें हें दतपर्वतयुक्त स्वात नदीचें खोरें ढुगणाखालीं घालून ग्रीक बॅकुस् देवाचे अनुयायी शकराच्या भक्ताना जिंकण्याकरिता पुढें चाल करून गेले. तारकासुराच्या मृत्यूनतर म्हणजे मेनाद्रच्या मृत्यूनतर ग्रीक राज्याचीं तीन शकलें झालीं. त्याना अनुलक्षून पौराणिक कवींनीं कथा रचिली कीं तारकासुराच्या मृत्यूनंतर त्याच्या तीन पुत्रानीं तीन नगरात राहून देवाना उपद्रव देण्याला प्रारंभ केला. तेव्हा शकरानें त्रिपुराचें दहन करून देवाना अभय दिलें. या त्रिपुरदहनाची लिंगपुराणातील कथा, ही शैवानीं बौद्धाचेंच उच्चाटन केल्याची कथा असल्याचें श्री. नदलाल दे यानीं दाखवून दिलें आहे. ' The story of the destruction of Tripura is an allegorical description of the expulsion of the Buddhists by the Shaivas ' ( लिंगपुराणखड, अध्याय ७१ ) तेव्हां अन्यत्र उपलब्ध होणाऱ्या माहितीच्या आधारानें पुराणांतील एखादें रूपक उकलतां आलें तर त्या रूपकांतील माहितीचा अधिक पूर्ण इतिहास लिहिण्यासाठीं उपयोग करण्यास प्रत्यवाय नसावा. शुगकाळीं सीमेवरील प्रातातून बौद्ध आणि शैव याची स्पर्धा तीव्रतर झाली होती आणि या स्पर्धेत बौद्धानीं ग्रीकांचें साहाय्य सपादिलें होतें, या गोष्टी निर्विवाद आहेत. तत्कालीन बौद्धाच्या आणि आज मेनाद्रचा इतिहास लिहिणाऱ्या प्रो. टार्न याच्या मताप्रमाणें अशोकाचा खरा वारस मेनाद्रच होता. कारण अशोकाचा आजा चद्रगुप्त यानें सेलेउकुस्च्या कन्येशीं विवाह केला होता आणि त्याच्याच एका वशजाच्या कन्येशीं मेनांद्रचा विवाह झाला होता. या बादरायण सबधाच्या जोरावर मेनाद्र स्वतःला सोतेर अर्थात् तारक म्हणवीत असे आणि चक्रवर्तीचीं चिन्हेंहि धारण करीत असे. मेनाद्रच्या या प्रचारामुळें सेनापति या साध्या पदवीवर सतुष्ट असलेल्या पुष्पमित्राला दुसरा अश्वमेध करून भारताचा खरा चक्रवर्ती कोण हें निःसदिग्धपणें जनतेच्या निदर्शनास आणावें लागलें. या

अश्वमेधाला अनुलक्षूनच धारिणी राणीनें म्हटलें आहे. 'अतिघोरे खलु पुत्रकः सेनापतिना नियुक्तः।' वसुमित्राच्या या पराक्रमानें अत्यंत संतुष्ट होऊन वृद्ध सेनापतीनें म्हटलें आहे. 'सोऽहमिदानीं अशुंमता सगरपौत्रेणेवप्रत्याहृताश्वो यक्ष्ये।' या वचनांत पुष्यमित्रानें पर्यायानें अग्निमित्राला असमंजसाची आणि आपल्या नातवाला उघडपणें अंशुमानाची उपमा देऊन पुत्राविषयींचा तिरस्कार आणि पौत्राविषयींचें प्रेम व्यक्त केलें आहे.

## तारकासुर धार्मिक बनला

या अश्वमेधाच्या निमित्तानें वसुमित्राचें अश्वदल आणि मिनाडरचें अश्वदल यांचा जो तुमुल संग्राम झाला, तो सिंधु नदीच्या उत्तरेकडील प्रदेशात बहुधा स्वात प्रातात झाला असावा. हा संग्राम माळव्यांतील कालीसिंधु नदीसंनिध झाला असावा, असा अभिप्राय पुष्पमित्राला लघुत्व देऊ इच्छिणाऱ्या व्हिन्सेंट स्मिथ-प्रभृति पाश्चात्य इतिहासकारानीं आणि त्याच्या भारतीय अनुयायानीं व्यक्त केला आहे. जणू काहीं माळव्यांत आपल्या पुत्रानें चिरस्मरणीय विजय मिळविल्याची वार्ता विदिशेंतील अग्निमित्राला पाटलीपुत्राहून पुष्यमित्रानें कळवावी लागते. असो. या युद्धात वसुमित्राच्या हातून व्यवस्थित मार खाऊन मिनाडरनें पुष्पमित्राला अश्वमेध साजरा करण्याकरिता भरपूर खडणी अर्पण केली आणि आपल्या सोतेर अथवा त्राता या पदवीचा त्याग करून दिकाइओस् म्हणजे धार्मिक ही नवीन पदवी त्यानें धारण केली. आपल्या इतिहासाच्या २६२ पानावर प्रो. टार्न लिहितात 'Menander's regular title on his coins is Soter; the coins with Dikaios are very rare, and the elderly portrait on the silver issue shows that he only adopted this title towards the very end of his reign' म्हणजे मिनाडरची त्याच्या नाण्यावरची नेहमीची पदवी सोतेर ही होती. दिकाइओस् अथवा धार्मिक ही पदवी असलेलीं नाणीं अगदीं दुर्मिळ असून त्या चांदीच्या नाण्यावरील वृद्धापकाळच्या मुखवट्यावरून ती पदवी त्यानें अगदीं अंतिम दिवसात स्वीकारलेली दिसते. मिनाडरनें आपल्या आयुष्याच्या अंतीं सोतेर अथवा त्राता ही पदवी टाकून दिकाइओस् अथवा धार्मिक ही पदवी का धारण केली, हें कोडें पाश्चात्य विद्वानांना उलगडलें नसल्यामुळें प्रो टार्न हे आश्चर्यचकित होऊन लिहितात. 'That Menander at the end of his life should have adopted a new title on a few pieces

is so strange that one is tempted to suppose that the Dikaios coins belonged to another Menander, the missing son of his son Strato I. But the elderly portrait is against this.' "आपल्या आयुष्याच्या अंतिम दिवसांत मिनांडरनें आपली नहमीची पदवीं टाकून नवी पदवी धारण करावी, ही गोष्ट इतकी चमत्कारिक आहे कीं दिकाइओस् अथवा धार्मिक या छापाचीं नाणीं मिनांडरच्या अविदितनामधेय अशा नातवाचीं असावींत, असाहि अनेकानीं तर्क केला आहे. पण त्या नाण्यांवरील वयोवृद्ध मुखपट्यावरून तो तर्क निराधार ठरतो." दिकाइओस् या ग्रीक शब्दाला प्रतिशब्द म्हणून खरोष्टी लिपींत धार्मिक हा शब्द कोरला असल्यानें मिनांडरनें तेव्हा बौद्ध धर्माचा स्वीकार केला असावा, असाहि अभिप्राय कांहीं जणानीं व्यक्त केला आहे. या अभिप्रायात तथ्यांश असल्यास बुद्धानें त्याला पराजयांतच समाधान मानावयाला शिकविलें असेल. असो. अशा प्रकारें पुष्यमित्र आणि वसुमित्र या सेनानींनीं आपल्या समकालीन तारकासुराचा अंत घडवून आणला असल्यानें स्कंदानें तारकवध केल्याचें आख्यान शुगयुगात अत्यंत लोकप्रिय झालें होतें. शुगांनीं मौर्यांच्या मयूरसिंहासनावर बसून मिनांडरचा पराजय केल्यामुळेंच तेव्हा मयूर हें स्कंदाचें वाहन ठरलें. याच घटनेला अनुलक्षून कालिदासानें 'मयूरपृष्ठाश्रयिणा गुहेन' असें कार्तिकेयाचें वर्णन केलें आहे. या वर्णनाला अनुसरून कार्तिकस्वामीच्या मूर्ति गुप्तकालांत घडविल्या जाऊं लागल्या. डॉ वासुदेवशरण आगरवाल समजतात, त्याप्रमाणें गुप्तकालातील त्या मूर्ति पाहून कालिदासानें आपलें वर्णन केलेलें नसून कालिदास कदाचित् त्या संकेताचा जनकहि असेल. महाभारतात स्कंदाचें वाहन कुक्कुट होतें.

## पुष्पमित्राचें परराष्ट्रीय राजकारण

या वेळीं मयूरपृष्ठावर आरूढ झालेल्या गुहानें म्हणजेच मौर्य साम्राज्याचा सर्वाधिकारी बनलेल्या पुष्पमित्रानें सम्राट् पदवीचा अंगीकार का केला नाहीं, याचा पुनर्विचार केला पाहिजे. प्रस्तुत लेखकाच्या डोळ्यादेखत स्पेनचे सर्वाधिकारी बनलेले सेनापति फ्रांको याचें उदाहरण पुढें ठेवलें म्हणजे पुष्पमित्राच्या चरित्रांतील या कोड्याचा उलगडा होऊं शकेल. सेनापति फ्रांको हे जशी आज नाहीं उद्या स्वदेशात राजसत्ता प्रस्थापित होण्याची आशा राजघराण्याच्या भक्तांना दाखवीत असतात, तशीच आशा मौर्य घराण्याच्या भक्तांच्या मनात उत्पन्न करण्या-

करितां पुष्पमित्रानें सेनापति या पदवीहून अधिक श्रेष्ठ पदवीचा स्वीकार केला नसेल. सेनापति ज्यूलियस् सीझर हा अधिक श्रेष्ठ पदाची अपेक्षा करीत असल्याची कल्पना असह्य होऊन रोममध्यें राज्यसभेच्या सभासदांनीं भरसभेंत त्याची हत्या केली, हें उदाहरणहि या प्रसगीं मनात येतें. हें अतर्गत राजकारण झालें. या प्रश्नाचा परराष्ट्रीय राजकारणाच्या दृष्टीनेंहि विचार केला पाहिजे. चद्रगुप्ताच्या काळापासून मौर्य साम्राज्याच्या पश्चिम सीमेवर यवनाचे राज्य होतें आणि या राज्यांतील राजघराण्याशीं मौर्यांची सोयरीकहि झाली होती. या सोयरिकीची उपयुक्तता सेलेउकुस् निकेटरच्या वंशजाना पूर्णपणें पटली होती. कारण तेव्हां रणांगणावर हस्तिदल हें सर्वांत प्रभावी शस्त्र होतें. आणि तत्कालीन कोणत्याहि राष्ट्राजवळ मौर्य सम्राटाच्या हस्तिदलाच्या एक दशांशहि हस्तिदल नव्हतें. इतकेंच नव्हें तर तेव्हा माहुताचा पुरवठा भारतावाचून अन्य कोणत्याहि राष्ट्रांतून होऊ शकत नव्हता. उलटपक्षीं चाणक्यनीतिला अनुसरून आपल्या श्वशुराना हस्तिदल पुरवून चंद्रगुप्ताला भारताच्या सरक्षक कवचाची सीमारेषा सीरियासारख्या सुदूर प्राता-पर्यंत लावविता येत होती. याकरिताच सेलेउकुस्चा पराजय करून त्याचे तीन प्रात जिंकून घेतल्यानंतरसुद्धा चद्रगुप्तानें आपल्या सासऱ्याला त्याच्या पश्चिमेकडील शत्रूशीं लढण्याकरिता ५०० हत्ती भेट म्हणून दिले. या हस्तिदलाच्या प्रभावानेंच सेलेउकुस्नें खि. पू. ३०१ या वर्षी मॅसिडोनियाच्या राजाचा सपशेल पराभव केला. चद्रगुप्तानतर बिंदुसारानेंहि आपल्या मातुल कुलातील राजाना भारताच्या संरक्षण सीमेचें रक्षण करण्याकरिता गजसेनेचें साहाय्य दिल्याचे उल्लेख आढळतात. अशोक वर सर्व प्रकारें यवनांची आराधना करीतच होता. त्याच्या मागून खि. पू. २०८ च्या सुमाराला मौर्यांच्या मैत्रीकरितां आणि साहाय्याकरिता तृषित झालेल्या सिरियाच्या अंतिओकुस्नें सुभगसेन नामक भारताधिपाकडून १५० हत्ती मिळवून पश्चिमेकडील शत्रूशीं युद्ध करण्याकरितां प्रयाण केलें. सुभगसेन ही एखाद्या मौर्य सम्राटाची पदवी होती कां वायव्यसीमेवरील तो कोणी स्थानिक राजा होता, हें निश्चितपणें सागता येत नाहीं. मौर्य घराण्याशीं असलेल्या परंपरागत मैत्रीला नवजीवन मिळवून देण्याकरितां आंतिओकुस् भारताकडे आल्याचा पोलिबियस् या रोमन इतिहासकारानें उल्लेख केला असल्यानें तो मौर्य सम्राट् असू शकेल, असें अनेक पाश्चात्य इतिहासकार म्हणतात. भारतीय हत्ती मिळवून आंतिओक राज-धानीकडे गेल्यानंतर अंतिओकुसनें रोमच्या राज्यकर्त्यांशीं वैर आरंभिलें. तेव्हां भारतसीमेवरील त्याच्या सत्रपानें (देमेत्रिउस्नें) स्वातत्र्य पुकारून भारतावर

स्वारी केली. अशा प्रकारें बाल्हीक प्रातांतील यवनांनीं शकांशीं सगनमत करून भारतावर आक्रमण आरंभिलें असता मौर्य घराण्याचें सेलेउकूस्च्या घराण्याशीं असलेले नात्याचे आणि पुरातन मैत्रीचे संबध लक्षात घेऊन पाटलीपुत्रातील राष्ट्र-सूत्रधार पुष्पमित्रानें अंतिओकुस्कडे दूत पाठवून देमेत्रिउस्च्या पिछाडीवर स्वारी करण्याची त्याला विनति केली होती, असें गृहीत धरल्यास तो स्वतः जन्मभर सेनापतिच कां राहिला आणि तिसऱ्या अंतिओकुस्च्या मृत्यूनतर चौथ्या अतिओकुस्नें भारतसम्राट् होऊ पाहणाऱ्या आपल्या सत्रावर खि पू. १६७ च्या सुमाराला स्वारी कां केली, याचा सरळ उलगडा होऊ शकेल. सेलेउकुस्च्या राज-घराण्याला स्वतःला हत्तींचा पुरवठा होण्याचा मार्ग स्वतःच्या सत्तेखालीं ठेवणें इष्ट होतें आणि मौर्य साम्राज्याची अनाक्रमणाची आणि मैत्रीची परपरा टिकून राहणें आवश्यक होतें. तें आश्वासन, पुष्पमित्र सेनापतिच राहून गेल्यानें त्यांना मिळालें असावें. अशा परिस्थितींत पाटलीपुत्र आणि अतिओक या राजधान्यातील राज-नैतिक दळणवळण यथापूर्व चालू राहिलें असल्यास नवल नाहीं. चौथ्या अंति-ओकुसनें इजिप्तच्या राजाना जिंकल्यानतर अतिओक राजधानीचें उपनगर दाफ्ने, येथें जो अभूतपूर्व विजयोत्सव झाला, त्या उत्सवाला पाटलीपुत्राचे प्रतिनिधि गेले असतीलच. त्याच्या उलट पुष्पमित्राच्या दोन अश्वमेधांना आतिओक नगरीचे प्रतिनिधि आले असतील.

## दाफ्ने येथील विजयोत्सव

यावेळीं आतिओक राजधानीचें शाखानगर जें दाफ्ने, त्या नगरांत झालेलौ विजयोत्सव इतका वैभवपूर्ण होता कीं त्याचीं वर्णनें वाचलीं तर तीं नुसतीं अति-शयोक्तिपूर्णच नव्हे तर शुद्ध काल्पनिक वाटतात. तथापि प्रो. हिट्टी याच्या सीरि-याच्या इतिहासातून तें वर्णन मी उतरून घेत आहे. ' At the celebration of the Daphne games we are told that Dionysius, a friend of Antiochus Epiphanes, had 1000 slaves marching in the procession carrying silver vessels none of which weighed less than a thousand drachmae. Then came six hundred royal pages bearing vessels of gold, and 200 women who sprinkled scented oil from gold pitchery. Close upon these in the procession came 80 women in litters of gold supports and 500 women in

litters with silver supports. Epiphanes himself wishing to outdo the Roman triumphs celebrated the Daphne games by a display ot gold and silver ware that was nothing less than fabulous. In the parade marched three thousand cilicians wearing gold crowns, 10000 Macedonians with gold shields, 5000 with bronze shields and 5000 with silver shields; the majority of 3000 citizen soldiers wore gold cheekcoverings of silver.' अशा अफाट प्रमाणावर झालेल्या उत्सवाच्या प्रसंगीं भारतांतून पुष्यमित्राचे प्रतिनिधि, राज्यातील कांहीं सामंत आणि अतिश्रीमंत व्यापारी, त्याचप्रमाणें सर्व प्रकारचे कलावंत दाफनेला गेले असतील, हें उघड आहे. हरिवंशांत वृष्णि कुलातील राजकुमारांनीं वज्रनाभ नामक असुराच्या राजधानींत विभाण्डकपुत्र शृंगीच्या आख्यानावरील नृत्यनाट्याचा प्रयोग केल्याचा उल्लेख आहे, तो असल्याच प्रसंगाला अनुलक्षून असावा. कारण शृंगी ऋषीच्या आख्यानासारखेंच गिलगामि मधील एआबानाचें आख्यान इराक-सीरियातील प्रजेला सुपरिचित असल्यानें त्या देशातील समाजाच्या मनोरंजनाकरिता त्या आख्यानाची निवड करणें स्वाभाविक आहे. असो. दाफने नगरींतील या वैभवप्रदर्शनाशीं स्पर्धा करण्याची पुष्यमित्रानें आपल्याकडून पराकाष्ठा केली असावी. महाभारतातील अश्वमेधपर्वांतील यज्ञाचें वर्णन त्याच्याच अश्वमेधाच्या आठवणींवर आधारलेलें असावें. अर्जुनाचा पणतू जनमेजय, याच्या यज्ञात विघ्न उत्पन्न झाल्यापासून तो यज्ञ साजरा झाला नसल्यास केवळ कल्पनेनेंच त्या यज्ञाचें वर्णन करणें कवींनाहि अवघड गेलें असतें. या संकटातून पुष्यमित्रानेंच त्याची सुटका केली असावी. महाभारतांतील वर्णनें समकालीन घटनांच्या आधारानें केलीं असतात, याचा एक पुरावा कालयवनाच्या आख्यानावरून उपलब्ध होतो. या आख्यानात श्रीकृष्णानें एका घटांत एक कृष्णसर्प भरून ते कालयवनाकडे धाडल्याचा उल्लेख आहे. ऑगस्टस् सीझरला एका भारतीय राजानें भेट म्हणून असे अनेक प्रचंड सर्प पाठविल्याची आठवण रोमच्या इतिहासकारांनीं चिरंतन करून ठेविली आहे.



प्रकरण चौथें

# भगवान् पतंजलि!

## शेषावतारांची परंपरा

भारतवर्षामध्यें होऊन गेलेल्या अद्वितीय पुरुषांत भगवान् पतंजलींची गणना होते. व्याकरणमहाभाष्याचे कर्ते, योगदर्शनाचे प्रणेते, आयुर्वेदांतील चरक परंपरेचे जनक इत्यादि नात्यांनीं त्यांनीं भारतीय इतिहासात उच्चस्थान प्राप्त करून घेतलें आहे. त्यांना वंदन करतांना भर्तृहरीनें वाक्यपदीय या विद्वत्त्वपूर्ण ग्रंथाच्या प्रारंभीं म्हटलें आहे 'योगेन चित्तस्य पदेन वाचाम् । मलं शरीरस्य च वैद्यकेन ।। योपाऽकरोत्तं प्रवरं मुनीनाम् । पतंजलिं प्रांजलिरानतोऽस्मि ।।' 'वाक्चेतोवपुषां मलः फणभृता भर्त्रेव येनोद्धृतः ।' असें अन्य ग्रंथकारांनींहि त्यांचें वर्णन केलें आहे पतंजलींच्या नंतर भारतांत कितीहि पांडित्यपूर्ण भाष्यें लिहिलीं गेलीं तरी स्वतः शंकराचार्यांसारख्या अलौकिक पुरुषांनींसुद्धां आपल्या भाष्यांना महाभाष्य हें नांव दिलें नाहीं. यावरून भाष्यकारांमध्यें पतंजलींचें स्थान किती अनन्यसाधारण आहे, याची कल्पना येते. पुराणकारांची अशी परंपरा आहे कीं विष्णु आणि त्याचा आधार शेष हे रामावतारांत राम आणि लक्ष्मण, तसेंच कृष्णावतारांत बळराम आणि कृष्ण झाले. या परंपरेंतच शेषाच्या पतंजलि अवतारांचीहि गणना करावयास पाहिजे पण पतंजलींचा भ्रातृतुल्य राजा पुष्पमित्र हा शेवटपर्यंत सेनापतिच राहून गेल्यानें त्याचें देव सेनापति स्कंदाशींच समीकरण झालं. त्यामुळें शेषाच्या पतंजलि अवतारासह विष्णूचा पृथ्वीवर अवतार झालेला दिसत नाहीं.

## विष्णूचा असह्य भार

अगदीं खरें सांगावयाचें म्हणजे पतंजलि अवतार घेण्यापूर्वीं शेषाला विष्णूचा भार असह्य झाला होता प. रामभद्र दीक्षितांच्या पतंजलिचरित्रांत यासंबंधीं एक सुरस आख्यायिका सांगितली आहे. एकदा विष्णूनें शेषावर शयन केलें असतां शंकरानें आपलें नृत्य आरंभिलें. जगत्तारणकर्ता विष्णु निद्रावश झाला म्हणजे शिवाच्या अकांडतांडवाला अवसर लाभणें स्वाभाविकच आहे. पण या विशिष्ट प्रसंगीं विष्णु पूर्णपणें निद्रेच्या आहारीं न गेल्यानें शंकराच्या नृत्याकडे त्याचें लक्ष

गेलें आणि त्या नृत्यावलोकनानें झालेला अत्यानद स्वतनूंत सामावेना म्हणून त्यानें आपली तनु वृद्धिंगत करण्याला प्रारभ केला. अशा प्रकारें विष्णूचें शरीर वृद्धिंगत होऊं लागलें, तेव्हा शेषाला त्याचा भार असह्य होऊन तो आपल्या अनत वदनांनीं फूत्कार करू लागला. या फूत्कारानीं सनत्कुमारादि ऋषिमुनींची दाणादाण झालेली पाहून गरुडानें शेषाला त्याच्या 'वैमनस्याचें' कारण विचारलें. तेव्हां शेषानें उत्तर दिलें. 'विष्णूनें माझी सत्त्वपरीक्षा पाहण्याकरितां आपला विस्तार इतका वाढविला आहे कीं मला त्याचा भार असह्य झाला आहे.' असें म्हणून शेषानें आपलें अग हलविले. तेव्हा लक्ष्मीनें विचलित होऊन विष्णूला हलवून जागें केलें. जागृतीनतर सभोंवतालची परिस्थिति पाहून देवानें आपली तनु संकुचित करून घेतली आणि शेषानें सुटकेचा सुस्कारा टाकला. मग थोडी विश्राति घेऊन जिवांत जीव आल्यानतर शेषानें विष्णूला विचारलें. 'देवा, तू आज माझी परीक्षा पहात होतास कीं काय ?' तेव्हा देवानें उत्तर दिलें 'आज शकराच्या तांडवनृत्याकडे माझें लक्ष गेलें आणि त्याच्या अवलोकनानें झालेला आनद नित्याच्या तनूत मावेना, म्हणून मी ती वृद्धिंगत केली आणि तुला तिचा भार सोसणार नाहीं, हें विसरून गेलों.' देवाला अत्यानद होण्याचें हें कारण कळल्यानंतर शेषानें तें ताडवनृत्य एकवार पाहण्याची इच्छा प्रदर्शित केली. तेव्हा देवानें उत्तर दिलें कीं तूं पुन्हा एकदां पृथ्वीवर अवतार घे, म्हणजे या खेपेला शिवकृपेनें तुला त्याच्या नृत्याचें दर्शन घेता येईल. देवाच्या या सूचनेप्रमाणें शेषानें गोणिका नांवाची एक साध्वी सूर्याला अर्घ्य वहात असताना तिच्या अजलींतील जळांत प्रवेश केला. ही घटना अवगत नसल्यामुळें अजलींतील अर्घ्य तिनें सूर्याला समर्पण केला, तेव्हा तिच्या अंजलींतून पतजलि भूमीवर पडला. अशा प्रकारें अंजलींतून पतन पावल्यामुळें त्याला पतजलि हें नाव प्राप्त झालें त्यानंतर पतंजलीनें शिवोपासना करून त्याचें तांडवनृत्य अवलोकन करण्याचें आणि महाभाष्याची रचना करण्याचें सामर्थ्य मागून घेतलें. पडित रामभद्र दीक्षितांनीं तामिळनाडमधील दिचबरम् या क्षेत्राशीं पतजलींचा संबध जोडला असून शिवाच्या ताडवाचें दर्शन त्यांना त्या क्षेत्रात लाभल्याचें वर्णन केलें असलें तरी तें अनैतिहासिक असल्याचें प्रो. सिल्व्हँ लेव्ही याच्या सशोधनानें सिद्ध झालें आहे.

## विदिशेसान्निध गोनर्द

पतंजलींना गोनर्दीय अशीहि एक संज्ञा आहे. या सज्ञेंतील गोनर्द कोठें

असावें, याचा शोध करून प्रो. सिल्व्हँ लेव्ही या नामांकित फ्रेंच पंडितांनीं ' गोनर्द, ल बेर्सो द्यु गोनर्दीय ' हा लेख लिहिला असून कलकत्ता विश्वविद्यालयाचे सर्वांत नामांकित कुलगुरु कै. आशुतोष मुखोपाध्याय यांच्या सन्मानार्थ प्रसिद्ध झालेल्या ग्रंथावलींत तो समाविष्ट झाला आहे. या प्रबधाकडे भारतीय विद्वानांनीं लक्ष दिलेलें दिसत नाहीं. ' चित्रकूटे गिरौरम्ये नानाधातु विचित्रिते । तत्रावसन् महाप्राज्ञः उपाध्यायः पतंजलिः ॥ ' अशी भविष्यपुराणातील परंपरा असून ती सत्यावर आधारली असल्याचे वरील प्रबधानें उघडकीस येतें. कारण त्या लेखावरून विदिशा आणि उज्जयिनी यांच्यामधील वाटेवर गोनर्द ग्राम असल्याचें कळून येतें प्रो. सिल्व्हँ लेव्ही यानीं असेंहि दाखवून दिलें आहे कीं विदिशेशेजारच्या सांचीच्या बौद्ध स्तूपाला आसपासच्या बहुतेक सान्या गावातील लोकानीं दानें दिल्याचे उल्लेख आढळत असून त्यात गोनर्द येथील लोकाचीं नावें मात्र अभावानेंच झळकतात. या गोष्टीबद्दल त्यांनीं आश्चर्यहि व्यक्त केलें आहे. पण या आश्चर्यावरून असें अनुमान निघतें कीं गोनर्दचे लोक कट्टे बौद्धविरोधक अ ावेत. अशा बौद्धविरोध-काच्या केंद्रात पतंजलींची जन्मभूमि होती, ही घटना त्याच्या चरित्राच्या दृष्टीनें महत्त्वाची आहे.

## पतंजलि चर होते

भावप्रकाश नामक वैद्यक ग्रथावरून अशी परपरा उपलब्ध होते कीं पत-जलिरूपी अनत प्रथम चर या रूपानें पृथ्वीवर संचार करीत असतांना सामान्य जनाना रोगामुळें भोगाव्या लागलेल्या यातना पाहून त्यांच्यावर उपाययोजना करण्याकरिता त्यानीं दयार्द्रबुद्धीनें चरक नांवाचा विख्यात वैद्यक ग्रथ लिहिला. आज उपलब्ध असलेला चरकग्रथ पतजलींनीं लिहिला नसल्यास त्याच्या परपरेंतील असू शकेल. त्या प्रश्नाची मला इथें चर्चा करावयाची नाहीं. पतजलि चर या रूपानें पृथ्वीवर संचार करीत होते, असा जो भावप्रकाशात उल्लेख आला आहे, तो ऐतिहासिकदृष्ट्या अतिशय महत्त्वाचा आहे, पतजलि हे प्रथम चर अथवा हेर या नात्यानें जगात सचार करीत असल्यास अर्थशास्त्रात वर्णिलेल्या सत्रिन् हेरात त्याचा समावेश होत असावा. ' ये चाप्यसंबधिनोऽवश्यभर्तव्याः ते लक्षणं, अगाविद्या, जभकविद्यां, मायागत, आश्रमधर्मं, निमित्त अतरचक्रम् इति अधीयानाः सत्रिणः ससर्गविद्या वा । ' म्हणजे पितृहीन आणि आप्तहीन असल्यामुळें ज्याना अवश्य पोसावें लागतें, अशांना सामुद्रिक, मुखपरीक्षा, जादूचे प्रयोग, वशीकरण, आश्रम-

धर्म, शकुन इत्यादि विद्या शिकवून त्याच्यातून सत्रिन् म्हणजे संसर्गानें अथवा समागमानें वृत्तसंग्रह करणारे हेर निवडावेत, असें अर्थशास्त्रकारानीं सांगितलें आहे. पतजलींना गोणिकापुत्र म्हणूनच ओळखतात, तेव्हा त्याचा पिता अकालींच कालवश झाला असल्यास आणि मत्सरी आप्ताचा त्याना आधार लाभला नसल्यास असल्या सत्रिन् हेरामध्येंच त्याचें शिक्षण झालें असावें. तसें नसल्यास त्यानीं आपण होऊनहि हा साहसी व्यवसाय पतकरला असेल.

## पुष्यमाणवांची संघटना

पतजलि हे अतिम मौर्यसम्राट बृहद्रथ याचा वध करणाऱ्या पुष्पमित्र शुगाचे समकालीन होत पुष्पमित्राचें वशपरपरागत राज्य दशार्ण देशात असून पतजलींची जन्मभूमि गोनर्द ही विदिशा या दशार्ण राजधानीच्या सन्निधच होती. तेव्हां पुष्पमित्र आणि पतजलि याचा परिचय विद्यार्थीदशेंतहि झाला असेल. पुष्पमित्राचें मूळचें नाव पुष्यमित्र, पण पुढे पुष्पपुर या नावानें प्रसिद्ध असलेल्या पाटलीपुत्र राजधानीचें त्यानें यवनापासून सरक्षण केल्यामुळें त्याला मगधांतील जनतेनें पुष्पमित्र बनविलें असावें. तें कसेंहि असो. पतजलींनीं व्याकरणशास्त्राची परीक्षा पाटलीपुत्रात दिली, अशी परपरा आहे या परीक्षेच्या निमित्तानें पतजलि जेव्हा त्या राजधानीला गेले, तेव्हाच त्यानीं नद साम्राज्याचा उच्छेद करणाऱ्या अर्थशास्त्रकाराच्या अनुकरणानें, बौद्ध बनलल्या मौर्यकुलाचा उच्छेद करून वैदिकधर्मी राज्याची पुनः प्रस्थापना करण्याचीं कारस्थानें केलीं असावींत. पतंजलिस्वरूपी शेषाला विष्णूनें आपलें शरीर फुगाविलेलें असह्य झालें होतें, याचा सरळ अर्थ असा आहे कीं पृथ्वीपतिस्वरूपी विष्णूने आपल्या अधिकारमर्यादाचें केलेलें अतिक्रमण पतजलींप्रमाणेंच मध्यभारतातील सरसकट सर्व नागकुलोत्पन्नाना असह्य झालें होतें. वैदिक परपरेप्रमाणें राजानें प्रजेच्या धर्मविषयक प्रश्नात ढवळाढवळ करावयाची नसते आणि मौर्य सम्राटानीं नेमकी हीच गोष्ट पिढयान्‌पिढया चालविली होती. त्यामुळें मध्यभारतातील सारे नाग धुसफुसू लागले होते. या नागाची पुष्पमित्राच्या नेतृत्वाखालीं एक सघटना झाली असावी, अशी शका घेण्याला महाभाष्यांत एक धागा आढळतो. पतजलींनीं त्या महान् ग्रथात उद्धृत केलेल्या काव्यपंक्तींत 'महीपालवचः श्रुत्वा जुघुषुः पुष्यमाणवाः ।' अशी एक पांक्त आली आहे. या वचनातील पुष्यमाणव हे पुष्पमित्राचे तरुण अनुयायी असावेत अशी कल्पना श्री. प्रभातचद्र चक्रवर्तीपासून श्री. वासुदेवशरण आग्रवालापर्यंत अनेक विद्वानांनीं केली

आहे. ही कल्पना खरी असल्यास पुष्पमित्राच्या अनुयायाचें म्हणजेच वैदिक परंपरेच्या पुनरुत्थानाकरिता झटणाऱ्या तरुणाचें एक दल त्या काळीं पाटलीपुत्रातहि संघटित झालें होतें, असे म्हणावें लागतें. या माणवाना म्हणजे तरुणाना उद्देशून महीपालानें अर्थात् मौर्य सम्राटानें भाषण केल्यानतर त्या तरुणांनीं घोषणा केल्या, असें त्या श्लोकार्धावरून समजतें. पुष्यमित्र स्वतःला कधींच राजा म्हणवीत नसल्यामुळें त्या श्लोकातील महीपाल मौर्यसम्राट् असला पाहिजे, हें उघड आहे. तेव्हां मौर्य सम्राज्याच्या अतकाळीं पाटलीपुत्रात महीपालाच्या धोरणाच्या विरुद्ध एक पुष्यमाणवाची संघटना उभी राहिली होती, हें स्पष्ट आहे. तीस वर्षांपूर्वीं जर्मनीत हिटलेरयूगेंड अर्थात् हिटलेरचे तरुण अनुयायी या नावाची जी सस्था होती, तिच्यासारखीच ही पुष्यमाणवाची सघटना असावी. या सघटनेमुळेंच मौर्य बृहद्रथाच्या वधानतर पाटलीपुत्रात आणि एकदर मौर्य साम्राज्यात पुष्पमित्राला साम्राज्याची सुव्यवस्था लावता आली असली पाहिजे. पुष्पमित्राचे चर आणि मित्र या नात्यानें कार्य करीत असलेल्या पतजलींनींच पुष्यमाणवाची संघटना करून तिचें संवर्धन केलें असावें. कारण विष्णूनें आपलें शरीर फुगविल्याचा, म्हणजेच मौर्यराजानीं आपल्या अधिकाराचें अतिक्रमण केल्याचा त्याना राग आला होता.

## महाभाष्य आणि महाराज्य

पुष्पमित्रकालीन समाजातहि पतजलींनीं वैदिक पुनरुत्थान चें नेतृत्व पतकरल्यामुळें द्विरश्वमेधयाजी पुष्पमित्र सेनापतीसमान मान मिळत असे, असें प्रो. नळिकंठ शास्त्री याच्या मौर्यशातवाहनकालाच्या इतिहासातील पुढील अवतरणावरून समजतें. One should teach or learn the Mahabhashhya or rule a great Kingdom. महाभाष्य वा पाठनीयम् महाराज्यं वा पालनीयम् । म्हणजे आर्यजन्माला येऊन महाभाष्याचें अध्यापन अथवा अध्ययन तरी करावें, नाहींतर एखाद्या साम्राज्यावर सत्ता चालवावी, अशा आशयाची एक म्हण प्राचीन सस्कृतात होती. ही म्हण एकाच काळीं आपापल्या क्षेत्रात अत्युच्च पदाला पोंचलेल्या पतंजलि आणि पुष्पमित्र या महापुरुषाच्या चरित्राना अनुलक्षून रचली गेली असावी, हें उघड आहे. पण शुगकालापासून आतापर्यंतच्या एकवीस शतकात पुष्पमित्राची महती बहुतांशीं विस्मृत झाली असली तरी त्या मानानें पतजलींच्या कीर्तीला फारसें ग्रहण लागलेलें दिसत नाहीं. खरेंच आहे. राष्ट्राचें रक्षण करण्याचें काम सेनेचें असलें तरी राष्ट्रीयत्वाचें रक्षण करण्याचें काम भाषेचें असते. सेनेचें नियत्रण सेनापतीकडे

असतें, तसेंच भाषेचें नियत्रण व्याकरणशास्त्रज्ञांकडे असतें. सेनेचें नियंत्रण करण्याचें कार्य सेनापतीला स्वतःच्या निधनानतर तरी सोडावेंच लागतें. त्याच्या उलट भाषेचें नियत्रण करण्याचें कार्य महाभाष्यकारासारख्या अलौकिक व्याकरणशास्त्रज्ञाना बहुधा ‘ यावच्चद्रदिवाकरौ ’ करावें लागणार, असा रग दिसतो. पण तत्कालीन परिस्थितींत मात्र मौर्यच्या हातून धरणीचा भार स्वशिरावर परत घेण्याच्या कार्यात शेषपतंजलींना पुष्पमित्राचें नेतृत्व पतकरावें लागलें.

## मयूरपृष्ठावरील धरणी

धरणीचा भार नेहमीच शेषाच्या शिरावर असावयाचा, पण मौर्य साम्राज्याच्या विनाशकालात अवतार घेणाऱ्या शेषपतजलींना असें दिसून आलें कीं त्या विपरीत काळात मयूरासारख्या नाचऱ्या पक्ष्याच्या शिरावर धरणीचा भार असून तो पक्षीहि सारा स्वाभिमान सोडून यवनांच्या तालावर नर्तन करीत आहे. अशा परिस्थितींत किंकर्तव्यतामूढ झालेल्या पतजलींनीं कांहीं काळ कामशास्त्रावरहि ग्रथरचना केली असेल कारण त्या शास्त्रातील पूर्वसूरींमध्यें वात्स्यायनानीं गोनर्दीय आणि गोणिकापुत्र याचाहि उल्लेख केला आहे. पण लौकरच योगाध्ययनानें मनोमालिन्याचा निरास झाल्यानतर पतजलींनीं मौर्य राजगता भूचें देशीविदेशी शत्रूच्या कारस्थानांपासून सरक्षण करण्याचा भार स्वतःच्या शिरावर घेतला असावा. ‘ अनत बनला जरी प्रणयचचल प्रेमळ, । शिरावरिल ही तरी विरल मात्र पृथ्वी ढळे. ।। मयूर नच नाचरा क्षम गर्भ वहाया तिला, । म्हणूनि गुरुभार हा फिरुनिया शिरीं घेतला. । नाचऱ्या मोराना ( अर्थात पाटलीपुत्रातील मौर्यांना ) पृथ्वीचा भार सोसणें अशक्य झाल्यानें अनतावतारी पतजलींना तो पुनश्च स्वशिरावर घ्यावा लागला. ही वस्तुस्थिति अर्थात् तत्कालीन राजकारणातील अतःप्रवाह ओळखणाऱ्यानाच सुविदित होती. इतरानीं शेवटपर्यंत मौर्य साम्राज्याचा सेनापतिच राहून गेलेल्या पुष्पमित्राचें देवसेनापति स्कदाशीं समीकरण रूढ करून स्कंदाचें मूळचें वाहन जें कुक्कुट तें बदलून त्याला मयूर हें नवेंच वाहन अर्पण केलें आणि त्यामुळें कालिदासाच्या काव्यात ‘ मयूरपृष्ठाश्रयिणा गुहन ’ म्हणजे मयूरपृष्ठावर आरूढ झालेल्या गुहाचा उल्लेख येतो. पण त्या मयूरपृष्ठापेक्षा पतजलिरूपी अनताच्या शिराचाच पुष्पमित्राला खरा आधार होता. पतजलिजन्माच्या आख्यायिकेंत विष्णूच्या भारानें शेष विचलित झाल्याचा जो उल्लेख आहे, त्यावरून असेंहि दिसून येतें कीं एखाद्या मोठ्या भूकपानतर आश्लेषा या अनताच्या नक्षत्रावर पतजलि जन्माला आल्यानें

रूपकें करणाऱ्या कवींना वरील आख्यान रचण्याची संधि मिळाली असावी. कदाचित् तेव्हांच्या धरणीकपाच्या धक्क्यानें पतजलींच्या कुलातील अनेक व्यक्ति मृत्युमुखीं पडल्यानेंहि त्याचें शिक्षण सत्रिन् हेरासह झालें असेल.

## तांडवनृत्याचें दर्शन

वरील विवेचनानें पतजलिचरित्रातील अनेक रूपकात्मक अद्भुत आख्यायिकाचा ऐतिहासिक दृष्टीनें उलगडा होऊं शकतो, असें उघडकीस आल्यानंतर त्यानीं अवलोकन केलेले कर्पूरगौर शकराचे ताडवनृत्य कोणतें असावें, हें समजण्याचा मार्ग मोकळा होतो. चिदबरम् येथील नटराजाची मूर्ति कितीहि नयनरम्य असली तरी तिच्या अवलोकनाचा आनंद अनुभवल्यानतर पतजलींच्यासारख्या शिवभक्तालासुद्धा महाभाष्यरचनेची स्फूर्ति होणें अवघड आहे. सहारकर्त्या शकराच्या ज्या ताडवनृत्याच्या अवलोकनानें पतजलींना महाभाष्यरचनेची आवश्यकता जाणवूं लागली, तें ताडवनृत्य अर्थात् बाल्हीक देशातील शकयवनाच्या सयुक्त सेनेनें देमेत्रेउस्, आपोलोदोतुस्, मिनादर इत्यादि नेत्यांच्या नेतृत्वाखालीं तक्षशिलेपासून पाटलीपुत्रापर्यंतच्या भरतभूमीवर भारतीय सस्कृतीच्या उच्छेदाकरिता आरंभिलेलें अत्यत भीषण अकाडताडव होय. वरील त्रिमूर्तींच्या सैन्यानीं भारतात जे अनन्वित अत्याचार केले, त्याचा इतिहास आज उपलब्ध नसला तरी त्याच्यापूर्वी अलेक्झाडरनें केलेल्या अघोर कृत्याचा इतिहास त्याच्याच देशबाधवानीं लिहिलेला अद्यापि उपलब्ध आहे. त्याच्यानतरच्या ग्रीक राजानीं युद्धप्रसगीं अत्याचारांची काटकसर करण्याचा उपक्रम आरभिला होता, असा संशय घेण्यालासुद्धा त्या यवनाच्या इतिहासात अवकाश नाहीं.

## महाभाष्याचें लेखन

पतजलींनीं आपल्या चक्षूंनीं प्रत्यक्ष पाहिलेलें रुद्राचें ताडवनृत्य हें आक्रमक यवनानीं मौर्यसाम्राज्यात आरभिलेलें अत्यत क्रूर ताडवनृत्यच असलें पाहिजे. असल्या अत्यत भीषण ताडवामुळें विचालित झालेल्या चित्तवृत्तींचा निरोध करून त्याना कार्यप्रवण करण्याला त्याच्या योगाध्ययनाचा पतजलींना अतिशय उपयोग झाला असला पाहिजे. असल्या आक्रमक यवनाच्या अत्यत आकर्षक वाङ्मयाचा भारतीयाना मोह पडूं नये, या हेतूनेंहि मौर्यकालात भूमिगत झालेल्या संस्कृत भाषेचा आणि वाङ्मयाचा पुनरुद्धार करण्याची पतजलिपुष्पमित्राना प्रेरणा झाली

असावी आणि ' न पठेद्यावनीं भाषां प्राणैः कण्ठगतैरपि । ' या जातीचा केवळ अकरणात्मक कठोर आदेश देऊन न थांबता पतंजलींनीं महाभाष्याची रचना करून देववाणीकडे अखिल आर्यावर्तांतील विद्वानांचें चित्त वेधलें. हाच पतंजलि-चरित्रांतील परंपराचा अर्थ असला पाहिजे. नाहींतर रुद्राच्या तांडवनृत्याचें दर्शन आणि महाभाष्याचें लेखन याच्यासारख्या विभिन्न आणि विसदृश घटनांचा अन्वय कसा लागणार ?

## संस्कृतानें राष्ट्राचा अभ्युदय

पतंजलिपुष्यमित्रासारख्या महापुरुषांनीं संस्कृत भाषेचा आग्रहानें पुरस्कार आरंभिल्यानंतर यवनांच्या ग्रीक भाषेसारखी लौकिक वाङ्मयानें समृद्ध असलेली भाषाच काय, पण पालीअर्धमागधीसारख्या बौद्धजैन गृहशत्रूंच्या धर्मभाषाहि तेव्हा मागें पडल्या. ' समानायाम् अर्थावगतौ शब्देन च अपशब्देन च धर्मनियमः क्रियते । ' म्हणजे संस्कृत आणि अपभ्रंश शब्दांनीं सारखाच अर्थ व्यक्त होत असला तरी धार्मिकदृष्ट्या संस्कृत शब्दाचाच उपयोग करावा. कारण ' न म्लेच्छितवै नापभाषितवै । ' अशी वेदाचाच आज्ञा आहे. एवं क्रियमाणम् अभ्युदयकारि भवति । ' म्हणजे संस्कृत शब्द वापरल्यानें अभ्युदय होतो, असेंहि पतंजलींनीं सांगितलें आहे. या साऱ्या विवेचनाचा इत्यर्थ हा की अपभ्रंश शब्द अनंत असल्यानें ते वापरल्यानें देशांतील प्रत्येक गटागटांतून विभक्तपणाची भावना बळावत जाते. उलटपक्षीं एकट्या संस्कृताला चिकटून राहिल्यानें परंपरेला स्थैर्य लाभून एकराष्ट्रीयत्वाची भावना दृढमूल होते. संस्कृत शब्द वापरल्यानें होणारा अभ्युदय व्यक्तीपेक्षां राष्ट्राचाच मुख्यतः होत होता. त्या काळीं पतंजलि—पुष्यमित्रांनीं केलेल्या संस्कृत भाषेच्या पुनरुद्धारामुळेंच महाभारत रामायणादि महान् ग्रंथांचा अखिल भारतात सामान्यतः एकाच स्वरूपात प्रचार होऊन भारताचें एकराष्ट्रीयत्व आतापर्यंत टिकून राहिलें आहे.

## यहुदी समाजाचें यवनांविरुद्ध बंड

पतंजलि-पुष्यमित्रांच्या काळींच सेलेउकुसच्या वंशजाविरुद्ध पॅलेस्टाइनमधील यहुदी लोकांनींहि बंड केलें होतें. या बंडाकडे दृष्टिक्षेप केला असता ग्रीकांचें अन्य संस्कृतींचा उच्छेद करण्याचें धोरण आणि त्या धोरणाविरुद्ध भारताप्रमाणेंच पॅलेस्टाईनमध्येंहि झालेली प्रतिक्रिया यांचें एकत्र दर्शन होऊन समकालीन इतिहासावर नवीन प्रकाश पडतो. यहुदी लोकांच्या बंडाची कथा सांगताना प्रो. हिट्टी

यांनीं म्हटलें आहे. 'In Jerusalem the aristocracy, the rich and modernized Jews had thus far responded to the outside stimulii by adopting the Hellenic language and customs, and were now ready to collaborate Hellenic dress became fashionable among the young and Hellenic gymnasium made its appearance.' म्हणजे जेरुसलेममधील वरिष्ठ वर्ग, श्रीमंत आणि नवमतवादी मंडळींनीं ग्रीक भाषेचा आणि चालीरीतींचा कधींच स्वीकार केला होता. ग्रीक सत्तेशीं सहकार्य करण्याला ते सिद्धच होते तरुणानीं ग्रीक वेष उचलला होता आणि ग्रीक विद्यालयातून त्याचें शिक्षणहि चालू झाले होतें. अशा परिस्थितींत चौथ्या अतिओकुस् राजानें त्याच्यावर ग्रीक धर्म लादण्याचा प्रयत्न केला. त्यालाहि यहुदी समाजातील सुधारकानीं मान्यता दिली. पण सनातनी यहुदी तरुणांनीं खि पू. १६८ च्या सुमाराला ग्रीक राज्याविरुद्ध बंड करून यहुदी समाजाचें यवन समाजात जें विलीनीकरण होऊ घातलें होतें, तें अशक्य करून सोडलें.

## यावनी भाषेचा मोह

पतंजलि-पुष्पमित्रांच्या काळीं भारताच्या वायव्य सीमेवरील प्रांतांतून असलीच परिस्थिति निर्माण झाली होती. त्या सीमेवरील गांधार, मद्र इत्यादि प्रांत हे आपल्या इतिहासात आक्रमणवाहक प्रांत म्हणूनच सुविदित आहेत. असल्या आक्रमणवाहक समाजातून स्वत्वाचा अभिमान सहसा नसतोच. उलट ज्या ज्या आक्रमकाच्या स्वाऱ्या आपल्या प्रांतावर होतील, त्याचें त्याचें अंतःकरण-पूर्वक अनुकरण करण्याची प्रवृत्ति मात्र त्याच्यात प्रभावी असते. त्यामुळें ग्रीक भाषा आणि संस्कृति याच्या प्रसाराला पुष्पमित्रकाळीं त्या प्रांतातून अतिशय अनुकूल क्षेत्र उत्पन्न झालें होतें अलेक्झांड्रियाचा क्लेमट, एलियन यांच्यासारख्या ग्रीकोरोमन लेखकानीं होमरचीं महाकाव्यें आणि ग्रीक शोकपर्यवसायी नाटककारांचीं नाटकें सुपरिचित असलेल्या शेंकडों भारतीयाचा उल्लेख केला आहे. वक्तृत्वाच्या भरांत त्यानीं केलेल्या विधानाना विशेष महत्त्व देऊं नये, असा त्याच्या विधानावर आचार्य रॉलिन्सन यानीं आक्षेप घेतला असला तरी तेवढ्या निमित्तानें तें विधान निराधार मानणें चूक ठरेल. विशेषतः मौर्य राज्यात यवन राजकन्या अतःपुरांत आल्या-पासूनच यवनींचें प्रस्थ भलतेंच वाढलें होतें, ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे त्यांच्या मुखपद्माचा आस्वाद घेणाऱ्यानीं त्याची भाषा आत्मसात् केली नसेल, असें मानणें

साहसाचेंच ठरेल. बिंदुसार राजानें सेलेउकुसच्या वंशजाकडे आपल्या करमणुकी-करिता एक ग्रीक तत्वज्ञ पाठवून देण्याची मागणी केली होती, यावरून त्याला त्याच्या सख्ख्या अथवा सावत्र मातेची भाषा चांगलीच अवगत होती, हें उघड आहे. प्रशियाच्या फ्रेडेरिक राजानें व्होल्तेरसारख्या फ्रेंच तत्वज्ञाला ज्या कारणा-करिता आपल्या सभेंत आश्रय दिला होता, त्याच कारणाकरिता बिंदुसार राजा ग्रीक तत्वज्ञाला पाचारण करीत होता. यवनींच्या मुखातून ग्रीक भाषा शिकल्या-नंतर ग्रीक तत्वज्ञाचा उपयोग व्हावयाचा. यवनींच्या मुखातून त्याची भाषा शिकणें रसिक आर्यांना किती सुखदायक झालें असेल, हें बायरनच्या डॉनजुआनमधील पुढील अवतरणावरून कळून येईल. ' It is pleasing to be schooled in a foreign tongue by female lips and eyes, when both the teacher and the tought are young ' या साऱ्या गोष्टींचा विचार केल्यावाचून आपल्याला पतंजलि पुष्यमित्रानीं घडवून आणलेल्या संस्कृताच्या पुनरुज्जीवनाचें महत्त्व पुरतें ध्यानात येणार नाहीं पतंजलि-पुष्यमित्राच्या कार्यावर आणि कर्तृत्वा-वर इतिहासविस्मृतीचा पडदा पडल्यामुळें विदेशातून भारतात घुसलेल्या शकानीं खिस्तोत्तर पहिल्या शतकात संस्कृत ही राजभाषा केली, असेंहि इतिहास लेखनाची विटंबना करणाऱ्या अप्रबुद्ध इतिहासकारानीं लिहून ठेविलें आहे उपलब्ध संस्कृत राजशासनात सर्वांत प्राचीन असा साकेत येथील शिलालेख पुष्यमित्रापासून सहाव्या पिढींतील धनदेवाचाच आहे. त्यावरून त्याच्या पूर्वीं सहा पिढयापासून ही परंपरा चालू झाली असावी, हें उघड आहे.

## वर्तमानकाल सिद्ध केला

पतञ्जलींनीं महाभाष्याची रचना केली, ही ढोबळ गोष्ट तेवढी आमच्या विद्वानाना दिसून येतें, त्यानीं आणीबाणीच्या प्रसंगीं केलेल्या वैचारिक नेतृत्वाची आणि मार्गदर्शनाची आमच्या इतिहासकाराना काय किंवा व्याकरणशास्त्रज्ञाना काय काहींच कल्पना नाहीं. बौद्ध धर्मानें अथवा अधर्मानें म्हणा निर्वाणलाभ होत असला तरी निःश्रेयसाचा लाभ होत नाहींच, हें सांगायला नको धर्मानें दुसरें अंग जें अभ्युदय तिकडे तर त्या अधर्मानें नुसतें दुर्लक्ष केलें नसून प्रत्यक्षपणेंच अभ्युदयविरोधी धोरण स्वीकारलें होतें. अभ्युदयाचा संबंध इहलोकाशीं असल्यानें पर्यायानें व्याकरणातील वर्तमानकालाशीं त्याचा संबंध येतो. याकरिता जनसमुदायाचा बुद्धिभेद करणाऱ्या बौद्धानीं शब्दच्छल करून वर्तमानकालाचें अस्तित्वच असिद्ध

असल्याचा बभ्रा केला होता. ' अनागतमतिक्रातम् वर्तमानमिति त्रयम् । सर्वत्रच गतिनास्ति गच्छतीति किमुच्यते ' ।। तस्मात् गतिश्च गन्ताच गन्तव्यंच न विद्यते । वर्तमानाभावः पततः पतित– पतितव्यकालापपत्तेः । ' ' तस्मात् वर्तमानः कालः न विद्यते । ' इत्यादि बुद्धिभेदवादी बौद्धांचीं वर्तमानकालविरोधी वचनें उध्दृत करून महाभाष्यकारानीं त्याचें खडन केलें आहे आणि आपल्या विशुद्ध विचारसरणीनें वर्तमानकालाचें अस्तित्व सिद्ध केलें आहे. वर्तमानकालासबधीं बौद्धांनीं आणि त्याच्या सहप्रवासी मित्रानीं उत्पन्न केलेले वाद केवळ असबद्ध वाद नसून बौद्धांच्या अभ्युदयविरोधा आणि त्यामुळें यज्ञविरोधी प्रचाराचा तो एक महत्त्वाचा भाग होता. याकरिताच ' इह पुष्यामत्र याजयामः । ' हें विशिष्ट वाक्य पतजलींनीं वर्तमानकालाचे उदाहरण म्हणून दिलें आहे या वाक्यातील इह शब्दानें वर्तमान-कालचें आणि इहलोकाचें समीकरण केल्यानतर अभ्युदय या इहलोकातील धर्म-फलाप्रीत्यर्थ करावयाच्या यज्ञाचा यज्ञविरोधकाच्या नाकावर टिच्चून उल्लेख केला आहे. हें न समजता महाभाष्याची पोपटपची करणारे 'स्थाणुरयं भारहारः किलाभूत् । ' याच जातीचे स्थाणु ठरतील वर उल्लेखिलेलें बौद्धाचें गतिविरोधी तत्त्वज्ञान झेनोच्या गतिविरोधी तत्त्वज्ञानाशीं एकरूपच होतें त्याचा वर्तमानकाल-विरोधहि सेमेटिक भाषांतून पूर्णभूत आणि अपूर्णभूत हे दोनच काळ असल्यानें वर्तमानकाळ नाहीं, या वस्तुस्थितीशीं सदृशच होता. असो पतंजलि हे एक थोर समाजसुधारकहि होते. पण तो भाग पुष्पमित्रचरित्रात अन्यत्र लिहिला आहे.



प्रकरण पांचवें

# विक्रमसंजीवनी

( बौद्धयवन–युतीचें राजकारण फसल्यानतर श्वेतांबर जैनांनीं शकाशीं सगनमत करून तेंच राजकारण पुढें चालविलें. त्याची चर्चा प्रस्तुत प्रबंधात केली आहे. )

## ऐतिहासिक अस्तित्वाचा पुरावा

एखाद्या राजाचें ऐतिहासिक अस्तित्व हें सामान्यतः त्याच्या वंशेतिहासा वरून सिद्ध होतें केवळ नाण्यानीं, ताम्रपटानीं किंवा शिलालेखानींच सिद्ध होत नाहीं. उदाहरणार्थ, मौर्य चंद्रगुप्ताचीं नाणीं किंवा शिलालेख अथवा ताम्रपट अद्यापि उपलब्ध झालेले नाहींत तथापि त्याचा आणि त्याच्या वंशाचा इतिहास इतका उपलब्ध झाला आहे कीं त्याचें ऐतिहासिक अस्तित्व नाकारण्याचें धाडस शुद्धीवर असलेला कोणीहि इतिहासकार करणार नाहीं. हाच न्याय विक्रमाच्या ऐतिहासिक अस्तित्वालाहि लावला पाहिजे. विक्रमादित्याच्या ऐतिहासिक अस्तित्वाचे पुरावे अजूनसुद्धा इतके उपलब्ध होऊ शकतात कीं त्याचा विचार करावयाचें नाकारल्यावाचून कोणाहि इतिहासकाराला त्याविषयीं साशंक राहता येणार नाहीं.

## विक्रमराजा अशोकवंशी

मेरुतुंगाच्या थेरावलीवरून असें कळतें कीं विक्रमाचा पिता गर्दभिल्ल हा उज्जयिनीचा एक प्राचीन राजा आणि भारतसम्राट् अशोकाचा नातू जो संप्रति अथवा संगत, त्याचा वंशज होता इथें कित्येकाना अशी शंका येईल कीं अशोकाचें घराणें तर मौर्य होतें आणि विक्रमराजा परमारवंशात जन्मला अशी माहिती आहे, तेव्हां या दोहोंचा मेळ कसा घालायचा ? त्याचें उत्तर इतकेंच आहे कीं संप्रति हा स्वतःला परमार्हत् म्हणवीत असे, त्यामुळें त्या शब्दाचा किंचित् संक्षेप होऊन त्याच्या वंशजांना परमार हें नाव मिळालें असावें विक्रमाच्या पित्याचें कथासरित्सागरानें दिलले नाव महेंद्रादित्य, हें अशोकाच्या मुलाचें किंवा भावाचें नाव होतें असें बौद्ध लेखक सांगतात स्वतः विक्रमाचें गुणाढ्यानें दिलेलें नाव विषमशील आहे. असलीं शीलवाचक नावें बौद्धजैनामध्यें हिंदु लोकाच्या मानानें

अधिक अढळतात. अर्वाचीन हिंदूंत पुष्पशील हें एकच शीलवाचक नांव ऐकल्याचें मला आतां स्मरत आहे. विषमशील हें नांव विक्रमाला त्याची माता शीलमती हिच्यामुळें ठेवलें असावें, असें वाटतें. पण त्या प्रश्नाची चर्चा मागाहून करतां येईल.

## राजतरंगिणीचा पुरावा

विक्रमराजा अशोकाच्या राजघराण्यापैकीं असावा, असें अनुमान करण्याला कल्हणांच्या राजतरंगिणींतहि आधार सापडतो.

अथ प्रतापादित्याख्यस्तैरानीय दिगंतरात् ।
विक्रमादित्य भूभर्तुर्ज्ञातिरत्राभ्यषिंचत ।।
शकारिर्विक्रमादित्य इति सभ्रममाश्रितैः ।
अन्यैरत्रान्यथालेखि विसंवादि कदर्थितम् ।।

विक्रमाच्या काळीं काश्मीरच्या राजघराण्याचा निर्वंश झाल्यामुळें तेथील लोकांनीं विक्रमाच्या बांधवांपैकीं प्रतापादित्य याला बोलावून आणून आपल्या शून्य सिंहासनावर बसविलें, अशी काश्मिरी इतिहासकाराची प्राचीन परंपरा होती. काश्मीरचें तत्कालीन राजघराणें अशोकाचा पुत्र जलोक याच्या वंशाचें असल्यानें त्याचा निर्वंश झाल्यावर तिथल्या प्रजेनें आपल्या राजघराण्याच्या थोरल्या शाखेंतील एक राजपुत्र आणून त्याला आपल्या गादीवर बसविणें स्वाभाविक आहे. अर्वाचीन चिकित्सकाचा जणू पूर्वावतारच अशा कल्हणानें असल्या स्थळीं स्वतःची बुद्धि न चालविता केवळ प्राचीन परंपरा संपूर्ण संरक्षिली असती तर त्याचे आपल्यावर अनंत उपकार झाले असते पण अति शाहणा त्याचा बैल रिकामा, या न्यायानें कल्हणासारख्या अर्धवट चिकित्सकांनीं प्राचीन इतिहास कसा लोपवून टाकला, इतकेंच काय तें वरील श्लोकावरून आज आपल्याला कळून येत आहे.

## संप्रति राजा शककर्ता

वर उल्लेखिलेला विक्रमाचा पूर्वज जो संप्रति, त्यासंबंधीं टॉडनें आपल्या राजस्थानाच्या इतिहासांत महत्त्वाची माहिती दिली आहे—' An era of Samprati grandson of Ashoka, is however mentioned in an ancient Jain manuscript. ' विक्रमाच्या जैन पूर्वजानें जर एखादा शक चालू केला असला तर जैनांनीं आणलेल्या गंडांतरांतून अवंतिदेशाची मुक्तता घडवून आणल्यानंतर विक्रमाला तो शक बंद करून आपला नवा शक चालू करण्याची आवश्यकता जाणवली

असल्यास त्यांत नवल तें काय ? त्यामुळें आपल्या पूर्वजाच्या विरुद्ध आचरण केल्याचा अपवाद येतो खरा, पण अशा प्रसगीं त्याला दोष देईल, तोच मूर्ख ठरेल. पूर्वजाच्या विरुद्ध आचरण करण्याची परंपरा मौर्य घराण्यात जुनीच होती. स्वत: अशोकाचें धोरण चद्रगुप्ताच्या धोरणाच्या सर्वस्वीं उलट होतें. अशोकानें आपल्या राजसत्तेच्या साहाय्यानें बौद्धधर्माचा सर्वत्र प्रसार घडवून आणल्यानतर त्याचा पुत्र जलोक याच्या वेळीं काश्मीर देशावर ग्रीकाची स्वारी झाली. ही स्वारी परतविल्यावर, बौद्ध धर्माचा देशसरक्षणाला यत्किंचित् सुद्धा उपयोग होत नाहीं असा अनुभव आल्यानें, जलोक राजानें बौद्ध पथाचें काश्मीरांतून उच्चाटन करून त्याच्या जागीं विक्रमप्रिय शैवपथाची स्थापना केली. सप्रतीच्या मागून अवतींदेशातहि असलाच प्रकार घडला असावा आणि त्यामुळेंच उज्जयिनीच्या जैनाचें त्याच्या घराण्याशीं प्राणातिक वैर उद्भवलें असावें.

## बौद्धजैनांचीं परदेशांतील कारस्थानें

अशोक आणि सप्रति यांच्या मागून अनुक्रमें बौद्ध आणि जैन धर्मानुयायाना राजद्रोहाचे आणि राष्ट्रद्रोहाचे विचार सुचू लागण्याचें प्रमुख कारण असें होतें कीं या दोघां राजानीं परदेशातून आपापल्या पथाचा प्रसार करण्याकरिता जे प्रचारक पाठविले होते, त्याच्या द्वारा या हिंदुविरोधी पंथाचें परराष्ट्रातील हिंदुविरोधी म्लेंच्छ राजाशीं अखड दळणवळण चालू झालें होतें. अशोकाने परदेशीं प्रचारक पाठ-विल्याची कथा सुप्रसिद्धच आहे. पण सप्रतीनेंहि हाच उद्योग केला होता, ही माहिती सामान्य इतिहासग्रथातून असतेच, असें नाहीं. “ कुनालसूनुस्त्रिखडभारता-धिपतिः परमार्हन्तो अनार्यदेशेष्वपि प्रवर्तितश्रमणविहारः सप्रति महाराजः ” असा त्याचा उल्लेख जिनप्रभसूरीनें केला आहे. अशोकसप्रतींनीं आपापल्या प्रचारकाना परदेशातील राजसभातून प्रथम प्रवेश मिळवून दिला खरा, पण पुढें हिंदुस्थानांतील आपल्या आश्रयदात्याच्या मृत्यूनंतर ते सर्वस्वीं परदेशातील म्लेंच्छ राजाचे हस्तक बनले आणि त्यांच्या हिताच्या दृष्टीने ते हिंदुस्थानात राजद्रोहाचीं आणि राष्ट्रद्रोहाचीं कारस्थानें खेळवूं लागले. अशोकाच्या नतर हिंदुस्थानावर केलेल्या स्वाऱ्यांतून विदेशी राजाना, स्वतः शिकंदराच्याहि शतपटीने यश मिळू लागलें, याचें प्रमुख कारण हेंच आहे. मो. सिल्व्हँ लेव्ही याच्या स्मरणार्थ प्रसिद्ध झालेल्या त्याच्या निबधसग्रहाच्या १९४ पानावरील पुढील उताऱ्याचें इथल्या इतिहासाभ्यासी मंडळींनीं अतिशय काळजीपूर्वक मनन करावें, अशी माझी त्याना विनति आहे.

"S'ils ont embrass'e le bouddhisme de pr'ef'erence a' l'orthodoxie brahmanique, c'est que le bouddhisme venait a eux tandis que le brahmanisme les tenait rigoureusement a' l'ecart, et leur interdisait a' tout jamais d'entrer dans la communaute'. Le bauddhisme et L'helle'nisme se donner'nt une aide re'ciproque pour conque'rir l'Inde; le succe's de l'un explique le succe's de l'autre L'helle'nisme demandait a' son auxiliaire des lettres de naturalisation; le bouddhisme re'clamait en re'tour un appui et des subsides." "बौद्ध लोक परक्याना आपल्या धर्मात घेण्याला उत्सुक असत, म्हणून परके लोक तो धर्म स्वीकारीत असत वैदिक हिंदु त्याना आपल्या धर्मात घ्यायला सरसकट प्रतिकूल असत. यामुळें बौद्ध आणि ग्रीक यानीं परस्पराशीं सगनमत करून वैदिक हिंदूचा काटा काढला. बौद्धानीं ग्रीकाना हिंदूचीं राज्ये जिंकण्याला साहाय्य केलें आणि ग्रीकानीं बौद्धाना वैदिक हिंदूचा धर्म बुडविण्याला साहाय्य केलें. हिंदुस्थानातील लोकानीं आपल्याला परकी मानू नये, आपल्यावर आणि आपल्या राज्ययन्त्रावर सशस्त्र बहिष्कार घालू नये, अशी ग्रीकाची इच्छा होती आणि उलटपक्षीं बौद्धाना ग्रीकाच्यकडून राजाश्रय हवा होता. यामुळें या उभयताचे हितसबध एक हाऊन बसले होते " वरील उताऱ्यात केवळ बौद्धांचा उल्लेख असला तरी त्यातील विवचन जैन लोकानाहि तितकेंच लागू पडतें, हें वेगळें सागायला नकोच.

## शालिशूककृत धर्मछळ

संप्रतीच्या मागून जैन आणि हिंदु याच्यामध्यें वैर उद्भवण्याचें आणखी एक कारण गर्गसहितेच्या युगपुराणावरून कळून येतें. संप्रतीच्या नंतर त्याचा भाऊ शालिशूक हा गादीवर आला आणि नेहमीं धर्माचें नाव घेणाऱ्या त्या अधार्मिकानें आपल्या प्रजेला अतिशय छळलें, असा उल्लेख युगपुराणात आढळतो.

" स राजा कर्मसूतो दुष्टात्मा प्रियविग्रहः ।
स्वराष्ट्रमर्दते घोर धर्मवादी अधार्मिकः ॥
सज्येष्ठभ्रातर साधु केतिति प्रथितं गुणैः ।"

त्या धर्मवादी अधार्मिक राजानें स्वराष्ट्राला घोर उपद्रव घेऊन आपल्या ज्येष्ठ भ्रात्यालाहि बरें म्हणायला लाविलें, असा या अशुद्ध वचनाचा एकंदरीनें अर्थ

होतो. आपल्या धर्मप्रसाराकरितां जैनांनीं हिंदूना छळल्याचीं उदाहरणें स्वतः जैनाच्या प्रभावकचरितासारख्या ग्रंथांतून आढळतात. मग त्या छळाला घोर छळ म्हणावें की नाहीं, हा ज्याच्या त्याच्या सहनशक्तीचा प्रश्न आहे.

## महाकालमंदिरावरून कलह

स्वतः उज्जयिनींत महाकालाच्या मंदिराच्या स्वामित्वाकरितां हिंदु आणि जैन याच्यामध्यें भांडणें चाललीं होतीं, असे जैन 'सिंहासनबत्तिशी' वरून कळतें. सिद्धसेनसूरि उज्जयिनीला आला असता तिथल्या जैनसंघानें आपलें गाऱ्हाणें सांगितले, L rd here in the temple of Mahakala the image of the holy Jina has been taken down and a symbol of Shiva has been set up by the Brahmanas; acting by the authority of the King." हा उल्लेख एजर्टेनच्या 'विक्रमाचीं साहसें' या ग्रंथात २५२ पानावर आला आहे. जैन आणि हिंदु याच्यामधील तत्कालीन कलहाचा आणखी एक प्रतिध्वनि पर्यूषणशतक या मागधी प्रबंधावरील संस्कृत टीकेंत आढळतो. कै. डॉ. भाऊ दाजी यानीं त्या टीकेवरून पुढील माहिती दिली आहे.—"For releasing his sister Saraswati, and for removing the disfavour into which religious knowledge had fallen Kalaka uprooted Gardabhilla' याचा अर्थ इतकाच होतो कीं, उज्जयिनींत जैनधर्माला कोणीहि मान देत नाहींत, ही परिस्थिति बदलून टाकण्याकरिता आणि आपल्या बहिणीची मुक्तता घडवून आणण्याकरिता कालकाचार्यानें उज्जयिनींत राज्यक्रांति घडवून आणली.

## राज्यक्रांतीच्या कटांना धर्मशास्त्राचा आधार

एखादा राजा जैनाना प्रतिकूल असला तर त्याच्या विरुद्ध परशत्रूना उठविण्यापर्यंतचे सर्व उपाय करण्याला जैन धर्माची अनुज्ञा आहे. याविषयीं जैनाच्या बृहत्कल्पसूत्राच्या टीकेंत सांगितलें आहे. "शासन-प्रातः प्रवचनप्रत्यनीको असाध्यश्च न यथा तथा राजा शासितु शक्यते, ततस्तेन सममधिकरणमुत्पाद्य शिक्षण कर्तव्यम् । तत्र च स्वयमसमर्थः सयतग्रामनगरदेशराज्यलक्षणानि पचापि पदानि सहायतया गृण्हीयात् । आगाढे कारणे राजससारिका राजान्तरस्थापना यतनया कुर्यात् । तथा हि यदि राजा अतीवप्रवचनप्रांतो अनुशिष्यादिभिः अनुकूलोपायैः न उपशाम्यति ततस्त राजान स्फेटयित्वा तद्वशज अन्यवशज वा भद्रक राजान स्थापयेत् ।" हा उतारा जैनाचा प्रसिद्ध सद्धर्मग्रंथ जो 'अभिधानराजेंद्र', त्याच्या

पहिल्या खंडाच्या ५८२ पानावरचा आहे. त्यातील संस्कृत वाचकाना सदोष वाटलें तरी तें सुधारण्याचा अधिकार लेखकाला नाहीं, हें त्यांनीं लक्ष्यात घ्यावें. जैनविरोधी राजाचा कसकसा काटा काढावा, हें शिकविण्यासाठीं त्यांच्या धर्मग्रंथातून स्वतंत्र प्रकरणेंच घातलीं आहेत, असें वरील उताऱ्यावरून दिसतें. पण तीं सारीं शोधायला सवड नसल्यानें आता या एकाच उताऱ्यावर भागविलें पाहिजे. एखादा राजा अगदींच जैनाच्या विरुद्ध असला आणि शिष्यांची मध्यस्थी इत्यादि उपायानांहि तो भीक घालीत नसला तर त्याचें उच्चाटन करून त्याच वंशातील दुसऱ्या एखाद्याला गादीवर बसवावें, किंवा भद्र अशा अन्यवंशीय राजाला आणून बसवावें, असा या उताऱ्यातील विवेचनाचा रोख आहे. आता या धोरणाचा तत्कालीन परिस्थितींत काय अर्थ झाला असेल, याचा विचार केला पाहिजे. त्या दृष्टीनें विचार केला असता या उताऱ्यातील भद्रक हा शब्द विशेष विचारणीय वाटतो. नग्नक्षपणकाच्या चेल्याना आपल्या गुरूच्या जीवनासारखेंच नैसर्गिक जीवन ज्याचें असेल, तेच लोक भद्र वाटायचे. त्यावाचून काहीं कालकाचार्यानें शकासारख्या रानटी लोकाना बोलावून आणून त्याच्याकरवीं उज्जयिनी-मथुरेसारख्या आर्य संस्कृतीच्या केंद्राची राखरागोळी करविली नसती. मला नाहीं, तुला नाहीं, घाल कुत्र्याला, (सग शब्दाचे अर्थ शक आणि कुत्रा हे दोनहि होतात.) याच नीच प्रवृत्तीनें प्रेरित झालेल्याच्या कृत्याविषयीं लिहिताना केव्हा केव्हा संताप अनावर होतो. तरीसुद्धा तो संताप आवरून तर्ककर्कश पद्धतीनें तत्कालीन इतिहासाची चिकित्सा केली पाहिजे. परमताच्या संबंधीं अतिशय उदार मनानें विचार करणाऱ्याना आणि अत्यंत सहिष्णु असणाऱ्या लोकानासुद्धा आणीबाणीच्या प्रसंगीं काहीं काहीं मताच्या प्रचाराला आळा घालावा लागतो. आपल्या सदसद्विवेकबुद्धीचें निमित्त सांगून राष्ट्रकार्य टाळणाऱ्याना प्रसंगविशेषीं अटकेतहि टाकावें लागतें. शुंगसम्राटाच्या काळांत प्रथम ग्रीक आणि मागाहून शक यांच्या आर्यावर्तावर स्वाऱ्या होऊं लागल्यामुळें आपल्या देशात मोठी आणीबाणीची परिस्थिति उत्पन्न झाली होती, ही गोष्ट उघड आहे. अशा परिस्थितींत राष्ट्रसंरक्षणाची जाणीव असणाऱ्या कोणत्याहि राजाला आपल्या राज्यात नग्नक्षपणकाच्या अनिर्बंध संचाराला आणि प्रचाराला अवकाश देणें अशक्य होतें अशा वेळीं "आगाढे कारणे राजसंसारिका राजांतरस्थापना यत्नया कुर्यात् । तथाहि यदि राजा अतीव प्रवचनप्रातो अनुशिष्यादिभिः अनुकूलोपायैर्न उपशाम्यति ततस्त राजान स्फेटयित्वा तद्वंशज अन्यवंशज वा भद्रक राजान स्थापयेत् ।" हा उपदेश आर्यावर्ताला किती

घातुक झाला असेल याची आमच्या अज्ञहि नाहींत आणि तज्ज्ञहि नाहींत असल्या अर्धवट इतिहासलेखकाना काहीं कल्पना तरी आहे का ? आर्यावर्ताचें सरक्षण करूं इच्छिणाऱ्या प्रत्येक राजाला त्या काळात नग्नक्षपणकविरोधी धोरण स्वीकारणें भाग होतें आणि हें निमित्त पुढें करून नग्नक्षपणकाचे अनुयायी आपल्या विदेशी शत्रूशीं राष्ट्रघाताचीं कारस्थानें करीत होते. या कारस्थानांच्या अघोर परिणामाचें वर्णन गर्गसहितेच्या ' युगपुराणात ' आलें आहे. पण ' युगपुराणा ' च्या उपलब्ध प्रति अत्यत अशुद्ध असल्यामुळें त्याच्याकडे इतिहासज्ञाचें फारसें लक्ष गेलेलें दिसत नाहीं.

## सरस्वतीहरणानिमित्त राज्यक्रांति

आतां ज्या सरस्वतीच्या निमित्तानें उज्जयिनींत जैनानीं राज्यक्राति घडवून आणली, त्या श्राविकाहरणप्रकरणाची थोडी चिकित्सा केला पाहिजे. कालकाचार्य-कथानकाच्या सर्व परपरा असे सागतात कीं सरस्वती ही कुमारी होती ती परस्त्री नव्हती आणि ब्राह्मणकन्याहि नव्हती. " असशय क्षत्रपरिग्रहक्षमा यदार्यमस्यामभिलाषि मे मनः ' किंवा " आशकसे यदग्निं तदिद स्पर्शक्षम रत्नम्। ' असा दुष्यताप्रमाणें विक्रमाच्या पित्यानेंहि विचार केला नव्हता, असें मानण्याचें काहींहि कारण नाहीं. कोणी म्हणतील कीं ती परिव्राजिका होती. पण ती स्वेच्छेनें म्हणजे अन्य कोणाचेंहि अयोग्य वजन न पडता परिव्राजिका झाली होती, असें कालकाचार्यकथानक सागत नाहीं. या कथानकाच्या कित्येक परपरा तर असेंच सागतात कीं स्वतः कालकानेंच तिला संन्यासदीक्षा दिली हाती स्त्रियाना सन्यास देणें हा कौटलीय अर्थशास्त्राप्रमाणें दण्ड्य अपराध आहे. " पुत्रदारप्रतिविधाय प्रव्रजतः पूर्वस्साहसदण्डः । स्त्रिय च प्रव्राजयतः " असा यासबधीं कौटल्याचा स्पष्ट नियम आहे मालविकाग्निमित्रातील परिव्राजिकेनें आपण होऊन सन्यास घेतल्याचें कालिदासानें याकरिताच सांगून ठेविलें आहे. कन्याहरण हें क्षत्रियाना विहित आहे, ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. राजाच्या अंतःपुरात गेल्यावर सरस्वती ही राजाची उपपत्नी नव्हे, तर पट्टराणी झाली होती हें डोळस वाचकाना सहज दिसून येण्याजोगें आहे. अकगणितातल्या बेरजांप्रमाणेंच इतिहासांतहि काहीं बेरजा करून उत्तरें काढावीं लागतात, ही गोष्ट आमचे इतिहासकार आणि त्यांचे वाचक सपशेल विसरून गेले आहेत. त्यामुळें अत्यत स्वाभाविक अशा घटनाचेसुद्धां ते पुरावे मागत असतात. अशा एका प्रसगीं कै. पडित मोतीलाल नेहरूनीं दिलेलें अत्यत मार्मिक उत्तर वेळीं अवेळीं पुरावे मागणाऱ्याना सादर करावेंसें वाटतें " What am I to substantiate ? Am I substantiate human

nature ?" ज्या श्राविका बनलेल्या राज्यकन्या सरस्वतीसाठीं राजानें उज्जयिनींतील प्रभावशाली जैनसघाला झिडकारिलें आणि राजक्रांतीचाहि धोका पत्करला, ती भुवनमोहिनी अतःपुरातील एखाद्या कोपऱ्यात पडून राहणें अशक्य आहे. राजा भर्तृहरीनें म्हटलेंच आहे–

" कुसुमस्तबकस्येव द्वे गतीस्तो मनस्विनाम् ।
मूर्ध्नि वा सर्व लोकस्य विशीर्येत वनेऽथवा ।।

विक्रमाच्या पित्याला इतकें वेड लावणारी सरस्वती राजाला वश झाली कीं पट्टराणी व्हावयाचीच ती राजाला वश झाली होती कीं नाहीं, हाच काय तो प्रश्न महत्त्वाचा आहे. कालकाचार्य कथानकाच्या अर्वाचीन परपरांतून बंदिवासात सरस्वतीने आपलें कौमार्य कसे राखले, याचीं सुरस वर्णनें आढळतात. पण नॉर्मन ब्राउननें सर्वांत प्राचीन ठरावेलेल्या प्रदीर्घ प्राकृत कथानकात काहीं वेगळाच माहिती आली आहे––

मइ मोहमोहियमई जो शीलम् साहुणीए भजेइ ।
जिण धम्मबोहिलाभस्स सो नरो देइ मूल अग्गिम् ।।
जम् अणिच्छंतिए साहुणीए विद्धसणम् कयम् तुमए ।
नय मन्नियोय सघो तेण अम्हेहिम् इम विहियम् ।।

'अनिच्छती अशा श्राविकेला तू भ्रष्ट केलीस आणि सघाला जुमानलें नाहींस, म्हणून तुला हें प्रायश्चित्त द्यावें लागलें' असें इथें स्वतः कालकाचार्यानेंच राजाला म्हटलें आहे. ब्राउनचें पुस्तक आता हाताशी नसल्याने सदर्भाचें पान देऊ शकत नाहीं.

## सरस्वतीच विक्रममाता

कालकाचार्यांची भगिनी सरस्वती, हीच विक्रमाची माता असावी, असें त्या कथानकाच्या विविध परपरावरून आणि कालिदासाच्या ग्रथावरून माझें निश्चित मत झालें आहे. सरस्वताला ब्रह्मदेवानें भ्रष्ट केल्याच्या कथेमुळें काहीं जैनाना तें नाव कदाचित रुचत नसेल, त्यामुळें सरस्वतीनें जैनधर्माची आणि संन्यासाची दीक्षा घेतल्यावर तिला शीलमती हें नाव ठेवलें होतें. या नावाचा उल्लेख ब्राउनच्या पुस्तकात आला आहे. मातेच्या शीलमती नावामुळेच विक्रमाला विषमशील हें नाव ठेवलें असावे भविष्यपुराणानें विक्रमाच्या मातेचें नाव वीरमती असें दिलें आहे, तें बहुधा मूळच्या जैन नावाचें हिंदु रूपातर असावें. कालिदासाच्या ग्रथाच्या

वाचनानें ही कल्पना अधिकच दृढमूल होते. बाणाच्या ग्रंथातून ज्याप्रमाणें हर्ष-राजाची तपस्विनी भगिनी राज्यश्री हिचा प्रभाव प्रत्ययाला येतो, त्याप्रमाणेच कालिदासाच्या ग्रंथांतून विक्रमादित्याची तपस्विनी माता सरस्वती हिचा प्रभाव प्रत्ययाला येतो तपस्विनीच्या कुशींतूनच श्रेष्ठ वीराची उत्पत्ति होते, ही कल्पना कालिदासाच्या सर्वांच श्रेष्ठ ग्रंथातून आढळून येते. उमा-सुदक्षिणा-शकुन्तला-चरित्रातून कालिदासानें हाच विषय पुनः पुनः हाताळलेला दिसून येतो. कालकाचार्य हा मूळचा मगध देशातील राजपुत्र होता, अशी जैन परंपरा आहे कालिदासाच्या वर उल्लेखिलेल्या तपस्विनींपैकी उमा आणि शकुन्तला या बहुतांशीं दिक्कालातीत आहेत म्हणून एकट्या सुदक्षिणेच्या निमित्तानें कालिदासाने आपल्या काव्यातून विक्रमाच्या मागधी मातेचे उल्लेख आणिले आहेत ‘ तयोर्जगृहतुः पादान् राजा राज्ञीच मागधी । ’ यासारखे अनेक उल्लेख वाचकांना सहज स्मरण्यासारखे आहेत. या मागधीचा पुत्र जो रघु, त्याच्या जन्माचें वर्णन करीत असताना कालिदासाच्या मनश्चक्षूपुढें विक्रमादित्यच होता, हें काव्यनिर्मितीची कल्पना असणाऱ्या चिकित्सकांना सहज कळून येईल—

आरिष्टशय्यां परितो विसारिणा सुजन्मनस्तस्य निजेन तेजसा ।
निशीथदीपाः सहसा हतत्विषो बभूवुरालेख्य समर्पिता इव ॥

## कालिदासाचा आधार

रघु म्हणजे विक्रम आणि सुदक्षिणा म्हणजे सरस्वती, हें समीकरण लक्षांत आलें म्हणजे या राजकवीच्या सर्वश्रेष्ठ काव्याच्या रचनेंतील कांहीं रहस्यें व्यक्त होऊं लागतात उदाहरणार्थ, सुदक्षिणादोहदवर्णनांतील ‘ न मे ह्रिया शंसति किंचिदीप्सित स्पृहावती वस्तुषु केषु मागधी । ’, किंवा ‘ नदीमिवान्तःसलिलां सरस्वतीं नृपः ससत्त्वां महिषीममन्यत । ’ या चरणांतून कालिदासानें मागधी आणि सरस्वती हींच नांवें कां योजलीं आहेत, याचें कारण कळतें शाकुन्तलाच्या प्रथमांकातील झाडांना पाणी घालण्याचा प्रसंग हा सरस्वतीच्या तपोवनातील जीवनातलाच एक प्रसंग आहे. राजा संध्याकाळीं फिरायला गेला असता त्यानें मैत्रिणींसह सरस्वतीला पाहिलें, असें प्रभावकचरितात आणि कालककथानकाच्याहि कांहीं परंपरांतून सांगितलेलें आहे. बहिणीची मुक्तता करण्याकरिता राजाला विनविताना कालकाचार्य म्हणतो ‘ रायरक्खियाणि तवोवणाणि होंति ’ हा उल्लेख या कथानकाच्या अनेक महत्त्वाच्या परंपरांतून आहे आणि त्या प्रसंगीं असलें बोलणें होणें, अगदीं

स्वाभाविकहि आहे. यालाच अनुलक्षून कालिदासानें शकुन्तलेच्या मैत्रिणींच्या तोंडीं पुढील उद्गार घातले आहेत. ' के आवा परित्रातुम् । दुष्यतमाक्रद । राजरक्षितानि तपोवनानि नाम ।' या वाक्यात तरुण मुलामध्यें नेहमी चालणाऱ्या परिहासाचें प्रतिबिंब तर आहेच. पण त्या निमित्तानें कवीनें आपल्याला अनुकूल तितकाच धर्म आठवणाऱ्या कालकाचार्याच्या एका अमोघ अस्त्राचा त्याच्यावरच प्रयोग करण्याची सधिहि साधली आहे. 'राजरक्षितानि तपोवनानि नाम' हें जितकें खरें तितकेंच

अर्थोहि कन्या परकीय एव तामद्य सप्रेष्य परिग्रहीतुः ।
जातो ममाय विशदप्रकाम प्रत्यर्पितन्यास इवातरत्मा ॥

हें वचनहि खरें आहे पण आपल्या बहिणीला श्राविका करून स्वतःपाशीं ठेवणाऱ्या कालकाचार्याला या वचनाची सपशेल विस्मृति झाली होती. चौथ्या अकातील शकुन्तलागमनाच्या भावनाप्रधान प्रसगानतर कण्व जेव्हा असला अत्यत वास्तवताप्रधान श्लोक म्हणून पडद्यात जातो, तेव्हा कालिदासाच्या अर्वाचीन भक्ताना त्याचा रागच येतो. उज्जयिनींतील कविकालीन घटनाची त्यानीं जर आधिक माहिती करून घेतली तर कवीवरील त्याची टीका अशतः तरी सौम्य होईल.

सरस्वतीच्या नावाचा आणखीहि एक महत्त्वाचा उल्लेख विक्रमोर्वशीयाच्या भरतवाक्यात आढळतो—

" परस्परविरोधिन्योरेकसश्रयदुर्लभम् ।
सगतं श्रीसरस्वत्योर्भूतयेऽस्तु सदा सताम् ॥ "

श्री आणि सरस्वती यांचें वैर सुप्रसिद्धच आहे पण असें असूनसुद्धा तत्त्वज्ञान्याला राजा करू इच्छिणाऱ्या प्लेटोप्रमाणेंच कालिदासहि या परस्परविरोधी देवतानीं एकत्र निवास करावा, अशी इच्छा करीत होता. विक्रमोर्वशीयाच्या भरतवाक्यांत कालिदासानें ही जी आपला मनःकामना व्यक्त केली आहे, ती तत्कालीन परिस्थितींत अत्यत आवश्यक वाटल्यामुळेच व्यक्त केली आहे हे उघड आहे. विक्रमाच्या पित्याच्या सदनीं श्री होती, तेव्हा सरस्वती नव्हती आणि सरस्वती आली, तशी श्री तिथून निघाली. हे उदाहरण डोळ्यापुढें असल्यामुळेंच आता विक्रमाच्या राजवटीत तरी तसला प्रकार न घडो, अशी प्रार्थना या भरतवाक्याच्या मिषानें कवीनें भगवतापाशीं केली आहे

## विक्रमपित्याचें नाम दर्पण

विक्रमाच्या पित्याला जैन ग्रथांतून सामान्यतः गर्दभिल्ल म्हणून संबोधिलें

असलें तरी तें कांहीं त्याचें खरें नाव नव्हतें. ते केवळ जैनानीं त्याची निंदा करण्याकरितां ठेवलेलें नाव होय. त्याला दर्पण असें दुसरें नाव असल्याचा उल्लेख कांहीं कालकाचार्यकथानकांतून आला आहे. हें दर्पण नाव कालिदासालाहि परिचित होतें कीं काय अशी शंका रघुवंशावरून येते. सीतात्याग करण्यापूर्वी राम आपल्या बंधूंना म्हणतो—

> " राजर्षिवंशस्य रविप्रसूतेरुपस्थितः पश्यत कीदृशोऽयम्
> मत्तः सदाचारशुचेःकलंकः पयोदवातादिव दर्पणस्य ॥ "

या श्लोकातील ' पयोदवातत् ' हा शब्द विशेष विचारणीय आहे, असें निदान मला तरी वाटतें. कारण पाण्याच्या थेंबानीं आरशाला जसा डाग लागतो, तसा माझ्या वंशाला डाग लागला आहे; इतकेंच जर रामाला किंवा कालिदासाला म्हणावयाचे असतें तर ' जलाभिषंगादिव दर्पणस्य । ' किंवा ' जलप्रसेकादिव दर्पणस्य । ' यासारखा एखादा त्यानें सरळ शब्दप्रयोग केला असता. सामान्यतः वातामुळें दर्पण 'मलिन' होतो, ' कलंकित ' होत नाहीं असा सारासार विचार केला असता कालिदासाला या ठिकाणीं कांहीं अप्रस्तुत गोष्टी सुचवावयाच्या आहेत, हें लक्षात येतें. दर्पणाला लागणाऱ्या कलंकाशीं रघुकुलाला लागलेल्या कलंकाची तुलना करण्यापेक्षासुद्धा दर्पणावरील समकालीन जनापवाद हा रामावरील जनापवादासारखाच निराधार आहे, असें या ठिकाणीं राजकवीला सुचवावयाचें आहे आणि याकरिताच त्यानें ' पयोदवातात् ' या श्लिष्ट पदाची योजना केली आहे. माझी कल्पना अशी आहे कीं सरस्वतीहरणानंतर कालकाचार्य हा वेड पांघरून असंबद्ध बडबडत उज्जयिनींत हिंडूं लागला आणि त्याची ती दुरवस्था पाहून लोकांनीं राजाला अतिशय दोष दिला, असें जें वर्णन त्याच्या कथेंत येतें, त्याला अनुलक्षून कालिदासानें इथें पयोद आणि वात हे शब्द योजिले आहेत. कारण पयोद म्हणजे पाणी देणारा अर्थात् काळा ढग आणि कालक शब्दाचाहि अर्थ काळा ढग ( काल+क ) हाच होतो. वात शब्दाचा अर्थ वातविकार असाहि होऊं शकतो, हें सर्वांनाच माहीत आहे. तेव्हा कालकाचार्यांच्या उन्मादामुळें सदाचारी दर्पणाला रामाप्रमाणेंच निष्कारण कलंक लागला, असेंहि या श्लोकात कवीला सुचवावयाचें आहे, असें दिसतें.

## शकांचा पूर्वेतिहास

आतापर्यंत विक्रमाच्या मातापितरांचा विचार झाला. यापुढें त्याच्या

कालक्रमामानें हिंदुस्थानात बोलावून आणलेल्या त्याच्या आणि आमच्या शकवंशी शत्रूचा थोडा पूर्वेतिहास पाहिला पाहिजे. ' हिस्टोरियन्स हिस्टरी ऑफ दि वर्ल्ड ' या सदर्भग्रथाच्या दुसऱ्या खडात शकाविषयीं पुढील माहिती आली आहे :—

"The sword in the literal sense of the word was their chief god, to whom sheep, horses and a portion of their prisoners taken in war were offered up in sacrifice. The scalps and skins of slain enemies and sometimes the skull formed into a drinking-cup, constituted the decoration of a Scythian warrior; whoever had not slain an enemy, was excluded from participation in the annual festival. The ceremonies which took place during the funeral obsequies of the Scythian kings partook of the same sanguinary disposition. It was the Scythian practice to put out the eyes of all their slaves; and the awkwardness of the Scythian frame, often overloaded with fat, together with extreme dirt of body, and the absence of all discriminating feature between one man and another complete the brutish portrait" "Every Scythian drinks the blood of the first person he slays. The heads of all the enemies who fall by his hand in battle, he presents to his king. The human skin is of all others the whitest and of a very firm texture; many Scythians will take the whole skin of a man and having stretched upon wood, use it as a covering to their horses." हे उतारे थोडे लांबले खरे. पण हिंदूंच्या द्वेषानें जैनानीं कोणत्या भद्र लोकांशीं सख्य केलें आणि त्यांना आर्यावर्तांतील अत्यत सुसस्कृत प्रात जिंकण्याला साहाय्य केलें, हें त्यावाचून वाचकांच्या हृदयावर ठसण्याचा सभव नाहीं. याहून अधिक उद्वेगजनक गोष्ट ही आहे कीं अर्वाचीन जैन-इतिहासकार, शक हे जैन होते, असे आग्रहानें प्रतिपादीत असतात.

...९

## शकांचा भारतांत प्रवेश

हे शक लोक प्रथम मध्य आशियातील सुविस्तृत पण सस्यहीन प्रदेशांत पशुपाल या नात्यानें रहात असत. इराणच्या सम्राटांनीं त्यांची आपल्या सैन्यांत भरती करून त्याना सुधारलेल्या जगाच्या वैभवाचा आणि दौर्बल्याचाहि परिचय करून दिला. त्याच्या आगमनापासून तीस वर्षांच्या आतच यांनीं इराणी साम्राज्य जिंकण्याचे प्रयत्न आरंभिले. याच्याशीं लढताना तिथल्या दोघा सम्राटाना धारातीर्थीं मरणहि आलें. त्यानतर दुसऱ्या मिथ्रिडेटसच्या राजवटींत या शकाचा पराभव झाला आणि त्यानीं हिंदुस्थानाकडे आपला मोर्चा वळविला. शकाच्या हिंदुस्थानावरील स्वारीची काहीं माहिती प्रो. टॉर्न याच्या ग्रंथावरून इतिहासाचार्य टॉयनबींनीं आपल्या ग्रंथराजाच्या पाचव्या खडात ६०३ पानावर दिली आहे. प्रो. टॉर्न याचा ग्रंथ इथें मिळत नाहीं, असें कळल्यामुळें टॉयनबींचाच उतारा घेणें भाग आहे.

"After making their way out of the Hilmand Basin into the Indus Basin over the Bolan Pass, these Shakas struck the river Indus itself in Northern Sind, took to the water, and went on to conquer the Patalene (the Indus Delta) and Surashtra (Kathiawar and Gujarat). By about 80 B. C. they had established in these provinces so firmly that they were able to turn northwards and attack the Seleucid Greek principality which still survived between the Zelum and the Hindukush. This time again the Shakas came by water and it was a naval victory on the Indus over their Greek antagonists that opened for them the way to the conqest of Taxila before 77 B. C., of Gandhara before 70 B. C., and of Kapish in the Paropamisadae before 60 B. C. While he was thus conquering the greater part of the Seleucid Greek principality in India with one hand, the Shaka warlord Maues was at the same time extending his rule in Central India by conquering Ujjain about 62 B. C., and Mathura about 60 B. C. The Euthydemid greek principality in the

Eastern Panjab, however, still held out between the Zelum and the Ravi, and both greek principalities reasserted themselves when in 58 B. C. Maues was defeated by the Malavas, lost Ujjain, and met his death."

यावरून असें दिसून येतें कीं मौएस्च्या आधिपत्याखालीं शकानीं काठेवाड, कच्छ, सिंधु, गुजराथ, माळवा, मथुरा, तक्षशिला आणि गांधार हे सारे प्रांत जिंकले होते आणि पंजाबातील ग्रीक राजाशीं त्याचीं युद्धें चालू होतीं. या सर्व प्रांतापैकीं उज्जयिनी ही प्रथम स्वतंत्र झाली आणि तिथल्या स्वातंत्र्यवीरानींच त्या शकाधिपतींच्या संहारलीलेची परिसमाप्ति केली.

## शकांचा पराजय कोणीं केला ?

इथें प्रश्न असा उपस्थित होतो कीं उज्जयिनीचा हा जय कोणीं मिळविला ? बहुतेक साऱ्या अधिकारी इतिहासकारांचें म्हणणें असें आहे कीं शकाना मालवगणानेंच जिंकलें. हें विधान करण्यापूर्वी ते कधीं असा विचार करीत नाहींत कीं माळव्यात आणि विशेषतः उज्जयिनीला तेव्हा मालगवणाची सत्ता चालत होती, अशी नुसती कल्पना करण्याला तरी कांहीं आधार आहे का ? प्रद्योताच्या काळापासून उज्जयिनीचा त्रुटित का होईना, पण इतिहास उपलब्ध आहे, तो सारा राजाचाच इतिहास आहे. पूर्वी १९३२ मध्यें भांडारकर संस्थेच्या मुखपत्रात डॉ. अद्रीश बानर्जी यानीं मालवगणाच्या उपलब्ध इतिहासाची चिकित्सा करून असें दाखवून दिलें आहे कीं खिस्तशकाब्दोच्या दुसऱ्या शतकापर्यंत तरी मालवगण हा जयपूर संस्थानाच्या दक्षिणेला आला नव्हता. ताम्रपट, शिलालेख, नाणीं इत्यादींचा व्यवस्थित अभ्यास करून त्यानीं काढलेला हा निष्कर्ष न मानण्याचें एकहि निमित्त गेल्या एका तपात तरी एकाहि इतिहासकाराला दाखविता आलें नाहीं. मग केवळ मालवगणानेंच शकाचा पराभव केला, हें निराधार विधान पुनःपुनः उच्चारण्यांत अर्थ काय ? उलटपक्षीं माझें तर म्हणणें असें आहे कीं शकाधिपति मौएस्चा मालवगणानें पराभव केला नाहीं, इतकेंच नव्हे तर मौएस्च्या पश्चात्सुद्धा तो गण स्वतंत्र झाला नव्हता. उज्जयिनी जिंकल्यावर शकानीं मथुरा घेतल्याचा उल्लेख वर आलाच आहे. उज्जयिनी गेल्यानंतरसुद्धा बरींच वर्षें शक लोक मथुरेंत राज्य करीत होते, असें राप्सन, स्टेनकोनोव, इत्यादि पाश्चात्य इतिहासकारानीं लिहिलें आहे. त्यावरून असें अनुमान निघतें कीं सिंधुनीरावरील शकांच्या प्रांतांतून मथुरेला

जाण्याच्या मार्गावरच मालवगणाचा प्रदेश असल्यानें मथुरेंत शकाचें राज्य होतें तोंवर तरी तो प्रदेश शकाच्याच हातीं राहिला होता. इतक्या चिकित्सेनंतरसुद्धा ज्याना मालवगणानेंच उज्जयिनीची लढाई जिंकली असें म्हणावयाचें असेल, त्यानीं वाटल्यास तसें म्हणावें; पण मग तो इतिहास न होता केवळ गणराज्याचा प्रचार होईल.

उज्जयिनीच्या युद्धांत गणाचा मुळींच भाग नव्हता, असें माझें म्हणणें नाहीं. " कांभोजसुराष्ट्रक्षत्रियश्रेण्यादयो वार्ताशस्त्रोपजीविनः । " असें एक सूत्र कौटिलीय अर्थशास्त्राच्या ' संघवृत्तम् ' या अधिकरणात आलें आहे. त्यावरून असें वाटतें कीं मौर्यकाळात या सुराष्ट्रसंघाचा नायनाट झाला नसला आणि शकाच्या पहिल्याच आघातानें ते जर नामशेष झाले नसले तर उज्जयिनी येथील स्वातंत्र्ययुद्धात त्यानीं नक्की भाग घेतला असेल. पण या स्वातंत्र्ययुद्धाचें नेतृत्व त्याच्याकडे नव्हतें आणि त्या युद्धातील यशाचें मुख्य श्रेयहि त्याना मिळालेलें दिसत नाहीं.

## विक्रमादित्यच शकांतक

याप्रमाणें केवळ दूरच्याच नव्हे तर निकटच्याहि गणाचा निकाल लागला म्हणजे या स्वातंत्र्ययुद्धाच्या नेतृत्वाचा मान उपलब्ध माहितीप्रमाणें तरी एकट्या विक्रमादित्याच्याच वाट्याला येतो. एवढ्या प्रश्नापुरती कालकाचार्यकथानकातील प्रासंगिक माहिती खरी आहे, असें धरून चालण्याला कोणताहि प्रत्यवाय दिसत नाहीं. ज्यानीं शकाचा राजाश्रय मिळविण्यासाठीं राष्ट्रद्रोह केला होता, त्याना शकराजानीं आपल्याशीं कृतज्ञ रहावें, याकरिता आपल्या राष्ट्रद्रोहाचा आणि मध्यंतरींच्या राज्यक्रांतीचा इतिहास जपून ठेवणें आवश्यकच होतें. त्याप्रमाणें त्यानीं तो जपून ठेविलाहि आहे. प्रभावकचरितातील कालकसूरिकथेमध्यें विक्रमासंबधीं जी माहिती आली आहे, ती मूळच्या प्राकृत कथानकातून आली आहे, हें न पाहतांच डॉ. आळतेकरानीं ती प्रक्षिप्त असल्याचा तर्क केला आहे. डॉ. आळतेकराना प्रभावकचरिताचा काळ माहीत नाहीं, कर्ता माहीत नाहीं. त्या ग्रंथातील कालकसूरिप्रबंधाव्यतिरिक्त अन्यत्रहि विक्रमानें मेदिनी अनृणा करून आपला संवत्सर चालू केल्याचे उल्लेख आहेत, हेंहि माहीत नाहीं. इतक्या अज्ञ आचार्यांनीं असल्या वादग्रस्त विषयावर लेख लिहिण्याची घाई कां करावी हेंच मला कळत नाहीं.

कालांतरेण केणाइ उप्पाडित्ता सगाण तं वंसम् ।
जाओ मालवरायो नामेण विक्कमाइच्चो ॥

पयडाविओ धराए रिणपरिहीण जण विहेउणा ।
गुरुरिथ वियरणाओ नियओ सवच्छरो जेण ।।

## परंपरागत माहितीचें महत्त्व

प्रभावकचरितातील माहिती प्रक्षिप्त ठरविण्याच्या घिसाडघाईत जैन लेखकानीं विक्रमादित्यासबधीं जी अमूल्य परपरा आतापर्यंत सरक्षून ठेवली आहे, तिचें मूल्य डॉ. आळतेकराना मुळींच कळलें नाहीं. " अनृणा मेदिनीं कृत्वाचीकरद्वत्सर निज: " या प्रभाचद्रसूरीच्या वचनानें विक्रमचरित्रावर अगदीं अभिनव प्रकाश पडतो. सर्व जनतेला अनृणी करून जर विक्रमानें आपला सवत् प्रचलित केला असेल तर त्याचा प्रारभकाल कार्तिकात असणें, नवान्नपौर्णिमेच्या पुढें असणें अगदीं स्वाभाविक आहे. कारण लोकाना अनृणी करण्याची आवश्यकता अतिशय भयकर अशा सार्वत्रिक दुर्भिक्षानतरच उत्पन्न व्हावयाची, हें उघड आहे. कार्तिकाच्या पूर्वी लोकाना अनृणी केले असतें तर शेतातील धान्य घरीं येण्यापूर्वीच्या काळात शेतकऱ्याना पुन्हा ऋण करावें लागलें असते आणि कार्तिकाच्यानतर जर लोकाना अनृणी केलें असतें तर अगोदरच सावकारानीं ऋणाच्या फेडीकरिता त्याचें धान्य नेऊन त्याच्यावर पुन्हा उपासमारीची पाळी आणली असती. सस्कृतज्ञांच्यामध्यें सामान्यत: नसणाऱ्या या व्यावहारिक दृष्टीनें विचार केला म्हणजेच विक्रमसवताचें वैशिष्ट्य स्पष्ट होतें आणि प्रभाचद्रसूरीच्या वरील वचनाची सत्यता मनाला पटते. ही कल्पना इतकी व्यावहारिक असूनसुद्धा आमच्या विद्वानाना केवळ कविकल्पनाच वाटते. तेव्हा ही कविकल्पना नसून केवळ इतिहासातील अतर्दृष्टि आहे, हें सिद्ध करण्याचा आता उपक्रम करणें प्राप्त आहे.

## कार्तिकांतील वर्षारंभ

भारतीय ज्योतिषशास्त्राच्या इतिहासात कै. दीक्षितानीं सर्व प्रकारच्या वर्षारंभांची माहिती दिली आहे. त्या माहितीवरून असें स्पष्ट दिसतें कीं विक्रमसवताच्या पूर्वी केव्हाहि कार्तिकात वर्षारभ नव्हता आपल्या ग्रथाच्या ३८५ पानावर ते लिहितात—" कार्तिकात सवत्सरारंभ पुष्कळ प्राचीन दिसतो. सूर्यसिद्धान्तात ते वर्षारंभ आहे. विक्रमकालाच्या आरभापासून तो उत्तरहिंदुस्थानात असावा असें दिसतें. " विक्रमापूर्वी कार्तिकात वर्षारभ होता, हें सिद्ध झालें तर माझें अनुमान लगडें पडेल. पण तसें घडण्याचा सभव फार थोडा आहे. कारण सूर्यसिद्धान्ताचा काळ विक्रमाच्या पूर्वीचा आहे, असें सिद्ध झालें तरच तत्पूर्वी कार्तिकात वर्षारभ

होता, असें सिद्ध होण्याचा संभव आहे. सूर्यसिद्धान्ताच्या काळासंबधीं के. दीक्षितानीं आपल्या ग्रंथाच्या १६८ पानावर लिहिलें आहे. "पाच सिद्धान्ताचा विचार वर झाला, त्यात त्याच्या कालाचा विचार झालाच आहे. कालानुक्रमानें त्याचा क्रम असा होतो—पैतामह, वासिष्ठ, पौलिश, सौर, रोमक. यात रोमक हा शककालाच्या पूर्वीचा होय आणि बाकीचे त्याच्यापूर्वीचे होत, असें मला वाटतें." यांपैकीं पौलिश सिद्धात ग्रीक ग्रंथावरून हिंदूनीं घेतला असल्याचें अल्बेरुणीनें लिहिलें आहे. तेव्हा त्याचा काळ बहुधा खि. पू. १५० च्या सुमाराचा असावा. त्यानंतर सुमारें एका शतकानें सूर्यसिद्धात आणि खिस्ताच्या पाहिल्या शतकात रोमक सिद्धात झाले असावेत, असें अनुमान केल्यास तें अगदींच अयुक्तिक ठरणार नाहीं, अशी आशा आहे.

## आदिसूर्यसिद्धांत विक्रमकालीन

वर सुचविलेले काळ मान्य केले म्हणजे सूर्यसिद्धाताचा कर्ता हा विक्रमादित्याचा समकालीन होतो. सूर्यसिद्धाताचा वर्षारंभ विक्रमसंवताच्या वर्षारंभाशीं जुळतो, या वस्तुस्थितीमुळेंहि ज्योतिषाच्या क्रमविकासावरून काढलेलें अनुमान दृढतर होतें. विक्रमराजा सूर्योपासक होता हें 'सूर्योपस्थानात्प्रातिनिवृत्त माम्' या विक्रमोर्वशीयातील उल्लेखानें सूचित होतें. सूर्यप्रभववंशावर त्यानें कालिदासाकडून काव्य लिहविलें, ही गोष्ट तर सुप्रसिद्ध आहे. पौलिशासारखे म्लेंच्छ सिद्धांत मारून टाकण्याकरिता त्यानें करविलेल्या ग्रंथाला सूर्यसिद्धात हें नाव देणें अतिशय उचित आहे. विक्रमाचा समकालीन रोमन सेनापति जो ज्यूलियस सीझर, तोहि याच वेळीं रोममध्यें पंचागसुधारणा घडवून आणीत होता. अर्वाचीन महाराष्ट्रांत शिवाजी राजा पंचवीस वर्षांचाहि झाला नव्हता, अशा वेळीं त्यानें कृष्ण नावाच्या एका देशस्थ ब्राह्मणाकडून 'करणकौस्तुभ' हा ग्रंथ शके १५७५ मध्यें करविला. हिंदूच्या अवनतीच्या काळात शिवाजीला जी सुगम, दृग्गणितैक्यविधायि करणग्रंथ करविण्याची कल्पना सुचली, ती कल्पना "ख्यातिं कामपि कालिदासकविता नीता शकारातिना।" अशी ज्याची प्रसिद्धि आहे, त्या सुसंस्कृत सम्राटाला सुचली नसेल, असें समजणें म्हणजे केवळ स्वतःच्या मनाचा कोतेपणा आणि परधार्जिणेपणा व्यक्त करणें आहे.

## शाकुंतलांतील सूचक प्रसंग

विक्रमानें लोकांना अनृणी केलें, या प्रसंगाच्या स्मरणार्थ कालिदासानें

शाकुन्तलाच्या पहिल्या अंकांत एक सूचक प्रसंग घातला आहे. " वृक्षसेचने द्वे धारयसि मे । एहि तावत् । आत्मानं मोचयित्वा गमिष्यसि । " असें म्हणत प्रियंवदेनें शकुन्तलेला बलानें परतविली असता राजानें ' तदहमेनामनृणां करोमि ' असें आश्वासन देऊन हातातील अगठी देऊ केली. लोक समजतात तितकी कवींची कल्पना स्वतंत्र नसते आणि राजकर्त्यांची तर नसतेच नसते. पुन्हा राजांच्या औदार्यासंबधींच्या प्राचीन उज्जयिनींतील प्रेक्षकाच्या कल्पना आजच्या प्रेक्षकांच्या कल्पनाइतक्याच कोत्या असत्या तर त्याना हा प्रसंग कालिदासाच्या हीन अभिरुचीचा द्योतक वाटला असता. या दोन्ही कारणाकरिता मला असें वाटतें कीं जैन परपरेवरून विक्रमाविषयीं जी माहिती उपलब्ध झाली आहे, तिला शाकुन्तलातील वर उल्लेखिलेल्या प्रसंगामुळे पुष्टि मिळते.

प्रस्तुत लेखाच्या बाबतींत स्थळ आणि काळ यासबधीं सपादकांनीं घालून दिलेल्या मर्यादांचें आता उल्लघन होत असल्याने—

" महिमानं यदुत्कीर्त्य तव संन्हियते वचः ।
श्रमेण तदशक्त्या वा न गुणानामियत्तया ।। "

असा कालिदासाच्या शब्दात सम्राट् विक्रमादित्याचा तात्पुरता तरी निरोप घ्यावा हें चागलें.

## टीपः– यथा यक्षस्तथा बलिः

या प्रकरणात कालिदासाच्या काव्यातून विक्रमादित्याच्या इतिहासाचे संदर्भ शोधून दाखविताना कवीच्या कवितेचे हाल झाले आहेत, असें अनेकांना वाटेल. पण गुप्तकालवाद्यानीं कालिदासकवितेवर केलेल्या अत्याचाराची ही केवळ अत्यल्प प्रतिक्रिया आहे; हें लक्षात ठेवूनच वाचकांनीं प्रस्तुत प्रबधाचा विचार करावा. हा प्रबध १९४४ च्या जानेवारींत जसा लिहिला, तसाच इथें छापला आहे. विक्रमद्विसहस्राब्दीच्या ग्रथात त्याच्या अस्तित्वाचें समर्थन करून पैसे मिळवावेत आणि नंतर करदीकराशीं वाद करतांना ख्रिस्तकालापूर्वीं विक्रमादित्य राजा अभावानेंच अस्तित्वांत असल्याचा वाद माडावा, असले महामहोपाध्यायाचे धंदे मी केले नाहींत, एवढेच मला समाधान आहे.

---

प्रकरण सहावें

# कालकाचार्य कथानकाची विश्वसनीयता

## कालकाचार्य कथेचें ऐतिहासिक महत्त्व

कालकाचार्य कथानकाची ऐतिहासिक उपयुक्तता प्रथम कै. डॉ. भाऊ दाजी याच्या लक्षांत आली आणि त्यानीं १०-१०-१८६७ या दिवशीं मुबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या शाखेंत या कथानकावर एक महत्त्वाचा प्रबध वाचला. त्यानतर अमेरिकेचे एक सशोधक मि. नॉर्मन ब्राऊन यानीं कालकाचार्यचरित्रावर लिहिलेले अनेक सस्कृतप्राकृत प्रबध शोधून त्याची एक सटीक आणि सचित्र आवृत्ति प्रसिद्ध केली. या आवृत्तीमुळें त्या कथानकातील ऐतिहासिक तथ्य समजणें पुष्कळच सुलभ झालें आहे. पण त्याच्या परिश्रमाचा अजून इतिहासज्ञानीं करावा तसा उपयोग करून घेतला नाहीं. त्यामुळें विक्रमपूर्वकालीन इतिहासावर या प्रबंधानें किती अपूर्व प्रकाश पडतो, याची कोणालाच अजून कल्पना आलेली नाहीं. ही कल्पना येण्याकरिता प्रथम या कथानकाचा साराश देऊन मग त्यातील ऐतिहासिक भाग प्रत्यतर पुराव्यानें कसा सिद्ध होतो, ते दाखविण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

## कथानकाचा सारांश

मगधामध्यें वज्रसिंह नावाचा राजा होता आणि त्याला सुरसुदरी नावाच्या राणीपासून कालक नावाचा पुत्र आणि सरस्वती नावाची कन्या अशीं दोन अपत्यें झालीं होतीं. यापैकीं कालकाला गुणसुदर नावाच्या सूरीनें जैनधर्माची श्रावक दीक्षा दिली. पुढें कालकाचार्यानें आपल्या बहिणीलाहि तीच दीक्षा देऊन श्राविका बनविलें. सरस्वती श्राविका झाल्यानंतर तिला घेऊन सचार करीत करीत कालकाचार्य अवती नगरीला आला. या नगरींत तेव्हां गर्दभिल्ल नावाचा राजा राज्य करीत होता. तो एके दिवशीं सध्याकाळीं फिरावयास गेला असता त्यानें कालकाचार्यांच्या मठांत झाडाना पाणी घालणाऱ्या सरस्वतीला पाहिलें. तेव्हा राजाला तिचा मोह पडून त्यानें सरस्वतीला बळाने ओढून अतःपुरात नेलें.

ही वार्ता कालकाचार्याला समजल्यावर त्यानें आपल्या बहिणीला सोडण्यासाठीं राजाची परोपरीनें विनवणी केली. नगरातील प्रतिष्ठित जनाना मध्यस्थीला घातलें. पण कालकाच्या विनवण्याना आणि जैन नागरिकाच्या मध्यस्थीला राजानें भीक घातली नाहीं. आपले सारे प्रयत्न व्यर्थ झालेले पाहून कालक वेड्यापिशाप्रमाणें वागू लागला आणि राजधानीभर राजाची निंदा करीत भ्रमू लागला. त्याची करुणास्पद अवस्था पाहून मन्त्र्यानीं सरस्वतीला कालकाच्या स्वाधीन करण्याचा राजाला उपदेश केला. पण तिकडे त्यानें मुळींच लक्ष दिले नाहीं. सरतेशेवटीं हताश होऊन कालकाचार्य सिंधु नदी ओलांडून शकाच्या देशात गेला.

## गर्दभी विद्या

शकाच्या देशात गेल्यावर ज्योतिषविद्येच्या प्रभावानें कालकानें शकाच्या एका टोळीच्या मुख्यावर चागलीच छाप पाडिली आणि तो त्याच्या आश्रयाला राहिला. पुढे काहीं दिवसानीं या शकपतीवर आणि त्याच्यासारख्याच आणखी ९५ टोळ्याच्या मुख्यावर शक सम्राटाचा रोष झाला. तेव्हा त्याच्या तावडींतून सुटण्यासाठीं कालकाचार्यांच्या सागण्यावरून ते सिंधु ओलाडून हिंदुस्थानात शिरले आणि प्रथम सुराष्ट्र जिंकून नतर त्यानीं अवतीवर चढाई केली. तेव्हा शकाना आपल्या राज्याच्या सीमेवरच अडविण्याचा गर्दभिल्ल राजानें प्रयत्न केला. पण त्याच्या सैन्यानें कच खाल्ल्यामुळे त्याला उज्जयिनीपर्यंत माघार घ्यावी लागली. पुढें उज्जयिनीचा वेढा चालू असताना एक दिवशीं गर्दभिल्ल राजा आपल्या शत्रुवर गर्दभी विद्येचा प्रयोग करणार अशी कालकाचार्याला शका आली. तेव्हा त्यानें शकातील शब्दवेधी धनुर्धराना निवडून गर्दभीचा शब्द ज्या दिशेनें येईल, तिकडे बाणाची वृष्टि करण्याची सूचना दिली. कृष्णाष्टमीला म्हणे गर्दभिल्ल राजाला गर्दभी विद्या वश होत होती आणि तिनें गर्दभीचें रूप घेऊन गर्दभध्वनि आरभिला कीं शत्रुसैन्यांतील योद्धे गर्भगळित होऊन प्राणत्याग करीत असत. त्या दिवशीं अपेक्षेप्रमाणें गर्दभीची गर्जना चालू होताच कालकाच्या शब्दवेधी शकानीं अचूक बाणवृष्टि करून गर्दभीचें तोंड बाणानीं भरून टाकिलें. त्यामुळें तिला मुळीं गर्जनाच करिता येईना. क्रोधातिरेकानें ती गर्दभी विद्या गर्दभिल्ल राजाच्या शिरावर आपल्या लघु आणि दीर्घ शकाचें विसर्जन करून निघून गेली आणि मग असहाय पडलेल्या राजाला शकानीं पकडून कालकाकडे नेलें. कालकाचार्यानें म्हणे त्याची कठोर निर्भर्त्सना करून त्याला सोडून दिलें. पुढें राजा रानावनात भटकताना

वाघाच्या भक्ष्यस्थानीं पडला. यानतर सरस्वती पुनश्च श्राविका बनली आणि कालकानेंहि आपल्या धर्मलोपाचें प्रायश्चित्त घेऊन पुन्हा श्रावकधर्माचें प्रतिपालन करण्याला प्रारभ केला. अशी एकंदरीनें गर्दभिल्लाचा शत्रु असलेल्या कालकाचार्याची कथा आहे. याव्यतिरिक्त आणखीहि कालकाचार्य जैनांत होऊन गेले. पण त्यांचीं चरित्रें भिन्न आहेत.

## गर्दभी विद्येची सत्यता

वरील कथानकांतील सर्वांत विक्षिप्त कल्पना ही सर्वांत अधिक विश्वसनीय पुराव्यानें सिद्ध होण्याजोगी आहे, हें पाहून वाचकाना नवल वाटल्यावाचून राहणार नाहीं. या कथानकातील गर्दभीविद्या एके काळीं खरीच अस्तित्वात होती आणि खि. पू. पहिल्या शतकात तिचा युद्धात उपयोग केला जात असे, हें प्लूटार्ककृत क्रास्सुसच्या चरित्रावरून मला कळून आलें. क्रास्सुस हा ज्यूलियस सीझरचा समकालीन रोमन सेनापति होता आणि इराण जिंकण्याचा प्रयत्न करीत असतांना खि पू. ५३ या वर्षीं इराणच्या सैन्याकडून वेढला जाऊन तो मारला गेला. या सग्रामात इराणचे राज्यकर्ते जे पार्थव, त्यानीं गर्दभी विद्येचा प्रयोग केला, हें प्लूटार्कनें पुढील उताऱ्यात वर्णिलें आहे.

"The Parthians do not encourage their men to fight with the sound of a horn, neithar with trumpets, nor hautboys but with great kettledrums hollow within and about them they hang little bells and copper rings and with them they all make a noise every where together, and it is like a dread sound mingled as it were with the *braying* or bellowing of a wild beast, and a fearful noise as it thundered, knowing that hearing is one of the senses that soonest moves the heart and spirit of any man and makes him soonest beside himself."

प्लूटार्कच्या वरील उताऱ्यावरून असें सिद्ध होतें कीं खि. पू. ५३ च्या सुमाराला इराणचे सम्राट् युद्धामध्यें रणभेरींच्या गर्दभी निनादानें शत्रूना गर्भगळित करण्याचा प्रयत्न करीत असत. याच घटनेला अलौकिक स्वरूप देऊन जैनानीं उज्जयिनीच्या राजाला गर्दभी विद्या साध्य झाल्याची कथा लिहिली आहे. रणभेरीरूपी गर्दभीवर बाणाचा नेमका प्रयोग झाला म्हणजे तिच्या गर्जना स्वाभाविकपणेंच

थांबतात. यामुळें ही क्लृप्ति युद्धात फार दिवस वापरणें शक्यच नव्हतें. खि. पू. पहिल्या शतकात ती इराणात आणि अवतींत वापरल्याचे दोन उल्लेख आपल्याला आता माहीत झाले आहेत. त्यानतर लवकरच ती प्रचारातून गेली असावी.

## सरस्वतीहरणाचें ऐतिहासिकत्व

कालकाचार्य कथानकातील कथादृष्ट्या सर्वांत महत्त्वाचा प्रसग अर्थात् सरस्वतीहरणाचा प्रसंग होय. सरस्वती ही श्राविका झाल्यानंतर उज्जयिनींतील गर्दभिल्ल राजाच्या दृष्टिपथात आली आणि त्यानें तिला बळानें आपल्या अत:पुरात नेली. यासंबधीं काहीं प्रत्यतर पुरावा मिळतो कीं नाहीं, याचा शोध करीत असता कै. डॉ. भाडारकराच्या समग्र ग्रथाच्या दुसऱ्या खडात २८१ पानावर पुढील उल्लेख सापडला. “ The sucession-list of High-Priests of the Saraswatigachha of the Balatkargana of the Mulasangh belonging to the line of Kundakundacharya is thus given. ” या अवतरणातील ‘ सरस्वतीगच्छ ’ आणि ‘ बलात्कारगण ’ हे दोन शब्द अतिशय महत्त्वाचे आहेत. यापैकीं दुसरा शब्द जैन धर्मांतील एका पथाचा वाचक असल्यानें त्याचा अर्थ बलात्कारप्रतिकारक गण असा करणें योग्य होईल. या बलात्कारगणाची सरस्वती ही एक शाखा होती, हें वाचताक्षणीं कालकाचार्यभगिनी सरस्वतीचा सारा इतिहास आठवल्यावाचून राहत नाहीं. या सरस्वतीगच्छाचा एक गुरु कुदकुदाचार्य हा खिस्ताब्दाच्या पहिल्या शतकांत होऊन गेला, अशी जैनाची परपरागत माहिती आहे. त्याच्या आधीं खि. पू. ५३ या वर्षींहि सरस्वतीगच्छ अस्तित्वांत होता, असें डॉ. राधाकुमुद मुखोपाध्यायाच्या चंद्रगुप्तचरित्रावरून कळतें. जैनगुरु भद्रबाहु हा मौर्य चद्रगुप्ताचा गुरु होता कीं नाहीं, या प्रश्नाची चर्चा करताना त्यानीं म्हटलें आहे, “ It may be noted that Fhleet considered Bhadrabahu of inseription No. 1 as Bhadrabahu II mentioned in the Saraswatigachha pattavali as becoming pontif in 53 B. C. ” या वाक्यावरून इतकें कळून येतें की बलात्कारगणाचा सरस्वतीगच्छ खि. पू. ५३ या काळीं अस्तित्वात होता आणि भद्रबाहूसारख्या नामांकित व्यक्तीकडे त्याचें नेतृत्व होतें. या श्रुतिविरहित सरस्वतीगच्छाची तत्कालीन प्रतिष्ठा लक्षात घेऊनच कालिदासानें शाकुतलाच्या अंतीं ‘ सरस्वती श्रुतिमहता महीयताम् ’ अशी प्रार्थना केली असावी, असें वाटतें.

## कालकाचार्यांचा कालनिर्णय

आतापर्यंत जैन धर्माच्या इतिहासात कालकाचार्यभगिनी सरस्वती हिचें महत्त्व काय होतें आणि तिच्या नावानें ओळखिल्या जाणाऱ्या शाखेच्या गुरुपरंपरेवरून तिचा काळ कसा ठरतो, याचा विचार झाला. आता जैनांच्या दिगंबर आणि श्वेतांबर या पंथांच्या इतिहासावरून कालकाचार्यकथा केव्हां घडून आली असावी, याचा विचार केला पाहिजे. दिगंबर आणि श्वेतांबर या पंथांच्या कलहाला खि. पू. ३०० च्या सुमाराला प्रारंभ झाला आणि खिस्ताब्दाच्या पहिल्या शतकात हे दोन पंथ परस्परांपासून पूर्णपणें विभक्त झाले. चंद्रगुप्त मौर्यांच्या काळात जैन गुरूंपैकीं कित्येकांना शुभ्र वस्त्रें वापरू लागलीं. पुढें चंद्रगुप्ताचा पणतू संप्रती याच्या काळात अवंती देशात श्वेतांबरांचें वर्चस्व झालें म्हणून दिगंबर मुनि दशार्ण देशीं गेले, अशी माहिती प्रभावकचरित्रात आढळते. 'या देशात कावळे फार असल्यानें हंस तेथें थोडाच वेळ राहतात,' हें कालिदासानें मेघदूतात केलेलें वर्णन दिगंबर आणि श्वेतांबर यांच्या कलहांना उद्देशून असावें, अशी शंका येते. शुभ्र वस्त्रें पचनीं पडल्यानंतर मग बौद्धांच्या अनुकरणानें स्त्रियांना श्राविका दीक्षा देण्याची प्रथा प्रचलित झाली असावी. कालकाचार्य मगधांतून अवंतीकडे आला होता, या परंपरागत माहितीवरून वरील कल्पनेला पाठिंबा मिळतो. स्त्रियांना दीक्षा देण्याच्या श्वेतांबरांच्या आग्रहामुळेंच दिगंबरांनीं खिस्ताब्दाच्या पहिल्या शतकात त्यांचा संबंध संपशेल तोडला. दिगंबर पंथाचें असें स्पष्ट मत आहे कीं स्त्रियांना मोक्ष मिळणें शक्य नाहीं. यामुळें त्या पंथात रमणींना श्राविकेची दीक्षा देत नाहींत, असें रॅप्सनसंपादित हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासात स्पष्ट सांगितलें आहे. स्त्रियांना परिव्राजिकेची दीक्षा देणाऱ्यांना शिक्षा करावी, असें कौटिल्यानें आपल्या अर्थशास्त्रात लिहून सांगितलें आहे. या आज्ञेप्रमाणेंच शुंग सम्राट् वर्तन करीत असावेत, असें त्यांच्या एकंदर इतिहासावरून वाटतें. अशी सारी पूर्वेतिहासाची चिकित्सा केली म्हणजे शुंगांच्या अस्तानंतर लवकरच श्वेतांबरांनीं स्त्रियांना श्राविका दीक्षा देण्याला प्रारंभ केला असावा, असें वाटतें. हा काळ खि. पू. पहिल्या शतकाचाच येतो. यावरून कालकाचार्यांची भगिनी सरस्वती ही अगदीं आरंभीच्या श्राविकांपैकीं असावी, असें दिसून येतें. यावरून कालकाचार्य कथानकातील सरस्वतीच्या कथेची विश्वसनीयता व्यक्त होते.

## विक्रमपित्याचें निरपराधित्व

या सरस्वतीहरणाच्या प्रकरणात विक्रमाचा पिता गर्दभिल्ल सर्वस्वीं निर्दोषी

होता, असें सिद्ध करण्याकरता कालिदासानें शाकुंतलाचा बराचसा भाग खर्ची घातला आहे, त्यावरून कालकाचार्यविरोधी पक्षाला त्या घटनेचें ऐतिहासिकत्व मान्य होतें, असें स्पष्ट दिसतें. विक्रमपित्याच्या या कृत्याविषयीं हिंदु आणि जैन यांच्यात मतभेद असणें स्वाभाविक आहे. पण त्या मतभेदावरूनच त्या घटनेची सत्यता सिद्ध होते. गर्गसंहितेंतील युगपुराणातहि एका अतिसुंदर स्त्रीवरून कलह होऊन एका राज्याचा विनाश झाल्याची माहिती आढळते. या माहितींत बहुधा सरस्वती प्रकरणाचाच प्रतिध्वनि उमटला असावा. विक्रमपित्यानें आपल्या राज्याचा त्याग केल्याची कथा बृहत्कथामंजरी आणि कथासरित्सागर यांच्यातूनहि आढळते. तो राज्यभ्रष्ट झाला होता, असें सांगण्याचाच हा एक पर्याय आहे. या सर्व उल्लेखांचा आणि एकंदरीनें तत्कालीन ऐतिहासिक परिस्थितीचा विचार केला असता कालकाचार्य कथानकातल्या उज्जयिनींतील राज्यक्रांतीच्या कथेची रूपरेखा पुष्कळशी विश्वसनीय असावी, असें वाटतें.

## सरस्वतीचा कुषाणकालीन पुतळा

सरस्वतीसंबंधींच्या आणखी एका उल्लेखाचा विचार करावयाचा राहून गेला. लखनौचे श्री. बैजनाथपुरी—ज्यांना त्यांच्या कुषाणकाळाच्या अभ्यासावरून कुषाणपुरी असेंहि नामाभिधान प्राप्त झालें आहे—यांनीं ‘ कुषाणकाळातील जैनांच्या शाखा ’ या लेखांत असें सांगितलें आहे कीं, त्या युगांतील शिलालेखांत वर्धमान, शांतिनाथ, पार्श्वनाथ इत्यादींच्या प्रमाणेंच सरस्वतीचाहि पुतळा उभारण्याकरिता धार्मिक वृत्तीच्या जैनांनीं देणग्या दिल्याचें वर्णन आढळतें. सामान्यतः पुतळे हे आपण मानवी व्यक्तींच्या सन्मानार्थ उभारितों. या सामान्य नियमावरून आणि सरस्वतीसह उल्लेखिलेल्या वर्धमान, शांतिनाथ, पार्श्वनाथ या साऱ्या मानवी व्यक्तिच असल्यानें त्यांच्यासहच उल्लेखिलेली सरस्वती हीहि मानवीच होती, देवता नव्हती, हें स्पष्टपणें दिसून येतें. यावरूनहि कुषाणकाळाच्या पूर्वीं सरस्वती होऊन गेली होती, असें सांगता येतें.

प्रकरण सातवें

# कालिदासाच्या ग्रंथांतून विक्रमादित्य

## विक्रमवर्णन

कालिदास हा विक्रमादित्याचा राजकवि असल्यानें त्याच्या ग्रथातून उघडपणें किंवा व्यंजनेनें आपल्या आश्रयदात्याविषयींचे उल्लेख येणें स्वाभाविक आहे. असले सारे उल्लेख एकत्रित केले असता आपल्याला विक्रमादित्याविषयीं थोडीफार समकालीन माहिती मिळू शकते. विक्रमादित्याविषयीं उघडपणें लिहावयाची संधि कालिदासाला 'रघुवशा'च्या इदुमतीस्वयवर प्रकरणात मिळाली आणि तिचा त्यानें योग्य उपयोग करून घेतला आहे. या स्वयवराच्या प्रसगीं इदुमतीला अवतिनाथाकडे नेल्याचे वर्णनसुद्धा सूचक आहे.

**ततःपरं दुष्प्रसह द्विषद्भिर्नृपं नियुक्ता प्रतिहारभूमौ ॥**
**निदर्शयामास विशेषदृश्यमिंदुं नवोत्थानमिवेंदुमत्यै ॥ ३१ ॥**

त्यानतर 'शत्रूना दुःसह पण नवोदित चद्राप्रमाणें अवश्य दर्शनीय' अशा अवतिनाथाकडे सुनदेनें इदुमतीचें लक्ष वेधलें. या श्लोकावरून अवतिनाथानें नुकतांच आपल्या शत्रूचा काटा काढला होता आणि त्याचा स्वतःचा नवीनच उदय झाला होता, या महत्त्वाच्या गोष्टी कळून येतात. यापुढील श्लोक अतिशयच महत्त्वाचा आहे.

अवतिनाथोयमुदग्रबाहुर्विशालवक्षास्तनुवृत्तमध्यः ॥
आरोप्य चक्रभ्रममुष्णतेजास्त्वष्ट्रेव यत्नोल्लिखितो विभाति ॥

या वर्णनावरून, अवतिनाथाचे हात लाब, छाती रुद आणि कटि आटोपशीर होती, इतकी माहिती तर काव्यातील व्यजना न कळणाऱ्यानासुद्धा मिळू शकेल. या श्लोकाच्या उत्तरार्धात कालिदासानें असें सागितलें आहे कीं, त्वष्ट्यानें चाकावर घासून ज्याचा ओबडधोबडपणा नाहींसा केला होता अशा सूर्याप्रमाणें तो अगदीं रेखीव दिसत होता. या वर्णनातील **चक्रभ्रम** आणि **त्वष्टा** हे दोन शब्द विशेष महत्त्वाचे आहेत. या दोन शब्दांपैकीं पहिल्या शब्दानें कालिदासाला असें सुचवावयाचें

आहे कीं, दैवचक्राच्या फेऱ्यांचा अवंतिनाथाला पूर्ण परिचय होता आणि हा परिचय त्याला शाकद्वीपांत म्हणजे जेथें त्वष्टयानें सूर्याला चाकावर घालून फिरविलें होतें, त्याच शकस्थानांत झाला होता. जेव्हां विक्रमाच्या पित्याचा पराजय करून शकांनीं उज्जयिनी नगरी जिंकली, तेव्हा शिप्रा नदीच्या खोऱ्यातील एकचतुर्थांश लोकाना त्यांनीं दास करून बॅक्ट्रिया प्रांतात म्हणजे शकस्थानात नेलें, अशी माहिती गर्गसंहितेंतील युगपुराणाच्या आधारानें डॉ. जायस्वाल यांनीं आपल्या नागवाकाटक-कालीन इतिहासात दिली आहे. इतक्या लोकाबरोबर विक्रमालाहि शकांनीं धरून नेणें असंभवनीय नाहीं. हा तत्कालीन इतिहास लक्षात घेतला म्हणजे कालिदासानें केलेल्या अवंतिनाथाच्या वर्णनातील खरें स्वारस्य व्यक्त होतें आणि इंदुमती-स्वयंवरात वर्णिलेला अवंतिनाथ शक असला पाहिजे, या कुलगुरु केदाराच्या कल्पनेचा फोलपणा प्रकट होतो. येथे प्रसंगानुरोधानें हेंहि सांगून ठेविलें पाहिजे कीं नागपूर विश्वविद्यालयाच्या नियतकालिकातून १९३९ आणि १९४० या वर्षी प्रसिद्ध झालेला कुलगुरु केदाराचा कालिदासावरील प्रबंध अतिशय चिकित्सक-पणानें लिहिलेला असल्यानें त्याचा आधार प्रस्तुत प्रबंधात अनेकदा घ्यावा लाग-णार आहे. पण कुलगुरु केदारानाहि प्रसंगविशेषीं डुलकी लागते म्हणून तितक्या-पुरतीच मला त्याची विरोधभक्ति करावी लागते !

असो, सुनंदेच्या भाषणातील यापुढच्या श्लोकात अवंतिनाथाच्या घोडदळाचें वर्णन आलें आहे. विक्रमकालीन युद्धशास्त्राचा विचार करिताना त्या श्लोकाची चिकित्सा करिता येईल. त्यानंतरच्या श्लोकात महाकालाच्या मंदिरासंनिध अवंति-नाथाचा निवास असल्याचा उल्लेख आला आहे. खरें म्हणजे या उल्लेखानें कालि-दासाच्या काळीं उज्जयिनीला राजाच नव्हता, असें म्हणणाऱ्याच्या जिव्हा लुळ्याच पडल्या पाहिजेत. पण विदिशेप्रमाणें उज्जयिनीचें कालिदासानें राजधानी म्हणून वर्णन केलें नसल्यामुळें असल्या संशयात्म्याच्या शंकाना अवसर सापडतो. भारतीय परंपरेपासून भ्रष्ट झालेल्या या संशयात्म्याना ही गोष्ट माहीत नाहीं कीं उज्ज-यिनीचा खरा राजा महाकालच आहे. आजपर्यंत उज्जयिनीला जे जे हिंदु राजे होऊन गेले किंवा आज विद्यमान आहेत, ते सारे आपल्याला महाकालाचे अंकित मानीत असत आणि अजूनहि मानतात. कालिदासासारख्या निष्ठावंत महाकाल-भक्ताला ही वस्तुस्थिति माहीत असल्यानें उज्जयिनीला राजधानी हे विशेषण लावून महाकालाचा अपमान करण्याचा अप्रयोजकपणा त्याच्या हातून होणें अशक्य होतें. या एकाच कारणाकरता त्यानें उज्जयिनीचें राजधानी म्हणून वर्णन केलेलें

नाहीं. असो, अवंतिनाथाला उद्देशून लिहिलेल्या शेवटच्या श्लोकात त्याला 'प्रतापसशोषितशत्रुपंक ' हे विशेषण लावून आपण विक्रमादित्याला उद्देशूनच लिहीत आहोत, असें जवळ जवळ स्पष्ट शब्दात कालिदासानें सागून टाकलें आहे. या सर्व विवेचनावरून इंदुमतीस्वयंवरवर्णनातील अवंतिनाथाच्या वर्णनाचे श्लोक, हें पहिल्या विक्रमादित्याचें पहिलेंच शब्दचित्र आहे, हें उघड होतें. तेव्हा या श्लोकांची अधिक चिकित्सा करण्याची आवश्यकता दिसत नाहीं.

## ' विक्रमोर्वशीयम् 'मधील इतिहास

विक्रमादित्याच्या ज्या विक्रमामुळें कालिदासाचें मन त्याच्यावर अगदीं मोहून गेलें होतें, तो विक्रम म्हणजे उज्जयिनी नगरीची शकापासून मुक्तता आणि पुनःप्रतिष्ठा होय. ' विक्रमोर्वशीयम् ' नाटक हें वस्तुतः विक्रमाच्या उज्जयिनी-विजयावरील रूपकच आहे, अशी अतिशय मार्मिक कल्पना कुलगुरु केदारांनीं केली असून ती मलाहि बहुतांशीं मान्य आहे. ते म्हणतात कीं उर्वशीचें लतेंत रूपांतर होण्याचा ' विक्रमोर्वशीया 'तील प्रसंगसुद्धां कालिदासाला शकाच्या राजवटींत उज्जयिनीचें अरण्यात रूपांतर झालेले पाहूनच सुचला असला पाहिजे. कुलगुरूंची ही कल्पना यथार्थ असल्याचा एक पुरावा ' रघुवंशा 'तहि सापडतो. रघूच्या सोळाव्या सर्गात रामाच्या परलोकप्रयाणामुळें ओसाड पडलेली अयोध्या नगरी परत कुशानें वसविल्याचें जें वर्णन आलें आहे, तें वर्णनसुद्धा कालिदासानें, पित्याच्या मृत्यूनंतर ओस पडलेली उज्जयिनी विक्रमानें पुन्हा वसविली, या समकालीन घटनेला अनुलक्षूनच लिहिलें आहे. ओस पडलेली अयोध्या नगरी कुशानें परत वसविल्याची कथा ' रघुवंशा ' व्यतिरिक्त अन्यत्र कोठेंहि आलेली नाहीं. इतकेंच नव्हे तर कालिदासाची ही कथा रामायणातील उल्लेखाच्या विरुद्धहि आहे.

अयोध्यापि पुरी रम्या । शून्या वर्षगणान् बहून् ।।
ऋषभं प्राप्य राजानम् । निवासमुपयास्यति ।। ( ७-१११-१० )

या रामायणातील कथेंत कालिदासानें जो बदल केला आहे, तो केवळ महेंद्रादित्याच्या पुत्रानें उज्जयिनीची पुनःप्रतिष्ठा केल्याची कथा चिरंतन करण्याच्या उद्देशानेंच केला आहे. ' स्वदेशे पूज्यते राजा ' म्हणजे राजे लोकाना त्याच्या राज्याबाहेर कोणीहि विचारीत नाहींत, या वस्तुस्थितीची संस्कृत कवींना अतिशय चागली जाणीव असल्यानें त्याना समकालीन घटनांचीं वर्णनें करिताना नेहमीच या वाम्मार्गाचा अवलंब करावा लागत असे. सोळाव्या सर्गात अयोध्या नगरीच्या

अधिष्ठात्री देवतेनें केलेलें आपल्या विपरीत परिस्थितीचें वर्णन रामाच्या अयोध्येला लागू पडत नसून कालिदासकालीन उज्जयिनीलाच लागूं पडतें. उदाहरणार्थ—

निशासु भास्वत्कलनूपुराणाम् । यः सचरो ऽ भूदभिसारिकानाम् ।।

हें बाराव्या श्लोकातील वर्णन रामायणातील अयोध्या-वर्णनाच्या अगदी उलट आहे.

सर्वे नराश्च नार्यश्च । धर्मशीलाः सुसयताः ।।
मुदिताः शीलवृत्ताभ्याम् । महर्षय इवामलाः ।। ( १-६-९ )

या एका विसगतीवरूनहि कालिदास अयोध्येचें नांव वापरीत असला तरी वर्णन मात्र उज्जयिनीचेंच करीत होता, याविषयीं मनाची निश्चिति होते. आपल्या नाण्यावरसुद्धा स्वतःचें नाव न घालिता उज्जयिनीचें नाव घालणाऱ्या अवंति-नाथानाच सोळाव्या सर्गात वर्णिल्यासारखा आपल्या नगरदेवतेचा साक्षात्कार झाल्याचें वर्णन करण्यात स्वारस्य आहे, ही गोष्ट लक्षात घेऊनच कालिदासानें तो सर्ग लिहिलेला आहे. याच ठिकाणीं उज्जयिनीच्या नाण्यांचीहि माहिती सागून टाकणें सोयीचें होईल. त्या नाण्यावर एका बाजूला ' उज्जयिनी ' हीं अक्षरें असत आणि उलट बाजूला सर्गस्थितिप्रत्यवहारहेतु अशा महाकालाची त्रिशिर पण दोनच हाताची मूर्ति असे. उज्जयिनीचा राजा महाकाल मानला जातो, असें जें वर सागितलें आहे, त्याचा हाहि एक पुरावा होऊ शकेल.

## कलिंगेतिहासाचा संदर्भ

इदुमतीस्वयवरवर्णनातील आणखी एका श्लोकात विक्रमसमकालीन इति-हासाचा सदर्भ असावा, असें प्रयागच्या श्री. क्षेत्रेशचद्र चट्टोपाध्यायानीं सुचविलें आहे आणि त्याची सूचना मलाहि विचारार्ह वाटते. कलिंगराजाला माळ न घालता इदुमती कशी परतली हें सागताना कालिदास म्हणतो,

तस्मादपावर्तत दूरकृष्टा । नीत्येव लक्ष्मीः प्रतिकूलदैवात् ।।

' राजनीतीनें ओढून नेलेली लक्ष्मी ज्याप्रमाणें दुर्दैवी व्यक्तीपासून दूर जाते,' त्याप्रमाणें इदुमती कलिंगराजापासून दूर झाली. या वचनावरून असें अनु-मान निघते कीं कलिंगाचें राज्य हें तेव्हा वैभवाच्या कळसापासून ढळून अवन-तीच्या गर्तेकडे चाललें होतें. खारवेलाच्या काळीं सार्वभौमपदासाठीं स्पर्धा करणारें कलिंगाचें राजघराणें विक्रमाच्या काळीं बलिष्ठ राजाचें खेळणें होऊन बसलें होतें.

'कथासरित्सागरा'त अशी एक कथा आली आहे कीं विक्रमानें कलिंग राजाच्या मुलीला मागणी घातली असता त्याला नकार मिळाला, तेव्हा विक्रम राजानें गुप्त रीतीनें त्याच्या वाड्यांत शिरून त्याला मुलगी देणें भाग पाडलें. ही सारी कथा गुणाढ्यानें कलिंगराजाची कन्या जी कलिंगसेना, तिच्याच तोंडीं घातली आहे. आपल्याला विक्रमानें अविधीनें का वरलें, याची चौकशी करताना म्हणे तिला ही कथा कळली !

परिणीतास्म्यविधिना कथ राज्ञेतिदुःखिताम् ।।
मामेत्याश्वासयन्नेव सहि कार्पटिकोऽब्रवीत् ।।

कलिंगसेनेला ही माहिती सागणारा कार्पटिक हा तिचाच वर्णावर भ्राता असावा असें 'बृहत्कथामजरी'वरून दिसतें. या माहितीचा अधिक उपयोग 'मालविकाग्निमित्रा'च्या चिकित्सेच्या वेळीं करिता येईल. येथें इतकेंच सांगितलें म्हणजे पुरें कीं कलिंगसेना या नावांतील 'सेना' या पदावरूनच ती विक्रमाची उपपत्नी होती, हें उघड होतें. तेव्हा ज्या देशाच्या राजांना आपल्या कन्या उपपत्नी म्हणून इतरांना देऊन टाकाव्या लागत, त्याना कालिदासासारख्या समकालीन कवींनीं 'प्रतिकूलदैवात्' हा शब्द लावणें स्वाभाविक आहे. कलिंग देशावर विक्रमाचा इतका राग का होता, याचें कारणहि येथेंच सागणें सोयीचें होईल. कलिंग देशाचे तत्कालीन राजे जैन होते आणि विक्रमाच्या पित्याचें जेव्हा जैनाशीं वाकडें आलें, तेव्हा कलिंगाच्या राजानींहि त्याच्याविरुद्ध शस्त्र उचललें असावें. कलिंगाचा सुप्रसिद्ध सम्राट् खारवेल याच्या राथिक आणि भोजक याच्याशीं लढाया झाल्याचा उल्लेख त्याच्या हाथीगुंफा शिलालेखांत आहे. अग्निमित्राच्या काळापासून वरील लोक उज्जयिनीच्या अधिपतींचे अंकित होते. विक्रमाच्या पित्याचा ज्यानीं पराजय केला, त्या शकाशीं कलिंगदेशाच्या राजाचा काहींतरी संबध आला होता, असें गर्गसहितेंतील युगपुराणावरूनहि दिसते. उज्जयिनी-पतीच्या दोघा शत्रूंचे एकमेकांशीं सख्यसबध असणें स्वाभाविकच आहे.

## इंदुमती स्वयंवराची चिकित्सा

इ दुमतीस्वयवर प्रकरणाची कालिदासाचा काळ ठरविण्याच्या दृष्टीनें चिकित्सा केल्यास त्यांतल्या बहुतेक सर्वच राजाच्या वर्णनाची चिकित्सा करावी लागेल. मला या ठिकाणीं मुख्यतः विक्रमचरित्राच्या दृष्टीनें त्या आख्यानाचें परीक्षण करावयाचें असल्यानें त्या साऱ्या राजानीं अजापासून इदुमतीला पळवून नेण्याचा

जो अयशस्वी प्रयत्न केला, त्याचाच तेवढा विचार करून या आख्यानाचा निरोप घेतला पाहिजे. या प्रसंगाची चर्चा करिताना प्रथम हें ऐतिहासिक सत्य लक्षात घेतलें पाहिजे कीं अज आणि इंदुमती याच्या स्वयंवराचें आख्यान प्रत्यक्ष रामायणात नाहीं, त्याप्रमाणेंच तें अन्य कोणत्याहि पुराणात पण नाहीं. फार काय, इंदुमती ही अजाची पत्नी होती, इतकी माहितीसुद्धा 'रघुवशा'व्यतिरिक्त अन्यत्र कोठेंहि मिळावयाची नाहीं. 'रघुवंश'रचनेच्या प्रारभींच कालिदासानें पूर्वसूरींचा आधार सांगून ठेवेला असल्यानें तो रघुकुलातील राजाचीं चरित्रें गात नसून राजकवींच्या पद्धतीप्रमाणें आपल्या आश्रयदात्यांच्या चरित्रातील विभिन्न घटनाचें 'रघुवशा'तील राजर्षींच्या चरित्रांच्या मिषानें वर्णन करीत आहे, ही वस्तुस्थिति कोणाच्याहि लक्षात येत नाहीं. पण आता इतक्या दिवसांच्या कालिदासचिकित्सेनतर त्यानें दाखविलेल्या पूर्वसूरींच्या बुजगावण्यानें बिचकून जाण्याचें काहींहि कारण उरलेलें नाहीं. उलटपक्षीं त्याना आपण विसरून गेलों तर मात्र 'रघुवंशा'च्या रचनेवर अभिनव प्रकाश पडूं शकेल. स्वयवरानंतर इदुमतीला पळविण्याचा प्रयत्न झाल्याच्या कथेशीं सदृश अशी कथा 'कथासरित्सागरा'तील विषमशीललबकात म्हणजेच विक्रमचरित्रात आढळते. प्राचीन काळीं पंजाबकडे सिंहल नावाचा एक प्रात होता. त्या प्रांताच्या राजाची कन्या मदनलेखा, हिला विक्रमाला वरण्याची इच्छा झाली. तेव्हा त्या राजानें विक्रमाच्या अनंगदेव नामक दूताबरोबर तिला विक्रमाकडे धाडली. अनंगदेवासह ती, विक्रमाचा सेनापति जो विक्रमशक्ति त्याच्या शिबिरात सुरक्षित पोंचली. पण विक्रमशक्ति तिला विक्रमाकडे घेऊन येत असताना वाटेंतील राजांनीं एकत्र होऊन तिला पळविण्याचा प्रयत्न केला. यासबधीं कथासरित्सागरात पुढील माहिती आली आहे.

अद्य ज्ञातं च यत्तस्य राज्ञस्त्रैलोक्यसुंदरी ।।
प्रेषिता सिंहलेंद्रेण तनया सा स्वयंवरा ।।
ता च हर्तुं कृता बुद्धिः सर्वैः सभूय राजभिः ।।
हत्वा विक्रमशक्तिं त तत्सामतं समत्सरैः ।।

## कालिदासाचा एक अक्षम्य अविवेक !

या राजकन्येला पळविण्याचा प्रयत्न म्लेंच्छासकट सर्व राजानीं केला असतां विक्रमाच्या सैन्यानें आणि सेनापतीनें त्याचा सपशेल पराजय केला आणि त्या सिंहलेंद्रतनयेला विक्रमाकडे सुरक्षित आणून पोंचविली. विक्रमचरित्रातील या

प्रसंगावरूनच कालिदासानें अजाच्या हातून इंदुमतीला विवाहानतर पळविण्याचा प्रयत्न स्वयवराला आलेल्या राजानीं केल्याची कथा रचली आहे. पण 'रघुवशा'-सारख्या काव्यात हा प्रसग दडपून देताना आपण औचित्याच्या दृष्टीनें किती चुका करीत आहोत, याचा कालिदासानें फारसा विचार केला नाहीं. या कथेंत औचित्याच्या दृष्टीनें पहिलाच दोष असा उद्‌भवतो कीं स्वयवराला जमलेल्या राजाचा विवाहविधीच्या पावित्र्यावर, किंवा वाटल्यास विवाहसस्थेच्या पावित्र्यावर म्हणा, मुळींच विश्वास नव्हता, असें त्यावरून अनुमान निघतें. वाचकाची अशी कल्पना होणें हें त्या महाकाव्याच्या विषयवस्तूच्या दृष्टीनें अतिशय अनिष्ट आहे. दुसरी गोष्ट अशी कीं अजानें उष्टावलेल्या इदुमतीला पळविण्याची भारतवर्षातील प्रमुख राजाना इच्छा होण्यापेक्षा स्वयवरातच विघ्न उपस्थित करण्याची त्याना इच्छा होणें अधिक स्वाभाविक आहे. 'सान्निध्ययोगात्किल तत्र शच्याः स्वयवरक्षोभकृतामभावः' असें या आक्षेपाचें निराकरण करण्याचा कालिदासानें प्रयत्न केला आहे. पण त्यातील 'किल' शब्दाच्या प्रयोगावरून त्यानें सागितलेल्या कारणावर त्याचा स्वतःचाच विश्वास नव्हता, हें सिद्ध होतें. बाकी प्रत्यक्ष कुडिनपुरातच रुक्मिणीचें स्वयवर मोडल्याचा इतिहास त्याला माहीत असल्यानें तेथल्या शचीच्या प्रभावाविषयीं त्याच्यासारखा चिकित्सक कवि साशक होणें साहजिक आहे. यावर कोणी आक्षेप घेईल कीं रामाच्या आजाच्या स्वयवराचें वर्णन करताना त्याच्या मागून तीसपस्तीस पिढ्यानीं अवतरलेल्या कृष्णाच्या लग्नातील प्रसगाची आठवण ठेवण्याचें कवीला काहींच कारण नव्हतें. पण हें समर्थन कालिदासासारख्या काल-विपर्यासपटु कवीच्या मुळींच उपयोगीं पडणार नाहीं. कारण इदुमतीस्वयंवराच्या सर्गातच त्यानें कृष्णाचा उल्लेख करणारा पुढील श्लोक घातला आहे.

त्रस्तेन तार्क्ष्यात्किल कालियेन । मणिं विसृष्ट यमुनौकसा यः ॥
वक्षस्थलव्यापि रुच दधानः । सकौस्तुभ ह्रेपयतीव कृष्णम् ॥ ४९ ॥

तेव्हा शचीचें निमित्त सागून कालिदासानें इदुमतीच्या विवाहाच्या सविस्तर वर्णनाला सवड करून घेतली असली तरी त्यामुळें त्याच्या काव्यांत नैतिकदृष्ट्या मोठेंच व्यग राहून गेलें आहे. हें व्यग समकालीन पडिताच्या ध्यानात न येण्याचें कारण हेंच कीं अजानें इदुमतीहरणासाठीं उद्युक्त झालेल्या राजाशीं केलेल्या लढाईचें वर्णन वाचताना त्याच्या डोळ्यापुढें सिंहलेंद्रतनयेसाठीं विक्रमशक्तीनें केलेल्या लढाईचें दृश्य उभें रहात असे. त्यामुळें कालिदासानें भारतवर्षातील सर्व प्रमुख राजांना दुसऱ्या राजाची विवाहित पत्नी पळविण्याचा प्रयत्न करणारे रावण बनविलें आहे, ही

वस्तुस्थिति त्यांच्या लक्षांत येत नसे. दशरथाच्या पित्याच्या चरित्रांत असलें प्रकरण घडल्याची माहिती परपरागत असती तर तिचा रामायणांतहि समावेश झाला असता. कारण रामाच्या विवाहित पत्नीचें हरण आणि मुक्तता हाच तर रामायणाचा मुख्य विषय आहे. या विशिष्ट प्रश्नाविषयींचा भारतवर्षाचा दृष्टिकोण महाभारतातील अबेच्या आख्यानात अतिशय उठावदारपणानें व्यक्त झाला आहे. तेव्हा या प्रकरणीं कालिदासाच्या हातून अक्षम्य अविवेकीपणाचें कृत्य घडलें आहे, याविषयीं शका नाहीं.

कालिदास हा चद्रगुप्त विक्रमादित्याचा राजकवि होता असें मानणाऱ्याच्या सह वरील प्रश्नाची चर्चा करीत असताना त्यानीं हर्षभरित होऊन सागितलें कीं चद्रगुप्त विक्रमादित्यानें आपल्या भावाची हत्या करून त्याच्या विवाहित पत्नीशीं पुनर्विवाह लाविला असल्यामुळें कालिदासाचें वरील वर्णन तत्कालीन नीतिनिर्बधाना अनुसरूनच आहे. असल्या विचारसरणीचा अवलब करून स्वपक्षाचें समर्थन करणाऱ्याना एक दोन गोष्टींची आठवण देणें आवश्यक आहे. पहिली गोष्ट ही कीं कोणाहि पतीला मारून त्याच्या पत्नीशीं पुनर्विवाह लावणें ही कोणत्याहि काळात नीति होऊं शकत नाही. नीति शब्दाचा Norm हा नेहमींचा अर्थ मान्य करून मी वरील वाक्य लिहिलें आहे. राजकारणात आपद्धर्म म्हणून चद्रगुप्ताला ज्या गोष्टी कराव्या लागल्या, त्याच्यावर टीका करण्याचा माझा उद्देश नाहीं. मात्र ती नेहमींची नीति होऊ शकत नाहीं आणि नव्हतीहि. यानतर पुढचा प्रश्न असा कीं आपल्या आश्रयदात्या राजाचें वरील चरित्र कालिदासाच्या दृष्टीपुढें असतें तर त्याच्यासारख्या राजकवीनें इदुमतीस्वयवराचें प्रकरण सध्याच्या स्वरूपांत लिहिलें असतें का? या प्रश्नाला नकारार्थींच उत्तर द्यावें लागतें. उपलब्ध माहितीवरून असें कळते कीं चद्रगुप्ताची भ्रातृजाया ध्रुवस्वामिनी हिनें प्रथम चद्रगुप्तालाच स्वयवरात वरिलें होतें, पण त्याच्या वडिल भावानें बळानें तिच्याशीं स्वतःच लग्न लाविलें होतें, म्हणून त्यानें योग्य वेळीं भावाला मारून ध्रुवस्वामिनीशीं पुनर्विवाह केला. अशा राजाच्या सभेंत स्वयवरात प्राप्त झालेल्या पत्नीचें अजानें स्वपराक्रमानें कसें संरक्षण केलें, याचें सविस्तर वर्णन करण्यात स्वारस्य काय? त्याचप्रमाणें भ्रातृहत्या करून ज्यानें पत्नी आणि राजलक्ष्मी प्राप्त करून घेतली त्याच्यापुढें 'न चारिहिंसा विजयश्च हस्ते' हा चरण उच्चारणें म्हणजे त्याच्याच चरित्रावर प्रच्छन्न टीका करण्यासारखेंच आहे. एवींतेवीं चद्रगुप्ताच्या राणीची माहिती वर आलीच आहे. तेव्हा चौदाव्या सर्गांतल्या सीतासदेशातील 'भूयो यथा मे जननान्तरेऽपि स एव

भर्ता न च विप्रयोगः ' हा श्लोकार्ध श्रवण केल्यानंतर चद्रगुप्तसभेंतील श्रोत्यांच्या मनांत कोणत्या भावना उद्भवल्या असतील, याचाहि आताच वाचकांनीं विचार करावा. गुप्त राजे जाट असल्यानें त्याच्यात भावजईशीं विवाह करण्याची रुढी होती. तशी इक्ष्वाकूत नव्हती.

## कालिदास गुप्त-समकालीन नव्हे

कालिदासाच्या काव्यातून पदोपदीं तो गुप्त-समकालीन नसल्याचे पुरावे उपलब्ध होत असतांना गुप्तांच्या इतिहासकाराना मात्र ते दिसू नयेत, याचें मला नेहमीच नवल वाटतें. समुद्रगुप्त-चद्रगुप्तासारखे सम्राट् स्वतःला ' सर्वराजोच्छेत्ता ' हें विशेषण लावीत असत. या त्याच्या धोरणाशीं ' गृहीतप्रतिमुक्तस्य स धर्मविजयी नृपः । श्रियं महेंद्रनाथस्य जहार न तु मेदिनीम् ।। ' या कालिदासाच्या श्लोकातील धोरणाचा स्पष्ट विरोध आहे. अजाच्या राज्यारोहणानतरचा कालिदासाचा श्लोक चद्रगुप्त विक्रमादित्याच्या सभेंत म्हणून दाखविणें अगदीं अशक्य आहे. कारण

दुरितैरपि कर्तुमात्मसात्प्रयतन्ते नृपसूनवो हि यत् ।।
तदुपस्थितमग्रहीदजः पितुराज्ञेति न भोगतृष्णया ।।

हें अजाचें वर्णन चद्रगुप्त-चरित्राशीं किती विसंगत आहे, तें आतां वाचकाना माहीत झालेंच आहे. गुप्त राजे हे परमवैष्णव होते, असें इतिहास सागतो. त्या विष्णूला कालिदासाच्या कवितेंत इद्राच्या मानानें किती गौण स्थान दिलेलें आहे, हें सीतासदेशातील पहिल्याच श्लोकावरून कळून येईल.

सीता तमुत्थाप्य जगाद वाक्यं प्रीतास्मि ते सौम्य चिराय जीव
बिडौजसा विष्णुरिवाग्रजेन भ्रात्रा यदित्थ परवानसि त्वम् ।।

समुद्रगुप्तानें जिंकलेल्या राजापैकीं एकाचें नांव गणपति आहे. हें नाव गणपतीची उपासना प्रचलित झाल्यानतरच प्रचारात आलें असलें पाहिजे. गुप्तकालीं गणपतीची उपासना प्रचलित असल्याचें अन्य आधारावरूनहि माहीत झालें आहे. उलटपक्षीं कालिदासाला गणपतीचा परिचय केवळ त्याच्या पूर्वावतारातील निकुभस्वरूपांतच झाला होता, असें ' कुभोदर नाम निकुभमित्रम् ' या दुसऱ्या सर्गातील वचनावरून दिसून येतें. निकुभाचेंच पुढें गणपतींत रूपातर झालें, हें वायुपुराणाच्या आधारानें मी अन्यत्र दाखवून दिलें आहे.

## कालकाचार्य-कथानकाचा संदर्भ

कालिदास हा गुप्तकालातील कवि नव्हे, इतकें दाखवून देण्याकरितां वरील आधारांचा उल्लेख केला. आता पुन्हा कालिदासावरून कळणाऱ्या विक्रमचरित्राकडे वळावें, हें बरें. कवितेवरून ऐतिहासिक अनुमानें काढणें हें नेहमींच अवघड काम असतें आणि तीं स्थूलबुद्धीच्या प्रतिपक्षाच्या गळीं उतरविणें तर जवळ जवळ असाध्यच असतें. तरीसुद्धा या विषयाला हात घातलाच आहे, तेव्हा विषयपूर्तीसाठीं तोहि उद्योग केला पाहिजे. ऐतिहासिकदृष्ट्या 'रघुवंशाची' आवृत्ति करितांना 'स्थित्यै दंडयतो दण्ड्यान्परिणेतुः प्रसूतये' हा श्लोकार्धसुद्धा गूढार्थप्रतिपादक असावा, अशी शंका येते. कारण लोकांना शिक्षा करण्याचा आणि आपण विवाह करण्याचा परस्परसंबंध काय ? हा श्लोक मराठींत लिहिलेला असता तर लोकांना चतुर्भुज करणें आणि आपण चतुर्भुज होणें याचा परस्परसंबंध लगेच लक्षात आला असता. पण तसली कल्पना सुचविण्याचा येथें कवीचा उद्देश दिसत नाहीं. यामुळें मला अशी शंका येते कीं स्थिति म्हणजे परंपरा संभाळण्याकरिता कोणाला तरी शिक्षा करण्याच्या निमित्तानें स्वतःचा विवाह साधून घेणाऱ्या एखाद्या राजाला उद्देशून कालिदासानें या ओळी लिहिल्या आहेत कीं काय ! असा प्रसंग विक्रमाचा पिता गर्दभिल्ल याच्या चरित्रात घडला होता. कालकाचार्यांने स्वतःच्या बहिणीला पूर्वपरंपरेविरुद्ध भिक्षुणी केल्याबद्दल त्याला शिक्षा करून गर्दभिल्लानें त्याच्या बहिणीशीं स्वतःच लग्न लाविलें होतें. इतका श्लेष यातून निघत नाहीं, असें तज्ज्ञाचें मत पडल्यास माझा मुळींच आग्रह नाहीं. तरीसुद्धा 'परिणेतुःप्रसूतये' किंवा 'प्रजायै गृहमेधिनाम्' यासारख्या कालिदासाच्या सूत्राचा गुप्तकुलाच्या वहिवाटीशीं किती विरोध आहे, हें त्या कालाच्या पुरस्कर्त्यांना दाखवून देणें आवश्यक आहे. गुप्तकालातील राजे बहुभार्या करीत असत, इतकेंच नव्हे तर त्यातील अनेक भार्यांच्या ठिकाणीं ते संततीहि उत्पन्न करीत असत, असें इतिहासावरून कळून येतें. उलटपक्षीं कालिदासाचे बहुतेक राजे पूर्वींच्या पत्नींना संतति न झाल्यामुळें अन्य सौभाग्यकांक्षिणींच्या शोधात असतात. पुरूरव्याला पहिल्या राणीपासून संतति झाली नव्हती. दुष्यंताचें अंतःपुर ओतप्रोत भरलें असूनसुद्धा त्याला अपत्यलाभ झाला नव्हता. दिलीपाची परिस्थितिहि दुष्यन्तासारखीच होती. पूर्वींची संतति असून विवाह केल्याचें कालिदासवाङ्मयातील एकुलतें एक उदाहरण अग्निमित्राचें आहे. पण तें ऐतिहासिक नाटक असल्यानें त्या नायकाच्या कृतीचें दायित्व कालिदासावर लादतां येत नाहीं.

रघु आणि इंद्र याच्या युद्धातील पुढील श्लोकार्धातहि ऐतिहासिक श्लेष असावा अशी शंका येते.

'शशाक निर्वापयितुं न वासवः स्वतश्च्युतं वन्हिमिवाद्भिरबुदः' ॥

म्हणजे 'मेघातील विजेपासून उद्भवलेला अग्नि हा जसा मेघाला शमविता येत नाहीं, त्याप्रमाणेंच इंद्रांशापासून उत्पन्न झालेल्या रघूला जिंकणें इंद्राला शक्य झालें नाहीं.' विक्रमाचा मामा जो कालक, त्याचा अर्थ मेघ असाहि होत असल्यानें मेघाची उपमा देऊन स्वकुलापासून उत्पन्न झालेल्या विक्रमाला शमविणें कालकाला कसें अशक्य झालें, हेंहि सुचविण्याचा कालिदासाचा उद्देश असू शकेल. रघुदिग्विजयाच्या वर्णनात रघूकडून शकाचा पराभव झाल्याचें वर्णन कालिदासानें जसें सविस्तर केलें आहे तसें अन्य कोणत्याहि युद्धाचें केलेलें नाहीं, यावरून वरील अनुमानाला दुजोरा मिळतो.

## रघूची लढाई शकांशीं-ग्रीकांशीं नव्हे

'रघुवंशा'च्या चौथ्या सर्गातील रघूच्या दिग्विजयाचा ऐतिहासिकदृष्ट्या विचार करण्याचा अनेकानीं प्रयत्न केला आहे. पण त्याच्यापैकीं कोणींच तत्कालीन इतिहासाच्या आधारानें रघु आणि पारसीक याच्या युद्धाचा उलगडा केलेला नाहीं 'रघुवंशा'तील पारसीक हे काहीं इराणातील पारसीक नव्हते, इतकीसुद्धा माहिती आमच्या कालिदासाची चिकित्सा करणाऱ्या विद्वानाना असत नाहीं. कालकाचार्य-कथानकावरूनच आपल्याला असें कळतें कीं विक्रमाच्या काळीं हिंदुस्थानात अत्याचार करीत असलेल्या शकांनाच पारसीक ही संज्ञा होती. त्या कथानकात त्याना पारसकुल या नावानेंच संबोधिलें आहे. या शकानीं आपलें राज्य प्रथम सिंधमध्यें स्थापिलें आणि सिंधु नदींतूनच वर जाऊन त्यानीं गांधारपर्यंतचा प्रदेश व्यापिला. तेव्हा पंजाबांत सिंधु नदीच्या दोन तीरावर दोन निरनिराळीं ग्रीक राज्यें होतीं. या ग्रीक राजाच्या मध्यें शकानीं पाचर मारल्यामुळें त्याना कसेंहि करून शकाचें पंजाबातून उच्चाटन करणें भाग होतें. या कार्यांत पंजाबातील ग्रीक राजाना विक्रमानें साहाय्य केलें आणि हिंदु-ग्रीकाच्या संघटित प्रयत्नाना यश येऊन पंजाबच्या लढाईत शकाचा सपशेल पराजय झाला. हिंदुस्थानातील ग्रीक राज्यांच्या इतिहासावरून आणि कालिदासाच्या कवितेवरून शकावरील स्वारीची वरील रूपरेखा मी दिली आहे. ही रूपरेखा आधीं सांगितली तरच कालिदासाच्या श्लोकाचा चिकित्सा सुलभ होईल, या समजुतीनें मला हा

उलटा क्रम अवलंबावा लागला आहे. हा सारा इतिहास कालिदासाच्या श्लोकातून कसा सूचित होतो, तें आता पाहू.

‘ पारसीकास्ततो जेतु प्रतस्थे स्थलवर्त्मना ’

या चरणावरून अनेकानीं असें अनुमान काढलें आहे कीं नौकागमन निषिद्ध असल्यामुळें रघु स्थलमार्गानें इराणला गेला. पण तत्कालीन इतिहासावरून असें समजतें कीं, सिंधु नदीवर शकांशीं टक्कर देऊन त्यांचा पराजय करण्याचा भार ग्रीकानीं आपल्या शिरावर घेतला होता आणि भूमियुद्धात त्यांना पराभूत करण्याचें काम विक्रमाच्या वाट्याला आलें होतें. या वेळीं ग्रीकाना जलयुद्धात विजय मिळाल्याचीं नाणीं उपलब्ध आहेत आणि त्या नाण्यांवरूनच ही माहिती उपलब्ध झाली आहे. या वेळीं विक्रमाचें पारसीकांशीं म्हणजे शकाशीं जें युद्ध झालें, तें ग्रीकांच्या प्रातात झालें, ही गोष्ट कालिदासानें ‘ यवनीमुखपद्माना सेहे मधुमद न सः ’ या श्लोकार्धात स्पष्टपणें सागितली आहे. पारसीकाना जिंकावयाला रघु निघाल्याचा उल्लेख केल्यानतरच्या श्लोकात अकल्पितपणें ग्रीक स्त्रियाचा उल्लेख येण्याचें कारण हें आहे. एकाएकीं आपल्या देशात विक्रमाची भिल्ल सेना आलेली पाहून ग्रीक रमणींच्या मुखावरील रग उडून गेला असल्यास नवल नाहीं. यानंतरच्या श्लोकातून आलेल्या वर्णनावरूनहि तेंव्हा विक्रमाची ग्रीकाशीं लढाई झाली नाहीं हें स्पष्ट आहे.

सग्रामस्तुमुलस्तस्य पाश्चात्यैरश्वसाधनैः ॥
शाङ्‌र्गकूजितविज्ञेयप्रतियोधे रजस्यभूत् ॥ ६२ ॥
भल्लापवर्जितैस्तेषां शिरोभिःश्मश्रुलैर्महीम् ॥
तस्तार सरघाव्याप्तैः स क्षौद्रपटलैरिव ॥६३ ॥
अपनीत शिरस्त्राणाः शेषास्त शरण ययुः ॥

या श्लोकावरून असें समजतें कीं विक्रमाची या वेळीं जी लढाई झाली, ती मुख्यतः घोडदळाशीं झाली. शकाचा सारा भर त्याच्या घोडदळावरच होता. उलटपक्षीं ग्रीक सैन्याचें मुख्य अग त्याचें भालाइताचें पायदळ पथक असे, हें सुप्रसिद्ध आहे. रोमन लोकहि मुख्यतः आपल्या पायदळावर अवलंबून असत. पुन्हा कालिदासानें विक्रमाच्या शत्रूच्या ‘श्मश्रुल’ शिराचा आणि ‘ मधमाश्यांच्या पोळयाप्रमाणें दिसणाऱ्या ’ मुखांचा जो उल्लेख केला आहे तोहि तत्कालीन ग्रीक सैनिकांना लागूं पडत नाहीं. तो केवळ शकानाच लागू पडतो. ‘ विक्रमोर्वशीया’तहि

उर्वशीला पळविणाऱ्या दैत्याला कालिदासानें ' केशिन् ' हेंच नाव दिलें आहे. या नांवांत आणि श्मश्रुल या विशेषणांत फारसा भेद नाहीं. रघु आणि पारसीक यांच्या युद्धाचें वर्णन ऐतिहासिक आहे असें मानलें तर त्याचा अर्थ मी वर केलेल्याहून भिन्न होऊ शकत नाहीं. 'रघुवंश' हें केवळ काव्य आहे, त्याचे ऐतिहासिक अर्थ करणें सपशेल चूक आहे, असें ज्यांचें मत असेल, त्याना मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं राजकवीचें काव्य वाचण्याची पात्रता त्याना अद्यापि प्राप्त झालेली नाहीं.



प्रकरण आठवें

# कुमारसंभवाची पार्श्वभूमि

कुमारसभव हें नाव कालिदासाला रामायणावरून सुचलेलें दिसतें. बालकांडाच्या सदतीसाव्या सर्गांत विश्वामित्र रामाला म्हणतात, 'एष ते राम गंगाया विस्तरोऽभिहितो मया । कुमारसभवश्चैव धन्यः पुण्यस्तथैव च ।। ' ( १–३७–३१ ) या श्लोकात गगेच्या इतिहासासहच कुमारजन्माचा इतिहास रामाला सागितल्याचा उल्लेख आहे. कुमार हा एका अर्थी गगेचा पुत्रच आहे. हें नातें विसरल्यास कुमारसभवाच्या आख्यानाचें ऐतिहासिक महत्त्व समजणें शक्य नाहीं. कारण कुमार हा एका अर्थी गगापुत्र म्हणजे सरितापुत्र असला तरी त्याचबरोबर तो गिरीशाचाहि पुत्र आहे. त्यामुळें भारतातील पर्वतपुत्राना आणि सरितापुत्रांना सारखाच पूज्य वाटणारा हाच एक देव आहे.

## पर्वतपुत्र आणि सरितापुत्र

पर्वतपृष्ठावरील उच्च वातावरणात सचार करणाऱ्यांना सपाट प्रदेशातील नीच वातावरणात निवास करणाऱ्या क्षुद्र जनाचा तिरस्कार वाटणें जितकें स्वाभाविक आहे, तितकेंच मानवी प्रयत्नानीं निर्मिलेल्या प्रासादातून आणि उद्यानातून नित्य नूतन विलास भोगणाऱ्या नागरिकाना अजून निसर्गावस्थेच्या सान्निध्यांत राहणाऱ्या गिरिरावअण्णाच्याविषयीं तसाच तिरस्कार वाटणें तितकेंच स्वाभाविक आहे. या उभयतामधील विरोधावरच महाभारतातील कद्रूविनताख्यानाची उभारणी झाली आहे. अवेस्ताग्रंथांत पर्वताला एके ठिकाणीं कद्रू ही सज्ञा लाविली असून क म्हणजे मेघ अथवा जल, द म्हणजे देणारा, आणि रू म्हणजे मोठा ध्वनि करणारा या धातूशीं त्या शब्दाचा सबध दिसतो. कद्रूशीं विरोध करणारी विनता ही अर्थात् सखल आणि सपाट प्रदेशातील भूमि असून तिच्या पुत्राना जन्मापासूनच कद्रूपुत्राचें दास्य करावें लागतें. या विनतेच्या पुत्रामध्यें 'दिवस्पुत्रासो अमृतस्य वीराः' या पदवीला पात्र असे कोणी गरुडासारखे महावीर जन्माला आले तरच त्याची तात्पुरती तरी दास्यातून सुटका व्हावयाची. विनतेचा एक पुत्र सुपर्ण हा आकाशांत उड्डाण करून देवलोकातून अमृत आणण्याला समर्थ झाला असला तरी त्याचा

थोरला भाऊ अरुण शुद्ध लुळापांगळा होता, हें कोणींहि विसरूं नये. कद्रूपुत्र हे दरिद्री पण स्वतंत्र असतात. त्याच्या उलट विनतेच्या कांहीं थोड्या पुत्राच्या वाट्याला विलास आणि इतर सर्वांच्या वाट्याला दास्य, असाच अनुभव सर्वत्र येतो. हें सारें विवेचन अगदींच स्वकपोलकल्पित भासू नये याकरितां इथें इतकें स्पष्टीकरण केलें पाहिजे कीं पौराणिक कथांतून कद्रूचे पुत्र म्हणून वर्णिलेले अहि, नाग आणि सर्प हे अजूनहि अनुक्रमे अफगाणिस्थान, काश्मीर आणि नेपाळ या भागांत निवास करीत आहेत. संस्कृत अहीपासून फारशींतील सर्पवाचक अफई हा शब्द उद्भवला असून त्यापासूनच अहिगणस्थान या अर्थी अफगाणिस्थान हा शब्द जन्माला आला आहे. काश्मीरमध्यें प्रथम नागाचीच वसती होती. पुढें ब्राह्मणानीं काश्मीरचें खोरें नागाच्या हातून सोडवून तेथें नागरजनाची वसती घडवून आणली. नेपाळांतील सर्प हे ज्याला इंग्रजी अक्षराच्या चुकीच्या उच्चारामुळें आपण शेरपा म्हणतो, त्या सर्प तेनसिंगामुळें आता विश्वविख्यात झाले आहेत. हा सर्प शब्द मूळचा तिबेटी भाषेतील असून त्याचा अर्थ प्राच्य असा होतो. या पीत-वर्णी सर्पांच्यापेक्षा काश्मीरमधील श्वेतवर्णी नाग हे वैदिक आर्यांना अधिक निकटचे असल्यानें ‘ अनंतश्चास्मि नागानाम् ’ असें सांगणाऱ्या कृष्णाच्या परिवारात अनंत नागाला जसें स्थान मिळालें, तसें कांहीं सर्पराज वासुकीला मिळालें नाहीं. वर उल्लेखिलेलीं कद्रूपुत्राचीं सारीं नामें भारतीय परंपरेंतील असलीं तरी त्याच्याशीं सदृश अशीं कांहीं इराणी नामेंहि असू शकतील पण तीं मला अविदित आहेत. ऐतरेय ब्राह्मणात अर्बुदकाद्रवेय या ऋषीचा उल्लेख आला असून त्याच्यासंबधीं अधिक विवेचन मी ‘ दाशराज्ञ युद्धात ’ केलें आहे.

## इराणांतील शिवोपासक

कद्रू हा शब्द इराणांत पर्वत या अर्थानें प्रचलित होता आणि कद्रूचे अहि, नाग, सर्प इत्यादि पुत्र हे वस्तुतः पर्वतपुत्र अर्थात् गिरिजन आहेत, ही गोष्ट उघडकीला आल्यानंतर, या गिरिजनाचा देव जो गिरीश, त्याची उपासना इराणात प्रचलित होती कीं नाहीं, याचा आता विचार केला पाहिजे. अवेस्ता ग्रथांत अहुरमज्दाच्या शत्रूत इंद्र, नाओन्हैत्य अर्थात् नासत्य आणि शौर्व अर्थात् शर्व, या तीन वैदिक देवाचा उल्लेख आढळतो. या देवापैकीं नासत्याना सोमपानाचा अधिकार नव्हता, तो भृगुकुलातील च्यवनानीं मदासुराच्या म्हणजे इराणातील मीडिया प्रांतातील लोकाच्या साहाय्यानें मिळवून दिल्याचें आख्यान आरण्यक आणि

अनुशासन या दोन पर्वांतून आलें आहे. त्यावरून नासत्य हे इराणातील मद लोकांचे आवडते देव होते, हें कळून येतें. तेव्हा या नासत्याप्रमाणेंच शर्व देवाची उपासनाहि इराणात इराणी आणि भारतीय आर्य परस्परापासून विभक्त होण्या-पूर्वींपासूनच प्रचलित होती, हें उघड आहे. कृषीवल संस्कृतीचा पुरस्कार करणाऱ्या जरथुश्त्राच्या अनुयायांनीं इराणातून गिरीश शर्वाची उपासना पददलित केल्या-नंतर अफगाणिस्थानातील मूजवत् पर्वताच्या आसपास त्याच्या उपासनेचें एक प्रमुख केंद्र अस्तित्वांत आलें. उदाहरणार्थ तैत्तिरीय संहितेंत एके टिकाणीं म्हटलें आहे, 'एष ते रुद्र भागः त जुषस्व। तेनावसेन परो मूजवतोऽतींहि। अवततधन्वः पिनाकहस्तः कृत्तिवासाः।' (१-८-६) वाजसनेय संहिता आणि शतपथ ब्राह्मण यांतूनहि अशाच आशयाचे उल्लेख आढळतात. या उल्लेखावरून असें दिसून येते कीं जरथुश्त्री कृषीवलाप्रमाणेंच वैदिक कृषीवलाचे आचार्यहि आपल्या जीवनक्षेत्रांतून रुद्राला घालवून देण्याचा प्रयत्न करीत होते पण या प्रयत्नात या दोनहि कृषीवल संस्कृतींना सारखेंच अपयश आलें. इराणात कालक्रमानें अर्धनारीनटेश्वर अशा महाकालाची झर्वान् या नावानें उपासना प्रचलित झाली, इतकेंच नव्हे तर प्रभावीहि झाली. इराणात झर्वान् या नावानें महाकालाची उपासना ज्या कारणांनीं प्रभावी झाली असेल, त्याच कारणांनीं वैदिक आर्यांतहि 'ईश्वर. शर्व ईशानः' इत्यादि नावांनीं महाकालाची उपासना प्रभावी झाली असली पाहिजे प्राचीन इराण आणि भारत यांमधील गाधारात देव शब्दाचा अर्थ शिव असाच होत असे. यामुळें अशी कल्पना मनात येते कीं शिवाच्या पिशाचगणामुळेंच कदाचित् इराणात देव शब्दाचा अर्थच पिशाच झाला असेल. अथर्ववेदातील एका सूक्तात 'गधारिभ्यः, मूजवद्भ्यः, अंगेभ्यः मगधेभ्यः' असा गाधार आणि मूजवत् या शिवोपासनेच्या केंद्रासहच अग आणि मगध यांचाहि उल्लेख आला आहे. इथें उल्लेखिलेले अग आणि मगध हे भारताच्या पूर्वेकडील अगमगध नव्हते, ही गोष्ट डॉ. देवदत्तराव भाडारकरांनीं आपल्या मद्रासेंतील व्याख्यानांतून पूर्वींच दाखवून दिली आहे.

## मदनदहनाख्यानाचा पुरावा

वैदिक परंपरेप्रमाणें स्वकन्येचा अभिलाष करणाऱ्या प्रजापतीला शासन-करण्याकरिता सर्व देवांनीं आपल्या घोर तनु एकत्र करून रुद्रनिर्मिति केली. तेव्हा रुद्र हा जन्मतःच मदनारि आहे, हें सांगायला नकोच. प्रजापतीच्या ज्या कृत्यामुळें त्याला शासन करण्याकरिता देवांनीं रुद्राला निर्माण केलें, तें कर्म प्राचीन इराणात

पुण्यकर्मच मानलें जात असे. त्या देशात प्राचीन काळीं माता आणि पुत्र, पिता आणि कन्या, तसेंच बधु आणि भगिनी या निकटतम नातेवाईकांचे विवाह पवित्रतम मानले जात. अशा परिस्थितींत आपला शर्व हा त्यांच्या अहुरमझ्दाचा कट्टा शत्रू बनणें स्वाभाविक होतें. रुद्र हा जन्मतःच मदनारि आहे, ही वस्तुस्थिति लक्षात न घेता म. म. घुलेशास्त्री यानीं 'महादेवाचें मूळ स्वरूप' या मननीय लेखात पुढील विक्षिप्त विधान केलें आहे. 'महाभारतात महादेवाच्या तृतीय नेत्राच्या जन्मकथेंत व्यासानीं मदनदाहाचा उल्लेख केलेला नाहीं. इतकेंच नव्हे तर द्रोणपर्वांत (अध्याय २०३) श्रीव्यासानीं महादेवाचीं जीं दिव्यकर्में आहेत, तीं मी आता तुला सागतों अशी अर्जुनाजवळ प्रतिज्ञा करून जीं कर्में सागितलीं आहेत, त्यातहि मदनदाहाचा नुसता नामनिर्देशहि नाहीं. यावरून कोणतें अनुमान काढावयाचें तें विद्वान् लोकानीं पाहून घ्यावें. तरी हें अनुमान काढताना गौतम-बुद्धानेंहि अशा प्रकारें मदनाचा पाडाव केला होता आणि म्हणूनच त्याला माराजित् हें नाव मिळालें आहे, हें त्यानीं अवश्य लक्षात असू द्यावें.' या अवतरणात म. म. घुलेशास्त्री यानीं जी गर्भित आणि गर्ह्य सूचना केली आहे, ती अगदींच अनाठायीं आहे. महादेवाच्या तृतीय नेत्रातील अग्नीनें मदनदहन केले, ही परपरा कालिदासानें प्रचलित केली. तिला रामायण महाभारतात आधार नाहीं. घुलेशास्त्र्यांनीं उल्लेखिलेल्या स्थळीं मदनदहनाचा उल्लेख महाभारतकारानीं कां केला नाहीं, हें मी आज सांगू शकत नाहीं. पण आदिकवि वाल्मीकींनीं बालकाडातच या प्रसगाचा स्पष्ट उल्लेख केला असल्यानें बुद्धचरित्राच्या अनुकरणानें वैदिक आर्यांनीं महादेवाला मदनारि बनविला, असल्या अप्रबुद्ध कल्पना करण्याचें काहीं कारण नाहीं. बालकाडाच्या तेविसाव्या सर्गात आदिकवि सागतात

"कदर्पो मूर्तिमान् आसीत् काम इत्युच्यते बुधैः । तपस्यन्तमिह स्थाणु नियमेन समाहितम् ॥ कृतोद्वाह तु देवेश गच्छन्त समरुद्गणम् । घर्षयामास दुर्मेधा हुंकृतश्च महात्मना ॥ अवध्यातश्च रुद्रेण चक्षुषा रघुनदन । व्यशीर्यन्त शरीरात् स्वात् सर्वगात्राणि दुर्मतेः ॥ तत्र गात्र हत तस्य निर्दग्धस्य महात्मनः । अशरीरः कृतः कामः क्रोधात् देवेश्वरेण ह ॥ अनग इति विख्यातस्तदाप्रभृति राघव । स चागविषयः श्रीमान् यत्राग स मुमोच ह ॥" ज्याला बुधजन काम असें म्हणतात, तो कंदर्प पूर्वी मूर्तिमान् होता. अशा दिवसात यमनियमांचें पालन करून तपस्या करीत असलेला देवेश विवाहानतर एकदां मरुद्गणासह जात असताना त्याच्यावर कंदर्पानें आक्रमण केलें. तेव्हा त्या महात्म्यानें हुंकार केला आणि त्याच्याकडे रोखून पाहिलें.

तत्क्षणीं त्याच्या शरीरापासून त्याचे सारे अवयव गळून पडले आणि तिथल्या तिथेंच त्याचें शरीर जळून गेलें. अशा प्रकारें देवेश्वरानें कामाला अशरीरी केलें. तेव्हापासून तो अनग या नांवानें विख्यात झाला आणि त्याचें शरीर जिथें नष्ट झालें, त्या देशाला अग हें नाव मिळालें. कामाचें अग जिथें पडलें आणि दग्ध झालें, या देशाला अग हें नाव लाभलें, ही रामायणातील आख्यायिका बरीच प्राचीन असावी. बुद्धकाळीं अग हें देशनाम पूर्वभारतातहि पुरेसें प्रसिद्ध झालें होतें. तेव्हा बुद्ध हा मारजित् असल्यामुळें वैदिक आर्यांनीं त्याच्या अनुकरणानें शिवाकडून मदनदहन करविलें असावें, ही म. म. घुलेशास्त्री यांची कुकल्पना सर्वस्वीं निराधार आहे. वर उतरून घेतलेल्या रामायणातील श्लोकावरूनच कालिदासानें आपलें मदनदहनाचें आख्यान रचलें आहे, हें उघड आहे. रामायणातील आख्यानांत कालिदासानें जे बदल केले आहेत, त्याची चर्चा पुढें करता येईल. या आख्यायिकेचा विषयीभूत मूळ अग देश गाधारापाशीं होता, हें वर दाखविलेंच आहे.

## रुद्र मखारि कां ?

गिरीश हा जसा मदनारि आहे, तसाच तो मखारि म्हणजे यज्ञयागांचा विरोधक म्हणूनहि प्रसिद्ध आहे. याचें भौतिक कारण असें आहे कीं, यज्ञयाग हा मुख्यत: सपाट प्रदेशांतील विनतापुत्राचा धर्म आहे. उदाहरणार्थ बालकांडाच्या एकोणचाळीसाव्या सर्गात आदिकवीनें म्हटलें आहे. " शकरश्वशुरो नाम्ना हिमवानिति विश्रुतः । विंध्यपर्वतमासाद्य निरीक्षेत परस्परम् ।। तयोर्मध्ये समभवत् यज्ञः स पुरुषोत्तम । स हि देशो नरव्याघ्र प्रशस्तो यज्ञकर्मणि ।। " हिमवान् नावाचा शकराचा श्वशुर आणि विंध्य पर्वत हे उभयता एकमेकाकडे टक लावून पहात असतात. त्या उभयतामधील प्रदेशात तो यज्ञ झाला. कारण यज्ञकर्माला तोच देश प्रशस्त आहे. अर्थात् या दोन पर्वतांमधील सपाट प्रदेशात यज्ञयागाचा पथ प्रतिष्ठा पावला असला तरी गिरिश्रेष्ठ हिमालयात गिरीशाची आणि विंध्य प्रदेशात विंध्यवासिनीची उपासना प्राधान्य पावली. ज्या काळात यज्ञयागांची उपासना हिमालयापासून विंध्य पर्वतापर्यंतच्या प्रदेशात विस्तार पावत होती, त्याच काळात म्हणजे खि. पू. २३०० पासून खि. पू. १९०० या काळात आकाशातहि याच्या विरोधाचें दृश्य प्रत्यक्ष दिसत होतें. दक्षिण ध्रुवाकडील त्रिशकूच्या थोडा वरती यज्ञवेदी म्हणून एक तारकापुंज आहे आणि उत्तरेकडील स्वाति नक्षत्रासन्निध भूतेश ( रुद्र ) (इंग्रजी Boote's) नांवाचा दुसरा एक तारकापुंज आहे. खिस्तपूर्व २३०० पासून १९०० पर्यंतच्या

काळांत यज्ञवेदी उगवली कीं भूतेश अस्ताला जाई आणि भूतेश उगवला कीं यज्ञवेदी अस्ताला जाई. रुद्र आणि यज्ञ यांच्या विरोधाच्या साऱ्या आख्यायिका या काळात उद्भवल्या आहेत.

## यज्ञांचें केंद्र शूरसेन

याप्रमाणें ऋग्वेदोत्तर काळात रुद्र हा यज्ञविरोधक म्हणून ओळखला जात असताना त्याच काळीं यज्ञपुरस्कर्ता आणि यज्ञसरक्षक या नात्यानें विष्णूचें महत्त्व वाढूं लागलें. एके प्रसंगीं साऱ्या देवानीं मिळून सत्र केलें असतां त्याचें सारें श्रेय एकट्या विष्णूनेंच आत्मसात् केल्यामुळें सर्व देव त्याच्यावर रुष्ट झाले, अशा आशयाचें एक आख्यान तैत्तिरीय आरण्यकाच्या पाचव्या प्रपाठकातील पहिल्या अनुवाकात आलें आहे. त्यावरून श्रौत काळाच्या अतीं विष्णूच्या वाढत्या महत्त्वाचा इतर देवाच्या भक्तांना कसा मत्सर वाटत होता, याची कल्पना येते. विष्णु हा एका अर्थीं रुद्राचा प्रतियोगी देवच असल्यानें त्याकाळीं त्याचे महत्त्व वाढत होतें, हें उघड आहे. कारण गिरीश रुद्र हा नगाधिराजाचा जावई असला तर विष्णु हा साऱ्या जलाशयाचा राजा जो सागर त्याचा जावई आहे. गिरीश हा अकिंचन योगी आहे, तर विष्णु उघड उघड लक्ष्मीपति आहे. गिरीश हा मदनारि असला तर विष्णु हा कृष्णावतारात मदनाचा पिता बनला. कृष्णानें भगवद्गीतेंत यज्ञयागाना गौणपणा दिला असला तरी कृष्णाच्या मागें शूरसेन देश हें यज्ञयागाचें एक प्रधान केंद्र बनलें, असें कर्णशल्यसवादातील पुढील श्लोकावरून कळून येतें. भारतातील भिन्नभिन्न प्रातांचें वैशिष्ट्य सागताना कर्ण म्हणतो, “ ब्राह्म पाचालाः कौरवेयास्तु-धर्म्यम् । सत्य मत्स्याः शूरसेनाश्चयज्ञम् ।। प्राच्या दासा वृषला दाक्षिणात्याः । स्तेना-वाहीकाः सकरा वै सुराष्ट्राः ।। ” ( नीलकंठी महाभारत चित्रशाळा प्रत कर्णपर्व ४५–२८ ) या श्लोकावरून असें समजतें कीं पाचालात ब्रह्म, कुरुमध्यें धर्म, मत्स्यात सत्य आणि शूरसेनामध्यें यज्ञ यांची उपासना प्राधान्येंकरून प्रचलित होती. त्याकाळीं प्राच्य भारतातील प्रजा दास, दक्षिणपथातील प्रजा सस्कारलोपामुळें वृषल, सौराष्ट्रातील प्रजेंत सकर फार आणि वाहीक अथवा पजाब प्रात स्तेनानीं भरलेला, त्यामुळें त्यांच्या जीवनदर्शनासबधीं कर्णाला कोणताच उल्लेख करतां आला नाहीं.

## चोर हे स्कंदपुत्र

वरील अवतरणातील ‘ स्तेना वाहिकाः ’ हा कर्णपर्वातील उल्लेख अतिशय

महत्त्वाचा आहे. त्याकाळीं पंजाब हा चोरांचा प्रांत मानला जात असे आणि त्या प्रातांतच स्कंदोपासनेचें सर्वात मोठें केंद्र असल्यानें चोराना स्कंदपुत्र ही संज्ञा प्राप्त झाली होती. मृच्छकटिकांत शर्विलकानें स्वत:ला स्कंदपुत्र ही संज्ञा लाविली असून चारुदत्ताच्या प्रासादात शिरण्यापूर्वी त्यानें प्रथम स्कदाला नमन करून पुन्हा 'नमः कनकशक्तये ब्रह्मण्यदेवाय देवव्रताय' असें वदन केलें आहे. हीं सारीं स्कदाचींच विभिन्न नामें आहेत. यौधेयगणाच्या नाण्यावर यापैकीं ब्रह्मण्यदेवाचा उल्लेख सापडतो. या नांवाच्या मागें सु हें विशेषण लागून द्राविडी लोकात सुप्रसिद्ध असलेलें सुब्रह्मण्य हें नाम बनलें आहे. यौधेयादिगणामध्यें स्कंदाची उपासना प्रबळ होती. यावरून अशी एक कल्पना सुचते कीं त्या काळीं राजसत्तावादी लोक या गणाना चोर म्हणत असत आणि त्यामुळें स्कदोपासक तितके चोर असें समीकरण बनून चोराना स्कदपुत्र ही सज्ञा प्राप्त झाली असावी. चंद्रगुप्तानें आपल्या सैन्यात मुख्यत: चोराचा समावेश केला होता, या जस्टिनच्या विधानाचा अर्थ मॅक्क्रिंडलनें, पजाबातील गणातून चंद्रगुप्तानें सैन्य उभारलें असाच केला आहे. एकीकडे चोरांचा देव मानलेल्या स्कदाच्या वर्णनात मार्कंडेय म्हणतात, "ब्रह्मण्यो वै ब्रह्मजो ब्रह्मविच्च । ब्रह्मेशयो ब्रह्मवता वरिष्ठः ।। ब्रह्मप्रियो ब्राह्मण सव्रती त्वम् । ब्रह्मज्ञो वै ब्राह्मणानां च नेता ।। " मला वाटतें, या सकृद्दर्शनीं दिसणाऱ्या विरोधाचा परिहार विष्णुधर्म पुराणांतील पुढील भौगोलिक वचनानें होऊ शकतो. 'त्रिगर्तमीनकौलूता ब्रह्मपुत्राः सतीगणाः ।। अभिसाराश्च काश्मीराश्चोदक्पूर्वेण कीर्तिताः ।। ' या वचनात उल्लेखिलेल्या उत्तरपूर्वेकडील देशांतून शिवस्कदोपासना प्रबळ असली पाहिजे; विशेषतः सतीगण आणि ब्रह्मपुत्र या देशांत, त्यामुळेंच स्कद हा ब्रह्मण्यदेव बनला असला पाहिजे.

## स्कंद आणि पिशाचगण

ब्रह्मपुत्रांसारख्या समाजाच्या संसर्गानें स्कद हा ब्रह्मण्यदेव बनला असला तरी त्याच्या पित्याच्या पिशाचगणानीं तो नेहमींच वेष्टिलेला असे. वनपर्वातील स्कंदोपाख्यानांत वर्णन केलेंच आहे. 'स सवृतः पिशाचाना गणैर्देवगणैस्तथा' या गणांतले देवगण आणि पिशाचगण हे दोघेहि मानवच होते. या उभयतामध्यें पिशाच हे फार प्रबळ असून ते शिवाचे कट्टे अभिमानी होते. या पिशाच लोकाची भाषा जी पैशाची त्या भाषेंतच शिवानें पार्वतीला सांगितलेल्या गोष्टींचा संकलना-

त्मक बृहत्कथा हा प्रचंड ग्रंथ रचला गेला. या पिशाचाचा देश म्हणजे काश्मीर शेजारचा दरद लोकांचा देश असल्याचें ग्रीयर्सननीं पूर्वीच सिद्ध केलें आहे. पैशाची भाषेचे शूलिक पैशाची म्हणजे सोग्डियाना प्रांतातील पैशाची, केकय पैशाची म्हणजे गांधार प्रांतातील पैशाची, त्याचप्रमाणें शौरसेनी आणि पांचाली असे चार प्रमुख भेद प्राकृत व्याकरणकारांनीं सांगितले आहेत. त्यावरून मध्य आशियातील सोग्डियाना, अफगाणिस्थानातील गांधार यासारख्या प्रांतातून पूर्वी शिवाच्या पिशाचगणांची वस्ती होती, हें कळून येतें.

## उमा हीच देविका

अर्वाचीन काळीं नेपाळातील हिमालयात शिवोपासकांचीं सर्वांत पवित्र क्षेत्रें आहेत. पण प्राचीन काळीं याच्या उलट परिस्थिति होती पूर्वेकडील हिमालयाशीं शिवाचा जो संबंध येतो, तो मुख्यतः गंगाधर या नात्यानें आणि गंगावतरणाच्या आख्यानामुळें येतो. कैलास हेंहि शिवाचें मूळचें निवासस्थान नसून केवळ कुबेराच्या आग्रहाकरिता त्यानें तेथें निवास केला. विवाहानंतर शंकर हे पश्चिमेकडील हिमालयात रहावयाला गेले, असें बालकांडात स्पष्ट सांगितलें आहे. शंकरपत्नी उमा ही जम्मू प्रांतातील देविका (अर्वाचीन देग) नदी असून ती सियालकोट आणि शेखपुरा या जिल्ह्यातून वहात जाऊन रावी नदीला मिळते. ही नदी अत्यंत पवित्र असून तिच्या तीरावर भारतीय वैदिक संस्कृतीचें एक अत्यंत महत्त्वाचें केंद्र होतें. 'उमादेवीति मद्रेषु देविका या सरिद्वरा।' असें वचन विष्णुधर्मोत्तर पुराणात आलें असून वामन पुराणादि ग्रंथातून अशाच आशयाचीं वचनें आढळतात. या नदीतीरीं उत्पन्न होणारे तांदूळ निदान पाणिनीच्या काळापासून अर्वाचीन काळापर्यंत सारखेच प्रसिद्ध आहेत. हिच्या तीरावर पिकणाऱ्या सुप्रसिद्ध बासमती तांदुळामुळेंच उमेला तिचें अन्नपूर्णा हें अमर नाम प्राप्त झालें आहे. जम्मूच्या उत्तरेकडील काश्मीर हे उमेच्या पूर्वावतारांतील सतीचें सरोवर म्हणून प्रसिद्ध आहे. असो. उमादेवीचें नांव वैदिक वाङ्मयात प्रथम केनोपनिषदात आलें असून त्या ठिकाणीं तिनें इंद्र, अग्नि, वायु या देवांचें अहंकारहरण केल्याचा उल्लेख आहे. पाणिनीला उमा हें नाव माहीत नसावें, असा एक अप्रतिष्ठित तर्क म. म. घुलेशास्त्री यानीं केला आहे. तो सपशेल निराधार आहे, हें सांगायला नकोच. वर केलेल्या साऱ्या भौगोलिक चिकित्सेनें शिवाची उपासना अनार्यांत, विशेषतः अनार्य द्रविडात प्रथम प्रचलित झाली,

असा प्रचार करणाऱ्यांची थोडीफार अडचण होईल, हें उघड आहे. पण इराण आणि मूजवत् पर्वतप्रभृति शिवोपासनेच्या केंद्रांतून पूर्वी द्रविड समाजाची वसती होती, असें प्रतिपादण्याचा मार्ग त्याना मोकळा आहेच. ' अथ गच्छेत राजेन्द्र देविका लोकविश्रुताम् । प्रसूतिर्यत्र विप्राणा श्रूयते भरतर्षभ ।। ' या वनपर्वातील तीर्थयात्रावर्णनातील श्लोकावरून ब्राह्मणी सस्कृतीचें उत्पत्तिस्थान म्हणून देविकेची प्रसिद्धि असल्याचें कळून येतें.

## पश्चिमेचीं शिवोपासनेचीं केंद्रें

अखड भारताच्या वायव्यसीमेवरील भागांत शिवोपासनेचीं आणखींहि अनेक पुरातन केंद्रें होतीं. त्याची उपलब्ध माहिती एकत्रित करणें शैव पंथाच्या इतिहासाच्या दृष्टीनें अतिशय आवश्यक आहे. हेसूचियस् नावाच्या ग्रीक लेखकानें लिहिलें आहे कीं वृषभ हा गाधार देशाचा देव होता. या विधानाचा भारतीय परपरेंत असा अर्थ होतो कीं ते लोक वृषभध्वजाचे उपासक होते. त्या भागांत देव शब्दाचा अर्थहि महादेव असाच होत असे खिस्तकालाच्या प्रारभीं गोंदोफर नावाच्या पार्थियन राजानें आपल्या नाण्यावर स्वतःला देवव्रत, अथवा सुदेवव्रत असे विशेषण लाविलें असून त्याचा अर्थ अधिकारी इतिहासकारानीं शिवोपासक असाच केला आहे. देवव्रत शब्दाचा अर्थ स्कद असाहि होतो. पण ही सज्ञा स्कदाला कधींपासून लागली, याचा शोध केला पाहिजे. देवव्रत आणि सुदेवव्रत हीं नावें तर ब्रह्मण्यदेव आणि सुब्रह्मण्यदेव या स्कदाच्या सुप्रसिद्ध नावासारखींच दिसतात. वायव्यसीमेवरील धर्मवेड्या मुसलमानाचे प्रख्यात केंद्र जें महाबन पठार, त्या पठारावर खिस्त-कालाच्या प्रारभीं शिवोपासनेचें केंद्र असल्याचें तत्कालीन शिलालेखावरून कळून आलें आहे. मथुरा येथील पुराणवस्तुसग्रहात दोन विदेशी व्यक्ति हातात द्राक्षवल्ली घेऊन ती शिवलिंगाला वहावयाला जात असल्याचें चित्र आहे. या विदेशी व्यक्तींचा वेष मध्यआशियातील दिसतो. वायव्यसीमेवरील स्वात नदीच्या खोऱ्याजवळच गौरी नावाची नदी असून त्या नदीतीरावरील गौरीच्या उपासकानीं अलेक्झाडरला विरोध करण्यात भाग घेतला होता. त्या गौरी नदीला लागूनच त्र्यक्षायण नावाचा प्रात प्राचीन काळीं होता. या नांवाचा शिवाच्या तृतीय नेत्राशीं सबध आहे, हें उघड आहे. महाभारतातील सभापर्वतात द्व्यक्ष, त्र्यक्ष आणि ललाटाक्ष या तीन जनपदाचा उल्लेख आला आहे. त्यापैकीं द्व्यक्ष हा बदकशान असावा असें डॉ. वासुदेवशरण आगरवाल यांनीं सुचविलें आहे. ललाटाक्ष हा चीनच्या आक्रमणामुळें

अलीकडे प्रसिद्धीला आलेला लडाख प्रांत होय. ग्रीकाना शरण येणाऱ्या लोकांत आरियननें ओस्सदी नांवाच्या लोकांचा उल्लेख केला आहे. या लोकाचें नाव, कुमारसभवात हिमालयाची राजधानी आणि उमेची जन्मभूमि म्हणून उल्लेखिलेल्या ओषधिप्रस्थ राजधानीशीं अतिशय सदृश दिसतें. प्रस्थान्त नावें कुरुक्षेत्रात फार होतीं, असें पाणिनीवरून समजतें. शोणप्रस्थ, पाणिप्रस्थ, इद्रप्रस्थ या सुप्रसिद्ध नावांव्यतिरिक्त शमीप्रस्थ, कटुकप्रस्थ, बदरप्रस्थ, द्राक्षाप्रस्थ इत्यादि नावें व्याकरण-ग्रथात आढळून येतात. याच्या सान्निध्यातच ओषधिप्रस्थ असलें पाहिजे. शिव आणि स्कद याच्या परिवारात पिशाचाच्या सह देवगणहि असत. पजाबातील राजन्यादि गणात देवयान गणाचाहि पतजलींनीं उल्लेख केला आहे. अलेक्झाडरला प्रतिरोध करणाऱ्या गणात ग्रीक इतिहासकारानीं शिवासाचाहि उल्लेख केला आहे. हे शिवास दाशराज्ञयुद्धानतर अलेक्झाडरच्या काळींच प्रथम भेटत असले तरी त्यांची शैवो-पासना किती प्राचीन आणि प्रभावी होती, याची तेवढयावरूनहि कल्पना येऊ शकते. वरील मजकूर लिहिल्यानंतर ओस्सदी जनाची वसती रावी नदीच्या शेजारच्या प्रदेशात असावी, असें विधान डॉ. हेमचद्र रायचौधरी यानीं त्याच्या प्राचीन भारताच्या राजकीय इतिहासात केलेलें आढळलें. उमादेवी ही नदी रावी नदीलाच मिळाली असल्यानें कालिदासाचें ओषधिप्रस्थ तिच्या उगमाकडील प्रदेशांत असण्याची शक्यता त्या विधानानें थोडी वाढली आहे. स्कदाची उत्पत्ति झाली तेव्हां चैत्ररथ वनातील लोकानीं सांगितलें कीं हा अनर्थ अग्नीनें निर्माण केला आहे. ' निवसन्ति वने ये तु तस्मिंश्चैत्ररथे जनाः । तेऽब्रुवन्नेष नोऽनर्थः पावकेनाहितो महान् ॥ ' तेव्हां स्कंदोत्पत्तीचें क्षेत्र चैत्ररथ वनाशेजारीं म्हणजे चित्रळ प्राताच्या सान्निध्यात असलें पाहिजे, हें उघड आहे.

## राष्ट्रीयत्वाचा जन्म पर्वतांत

सीमाप्रातातील गिरीशोपासनेवर इतका भर देण्याचें मुख्य कारण हें कीं या प्रांतातील पर्वतपुत्रामध्येंच प्रथम हिंदुराष्ट्रीयत्वाच्या कल्पनेचा जन्म झाला. खिस्तपूर्व दुसऱ्या आणि पहिल्या शतकातहि ही हिंदुत्वाची भावना इतकी स्वाभाविक आणि सासर्गिक बनून गेली होती कीं त्या प्रातातील एका ग्रीक राजानें स्वतःला अभि-मानानें ' हिंदुज ' असें म्हणवून घेतल्याचें उदाहरण श्री. नीलकंठशास्त्री यांनीं त्यांच्या मौर्यशातवाहनकालाच्या इतिहासात दिलें आहे. राष्ट्रांचें जन्मस्थान पर्वत प्रदेशातच असतें आणि त्याच प्रदेशांत त्यांना सकटप्रसंगीं निर्भय आश्रयस्थान लाभूं

शकतें. सपाट प्रदेश अत्यंत असुरक्षित असतात. त्यामुळें राष्ट्रांच्या बाल्यावस्थेंत त्यांना जें संरक्षण हवें असतें, तें सपाट प्रदेशांत लाभू शकत नाहीं. याकरितां राष्ट्रांचा जन्म नेहमीं पर्वत-प्रदेशात होतो. पर्वत-प्रदेशात जन्म घेऊन आणि शैशव घालवून धष्टीकष्टीं झाल्यावर मग तीं अधिक समृद्ध प्रदेशांत पसरतात आणि संकटकाळीं पुन्हां आपल्या जन्मस्थानात आश्रय घेतात. स्वातंत्र्य आणि राष्ट्रीयत्व याची उपासना करणें हा पर्वतपुत्राचा जन्मस्वभावच आहे. असल्याच पर्वतपुत्रांपैकीं एक अतिप्रसिद्ध पर्वतपुत्र आर्य चाणक्य यांनींच अर्थशास्त्राच्या नवव्या अधिकरणात 'चक्रवर्ति क्षेत्रा'च्या रूपानें भारताच्या एकराष्ट्रीयत्वाची कल्पना मांडली आहे. 'देशः पृथिवी, तस्यां हिमवत्समुद्रांतरमुदीचीनं योजनसहस्रपरिमाणमतिर्यक्चक्रवर्ति-क्षेत्रम् ।' म्हणजे हिमवतापासून महासागरापर्यंत सहस्र योजनें हें चक्रवर्तिक्षेत्र होय. या क्षेत्रावर स्वतःला भारतीय संस्कृतीचे अनुयायी म्हणवून घेणाऱ्या विदेशी शत्रूनीं आक्रमण केलें तरी त्याचा प्राणपणानें प्रतिकार करण्याला सीमा प्रांतातील गणराज्यें सिद्ध असत. ग्रीकांसारख्या विधर्मी परकीयाना त्यानीं किती निकरानें प्रतिकार केला, त्याचें वर्णन त्या यवनांनींच लिहून ठेवल्यामुळें साऱ्या इतिहासज्ञांना सुविदित झालें आहे. पण ग्रीकांच्या मागून शक, पारद आणि कुषाण यांचीं जीं लागोपाठ आक्रमणें झालीं, त्याचाहि सीमाप्रांतातील गणराज्याच्या ब्राह्मण नेत्यानीं तितकाच निकरानें प्रतिकार केला असूनहि त्याची गधवार्ता आमच्या अधिकारी इतिहासकाराना अद्यापि लागली नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

## कप-ब्राह्मण संवाद

महाभारताच्या अनुशासनपर्वांतील वायु आणि सहस्रार्जुन याच्या संवादात कप नामक असुरानीं स्वर्ग अर्थात् चित्ररथ = चित्रळ, काफिरिस्थान आणि काश्मीर हा प्रदेश जिंकल्यानंतर त्याचीं आणि ब्राह्मणाचीं जीं बोलणीं झालीं, त्यांचा सारांश दिला आहे. "ब्राह्मणांनीं कपासुराच्या नाशार्थ कर्मानुष्ठान आरंभिलें. तें वर्तमान कपांच्या कानीं गेलें, तेव्हा त्यानीं ब्राह्मणाकडे धनिन् (मुरुड ?) नावाचा दूत पाठवून त्याच्या द्वारा विचारलें. हे ब्राह्मणानो, आम्ही सर्व कप अगदीं तुम्हा-सारखेच आहोत. आम्ही कधीं अयोग्य रीतीनें स्त्रीसंभोग करीत नाहीं, यज्ञात वधलेल्या पशूवाचून अन्य पशूंचें मांस खात नाहीं. आम्ही नित्य अग्नीचें प्रज्वलन करून त्याचें हवन करतों, गुरुजनाची आज्ञा पाळतों, इंद्रियांचा निग्रह करतों आणि बालकांना अन्नादिक वांटून देतों. आम्ही सर्व मिळून मिसळून सावकाशपणें

मार्गक्रमण करतों. सणवार पाळतों, रजस्वलेला स्पर्श करीत नाहीं. गर्भिणी आणि वृद्ध यांचें भोजन झाल्यावांचून अन्नग्रहण करीत नाहीं. आम्ही पूर्वाह्णीं द्यूतक्रीडा करीत नाहीं. किंवा दिवसां निजत नाहीं. तेव्हां आम्हां कपांना तुम्ही कसें जिंकाल ? " पुण्यामुंबईच्या सुधारकांनीं, आम्ही इंग्रजांचे सारे आचार पाळतों, इंग्रजांप्रमाणेंच मद्यमांसाशन करतों, रविवारीं प्रार्थनासमाजात डोळेसुद्धां मिटतों, तस्मात् हे इंग्रजानों, तुम्ही आम्हांला कसे जिंकणार, असा प्रश्न विचारण्याइतकेंच कपांचे उद्गार हास्यास्पद वाटतील. पण तेव्हा कपांनीं म्हणजे सम्राट्कनिष्काच्या पूर्वजांनीं सीमाप्रांतातील निसर्गश्रीनें आणि मानवीश्रीने विनटलेले प्रांत जिंकले होते आणि त्यामुळें कातर झालेले देव ब्राह्मणाच्या पुढें गाऱ्हाणें गात होते. ' मदास्यव्यतिषिक्ताना अस्माकं लोकपूजितः । च्यवनेन हृता भूमिः कपैश्चैव दिवंप्रभो ।। ' याचा अर्थ असा कीं मद नामक असुराच्या अर्थात् इराणच्या मीडिया नामक प्रातातील जनांच्या साहाय्यानें च्यवनानें भूमि म्हणजे सिंध, पंजाब प्रभृति प्रांत आणि कपानीं स्वर्ग म्हणजे चित्रळ, काश्मीर प्रभृति प्रात व्यापल्यामुळें तेव्हा भारतवर्षावर अतिशय मोठें अरिष्ट कोसळलें होतें. हा काळ शकपारदकुषाण याच्या स्वाऱ्याचा काळ होय. या अवतरणांतील कप हा कुषाण घराण्यातील पहिला राजा कुजुल खडफिस. याच्या नाण्यावर ' कपस्य ' अशा आशयाचीं अक्षरें खोदलेलीं असतात. या कप शब्दाचा उलगडा करताया आचार्य स्टेन कोनोव यानीं लिहिलें आहे. ' The final Kıap ıs represented ın coın-legends by forms such as Kap, Kapha, Kau, Kasa, Kaphsa, Kadapha, Kadphıs. ' म्हणजे या राजाच्या नांवातील शेवटचीं कियाप हीं अक्षरें त्याच्या नाण्यावर कप, कफ, खडफिस इत्यादि भिन्न स्वरूपात आढळतात. कुषाण घराण्याच्या नाण्यावर यज्ञवेदींत राजा आहुति देत असल्याचीं चित्रें नेहमीं आढळून येतात. हें चित्र म्हणजे कुषाण घराण्याचें प्रतीकच बनलें होतें. तेव्हा अनुशासन पर्वातल्या कप ब्राह्मण सवादातील, कप हें आक्रमक राजाचें नाव आणि त्याच्या कुळांतील अग्निहोत्रयज्ञादिकाचा उल्लेख, यांवरून त्या सवादातील माहिती काल्पनिक नसून ऐतिहासिक असल्याचें प्रत्ययाला येतें. कपांच्या सदेशाला ब्राह्मणानीं पुढील आशयाचें उत्तर दिलें, असें व्यासांनीं आपल्या इतिहासात लिहिलें आहे. ' कपान्वय विजेष्यामो ये देवास्ते वय स्मृताः ।। तस्मात् वध्याः कपाऽस्माकं धनिन् याहि यथागतम् ।। ' नीलकंठी महाभारताच्या चित्रशाळा प्रतींतील या श्लोकाचा भावार्थ असा दिसतो कीं देवांना टाकून आम्ही कपांच्या पक्षाला मिळणार नाहीं. कप हे आमचे वध्य

आहेत आणि आम्ही कपवंशाला जिंकणार, तेव्हां हे धनिन्, (हे मुरुंडा) तूं आलास तसा परत जा.' कुजुल खडफिस याच्या नावांतील खडफिस शब्दाचा अर्थ धनुर्धारी होत असावा, असें कनिंगहॅमनें सुचविलें आहे. ती कल्पना खरी असल्यास कपवंशातील पुढच्या राजांचें चरित्र रचताना हरिवंशादि पुराणकारांनीं बाणासुर ही संज्ञा का वापरली, याचें स्पष्टीकरण मिळतें.

## हनिष्यामो कपान्वयम्

कप राजाच्या नाण्यावर 'सत्यधर्मस्थितस्य' हीं अक्षरें कोरलेलीं असतात. पण यावरून हा शैव होता कीं बौद्ध होता, हें सागता येत नाहीं. याच्या नाण्यावरील देवमूर्ति ही बुद्धाची मूर्ति आहे, असें नाणकशास्त्रज्ञ म्हणतात. तसें असल्यास ब्राह्मणानीं झिडकारल्यानतर तो कदाचित् बौद्ध बनला असेल. त्याचा मुलगा विम खडफिस हा तर स्वतःला माहेश्वर म्हणवितो आणि त्याच्या नाण्यांवर निरपवादपणें शैवप्रतीकें आढळून येतात. तेव्हां तो कट्टा शैव होता, याविषयीं शंका नाहीं. कुषाण कुळ प्रथमपासून शैव असल्यामुळेच त्या कुळातील राजानीं जिंकलेल्या प्रातातील ब्राह्मणाच्या पुढे याच्या राज्याला मान्यता द्यावयाची कीं नाहीं, हा प्रश्न उपस्थित झाला होता. भारतीय बौद्धाना बुद्धाला वंदन करणारा कोणीहि विदेशी राजा चालत असे. पण त्याचें अनुकरण करण्याचे ब्राह्मणानीं नाकारलें आणि 'विजेष्यामो कपान्वय' अर्थात् कपवशाला आम्ही जिंकू, अशी त्यानीं प्रतिज्ञा केली. केव्हा केव्हा मनात येतें कीं या राजाना ब्राह्मणानीं मान्यता दिली असती तर वर्तमानकाळीं बौद्धपथाच्या ऐवजीं शैवपथच विश्वधर्म झालेला आपल्याला दिसला असता. पण धर्म हा आक्रमकाचा मार्ग सुकर करण्याकरिता नसून त्याचा उच्छेद करण्याकरिता आहे, अशीच तत्कालीन ब्राह्मणाची भावना असल्यानें त्यानीं कुषाणाना अगदीं कसून विरोध केला.

## सेनानींची उपासना

प्राचीन काळीं इराण, अफगाणिस्थान आणि मोंगोलिया या सर्व देशातून शिवाची उपासना प्रचलित होती. यामुळेंच देवावर म्हणजे भारतावर आक्रमण करणाऱ्या बहुतेक साऱ्या असुराना शिव प्रसन्न झाल्याचीं वर्णनें पुराणातून आढळतात. पण ब्राह्मणानीं कुषाणाना विरोध केल्यानतर शैवपंथाच्या या आतरराष्ट्रीय स्वरूपात परिवर्तन घडून आलें आणि तो भारतापुरताच मर्यादित राहिला. बौद्ध परंपरेप्रमाणें अशोक राजाहि प्रथम शैव होता. पण बिंदुसाराच्या

औरस पुत्रांचा संहार करण्याच्या कारस्थानांत त्याला ब्राह्मणाचें साहाय्य न होतां बौद्धांचें साहाय्य झालें, त्यामुळें तो बौद्ध बनला. अशोकाप्रमाणेंच कनिष्कानेंहि ब्राह्मणांच्या अखंड विरोधामुळें रुष्ट होऊन बौद्धधर्माचा स्वीकार आणि प्रसार करून त्याला विश्वधर्माचें स्वरूप प्राप्त करून दिलें. असो. या शक, पारद, कुषाण-प्रभृति विदेशी आक्रमकांचा प्रतिकार करण्याला समर्थ असा कोणी राजा लाभण्याची आशा आणि अपेक्षा सीमेवरील ब्राह्मणांना आणि तेथील वार्ताशस्त्रोपजीवि गणाना उरली नसल्यानें ते केवळ युद्धकुशल सेनापतीच्या शोधात असत आणि असा सेनानी लाभावा, याकरितां देवसेनानी स्कंद याची भक्तिभावानें उपासना करीत असत. या उपासनेमुळें आक्रमक शैव कुषाणाचा नायनाट करण्याची प्रतिज्ञा केलेले ब्राह्मण आणि त्याचे अनुनायी असलेले यौधेयादि गण हे आपल्या शत्रू-पासून आपोआप पृथक् बनले. किंबहुना या विदेशी शैवशत्रूपासून पृथक्त्वाचें प्रदर्शन करण्याकरिता यौधेयादि गणांनीं कार्तिकस्वामीच्या उपासनेवर त्या काळीं इतका भर दिला असला पाहिजे. यौधेय गणाच्या सर्वांत प्राचीन नाण्यांवर शिवाला प्रिय असलेल्या शूलगव यज्ञाचें दृश्य दाखविलें असल्यानें त्या काळीं त्यानीं कार्तिकस्वामीला आपलें सर्वस्व अर्पण केलें नव्हतें, हें उघड आहे. पण पुढें कार्तिकस्वामीच्या उपासनेची राजकीय उपयुक्तता त्याच्या नेत्याना कळून आल्यानंतर तो त्यांचा एकमेव देव बनला. यामुळें पुष्पमित्राच्या उदयावरून स्कदविषयक नवनवीन आख्यानें रचलीं जाऊ लागलीं. कारण स्कदाप्रमाणेंच पुष्पमित्रहि सेनानीच आहे. स्कंदाचा मूळचा आवडता पक्षी कुक्कुट होता. स्कदाच्या आवडत्या रोहितक गिरीसहच पाणिनींनीं कुक्कुटगिरीचाहि उल्लेख केला आहे. पण पुष्पमित्रानें मौर्यांच्या मयूरसिंहासनावर बसून परशत्रूचा कांटा काढल्यानें ‘ मयूरपृष्ठाश्रयिणा गुहेन ’ असें वर्णन करण्याला कालिदासाला स्फूर्ति झाली. आमच्या अर्वाचीन इतिहासकारांच्या डोळ्यादेखत टिळकानीं गणेशोत्सवाचा इग्रजविरोधी राजकारणाकरिता उपयोग केलेला असूनहि त्याना राजकारणाच्या दृष्टीनें आपला धार्मिक इतिहास तपासण्याची बुद्धि होत नाहीं, हें नवल आहे. उदाहरणार्थ, सबध विष्णुसहस्त्रनामात विष्णूला कोठेंहि स्कदजित् ही सज्ञा लाविलेली नाहीं. पण गुप्तकाळांत उत्कर्ष पावलेल्या पाचरात्र पथात ही सज्ञा त्याला लाविली आहे. याचा अर्थ अगदीं उघड आहे. विष्णुभक्त गुप्ताच्या उत्कर्षासहच यौधेयादि स्कदभक्त गणाचा अपकर्ष झाला आणि स्कंदाची उपासना मागें पडली. नाहीं तरी कपाचा उच्छेद करण्याकरिता ब्राह्मणानीं या सुब्रह्मण्यदेवाचें माहात्म्य वाढविलें असल्यानें कुषाणाच्या विनाशानंतर त्याचें

जीवनप्रयोजनच नष्ट झालें होतें. गुप्तकाळातच कालिदासाला अविदित असलेल्या गणेशोपासनेचा उत्कर्ष झाला आणि त्या उपासनेला पुढें पचायतनांत स्थानहि मिळालें. पण सुब्रह्मण्याला मात्र त्यात स्थान मिळालें नाहीं, इतकेंच नव्हे तर त्याला भारताच्या दक्षिण टोंकाला निर्वासित व्हावें लागलें. या घटनेचा ऐतिहासिक अर्थ लावण्याचा निदान प्रयत्न तरी करणें आवश्यक आहे.

## विष्णुभक्तांची स्कंदभक्तांशीं स्पर्धा

शुंगांच्या उदयापासून समुद्रगुप्ताच्या दिग्विजयापर्यंतच्या काळांत पश्चिम भारतात विष्णुभक्त आणि स्कंदभक्त या उभयतामध्ये जी तीव्र स्पर्धा चालू होती, तिची रूपरेखाहि अजून आपल्या इतिहासकारांनीं रेखाटलेली नाहीं. विष्णुभक्त हे राजसत्तेचे पुरस्कर्ते होते, ही गोष्ट स्वतःसिद्धच आहे. कारण ' नाविष्णुःपृथिवी-पतिः ' हा तर त्यांचा सिद्धान्तच आहे. कदाचित् या सिद्धाताच्या प्रभावामुळेंच मुद्राराक्षसातील विष्णुगुप्तचाणक्य आपण स्वतःच सम्राट् असल्यासारखें वर्तन करीत असतो. असो. याच्या उलट चोरांना आणि गणाना स्कदपुत्र म्हणत असत, त्यावरून स्कदोपासना ही सामान्यतः गणराज्याना अनुकूल होती, असें दिसून येतें. गणांना त्या काळीं चोर म्हणण्याचें एक प्रमुख कारण हें होतें कीं चीन, इराण आणि रोमन साम्राज्य यांच्याशीं स्थलमार्गानें होणाऱ्या भारताच्या आयातनिर्यात व्यापाराच्या वाहतुकीचे सीमेवरील पर्वतप्रदेशातील सारे मार्ग गणराज्याच्या सत्ते-खालीं होते. त्यामुळें तो माल लुटून किंवा तो सुरक्षित जाऊं देण्याकरिता भरमसाट वाहतूक कर ( transit fee ) आकारून श्रीमंत बनणें गणराज्यांना फार सुलभ होतें. नाक्यांच्या मार्गावरील स्वामित्वाचा वारसा स्कदाला शिवाकडूनच प्राप्त झालेला होता. कारण प्रवासाला निघतांना, अरण्यांत प्रवेश करतांना, त्याचप्रमाणें नदी ओलाडतांना, चार वाटा फुटतात त्या ठिकाणीं रुद्राला नमन करून प्रार्थना पाठ करण्याचा विधि गृह्यसूत्रानीं पूर्वींच सांगितला आहे. अशा प्रकारें व्यापाराच्या वाहतुकीवर श्रीमंत होणारीं गणराज्यें राजसत्तेशीं तीव्र स्पर्धा करूं शकत. पर्वत-प्रदेशातील स्कदभक्त गणाच्या या वाटमारीची विष्णुभक्त राजसत्ताना स्वाभाविकच चीड येत असे. त्यांतून स्कद हा गिरिशाप्रमाणें केवळ पर्वत-प्रदेशावर संतुष्ट राह-णारा देव नसून तो गंगापुत्रहि असल्यानें त्यानें सरितापुत्राच्या क्षेत्रावरहि आक्रमण आरंभिलें होतें. अलेक्झाडरनें भारतावर आक्रमण केलें, तेव्हां त्याला वाटेंत कांहीं राज्येंहि भेटलीं आणि कांहीं गणराज्येंहि भेटलीं. त्यांपैकीं बहुतेक सारीं गणराज्यें

त्याच्याशीं निकरानें लढली. उलटपक्षीं बहुतेक सारे राजे शस्त्रद्यूत न खेळतांच त्याला शरण गेले. तेव्हापासून गुप्तांचा उत्कर्ष होईपर्यंतच्या काळात अलेक्झांडरच्या आक्रमणाच्या क्षेत्रांत स्वदेशी राजाचे सहसा उल्लेख आढळत नाहींत आणि गण-राज्यांचे उल्लेख मात्र पदोपदीं आढळतात. या साऱ्या गणराज्यांना अंकित करूनच कनिष्कानें गणेश ही पदवी धारण केली होती. यावरून या क्षेत्रांतील विष्णुभक्तांची सत्ता सपशेल नष्ट झाली होती, असें अनुमान काढावें लागतें. पंजा-बांतील राजमंडलापैकीं एकटा पोरस् अथवा पुरु राजा मात्र अलेक्झांडरशीं निकरानें लढला होता. हा राजा जेव्हां लढाईला गेला, तेव्हा त्याच्या सैन्याच्या आघाडीला कृष्णाची मूर्ति होती, असें क्विंटस् कुर्टिउस यानें लिहिलें आहे. आघा-डीला चालविलेल्या कृष्णमूर्तीच्या वाहकाचें संरक्षण न करता पळून येणें हा घोर सैनिकी अपराध होता आणि त्या अपराधाकरिता मृत्यूचीहि शिक्षा होत असे. भारतीय युद्धात अर्जुनाच्या पुढें कृष्ण होता, या पवित्र परंपरेला अनुलक्षूनच पुरूच्या राज्यात ही प्रथा रूढ झाली असली पाहिजे. पण या लढाईत पराजित झाल्यानंतर पुरु हा प्रथम ग्रीकांचा विश्वासू हस्तक आणि मग त्याचा एक राज्य-पालहि बनला. या अपराधामुळें पुढें गणांनीं त्याचें राज्य नष्ट केलें. असो. ग्रीक लेखकाच्या वरील वर्णनावरून महाभारतातील असल्याच अन्य एका प्रसंगाचें स्मरण होतें. द्रोणपर्वाच्या अंतीं अर्जुन व्यासांना विचारतो. “ अग्रत लक्षये यान्त पुरुष पावकप्रभम् । ज्वलन्त शूलमुद्यम्य या दिश प्रतिपद्यते । तस्या दिशि विदीर्यन्ते शत्रवो मे महामुने ।। ” अर्जुनाच्या प्रश्नाला व्यासांनीं उत्तर दिलें कीं तो तेजस्वी पुरुष स्वतः शूलपाणि शंकर आहे. देवमूर्तींना युद्धात भाग घ्यावयाला लावण्याच्या प्रथेमुळेंच व्यासांना अर्जुनाच्या मुखीं असे उद्गार घालण्याची कल्पना सुचली असली पाहिजे. या साऱ्या परंपरांचा विचार केला म्हणजे गुप्तकाळीं विष्णु हा स्कंदजित् कसा बनला असेल, याची कल्पना येते.



प्रकरण नववें

# कालिदास आणि अश्वघोष

कालिदास आणि अश्वघोष याच्या पौर्वापर्याचा विचार मला या प्रकरणात करावयाचा आहे. संस्कृत सारस्वतेतिहासाच्या दृष्टीनें हा विषय महत्त्वाचा आहे. त्या व्यतिरिक्त सध्या कालिदासचिकित्सेचा व्यवसाय करणाऱ्या बहुसंख्य सस्कृतज्ञांना त्याच्या वाङ्मयाची चिकित्सा कितपत करतां येते, याची चाचणी करण्याच्या दृष्टीनेंहि या विषयाला स्वतत्र महत्व आहे. या दोनहि दृष्टींनीं मी हें प्रकरण लिहीत आहें. या प्रश्नासंबधीं इतक्या स्पष्टपणें लिहिण्याचें कारण प्रथमच सागणें सोईचें होईल. श्री. सदानदराव दीक्षित मला एकदा रागावून म्हणाले होते कीं कालिदास गुप्तकालीं होऊन गेला, असें हिंदुस्थानांतले बहुतेक सारे विद्वान् मानीत असतांना केवळ तुमच्यासारखे काहीं प्रगतिविरोधी पुणेरी दुराग्रही मात्र ती गोष्ट मान्य करीत नाहींत. या उद्गाराचा उल्लेख मी केवळ करमणुकीसाठीं करीत नसून कालिदासाला त्या वाङ्मयदरिद्री बौद्ध भिक्षूचा ऋणी समजणें हें आज अधिकारी विद्वानात प्रागतिकपणाचें कसें लक्षण समजलें जात आहे, तें वाचकाच्या लक्षात यावें, त्यासाठीं मी हा उल्लेख करीत आहे. ज्या अश्वघोषाच्या उक्तींची उचलेगिरी करून कालिदासाला आपलीं काव्ये सजवावीं असें वाटलें, अशी आमच्या प्रगतिप्रिय पडिताची समजूत आहे, त्या बौद्ध भिक्षूच्या कवितेचा कालिदासोत्तर सस्कृत कवितेवर कितपत परिणाम झाला, याचा अगदीं सूक्ष्मदर्शक् यंत्रानें शोध घेऊन अश्वघोषभक्त डॉ. जॉन्स्टन यानीं आपल्या बुद्धचरिताच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे. 'Ashvaghoshha exercised only a minor influence on writers subsequent to Kalidasa.' म्हणजे कालिदासोत्तर कवींवर अश्वघोषाच्या काव्याचा अगदींच किरकोळ परिणाम झाला आहे. ही सुद्धा खरें म्हणजे अतिशयोक्तिच आहे. वस्तुतः अश्वघोष हा कालिदासोत्तर सस्कृत कवींच्या केवळ उपेक्षेचा विषय आहे. कारण अश्वघोषाला आपल्या मोरोपताच्या इतपत संस्कृत येत असले तरी सस्कृत काव्यरचना करण्याला तें ज्ञान अगदीं अपुरें होतें.

## अश्वघोषाचें संस्कृत

अश्वघोषाला साधे समासहि कवितेंत धड वापरतां येत नव्हते. उदाहरणार्थ, ‘उभौऽपि तस्मात् युगपद्धजस्व । ’ (बु. च. ९-२१ ) या चरणातील उभौ अपि या शब्दाचा त्यानें केलेला समास चूक आहे. त्याच्या आधींच्या सर्गांतील ‘ गतोऽर्यपुत्रो ह्यपुनर्निवृत्तये । ’ ( ८-३४ ) या चरणातला ‘ गतः आर्यपुत्रः ’ या शब्दांचा अश्वघोषकृत समास चूक आहे. ‘ दिदृक्षया शाक्यकुलध्वजस्य । ’ ( १-५८ ) या चरणात शाक्यकुलध्वजाला पाहण्याच्या इच्छेनें असें अश्वघोषाला लिहावयाचें असतांना त्यानें काय लिहून ठेविलें आहे, तें संस्कृतज्ञांना दिसतच आहे. याचप्रमाणें ‘ ततोऽब्रवीत् सारथिरस्य । ’ ( ३-४२ ) या ठिकाणीं सारथि ह्याला म्हणाला, असें म्हणावयाचें असतांना त्यानें त्यानंतर ह्याचा सारथि म्हणाला, असें लिहिलें आहे. विभक्तींचा वापर कसा करावयाचा, हें न कळणाऱ्या कवीला धातुरूपकोश चागला अवगत झाला नव्हता, हें सागायला नकोच. उदाहरणार्थ, ‘ सिषिंचिरे प्रोषितचदनान् स्तनान् । ’ ( १ २६ ) हा चरणात सिषिचुः या रूपाच्या स्थानीं सिषिंचिरे हे चुकीचें रूप वापरलें आहे. याच्या उलट ( ५-४५ ) एका श्लोकात उपतस्थिरे या रूपाच्या स्थानीं उपतस्थुः असें रूप येतें. एका श्लोकात ( ११-३० ) परिपालयित्वा हें चुकीचें कृदन्तरूप परिपाल्य या वास्तविक रूपाच्या स्थानीं येतें. संस्कृतांतील चुकांप्रमाणेंच त्यानें कित्येक ठिकाणीं वृत्तरचनेंतहि चुका केल्या आहेत. पहिल्या सर्गांतील शेवटच्या श्लोकांतला ‘ धनदपुरमिवाप्सरसोऽवकीर्णम् । हा चरण एक अक्षर अधिक असल्यानें सदोष आहे. त्याच्या उलट पांचव्या सर्गांतील ५७ व्या श्लोकाचा प्रारभ अपरा बभुर्निमीलिताक्ष्यो । ’ हा एक अक्षर उणें असल्यानें सदोष आहे. हीं सारीं उदाहरणें डॉ. जॉन्स्टन यांच्या सशोधित आवृत्तीवरून घेतलीं आहेत. कोवेलच्या पहिल्या आवृत्तीकडे तर पहावयाची सोय नाहीं.

## अश्वघोषकाव्यासंबंधीं तज्ज्ञांचा अभिप्राय

डॉ. जॉन्स्टन हे अश्वघोषाचे भक्त अथवा पुरस्कर्ते असले तरी आपल्या कवीला काव्यरचना कशी करूं नये हें कळत नव्हतें, ही गोष्ट त्यांनीं स्पष्ट शब्दात बोलून दाखविली आहे. ‘For, if his matter is excellent, his manner is often disconcerting. Take as an exmple the character of Shuddhodana in Saundarananda, (canto II). Read in transla-

tion, we see it to be an admirable picture of an ideal king, free from gross hyperbole and attractive in details. But our enjoyment of the original is obstructed by its resemblance to the section of a grammer which sets out the rules for the formation of the various aorists. Or take the formal descripions. They are deficient in inspiration and leave us with the impression of verses made merely to show how well the poet could manufacture this kind of thing.' थोडक्यांत सागावयाचें म्हणजे शुद्धोदन राजाच्या सौदरनद काव्यांतील वर्णनाला व्याकरणांतील एका प्रकरणाचें स्वरूप आलें आहे. त्याचप्रमाणें सातव्या आणि दहाव्या प्रकरणातील वर्णनें-केवळ मलासुद्धां अशीं वर्णनें-लिहितां येतात, याच भावनेनें लिहिलीं असल्यानें त्यातून प्रतिभेचा अभावच जाणवतो. या अवतरणावरून कवि या नात्यानें अश्वघोषाला कितपत महत्त्व द्यावें, हें निःपक्षपाती वाचकाना सहज कळून येईल. खरें म्हणजे असल्या नवशिक्या कवीच्या उक्तींची उचलेगिरी करण्याचा आरोप भास-कालिदासांसारख्या श्रेष्ठ कवींवर करण्यापूर्वी अश्वघोषभक्तानीं थोडा तरी विचार करावयाला पाहिजे होता. पण सामान्यतः इग्रजाना कोणत्याहि श्रेष्ठ हिंदूची निंदा करण्यापूर्वी विचार करावा लागत नाहीं आणि इग्रजकृत हिंदुनिंदेचें समर्थन करणाऱ्या शासनाभिमुख विद्वानाची आपल्या पारतन्त्र्यात कधींच उणीव पडली नव्हती.

## उघड बोलून दाखविलेले पूर्वग्रह

सरसकट पाश्चात्य आणि विशेषतः इग्रज पडिताचे पूर्वग्रह हिंदूंना प्रतिकूल असतात, असें लिहिण्यानें त्यांचे हिंदुस्थानातील चेले चिडतात, हें मला माहीत आहे. पण ते पंडित जिथें त्याचे पूर्वग्रह स्वतःच उघड उघड बोलून दाखवितात, तिथें माझ्यासारख्या हिंदूनें त्याचा उल्लेख कां करू नये, हेंच मला कळत नाहीं. उदाहरणार्थ, डॉ. विंटर्निट्झ यांनीं आपल्या सस्कृत वाङ्मयेतिहासाच्या दुसऱ्या खडाच्या प्रस्तावनेंत स्पष्ट लिहिलें आहे. 'Buddhism after all is and remains that production of the Indian mind which is the most important in the history of the world.' म्हणजे भारतानें जगाला बौद्ध धर्म दिला, हेंच जागतिक इतिहासांतलें त्याचें सर्वोत सहत्त्वाचें दान होय. पण या विद्वानांना ही साधी गोष्ट कळत नाहीं कीं कोणत्याहि संस्कृतीचा देशातरीं निर्यात

होणारा भाग हा सर्वात हीन भाग असतो. उदाहरणार्थ फ्रेंच वाङ्मयाचा सर्वात महत्त्वाचा भाग फ्रान्समध्येंच राहून जातो आणि तेथील कामकथाचा प्रसार मात्र जगभर होतो. पण असल्या साध्या गोष्टी बौद्ध धर्माची कावीळ झालेल्या पंडिताना कळणें अशक्य आहे.

## वाल्मीकि म्हणे अश्वघोषाचा ऋणकरी

बौद्ध धर्माच्या काविळीनें दृष्टि दूषित झालेल्या इग्रज पडितांनीं वाल्मीकी-सारख्या आदिकवीवरहि अश्वघोष नामक बौद्ध श्लोककाराच्या कल्पना चोरल्याचा आरोप केला आहे. असले आरोप निःशकपणें करणाऱ्या हिंदुनिंदकांनीं आपल्या विधानाच्या समर्थनार्थ पुढें आणलेले पुरावे किती दिव्य असतात, याची संस्कृतज्ञाना-सुद्धा काहींच कल्पना नसते. रामायणातील सुदरकांडाच्या नवव्या आणि दहाव्या सर्गात रावणाच्या अतःपुरातील सुप्त सुदरी मारुतीला कोणत्या अवस्थेंत असलेल्या दिसल्या, याचें वर्णन आलें आहे. या वर्णनाची बुद्धचरितांतील तत्सदृश वर्णनाशीं तुलना करताना अश्वघोषाचे प्रथम आणि प्रख्यात भाट प्रो. कोवेल लिहितात. 'Here again in the Hindu poem it is merely a purposeless episode, only introduced for the sake of ornment. In the Buddhist poem it is the final Implse which stirs the Bodhisattva to make his escape from the world' म्हणजे हिंदु महाकाव्यात या प्रसगाचें काहींच प्रयोजन नसून केवळ अलकृतिप्रीत्यर्थ अथवा चमत्कृतिप्रीत्यर्थ त्याची योजना केली आहे. उलटपक्षीं बौद्ध महाकाव्याचें तें अविच्छेद्य अग असून पलायनवादी बुद्धाला जीवनकलहातून पलायन करण्याची अतिम प्रेरणा करणारा तो प्रसग आहे. इथें ही महत्त्वाची गोष्ट सागितली पाहिजे कीं रमणीरमणरणागणावरील निपतित नितबिनींच्या दर्शनानें उद्वेजित होऊन सिद्धार्थानें प्रव्रज्या घेतली नसून 'न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे।' या अर्जुन-विषादयोगाला अनुसरून आपल्या बाधवाची हत्या करण्याची पाळी आली असतांना त्यानें प्रव्रज्या घेतली, असें कै. धर्मानद कोशांबी आणि कै. डॉ. आबेडकर या उभयतांनीं आग्रहानें प्रतिपादिलें आहे. तेव्हा मूळ बुद्धचरित्रात हा प्रसंग नव्हता, हें सागायला नकोच. हा विषय सोडून दिला तरी बुद्धचरितात अत्यावश्यक मानलेला एखादा प्रसग रामायणातहि वेगळ्या कारणाकरिता पण तितकाच आवश्यक असू शकेल, अशी कल्पनाहि या हिंदुनिंदक विद्वानाच्या मनात येऊ शकत नाहीं.

लंकानाथाच्या अंतःपुरांतील सुप्तसुंदरी स्वनाथावरील आपापली आसक्ति सुषुप्तींतील चेष्टानीं कशा व्यक्त करीत होत्या, याच्या वर्णनानें वाल्मीकीला अशा भाग्यशाली राक्षसेंद्रालाहि वश न होणाऱ्या सीतेची श्रेष्ठता आणि रामावरील प्रीति आपल्या वाचकाच्या अंतःकरणावर ठसवावयाची होती. 'अत्यर्थं सक्तमनसो रावणे ता वरस्त्रियः । अस्वतंत्राः सपत्नीना प्रियमेवाचरस्तदा ।।' असें वाल्मीकींनीं सुंदर-कांडाच्या नवव्या सर्गांत स्वतःच लिहून ठेविलें आहे. याच्या उलट प्रसाधनाच्या प्राचुर्यानें प्रमदा पुरुषांना प्रबुद्धावस्थेंत भुलवू शकल्या तरी प्रसुप्तीच्या प्रसर्गी त्यांचा नैसर्गिक बीभत्सपणा पुरुषाच्या प्रत्ययाला येतो, अशी अश्वघोषाच्या वर्णनातील मध्यवर्ती कल्पना आहे. 'अशुचिर्विकृतश्च जीवलोके । वनितानामियमीदृशः स्वभावः।। वसनाभरणैस्तु वच्यमानः पुरुषः स्त्रीविषयेषु रागमेति ।। विमृशेद्यदि योषितां मनुष्यः प्रकृतिं स्वप्नविकारमीदृशं च । ध्रुवमत्र न वर्धयत् प्रमादं गुणसंकल्पहतस्तु रागमेति ।।' अशा विभिन्न हेतूनीं लिहिलेल्या वर्णनांतून कांहीं ठिकाणीं कल्पनासाम्य आढळून आलें तर ज्याच्या केंद्रवर्ती कल्पनेशीं त्या कल्पनेचा निकटचा संबंध असेल, त्यालाच ती कल्पना प्रथम सुचली असावी, असें अनुमान काढणें अधिक तर्कशुद्ध ठरेल. या दिशेनें विचार केला असतां अश्वघोषाचे अनेक श्लोक फार संशयित दिसतात. 'विबभौ करलग्नवेणुरन्या स्तनविस्रस्तसितांशुका शयाना । ऋजुषट्पदपंक्तिजुष्टपद्मा जलफेनप्रहसत्तटा नदीव ।। नवहाटकभूषणास्तथान्या वसनं पीतमनुत्तमं वसानाः । अवशा बत निद्रया निपेतुर्गजभग्ना इव कर्णिकारशाखाः ।।' या श्लोकांनीं प्रस्तुत प्रसंगीं अश्वघोषाला अभीष्ट असलेला बीभत्स रस पुष्ट होतो, असें निदान मला तरी वाटत नाहीं. यांपैकीं पहिल्या श्लोकाची मूळ कल्पना सुंदरकांडाच्या दहाव्या सर्गांतील १७ व्या श्लोकांत आढळते. 'काचिद्वीणां परिष्वज्य प्रसुप्ता संप्रकाशते । महानदीप्रकीर्णेव नलिनीपोतमाश्रिता ।।' ज्यांना संस्कृताचा अर्थ आणि काव्यांतील कल्पनाहि कळतात, अशा तज्ज्ञांना वाल्मीकींच्या अकृतमनोहर श्लोकावरून अश्वघोषाला त्याचा अलंकृत श्लोक कसा सुचला हें सहज कळून येईल. अश्वघोषाच्या दुसऱ्या श्लोकाचें मूळ सुंदरकांडांतील नवव्या सर्गाच्या ४७ व्या श्लोकांत आढळतें. 'अकुंडलधराःचान्या विच्छिन्नमृदितस्रजः । गजेंद्रमृदिताः फुल्ला लता इव महावने।।' वाल्मीकींच्या या 'गजेंद्रमृदिता लते'वरूनच अश्वघोषाला 'गजभग्ना कर्णिकार-शाखे'ची कल्पना सुचली आहे, हें उघड दिसतें. या प्रश्नावर कीथचें मतहि माझ्यासारखेंच आहे.

## ललितविस्तर ग्रंथाचा आधार

वरील श्लोक लिहितांना अश्वघोषानेंच वाल्मीकीचें अनुकरण केलें असावें, असें अनुमान करण्याला बौद्धाच्या 'ललितविस्तर' या बुद्धचरित्रपर धर्मग्रथाचाहि आधार मिळण्याजोगा आहे. पण तो आधार घेण्यापूर्वी ललितविस्तर आणि बुद्धचरित या ग्रथांचे परस्परसंबध कोणते आहेत, हें सागितलें पाहिजे. या प्रश्नाची चर्चा करताना माझ्या गुरुजींचे गुरुजी प्रो. सिल्व्हँ लेव्ही यांनीं असा अभिप्राय व्यक्त केला होता कीं बुद्धचरित हा ललितविस्तराचा विस्तृत साराश होय. (un abre'ge' substantial du Lalitavistara) प्रो. विंटर्निट्झ यांचें मत जवळ जवळ वरील अभिप्रायासारखेंच आहे. ते म्हणतात. 'Though it is not an actual Buddha epic, it contains all the germs of such an epic and it is from the ballads and episodes as preserved in the earliest portions of the Lalitavistara, though not probably from the Lalitavistara itself that Ashvaghoshha the greatest poet of the Buddhists created his magnificent epic Buddhacharita, the life of Buddha.' म्हणजे अश्वघोषानें आपलें बुद्धचरित प्रत्यक्ष ललित विस्तराच्या आधारानें लिहिलें नसलें तरी त्या ग्रंथात एकत्रित केलेल्या पुरातन परंपराच्या आधारानेंच लिहिलें असलें पाहिजे. बुद्धचरित हें ललित विस्तराचें अपत्य असो अथवा भावड असो, त्या उभयताचें नातें अगदीं निकटचें आहे, एवढी गोष्ट प्रस्तुतच्या चर्चेंत पुरेशी आहे. ललितविस्तरांत अभिनिष्क्रमणाच्या रात्रीं सिद्धार्थानें आपल्या अतःपुरातील सुप्त सुंदरींना कोणत्या अवस्थेंत पाहिलें याचें वर्णन करिताना 'काश्चित् वेणु दंतैःकटकटायन्त्यः' असा एक उल्लेख येतो. या प्रसंगाचें ललितविस्तरांतील सारेंच वर्णन जुगुप्सा उत्पन्न करण्याच्याच उद्देशानें लिहिलें असल्यानें दातानीं वेणु फोडण्याचा तेथील उल्लेख त्या ठिकाणीं उचितच आहे. आता प्रश्न उपस्थित होतो कीं ललितविस्तरातील वरील वर्णनाची 'विबभौ करलग्नवेणुरन्या स्तनविस्रस्तसितांशुकाशयाना ।' या श्लोकांतील वर्णन ही स्वाभाविक परिणति आहे कीं नाहीं? अर्थात् नाहीं. तेव्हां या चिकित्सेचा निष्कर्ष असा निघतो कीं अश्वघोषाच्या वरील अलंकृत श्लोकांतील विषयवस्तु ललितविस्तरातील असून काव्य मात्र रामायणाच्या अनुकरणानें रचलें असलें पाहिजे.

## बीभत्स स्त्रीनिंदेची बौद्धपरंपरा

इथें आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीचा निर्देश केला पाहिजे. ती ही कीं भारतात बौद्धाच्या उदयापासूनच बीभत्स स्त्रीनिंदेची परपरा चालू झाली. बौद्धांचीं आद्य काव्यें थेरगाथा आणि थेरीगाथा या संग्रहांत असून रा. कोलंगडे यानीं त्याच्या बुद्धदर्शन या ग्रथात त्याचा परिचय करून देतांना म्हटलें आहे. ‘ थेरगाथेंत स्त्रियाची निंदा केली असून त्या पुरुषाना मोह पाडून बधनात पाडणाऱ्या आणि पवित्र स्थानापासून भ्रष्ट करणाऱ्या आहेत, असें म्हटलें आहे. थेरीगाथेंत आयुष्यातील काहीं प्रसगाचें वर्णन असून मारभिक्षुणीसवादरूपाने स्त्रीशरीराची विडबना करण्यात आलेली आहे. ’ असल्या अमगळ परपरेंत अश्वघोषानें जें अल्पस्वल्प परिवर्तन घडवून आणलें, तें अर्थात् व्यासवाल्मीकिकालिदास याच्या महाकाव्याच्या अनुकरणानें घडवून आणलें असून आता त्या भिक्षूचे भक्त व्यासावर नाहीं तरी वाल्मीकिकालिदासांवरच त्याच्या अनुकरणाचा आरोप करीत आहेत. असो. कालिदास आणि अश्वघोष याच्या पौर्वापर्याचा वाद प्रथम उपस्थित करणाऱ्या कोवेलमहाशयाची आणि त्याच्याप्रमाणेंच इतर पाश्चात्य पडिताची दृष्टि कशी पूर्वग्रह-दूषित आहे, हें दाखवून देण्यासाठीं वरील विषयातर करावें लागलें. डेक्कन कॉलेजा-तील एक पूर्वींचे आचार्य रॉलिन्सन यानीं मुबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुखपत्रात ( खड २१ पान २१८ ) व्हिन्सेंट स्मिथ या प्राचीन हिंदुस्थानाचा इतिहास लिहिणाऱ्या सशोधकाचें वर्णन केलें आहे. ‘ Mr. Vincent Smith is always anxious to deprive India of the credit of all her achievements in art and literature. म्हणजे वाङ्मयाच्या काय, किंवा कलेच्या काय, कोणत्याहि क्षेत्रातील श्रेष्ठतेचें श्रेय हिंदुस्थानाकडून हिरावून घेण्या-साठीं व्हिन्सेंट स्मिथ हे अतिशय उत्सुक असतात. प्रो कोवेल याची मनोवृत्ति नुसती हिंदुस्थानविरोधी नसून ती हिंदुविरोधी होती. त्यामुळें, आपल्या लौकिक आख्यायिकाप्रमाणें ऋषि बनण्यापूर्वी दरवडे घालीत असलेला वाल्मीकि, हा ऋषि झाल्यानतरसुद्धा अश्वघोषाचीं कल्पनारत्नें लुटीत होता, असा अपूर्व शोध त्यानीं लाविला. पण त्याच्या दुर्दैवानें त्याच्या या अपूर्व शोधाचा पाश्चात्य पडितामध्येंहि व्हावा तसा आदर आणि प्रसार झाला नाहीं. पण या आदिकवीचा सर्वांत श्रेष्ठ भक्त जो कालिदास, त्याच्यावर अश्वघोषाच्या काव्याचें अनुकरण करण्याचा त्यानीं

जो आरोप केला आहे, तो मात्र त्याला एखाद्या जळूप्रमाणें चिवटून बसला आहे. हा आरोपहि त्यांनीं वाल्मीकीवर केलेल्या आरोपासारखाच निराधार आहे, हें आतां दाखवून दिलें पाहिजे.

## अजदर्शन आणि सिद्धार्थदर्शन

रघुवंशाच्या सातव्या सर्गात अज आणि इंदुमती हीं उभयतां स्वयंवरानंतर विवाहमंडपाकडे जात असताना त्यांना पाहण्यासाठीं उतावीळ झालेल्या विदर्भरमणींची जी तारांबळ झाली त्या प्रसंगाची, बुद्धचरिताच्या तिसऱ्या सर्गातील सिद्धार्थाचें उद्यानगमन पाहण्यासाठीं कपिलवस्तूतील कामिनींच्या झालेल्या धांदलीशीं तुलना करताना प्रो. कोवेल लिहितात. ‘ We must not forget here that while in Kalidas the description belongs only to an episode in the main poem, in the Buddhist author it is a natural incident in one of the most important chapters of the whole work. ’ या ठिकाणीं कपिलवस्तूतील कामिनींच्या धांदलीच्या वर्णनाचा बुद्धचरिताच्या कथानकांतील एका अत्यंत महत्त्वाच्या प्रसंगाशीं अविच्छेद्य संबंध असल्याचा प्रो. कोवेल यांनीं बहाणा केला आहे. पण ललितविस्तराशीं तुलना केली असतां त्याचा हा बहाणा सर्वस्वीं निराधार असल्याचें स्पष्ट दिसून येतें. कारण या प्रसंगीं सिद्धार्थाला पाहण्यासाठीं शाक्यरमणींची धांदल झाल्याचा उल्लेख ललितविस्तरांतहि नाहीं, किंवा तत्पूर्वीच्या पाली धर्मग्रंथांतूनहि नाहीं. इतकेंच काय, अश्वघोषाचें बुद्धचरित प्रसिद्ध होण्यापूर्वी सर एडविन अर्नोल्ड यांनीं ‘Light of Asia ’ या नावाचें पाली धर्मग्रंथाच्या आधारानें जें बुद्धचरित्रपर काव्य लिहिलें, त्या काव्यातहि या प्रसंगाचा उल्लेख येत नाहीं. आपल्या स्वतंत्र कल्पनाशक्तीनें पूर्वीच्या बुद्धचरितांतून नसलेला हा प्रसंग निर्माण केल्याबद्दल प्रो. विंटर्निट्झ यांनीं अश्वघोषाची स्तुतिहि केली आहे. ‘ In contrast with the chaotic disorder in texts like Mahavastu and the Lalita vistara, we find in Buddhacharita a well planned artistic arrangement of the material.... How different from the Lalita vistara is for instance the highly poetical description of the excursions of the young prince, in cantos III and IV. ’ म्हणजे बुद्धचरितांत अमुक एक प्रसंग अत्यावश्यक आहे आणि रघुवंशांत त्याची तादृश आवश्यकता

नाहीं अशा बहाण्यानें कालिदासाला अश्वघोषाहून अर्वाचीन ठरविल्यानंतर, तोच काव्यपूर्ण प्रसग बौद्ध धर्मग्रथातील बुद्धचरित्रांतून नसतांना अश्वघोषानें प्रथम कल्पिल्याबद्दल विंटर्निट्झ महाशय त्याला महाकवींच्या पदवीला नेऊन बसवितात. कोवेल विंटर्निट्झसारख्या सस्कृताच्या आचार्यांनीं चिकित्सेच्या नांवाखालीं असली हातचलाखी करावी आणि हिंदुस्थानातील परप्रत्ययनेयबुद्धि 'प्रागतिक' विद्वानांनीं तिचा पुरस्कार करावा, ही वस्तुस्थिति सर्वांनाच लाछनास्पद आहे. असो जो प्रसंग बुद्धचरितांत अत्यावश्यक आहे, असें कोवेल महाशय आग्रहानें प्रतिपादितात, तो बौद्ध परंपरेंतील बुद्धचरित्रातून अभावानेंच अस्तित्वात असल्याचें सिद्ध केल्यानतर रघुवशात मात्र तो प्रसग कसा अत्यावश्यक आहे, हेंहि इथें सागितलें पाहिजे. वास्तविक पाहता कुडिनपुरात साऱ्या हिंदुस्थानातील राजे जमवून मोठ्या समारभानें स्वयवर साजरें केल्यानंतर आपल्या आवडत्या राजकुमारीनें निवडलेला पति पाहण्याकरिता समुत्सुक झालेल्या तिच्या पुरभगिनींची अज आणि इदुमती याच्या पुरप्रवेशाच्या प्रसगीं ताराबळ होणें अगदीं स्वाभाविक आहे. या प्रसगाचें कालिदासानें वर्णन केलें नसतें तर तो त्याचा कवि या नात्यानें अक्षम्य अपराध झाला असता. अज आणि इदुमती या आदर्श द्वद्वाच्या पुरप्रवेशाच्या प्रसगीं त्याचा दर्शनानद इदुमतीच्या नगरभगिनींनीं कसा लुटला, याचें वर्णन तिच्या विवाहवर्णनाच्या सर्गात येणें अपरिहार्यच आहे. या वर्णनाची मूळ कल्पना कालिदासाचीच असल्यानें प्रस्तुत प्रसगींच्या त्याच्या श्लोकात अप्रासंगिकपणा कोठेंहि आढळत नाहीं. उलटपक्षीं अश्वघोषाच्या वर्णनात मात्र हा अप्रासंगिकपणाचा अथवा विसंगतीचा दोष अगदीं स्पष्टपणें प्रत्ययाला येतो उदाहरणार्थ, ततः कुमारः खलु गच्छतीति श्रुत्वा स्त्रियः प्रेष्यजनात् प्रवृत्तिम् । दिदृक्षमा हर्म्यतलानि जग्मुर्जनेन मान्येन कृताभ्यनुज्ञाः ॥ ताः स्रस्तकाचीगुणविघ्निताश्च सुप्तप्रबुद्धाकुललोचनाश्च । वृत्तान्तविन्यस्तविभूषणाश्च कौतूहलेनानिभृताःपरीयुः ॥' मान्य जनांची अनुज्ञा घेऊन शुद्धोदनतनयाची उद्यानयात्रा पहावयाला चाललेल्या कपिलवस्तूतील कामिनींची अश्वघोषानें वर्णिलेली वेषभूषा, अनुज्ञा घेण्यावरून व्यक्त होणाऱ्या त्याच्या विनीत वृत्तीशीं किती विसगत आहे, हें सस्कृतज्ञाना विशद करून सांगण्याची आवश्यकता नाहींच. 'ऐशीं काव्यें कराया इकडून तिकडून आणलेली बुद्धि दे चक्रपाणि' ही सुप्रसिद्ध प्रार्थना जपून काव्यरचनेला प्रारभ केला, म्हणजे याच नमुन्याची काव्यानिर्मिति व्हावयाची.

## कोवेलचे दांत त्यांच्याच घशांत

आतांपर्यंत वाल्मीकि-कालिदासांना अश्वघोषाचे ऋणकरी ठरविण्याकरितां कोवेलमहाशयांनीं केलेल्या लटपटींचा समाचार घेतला. आता त्यांच्याच अनुमान-परंपरेनें अश्वघोष हा कालिदासाहून अर्वाचीन कसा ठरतो, तें दाखवून त्याचेच दांत त्याच्याच घशांत घातले पाहिजेत. कोवेलमहाशयाचा मुख्य सिद्धांत असा आहे कीं, एखाद्या कवीच्या मध्यवर्ती कथानकांतील अत्यावश्यक प्रसंग अन्य कवीनें केवळ 'अलंकारार्थे' वापरल्यास त्यानें तो प्रसंग पहिल्या कवीच्या अनुकरणानें लिहिला आहे, असें समजावें. हा सिद्धान्त जेथें ततोतंत लागू पडेल, असले प्रसंग अश्व-घोषाच्या बुद्धचरितांतून सहज काढून दाखवितां येतील. उदाहरणार्थ, बोधिप्राप्ती-साठीं शाक्यसिंहानें आसन घातलें असतां मारसेनेपैकीं एकानें गदा घेऊन त्याच्यावर आघात करण्याचा प्रयत्न केला. या प्रसंगाचें वर्णन करतांना भदंत अश्वघोष म्हणतो, 'कश्चित्ततो रौद्रविवृत्तदृष्टिस्तस्मै गदामुद्यमयाचकार । तस्तंभ बाहुः सगदस्ततोऽस्य पुरंदरस्येव पुरा सवज्रः ॥' अश्वघोषाचा हा श्लोक पाहिला कीं सिंहाच्या प्रभावानें स्तंभित झालेल्या दिलीपाचें 'जडीकृतस्त्र्यंबकवीक्षणेन वज्रं मुमुक्षन्निव वज्रपाणिः ।' हें कालिदासकृत वर्णन आठवल्यावाचून रहात नाहीं. या प्रसंगाचें रघुवंशांतील वर्णन हें रघुवंशाच्या दुसऱ्या सर्गांतील कथानकाचें एक अविच्छेद्य अंग आहे. उलटपक्षीं अश्वघोषाचा वरील श्लोक बुद्धचरिताच्या तेराव्या सर्गांतून सपशेल काढून टाकला तरी त्या सर्गाची कांहींहि हानि होणार नाहीं. तेव्हां कोवेलमहा-शयाच्या सिद्धांताप्रमाणें त्या स्थळीं कोणीं कोणाचें अनुकरण केलें आहे, तें आतां त्याच्या परप्रत्ययनेयबुद्धि चेल्यांनींच सांगावें. प्रस्तुत प्रसंगीं बौद्ध धर्मग्रंथांतील परंपरेचा विचार केला असताहि, कोण कोणाचा ऋणी आहे, हें सहज कळून येण्या-जोगें आहे. प्रस्तुत प्रसंगाचे वर्णन ललितविस्तरांत पुढीलप्रमाणें केलें आहे. 'निवृत्यच्च बोधिसत्वस्योपरि नानाविधानि प्रहरणानि उत्सृजतिस्म । ते चोरिक्षप्त-मात्रा नानाविधानि पुष्पदामानि पुष्पवितानानि इव सन्तिष्ठन्ते स्म ।' शाक्य-सिंहावर फेंकलेल्या शस्त्रांचीं पुष्पें बनत होतीं, हें ललितविस्तरांतील वर्णन त्या ग्रंथांतील मारपराभवाच्या इतर सर्व वर्णनाशीं सुसंगतच आहे. पण अश्वघोषाच्या बुद्धचरितांत हा सुसंगतपणाहि राखलेला नाहीं. माराच्या एका सैनिकाचे हस्त जरी शाक्यसिंहाच्या प्रभावानें स्तंभित झाले तरी इतर सैनिकांचीं शस्त्रें त्याच्या शरीरावर फेंकलीं जात होतींच. 'कश्चिज्ज्वलन्नर्क इवोदितः खादंगारवर्षंमहदुत्ससर्ज ।

चूर्णानि चामीकरकंदराणाम् कल्पात्यये मेरुरिव प्रदीप्तः ।। तद् बोधिमूले । प्रतिकीर्यमाण अगारवर्षं तु सविस्फुलिंगम् । मैत्रीविहारादृषिसत्तमस्य बभूव रक्तोत्पलपत्रवर्णः ।। ' या श्लोकांवरून असें स्वच्छ दिसून येतें कीं कालिदासाचें अनुकरण आणि प्राचीन बौद्ध परपरेचें अनुसरण या परस्परविरोधी प्रवृत्तींना अश्वघोषानें सारखाच अवसर दिल्यामुळें, त्याच्या कवितेंत पदोपदीं विसंगति उत्पन्न झाली आहे आणि या विसगतीच्या पुराव्यावरून कालिदास आणि अश्वघोष यांचें पौर्वापर्यहि प्रस्फुटित झालें आहे.

## बौद्धपरंपराविरोधी अश्वघोष

बौद्धधर्मग्रंथातील परपरा आणि अश्वघोषाची कविता याच्यांतील विसवादाचें आणखी एक ठळक उदाहरण ' सौंदरनद ' काव्यात आढळून येतें. यासबधीं के. हरप्रसादशास्त्री यानीं त्या काव्याच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे, ' In the sanskrita version Nanda extorts a promise from her husband to return before the paint on her cheek was dry, but in the pali she cried out to her husband to return quickly.' ' गच्छार्यपुत्रेहिच शीघ्रमेव विशेषको यावदय न शुष्कः । ' म्हणजे कपोलावरील पत्रावलि शुष्क होण्यापूर्वीं परत या, ही सरस कल्पना अश्वघोषाला कुमारसभवावरून सुचली आहे, हें उघड आहे. कुमारसभवाच्या चौथ्या सर्गात शोकविव्हल रति आपल्या विदग्ध पतीला आळवीत असतांना म्हणते. ' विबुधैरसि यस्य दारुणैरसमाप्ते परिकर्मणि स्मृतः । तमिम कुरु दक्षिणेतर चरण निर्मितरागमेहि मे ।। ' रतीच्या चरणाना लाक्षारस लावीत असतानाच देवानीं स्मरण केल्यामुळें कामाला अकस्मात् आपल्या कामावर जावें लागल्यानें वामचरणाला लाक्षारस लावावयाचा राहून गेला होता. त्यासाठीं तरी तूं आता परत ये, अशी आर्त हाक या श्लोकात रतीनें आपल्या पतीला मारली आहे. पण वामाचरणाचा भिक्षूला विटाळ वाटल्यामुळें त्यानें कपोलावरील विशेषकावरच आपली अनुकरणाची आसक्ति शमविली असावी.

## अश्वघोषाच्या काव्यांतील अग्राह्य ललित

अश्वघोषाच्या कवितेंतील ज्या ललित भागाचें कालिदासानें अनुकरण केल्याचा आरोप गुप्तकालवादी विद्वान् कालिदासावर करीत असतात, तो ललित भाग आपला स्वतःचा नाहीं, ही गुप्त गोष्ट अश्वघोषानें सौंदरनंद काव्याच्या अंतीं

पर्यायानें प्रकट केली आहे. 'प्रायेणालोक्य लोकं विषयरतिपरं मोक्षप्रतिहतम्। काव्यव्याजेन तत्त्वं कथितमिह मया मोक्षपरमिति ।। तद्बुद्ध्वा शामिक यत् तदवहितमितो ग्राह्य न ललितम्। पांशुभ्यो धातुजेभ्यो नियतमुपकर चामीकरमिति ।। बौद्ध धर्माचा कडुनिंब विषयरतिपर लोकांच्या पोटांत जावा, याकरितां विषयी जनांना सकृद्दर्शनीं आकर्षक वाटेल, असली कविता मी लिहिली असली तरी लोकांनीं तिच्यांतील शमप्रधान भागच ग्राह्य मानावा, ललित भाग ग्राह्य मानू नये, असें जेव्हां कवि स्वतःच सांगू लागतो, तेव्हा प्रतिभेच्या प्रसववेदनाचा अनुभव असलेल्या चिकित्सकाला सहज ओळखता येतें कीं अशा प्रकारें अंगुलिनिर्देश केलेला भाग कवीच्या प्रतिभेनें प्रसविलेला नसून तो केवळ त्याच्या अनुकरणबुद्धीनें अन्य कवींच्या आदर्शाप्रमाणें रचलेला आहे. पण प्रतिभेच्या प्रसववेदनाचा अनुभव, प्रतिभेपासून वंचित झालेल्या पंडिताना पटावयाचा नाहीं. यासाठीं त्यांच्या परप्रत्ययनेय-बुद्धीवर वेगळ्याच दिशेनें आक्रमण केलें पाहिजे.

## अश्वघोषाचा अनुल्लेख

कालिदास आणि अश्वघोष याच्या पौर्वापर्याचा वाद प्रथमतः हिंदूंना हीन ठरवूं पाहणाऱ्या इंग्रजांच्या प्रेरणेनें चालू झाला असला तरी इंग्रजांच्या निर्गमनानंतरहि त्यांच्या भूतपूर्व सेवकांनीं अमात्य राक्षसाच्या निष्ठेनें आपल्या विगत प्रभूंचा पक्ष उचलून धरण्याचा विश्वप्रयत्न चालविला आहे. वास्तविक पाहतां या वादाचा निर्णय करण्याकरिता बुद्धीचा अपव्यय करण्याची कांहींहि आवश्यकता नाहीं. मात्र हा वाद केवळ वितंडवादाकरिताच चालविला जात नसला म्हणजे पुरें. कारण कालिदासासारख्या कृतज्ञ आणि विनयशील कवीनें रघुवंशाच्या प्रारंभीं आपल्या पूर्वसूरींचा नामनिर्देश न करता उल्लेख केला असला तरी मालविकाग्निमित्राच्या प्रस्तावनेंत त्यानें नाटकक्षेत्रातील भाससौमिल्लकविपुत्रादि पूर्वसूरींचा नामनिर्देशपूर्वक जो उल्लेख केला आहे, त्यांत अश्वघोष नामक नाटककाराचा उल्लेख नसल्यानें कालिदासाच्या काळापूर्वी अश्वघोषाचीं नाटकें रंगभूमीवर आलीं नव्हतीं, हें उघड आहे. अश्वघोषाच्या सारिपुत्रप्रकरण अथवा शारद्वतीपुत्रप्रकरण या नऊ अंकी नाटकाचीं कांहीं पानें प्रो. लुडर्स यांना मध्य आशियात उपलब्ध झालीं या नाटकाच्या जीर्णपर्णासहच आणखी दोन अनामिक बौद्ध नाटकाचे अवशेष त्याना आढळून आले असून तींहि नाटकें अश्वघोषकृतच असावींत, असा अनेक तज्ज्ञाचा अभिप्राय आहे. या संशोधनावरून अश्वघोषाचीं निदान तीन नाटकें एके काळीं

भारतीय रंगभूमीच्या भक्तांना उपलब्ध होतीं आणि त्यापैकीं एक नाटक तर नऊ अंकीं असल्यानें भास आणि कालिदास यांच्या उपलब्ध सर्व नाटकापेक्षा मोठें असावें, असें अनुमान करण्याला आधार मिळाला आहे. तेव्हां वाल्मीकि, भास आणि कालिदास या तीन हिंदु महाकवींनीं ज्या अश्वघोष नामक बौद्ध भिक्षूकडे रमणीयार्थ प्रतिपादक पदाची भिक्षा मागितली, असें कोवेल, कीथ, विंटर्निट्झ प्रभृति हिंदुनिंदक विद्वान् प्रतिपादन करीत होते, त्या अश्वघोषाचा कालिदासानें नाटकक्षेत्रातील आपल्या मुनित्रयीसह उल्लेख कां केला नाहीं, याचा त्यांनीं उलगडा करावयाला हवा होता. पण असले अडचणीचे प्रश्न उपस्थित करणें त्याना सोयीचें नसल्यानें त्यांनीं मोठ्या सावधपणानें या प्रश्नाचा उल्लेखहि टाळला आहे. खरें म्हणजे कालिदासानें अश्वघोषाला अनुल्लेखानें मारलें, असें प्रतिपादन करण्याचा मार्ग भिक्षुभक्ताना अद्यापि मोकळा आहे. पण इतःपर त्यांनीं त्याचा अवलंब केला तरी त्याचा पक्ष किती उपेक्षणीय आहे, याची समाजाला जाणीव होईल.

## कालिदासभारवीमधील दुवा अश्वघोष

कालिदास, अश्वघोष आणि भारवि या तीन महाकाव्यप्रणेत्याच्या वृत्तरचनेची तुलना केली असताहि अश्वघोष हा कालिदास आणि भारवि यांच्यामधील दुवा असल्याचें तत्काळ उघडकीस येतें. फार काय अश्वघोषाच्या वृत्तरचनेवरून तो कालिदासाहून अर्वाचीन दिसतो, ही गोष्ट म. म. मिराशींनींहि मान्य केली आहे. कालिदासाच्या काळीं आदिकवीचें आवडतें अनुष्टुप वृत्त मागें पडून उपजातीला प्राधान्य प्राप्त झालें होतें. रघुवंशाच्या उपलब्ध एकोणीस सर्गांपैकीं आठ सर्ग उपजाति वृत्तात असून अनुष्टुप वृत्तात सहाच सर्ग आहेत. उरलेल्या सर्गांत रथोद्धतेचे दोन सर्ग असून वंशस्थ, वियोगिनी आणि द्रुतविलंबित या वृत्तात प्रत्येकीं एकेक सर्ग आहे. अश्वघोषाच्या बुद्धचरिताचे उणेपुरे चौदाच सर्ग उपलब्ध असून त्यापैकीं आठ उपजाति वृत्तात आणि चार अनुष्टुप वृत्तात आहेत. उरलेल्या दोन सर्गांपैकीं पाचव्या सर्गांत औपच्छंदसिक हें कालिदासानें कोणत्याहि सर्गांत न वापरलेलें वृत्त आलें असून आठव्या सर्गांत वंशस्थ वृत्ताचा वापर केलेला आहे. अश्वघोषाचें आद्य महाकाव्य जें सौंदरनंद त्यात प्रवचनें फार असल्यानें उपजातीच्या आठ सर्गांशीं अनुष्टुपाच्या सात सर्गांनीं स्पर्धा चालविली आहे. उरलेल्या तीन सर्गांत वंशस्थ, वियोगिनी आणि उद्गता हीं वृत्तें योजिलीं आहेत. अश्वघोषानें निरनिराळ्या सर्गांत मिळून २०१ वंशस्थ श्लोक लिहिले असले तर या वृत्ताचा प्रभु मानलेल्या भारवीनें

किरातार्जुनीयाच्या पांच सर्गांत याचा प्राधान्यानें उपयोग केला आहे. कालिदासानें औपच्छंदसिक आणि उद्गता या वृत्ताना एकहि सर्ग वाहिलेला नाहीं. इथें भारवीनें अश्वघोषाचें अनुकरण करून त्यांना प्रत्येकीं एकेक सर्ग अर्पण केला आहे. दोन महाकाव्यात मिळून अश्वघोषानें एकदर ३१ पुष्पिताग्रा रचल्या असल्या तर भारवीनें किराताचा दहावा सर्गच पुष्पिताग्रानीं सजविला आहे. प्रहर्षिणींच्या नादीं लागणें भिक्षूला शोभत नसल्यानें अश्वघोषानें तिचा वापर अवघ्या सात श्लोकात केला असला तरी भारवीनें सात्व्या सर्गांतील सुरागनावर्णन प्रहर्षिणीपूर्ण केल्यानें त्या सर्गाचें सौंदर्य वर्धिष्णु झालें आहे. किरातात उपजाति आणि अनुष्टुप या वृत्ताचा वापर प्रत्येकीं दोनच सर्गांत केला असल्यानें तीं वृत्तें तेव्हा सपशेल मागें पडलीं असल्याचें उघड होतें. या व्यातीरिक्त अश्वघोषानें रुचिरा, शरभा, कुसुमलता-वेल्लिता, सुवदना, अपरवक्त्र, उपास्थितप्रकुपिता इत्यादि अभिनव वृत्तें वापरून आपलें अर्वाचीनत्व अभिव्यक्त केलें आहे.

## स्मरजित् शिव आणि मारजित् बुद्ध

बुद्धचरिताच्या सध्या उपलब्ध असलेल्या सर्गांत मारविजयनामक तेरावा सर्ग सर्वांत महत्त्वाचा आहे. या सर्गांत बौद्धधर्मांतील सैतान जो मार, त्या मारावर बुद्धानें कसा विजय मिळाविला, याचें वर्णन आलें आहे. या मारविजयाच्या आख्या-नाच्या प्राचीनतेसबंधीं चर्चा करताना लडन येथील भारतभवन ग्रथालयाचे सुप्रसिद्ध ग्रंथपाल एडवर्ड जे. थॉमस हे त्याच्या बुद्धचरित्रात म्हणतात. ‘ The most remarkable feature in this recital is the entire absence of any temptation by Mara. There is even no mention of the famous tree under which enlightenment was attained. It will also be seen that later euthorities put addtional events in different places- This is an indication that such events were not a part of the original story and that they came to be inserted in one place or another according to individual ideas of fitness.’ म्हणजे मारप्रलोभनाचें आख्यान बुद्धाच्या तपस्येच्या ह्या अतिप्राचीन वर्णनात नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यात सुप्रसिद्ध बोधि वृक्षाचाहि सदर्भ येत नाहीं. यावरून असें दिसून येतें कीं मागाहूनच्या लेखकानीं मूळ कथेंत या उपाख्यानाची भर घातली आणि ती भरहि ज्याला जिथें घालावीशी वाटली, तिथें घातली. ही महत्त्वाची गोष्ट लक्षात

घेतली म्हणजे, ऐतिहासिक दृष्टि असणाऱ्याना सहज कळून येईल कीं स्मरजित् शंकराच्या चरित्राशीं स्पर्धा करण्याकरितां बौद्ध कथाकारानीं बुद्धाला मारजित् बनविला आणि त्यामुळेंच बुद्धचरितातील हें प्रकरण त्याना शंकराच्या चरित्रातील मदनदहनाच्या प्रकरणाचें अनुकरण करूनच अनन्यगतिकत्वानें लिहावें लागलें. उदाहरणार्थ, रामायणांतील मदनदहनाच्या कथेंत हरपार्वतींच्या विवाहानतर मदनानें शिवावर आक्रमण करून आपलें मरण ओढवून घेतलें, असा उल्लेख येतो. याच्याच अनुरोधानें बोधिप्राप्तीनतर मारानें बुद्धाला मोहात पाडण्याचा प्रयत्न केला, असें काहीं बौद्ध कथाकार लिहितात. पुढें कालिदासाने विवाहापूर्वींच मदनाला शिवावर शरसंधान करण्याला प्रवृत्त केल्यामुळें बोधिप्राप्तीपूर्वींच मारानें बुद्धावर निर्वाणीची चढाई केल्याचीं आख्यानें लिहिलीं गेलीं. स्वतः अश्वघोष बौद्ध बनण्यापूर्वीं शैव होता, असें बौद्धाचीच परपरा सागते. श्वेताश्वेतर उपनिषदासारखें शैव उपनिषदहि त्याला परिचित होतें, यावरून ती परपरा खरी दिसते. तेव्हा महाकवियशःप्रार्थी अश्वघोषाच्या मनात प्रथम यौवनात स्मरजित् शिवावर महाकाव्य लिहिण्याच्या उर्मी उचबळल्याहि असतील. पण मग सस्कृतातील पहिलें शैव महाकाव्य कुमारसभव त्याच्या अवलोकनात आल्यानतर त्यानें स्मराजित् शिवाचें ध्यान सोडून माराजित् बुद्धाचें ध्यान आरभिलें आणि कुमारसभवाशीं स्पर्धा करण्याकरिता बुद्धचरित्राला महाकाव्याच्या कालिदासी साच्यांत ओतलें. हा पूर्वेतिहास लक्षात घेतल्यावाचून बुद्धचरिताच्या तेराव्या सर्गाच्या प्रारभीं मार आणि काम याची जी एकात्मता वर्णिली आहे, तिचा उलगडा होत नाहीं. ' य कामदेव प्रवदन्ति लोके चित्रायुध पुष्पशर तथैव । कामप्रचाराधिपतिं तमेव मोक्षाद्विषं मारमुदाहरन्ति ।। ' म्हणजे लोक अर्थात् हिंदु लोक ज्याला कामदेव म्हणतात, तोच भिक्षु अश्वघोषाच्या मतानें मोक्षद्वेष्टा मार होय.

## बौद्ध परंपरेचा विरोध

पण हें अश्वघोषाचें विधान त्याच्या पूर्वींच्या बौद्ध परपराना अनुसरणारें नाहीं. त्याच्या मतानें मार आणि काम एकरूप नसून काम हा मारसैन्यातील चौथ्या क्रमाकाचा सेनापति आहे. मार आणि काम याची एकरूपता दाखविताना माराच्या ' तिस्रो रतिप्रीतितृषश्चकन्याः । ' म्हणजे रति, प्रीति, तृषा ( अर्थात् वासना ) या कन्याहि अश्वघोषानें कामकन्या म्हणून वर्णिल्या आहेत. पण हिंदु परंपरेप्रमाणें काम हा रतिपिता नसून रतिपति असल्यानें डॉ. जॉन्स्टन यानीं आपल्या बुद्धचरि-

ताच्या आवृत्तींत तिस्रो या शब्दापुढें एक अवग्रह टाकून रतीचें अरतींत रूपांतर केलें आहे. पण हस्तलिखिताचा पुरावा या जावईशोधाच्या विरुद्ध आहे. अश्वघोषाच्या इंग्रज संपादकाना या विसंगतीचें जसें भय वाटतें, तसें स्वतः अश्वघोषाला कधींच वाटत नव्हतें. त्यानें कामाच्या अनुकरणानें माराच्या हातीं पांच बाण दिले असले तरी ( ततो धनुः पुष्पमयं गृहीत्वा । शरान् जगन्मोहकरांश्च पंच ।। ) त्यातील एकच बाण सिद्धार्थावर सोडून तो हताशपणें उद्गार काढतो. ' शैलेंद्रपुत्रीं प्रति येन विद्धो देवोऽपि शंभुश्चलितो बभूव ।। न चिंतयत्येष तमेव बाणम् । किंस्यादचित्तो न शरः स एषः ।। तस्मादय नार्हति पुष्पबाणम् । न हर्षणं नापि रतेर्नियोगम् ।। ' सिद्धार्थावर शर सोडून हताश झालेला मार म्हणतो कीं याच्यावर रतीचा नियोग करण्यात काहींच अर्थ नाहीं. या वचनावरून डॉ. जॉन्स्टन यांनीं कल्पिलेला अरति हा पाठ किती बनावट आहे, याची कल्पना येते. असो. या ठिकाणीं कामशरानें शंभु चलितचित्त झाला, असें जें विधान अश्वघोषानें केलें आहे, तें कालिदासाच्याच आधारानें केलें आहे. ( हरस्तु किंचित् परिलुप्तधैर्यः । ) हा संदर्भ कुमारसंभवांतील मदनदहनाच्या सर्गाला अनुलक्षूनच आहे. ही वस्तुस्थिति अश्वघोषभक्त नाकारतात. पण त्याना ही साधी गोष्ट अविदित आहे कीं ग्रीकांच्या अनुकरणानें कालिदासानें मदनाला शरासनावरून शर सोडण्याला प्रवृत्त करीपर्यंत तो हिंदु मदन कोणाहि व्यक्तीवर शर सोडीत नव्हता. वर दाखविल्याप्रमाणें मारविजयाच्या सर्गाचें कुमारसंभवांतील मदनदहनाच्या सर्गाशीं असलेलें सादृश्य लपविण्याकरिता रति या पाठाचें अरतींत रूपांतर करणें आणि कालिदासाच्या नायकावर अश्वघोषानें केलेली टीकाहि कालिदासाच्या काव्याला अनुलक्षून नसून अद्यापि उपलब्ध न झालेल्या एखाद्या अज्ञात कवीच्या आख्यानावर असू शकेल, असलीं उडवाउडवीचीं उत्तरें देणें, यांवरून कालिदास आणि अश्वघोष याच्या पौर्वापर्याचा वाद कितपत प्रामाणिकपणानें चालविला जात आहे, याची चांगलीच कल्पना येते.

## उचलेगिरीचीं उदाहरणें

बुद्धकृत मारविजयाची मुख्य कल्पनाच बौद्धानीं शैव-परंपरेवरून घेतली असल्यानें अश्वघोषाच्या मारविजयाच्या सर्गात शंकराच्या दुसऱ्या लीलांचा संदर्भ येणें स्वाभाविक आहे. यापैकीं शंकरानें इंद्राच्या बाहूचें स्तंभन केल्याचा संदर्भ ' पुरंदरस्येव पुरा सवज्रः । ' या चरणात आल्याचा उल्लेख वर आलाच आहे. ही कथा महाभारताच्या आदिपर्वांत आली असल्यानें येथील संदर्भ त्या ग्रंथाला

अनुलक्षूनच आहे, असें अश्वघोषभक्त म्हणू शकतील. पण त्याच सर्गात बुद्धाला जिंकण्याचे माराचे सारे प्रयत्न निष्फळ झाल्यानतर आकाशातील एका अनामिक भुतानें त्याला केलेल्या उपदेशातहि रघूच्या दुसऱ्या सर्गाचाच प्रतिध्वनि उमटला आहे. ' मोघ श्रम नार्हसि मार कर्तुं । हिंस्रात्मतामुत्सृज गच्छ शर्म ।। नैष त्वया कंपयितु हि शक्यो महागिरिर्मेरुरिवानिलेन ।। ' वस्तुतः हाच उपदेश रघुवशात सिंहानें दिलीपाला केला असून कलहांतील एका पक्षानें विरुद्ध पक्षाला करण्याजोगा हा उपदेश असल्यानें तेथेंच तो शोभून दिसतो. ' अलं महीपाल तव श्रमेण । प्रयुक्तमप्यस्त्रमितो वृथा स्यात् ।। न पादपोन्मूलनशक्तिरहः । शिलोच्चये मूर्च्छति मारुतस्य ।। ' या अनामिक भुतानें कालिदासाचें अनुकरण करून उपदेशाला प्रारभ केल्यानंतर प्रतिभेच्या अभावीं भासाचाच एक श्लोक माराला सुनावण्याची त्याला बुद्धि झाली. 'काष्ठ हि मथ्नन् लभते हुताशम् । भूमिं खनन् विन्दति चापि तोयम् ।। निर्बंधिनः किंचन नास्त्यसाध्यम् । न्यायेन युक्तच कृतच सर्वम् ।। ' हा श्लोक भासाच्या प्रतिज्ञायौगधरायणात पुढील स्वरूपांत आढळतो. ' काष्ठादग्निर्जायते मथ्यमानात् । भूमिस्तोय खन्यमाना ददाति ।। सोत्साहाना नास्त्यसाध्यं नराणाम् । मार्गारब्धाः सर्वयत्नाः फलन्ति ।। ' हा श्लोक प्रतिज्ञा नाटकात अत्यावश्यक असून बुद्धचरितात त्याचा बाडगुळाइतकाच उपयोग आहे. तेव्हां हा श्लोक कोणी कोणाच्या ग्रंथावरून उचलला आहे, हें सागावयाला नकोच. हें विधान मी कोवेल महाशयांच्या तर्कशास्त्राला अनुसरून करीत आहे, हें न सागितल्यास माझ्यावरच वाङ्मयचौर्याचा आरोप येईल.

## कपालहस्ता मेघकाली

वस्तुस्थिति अशी आहे कीं प्रो. कोवेल प्रभृति इग्रजाच्या आदेशाला अनुसरून कालिदासानें अश्वघोषाचें अनुकरण केलें, असें आपले विद्वान् प्रतिपादन करीत असले तरी त्यानीं अश्वघोषाची कविता बहुधा झोपेंतच वाचलेली असते. उदाहरणार्थ ' कालिदास आणि बौद्धवाङ्मय ' या सुप्रसिद्ध प्रबधात ज्याच्या विद्वत्तेविषयीं मला स्वतःलाहि अतिशय आदर वाटतो, असे डॉ. वासुदेवशरण आगरवाल लिहितात, ' Kalidasa also mentions, Kali decoratad with Kapal ornment. ( कालीकपालाभरणा चकासे । ) This again is an, iconographic feature inconceivable before the Gupta period. ' म्हणजे कालिदासानें कपाल।भरणाकालीचा उल्लेख केला असून गुप्तकालापूर्वीं कालीच्या

कपालाभरणा मूर्तीची कल्पना करणेंहि अशक्य होतें. असलीं इंग्रजी वाक्संप्रदायाच्या अनुकरणानें सागावयाचें म्हणजे झाडूवाल्याच्या पद्धतीचीं (sweeping statement) विधानें त्यांच्यासारख्या विद्वानानीं तरी करू नयेत. गुप्तकालापूर्वीच्या कपालाभरणा कालीच्या मूर्ति उपलब्ध झाल्या नसल्या तरी स्वतः अश्वघोषानेंच मारविजयाच्या सर्गातच सिद्धार्थावर आक्रमण करावयाला आलेल्या कपालहस्ता मेघकालीचा उल्लेख केला आहे. ( स्त्री मेघकाली तु कपालहस्ता ) इथें अश्वघोषानें कालीला मेघ हें विशेषण लाविलें असलें तरी तेवढयानें कोणी बिचकून जायला नको. श्यामसुदराला कोणी मेघश्याम म्हटल्यानें त्याच्या स्वरूपात काहीं परिवर्तन घडत नाहीं.

## अश्वघोषकृत गजाननिंदा

अश्वघोष हा वर्तमानकालीन राहुल साकृत्यायनाप्रमाणेंच प्रथम ब्राह्मण असताना धर्मांतर करून बौद्ध झाल्यानें आधुनिक महापंडिताप्रमाणेंच त्यानेंहि हिंदूच्या साऱ्या देवदेवताची निंदा करण्याच्या व्यवसायाला स्वतःला वाहून घेतलें होतें. याकरितां बुद्ध आणि मार याच्या युद्धाच्या वर्णनात हिंदूचे अनेक अवतार मारसेनेंत समाविष्ट होऊन बुद्धावर आक्रमण करीत असलेले त्यानें दाखविले आहेत. ‘ वराहमीनाश्वखरोष्ट्रवक्त्रा । व्याघ्रर्क्षसिंहद्विरदाननाश्च । ’ या श्लोकार्धात वराह, मीन, हयग्रीव, नरसिंह, गजानन इत्यादि अवतारानीं तरी बुद्धावर चढाई केल्याचा उल्लेख आहे. वरील वचनातील द्विरदानन हा गजाननच असल्याचें लबोदर आणि वारणलबकर्ण याचाहि पुढील दोनचार ओळींत उल्लेख येत असल्यानें निश्चितपणें सागता येतें. गजाननाची उपासना कनिष्ककाळींच प्रथम प्रचलित झाल्याचें मी १९५६ च्या पूर्वार्धात ‘ नवभारत ’ मासिकात दोन लेख लिहून दाखवून दिलें होतें. पण तेव्हा अश्वघोषाचा हा सदर्भ माझ्याहि ध्यानात आला नव्हता. अश्वघोषाच्या उलट कालिदासाला गणपति दैवत अविदित असल्यानें तो त्या बौद्ध भिक्षूचाहि कविकुलगुरु होता, हें उघड आहे. ‘ कालिदासकालीन भारत ’ या सदर्भपूर्ण ग्रथांत श्री. भगवत् शरण उपाध्याय यानीं त्या काळीं वदित आणि विदित देवदेवताची जी नामावलि दिली आहे, तींत गजाननाचा उल्लेख नाहीं. तेव्हा कालिदासकाळीं त्याची उपासना प्रचलित झाली नव्हती, हें निश्चित. त्याचप्रमाणें भारतीय विद्याभवनाच्या साम्राज्यवादी ऐक्ययुग या ग्रंथात म्हटल्याप्रमाणें कुषाणकाळीं गजाननाची उपासना चालू होती, ही गोष्ट पूर्वीच सिद्ध झालेली आहे. कुषाणकालीन अश्वघोषानें द्विरदानन, लबोदर, वारणलंबकर्ण या सज्ञा वापरून गजाननाचें आनन, उदर आणि कर्ण आपल्याला,

परिचित असल्याचा पुरावाहि पुरविला आहे. इतकें असूनसुद्धां केवळ ' न चुकणाऱ्या माणसाला ' खोटें ठरविण्याकरिता नागपूरच्या महामहोपाध्यायांनीं या साऱ्या पुराव्याकडे डोळेझाक करावयाचें ठरविलें तर त्याला इतिहासाचा निरुपाय आहे. कालिदासाच्या काळीं अर्वाचीन काळचा गणेश अविदित होता. इतकेंच नव्हे, तर त्या दिवसात शकराच्या गणाचें आधिपत्य निकुभाकडे होतें. या निकुभाचा कुभोदर मित्र रघूच्या दुसऱ्या सर्गात दिलीपाला सागतो. ' अवेहि मां किंकरमष्टमूर्तेः । कुभोदर नाम निकुभमित्रम् ॥ " कालिदासकालीं शकराच्या अष्टमुख मूर्ति बनवीत असत. पुढें तो प्रघात बद पडला. रघूच्या दुसऱ्या सर्गांतील निकुभ हाच कालिदासकालीन गणेश होय, या माझ्या विधानावर आक्षेप घेऊन म. म. मिराशींनीं आपलें अज्ञान प्रसिद्ध करण्याकरिता म्हटलें आहे कीं निकुभाचा गणेशाशीं कांहींहि सबध नाहीं. त्याच्या अज्ञानतिमिराचा निरास करण्याकारिता डॉ. पाटील याच्या वायुपुराणातील 'सास्कृतिक इतिहास' या प्रसिद्ध प्रबधातील पुढील उतारा त्यानीं लक्षपूर्वक वाचावा. ' In the vayu shiva often appears attended by the Ganas; Bhutas and the vinayakas, but the God Ganapati, Ganesha, or Ganapati-vinayaka does not at all figure in the Purana. The Purana however narrates a story of one Ganesha, who appears to have two other names Nikumbha and Kshemaka. ' डॉ. पाटील याच्यापूर्वी प्राचीन चरित्रकोशकारानींहि निकुभ हाच प्राचीन गणपति होय, असे स्पष्ट सागितलें आहे. पण अज्ञानाच्या नदनवनात निवास करणाऱ्या नागपूरच्या महामहोपाध्यायाकडून इतपत अभ्यासाची अपेक्षा करणेंच चूक आहे. केवळ कालिदासाची कविता वाचणाऱ्याना निकुभ आणि कुभोदर याची काहींहि माहिती नसली तरी हरिवशवायुब्रह्माडनीलमतादि पुराणातून निकुभाचें चरित्र आलें असून कौटलीय अर्थशास्त्रातून त्याच्यासह कुभाचाहि उल्लेख आला आहे उदाहरणार्थ, ' बलिंवैरोचन वदे शतमायच्च शबरम् । भडीरपाक नरक निकुभ कुभमेव च ॥ देवल नारद वदे वदे सावर्णि गालवम् । एतेषामनुयोगेन कृत ते स्वापन महत् ॥ ' या प्रस्वापन मत्रात निकुभ आणि कुभ एकत्र आले आहेत. याच प्रकरणात पुन्हा एकदा निकुभादिकाचा उल्लेख येतो. ' निकुभ नरक कुभ तन्तुकच्छम् महासुरम् । ' मूळ अर्थशास्त्रातील या दोन मत्रातून निकुभ आणि कुभ याना बऱ्याच प्रमुख देवासुराच्या आणि ऋषींच्या शेजारीं बसविलेलें आढळून येतें. त्यावरून प्राचीनकाळातील त्याच्या महत्त्वाची थोडी फार कल्पना यावी. या अवतरणातील कुभ हाच कालिदासाचा कुंभोदर असावा

आणि निकुंभाचें परिवर्तन अर्वाचीन गणपतींत झाल्यानंतर कुंभोदराचेंहि लंबोदर या नावानें गणेशांत विलीनीकरण झालें असावें.

## काव्यरचना करतांना पूर्व-कवींवर टीका

प्राचीनकाळीं, पूर्व कवींवर स्वतंत्र टीकालेख लिहून त्यांच्या कवितेचा अधिक्षेप करण्याची अर्वाचीन सोय उपलब्ध नसल्यामुळें आपल्या काव्यांतूनच कवींना प्रसंगानुरोधानें पूर्व-कवींवर टीका करून आपल्या काव्याची श्रेष्ठता प्रस्थापित करावी लागत असे. उदाहरणार्थ, वनविहाराला चाललेल्या सिद्धार्थाचें दर्शन घेतांना कपिलवस्तूंतील कामिनी कालिदासाच्या उच्छृंखल कामिनींपेक्षा अधिक संयमानें वागल्या, असें दर्शविण्याकरितां त्या मान्यजनांची अनुज्ञा घेऊन कुमारदर्शनाकरितां वातायनापाशीं गेल्या, ( जनेन मान्येन कृताभ्यनुज्ञाः । ) असें अश्वघोषानें लिहून ठेविलें आहे. पण त्याचें वर्णन अनुज्ञा न घेतां वातायनापाशीं जाणाऱ्या ' रघुकुमारां 'तील रमणीवर्णनाच्या अनुकरणानेंच लिहिलें असल्यानें कपिलवस्तु आणि कुंडिनपूर येथील रमणींच्या कृतींत कांहींच भेद आढळून येत नाहीं. वास्तविक पाहतां असल्या प्रसंगीं वडिल मंडळींची अनुज्ञा घेण्याचा प्रश्न उपस्थित होत नसल्यामुळें सिंहलद्वीपांतील श्रेष्ठ संस्कृत कवि कुमारदास यानें ' जानकीहरण ' काव्यांत लिहिलें आहे. ' गुरून् अपृष्ट्वैव कुमारम् ईक्षितुम् । जवेन वातायनमीयुरंगनाः ।। '( जा. ह. ९-५२ )' जनेन मान्येन कृताभ्यनुज्ञाः । ' ही अश्वघोषानें कालिदासावर केलेली टीका कुमारदासाला सहन न झाल्यामुळेंच त्यानें वरील श्लोकार्ध लिहिला आहे. एवढ्या एका संदर्भावरूनहि वरील तीन कवींचा कालानुक्रम कळून येतो.

## अश्वघोषाची कुमारसंभवावरील टीका

आपला काव्यनायक बुद्ध हा कुमारसंभवाच्या नायकापेक्षां श्रेष्ठ होता, असें समकालीन कालिदासभक्तांना पटवून देण्याकरितां अश्वघोषानें कुमारसंभवांतील अनेक प्रसंगांचा बुद्धचरितांत अधिक्षेपपूर्वक उल्लेख केला आहे. अशा उल्लेखांत पुढील श्लोकाला अग्रस्थान दिलें पाहिजे. ' शैलेंद्रपुत्रीं प्रति येन विद्धो । देवोऽपि शंभुश्चलितो बभूव ।। न चिंतयत्येष तमेव बाणम् । किं स्यादचित्तो न शरः स एषः ।। ' शंभूला शैलेंद्रपुत्रीचा मोह पडावा, म्हणून मदनानें जो बाण मारून त्याला चंचल केलें, तोच बाण याला मारला असतां हा तिकडे लक्षहि देत नाहीं. तेव्हां यालाच चित्त नाहीं कीं तो हा बाण नव्हेंच. कुमारसंभवांतील पुढील श्लोकाशीं तुलना

केली असता अश्वघोषाच्या टीकास्त्राचा रोख कोणावर होता, हें भाष्यानें न गेलेल्या कोणाहि विद्वानाला सहज समजूं शकेल

‘ अथोपनिन्ये गिरिशाय गौरी । तपस्विने ताम्ररुचा करेण ।।
विशोषिता भानुमतो मयूखैः । मदाकिनीपुष्करबीजमालाम् ।।
प्रतिग्रहीतु प्रणयिप्रियत्वात् । त्रिलोचनस्तामुपचक्रमे च ।।
समोहन नाम तु पुष्पधन्वा । धनुष्यमोघ समधत्त बाणम् ।।
हरस्तु किंचित् परिलुप्तधैर्यः। चद्रोदयारभ इवाम्बुराशि : ।।
उमामुखे बिंबफलाधरोष्ठे । व्यापारयामास विलोचनानि ।। ’

बुद्धचरित रचताना कुमारसभवातील वरील श्लोक अश्वघोषाच्या दृष्टीपुढें नव्हते. त्यानें केवळ पुराणातरींच्या कथाना अनुलक्षून आपला श्लोक लिहिला आहे, असे प्रतिपादण्याचा प्रयत्न अश्वघोषाचे पक्षपातीं करतील. त्याना इतकेंच सुचवून ठेवणें इष्ट आहे की मदनानें शकराला बाण मारल्याची कथा ग्रीक वाङ्मयाच्या अनुकरणानें कालिदासानेंच प्रथम रचली. तोंपर्यंत हिंदु मदन हातात धनुष्य घेऊन बाण मारीत नव्हता असो. वर उल्लेखिलेला बुद्धचरितातील श्लोक आणि कुमारसभवातील प्रसग याच्यात केवळ सविधानकापुरतेंच सादृश्य नसून कालिदासानें हरवर्णनात योजलेल्या विशिष्ट शब्दावर अश्वघोषाच्या टीकेचा कटाक्ष आहे, ही गोष्ट त्या बौद्ध श्लोककाराला सस्कृतातील पहिला महाकवि म्हणणाऱ्या विद्वानानीं लक्षात घ्यावी. ‘ हरस्तु किंचित् परिलुप्तधैर्य : । ’ या चरणाची कुचेष्टा करण्याकरिताच अश्वघोषानें ‘ देवोऽपि शंभुश्चलितो बभूव । ’ हा चरण लिहिला आहे आणि कुमारसभवाच्या पाचव्या सर्गात शकरानें स्वतःला ‘ सचेतस् ’ ( सचेतसः कस्य मनो न दूयते ) शब्द लावला आहे. त्याच्याशीं विरोध दर्शविण्याकरिता अश्वघोषानें बुद्धाला ‘ अचित्त ’ ही सज्ञा लाविली आहे.

## पार्वतीच्या तपाची कुचेष्टा

कुमारसभवाच्या पाचव्या सर्गातच पार्वतीनें शंकराच्या प्राप्तीकरितां केलेल्या तपाचें जें वर्णन आलें आहे, त्याची कुचेष्टा करिताना अश्वघोष लिहितो. ‘ कायक्लमैः यश्च तपोऽभिधानैः । प्रवृत्तिमाकाक्षति कामहेतोः ।। ससारदोषान् अपरीक्ष्यमाणो । दुखेःन सोऽन्विच्छति दुःखमेव ।। ’ आपल्या अतःकरणात ज्याच्याविषयीं काम उत्पन्न झाला आहे, त्याच्या प्राप्तीच्या आकाक्षेनें जो तप या सज्ञेनें ओळखले जाणारे शरीरकष्ट करतो, तो संसारातील दोषाची चिकित्सा न करता एका प्रकारचें

दुःख सहन करीत असतानाच दुसऱ्या प्रकारच्या दुःखाची आशा करीत असतो. या श्लोकात अश्वघोषानें मुख्यतः कुमाराच्या पाचव्या सर्गाच्या अतीं असलेल्या सुप्रसिद्ध श्लोकावर टीका केली आहे. 'अद्यप्रभृत्यवनताङ्गि तवास्मि दासः। क्रीतस्तपोभिरिति वादिनि चंद्रमौलौ ॥ अह्नाय सा नियमज क्लमम् उत्ससर्ज। क्लेशः फलेन हि पुनर्नवता विधत्ते ॥' प्रस्तुत श्लोकातील क्लम हा शब्द अश्वघोषानें तसाच उचलला आहे. 'क्रीतस्तपोभिः' या कल्पनेची कुचेष्टा करण्याकरिता 'तपोऽभिधानैः' ही शब्दयोजना केली आहे. शंकरानें आपलें खरें स्वरूप प्रकट करण्यापूर्वी छद्मरूपानें केलेल्या शिवनिंदेला 'न कामवृत्तिर्वचनीयमीक्षते।' असें जें पार्वतीनें सदर्प उत्तर दिलें होतें, त्याला अनुलक्षून अश्वघोषाने 'प्रवृत्तिमाकांक्षति कामहेतोः।' हा चरण लिहिला आहे.

## व्यतिरेकानें केलेला विचार

कविता रचतांना कवि शब्दाची निवड कशी करीत असतो, याचा पंडिताना बहुधा अनुभव नसतो. त्यामुळें त्याना वरील विवेचन तितकेसें पटायचें नाहीं. याकरिता व्यतिरेकाच्या दृष्टीनें विचार करणें अधिक इष्ट ठरेल. कालिदास अश्वघोषाच्या काव्याचा अभ्यास आणि अनुकरण करीत होता, ही कोवेलप्रभृति कालिदास-निंदकाची कल्पना ग्राह्य मानली तर पुढें प्रश्न असा उपस्थित होतो कीं अश्वघोषानें उमामहेश्वरावर आधींच करून ठेविलेली टीका सार्थ करण्याच्या उद्देशानेंच कालिदास काव्यरचना करीत होता कीं काय? अश्वघोषाची 'देवोऽपि शम्भुश्चलितो बभूव।' ही टीका खरी करण्याकरिताच कालिदासानें 'हरस्तु किंचित् परिलुप्तधैर्यः।' हा चरण लिहिणें शक्य आहे काय? वार्धक्यात राजे लोकानीं तपोवनाचा आश्रय घेण्याच्या आर्य रूढीवर टीका करिताना अश्वघोष म्हणतो, 'वयांसि जीर्णानि विमर्षयन्ति। धीराण्यवस्थानपरायणानि ॥ अल्पेन यत्नेन शमात्मकानि। भवन्त्यगत्येव च लज्जया च ॥' किंवा 'शक्नोति जीर्णः खलु धर्ममाप्तुम्। कामोपभोगेष्वगतिर्जरायाः ॥' अश्वघोषाचे असले कुत्सित श्लोक वाचल्यानंतर कालिदासानें आपला 'गलितवयसामिक्ष्वाकूणामिदं हि कुलव्रतम्।' हा चरण निःशंक मनानें लिहिला असता काय, याचा कविनिंदकानीं आपल्या मनाशीं विचार करून पहावा.

## कठिण पण कष्टसाध्य

कालिदास आणि अश्वघोष यांच्या पौर्वापर्याचा विचार करताना म. म.

मिराशींनीं आपल्या कालिदासावरील ग्रंथात लिहिलें आहे कीं कल्पनासाम्यासह उक्तिसाम्य असेल तरच उसनवारीचा आरोप लागू पडेल. पण अशीं फारच थोडीं स्थळें या दोन कवींच्या काव्यात दाखवितां येतात. त्यानतर निवडक स्थळें उतरून घेऊन ते म्हणतात, ' या उताऱ्यातील साम्य आश्चर्यकारक आहे. यावरून एका कवीचीं काव्यें दुसऱ्यानें वाचलीं असावींत, असें निःशकपणें म्हणता येईल. पण केवळ या अवतरणावरून कोणी कोणाची उसनवारी केली, हें सागणे कठिण आहे. ' यावर माझें म्हणणें एवढेंच आहे कीं ते कठिण असलें तरी कष्टसाध्य आहे. पण असलें कष्टसाध्य काम करण्यापेक्षा पाश्चात्य पडिताच्या हिंदुनिंदेचें समर्थन करणें अधिक सुलभ आणि लाभदायक असल्यामुळें त्याना तें करण्याची बुद्धिच सुचली नाहीं. माझा हा आरोप त्यानीं उतरून घेतलेल्या एखाद्या सादृश्याच्या चिकित्सेनेहि सिद्ध होण्याजोगा आहे. उदाहणार्थ, ' एकातपत्रं जगत: प्रभुत्वम् । नव वय: कांतमिद वपुश्च ।। ' हें कालिदासानें केलेलें दिलीप राजाचें वर्णन आणि ' आदित्यपूर्वं विपुल कुल ते । नव वयो दीप्तमिद वपुश्च ।। ' हें अश्वघोषानें केलेलें बुद्धाचें वर्णन यातील दुसरे चरण जवळ जवळ सारखेच आहेत. पण या ठिकाणीं परस्वापहरणाचा आरोप कालिदासावर येऊ शकत नाहीं, इतकें सिद्ध करण्यापुरता पुरावा अद्यापि उपलब्ध आहे. दिलीप राजाचें वर्णन करण्यापूर्वीं कुमारसभवाच्या पाचव्या सर्गात कालिदासानें पार्वतीला उद्देशून त्याच आशयाचा श्लोक लिहिला आहे. ' कुले प्रसूति: प्रथमस्य वेधसः । त्रिलोकसौंदर्यमिवोदित वपु: ।। अमृग्यमैश्वर्यसुख नव वयः । तपःफल स्यात् किमतः पर वद ।। ' अश्वघोषाची उसनवारी केल्याचा आळ कालिदासावर घेण्याइतकें उक्तिसाम्य या श्लोकात नागपूरच्या महामहोपाध्यायाना आढळणार नाहीं, अशी आशा आहे. मग इथें असा प्रश्न उपस्थित होतो कीं कुमारसभवासारखें आपलें पहिलें महाकाव्य रचताना ज्या कालिदासाला अश्वघोषाच्या श्लोकाचे चरण आपल्या श्लोकातून घुसडून देण्याची आवश्यकता वाटली नव्हती, तोच कवि रघुवशासारखें अपूर्व आणि अतिम काव्य लिहीत असताना काय त्या बौद्धभिक्षूच्या दाराशीं भिक्षापात्र घेऊन तिष्ठत होता ! वस्तुस्थिति अशी आहे कीं रघुवशातील दिलीपवर्णन आणि बुद्धचरितातील बुद्धवर्णन याचें मूळ कुमारसभवातील वरील श्लोकातच आहे. ' कुले प्रसूतिः प्रथमस्य वेधसः । ' या कालिदासाच्या चरणावरून अश्वघोषानें ' आदित्यपूर्वं विपुल कुल ते । ' हा चरण लिहिला आहे. ' त्रिलोकसौंदर्य-

मिवोदितं वपुः ।' या चरणावरूनच कालिदासानें 'कातमिद वपुश्च ।' आणि अश्वघोषानें 'दीप्तमिद वपुश्च' हीं पदें रचलीं आहेत. पार्वतीवर्णनाच्या श्लोकातील तिसऱ्या चरणात केवळ तिलाच लागू पडणारें जें 'नव वयः' असें पद आहे, त्याचा कालिदासानें रघुवंशात आणि अश्वघोषानें बुद्धचरितात अनाठायीं वापर केला आहे. कारण 'नून मत्तः पर वंश्याः पिंडविच्छेददर्शिनः । न प्रकाम-भुजःश्राद्धे स्वधासग्रहतत्पराः ॥' असे गुरुजवळ गाऱ्हाणें गाणारा दिलीप आणि 'जरा जरेति प्रपरीक्षमाणः ।' असे अश्वघोषानें ज्याचें वर्णन केलें आहे तो सिद्धार्थ हे दोघेहि नवयुवक नव्हते. अशा परिस्थितींत या उभयताच्या वर्णनात ही समान चूक का आढळते, याचा विचार केल्यानेंहि त्याचें पौर्वापर्य आपोआप ठरण्याजोगें आहे. या प्रश्नासबधीं माझी अशी कल्पना आहे कीं 'कुलेन कात्या वयसा नवेन ।' अशी आपल्या नायकनायिकांची स्तुति करण्याची कालिदासाला नेहमींची सवय असल्यानें पार्वतीवर्णनातील श्लोकात अत्यावश्यक तितकेंच परिवर्तन करून त्यानें दिलीपाचे वर्णन केल्यामुळें त्या वर्णनातील 'नवं वयः' हें पद दिलीप राजाला लागत नाहीं, इकडे त्याचें अवधान राहिलें नाहीं. औचित्याचा विचार अश्वघोषाला कधींच शिवला नसल्यानें पुढें त्यानें त्याच चुकीची पुनरावृत्ति केली. हा सारा इतिहास दिलीप आणि सिद्धार्थ यांच्या वर्णनात 'नव वयः' हें पद वापरण्याच्या चुकीमागें दडून राहिला आहे.

## अश्वघोष आणि औचित्य

औचित्याचें अश्वघोषाला वावडें असल्याचें एक समर्पक उदाहरण येथें उतरून घेणें आवश्यक आहे. रघुवशाच्या तिसऱ्या सर्गात रघुजन्माचें वर्णन करताना कवीनें म्हटलें आहे. 'अरिष्टशय्या परितो विसारिणा । सुजन्मनस्तस्य निजेन तेजसा ॥ निशीथदीपाः सहसा हतत्विषः । बभूवुरालेख्यसमर्पिता इव ॥' या श्लोकातील कल्पना उसन्या घेऊन अश्वघोषानें बुद्धाच्या वनवासगमनानतर त्याच्या अंतःपुरातील स्त्रियाची जी दुरवस्था झाली, तिचे वर्णन केलें आहे. 'हतत्विषोऽन्याः शिथिलासबाहवः । स्त्रियो विषादेन विचेतना इव ॥ न चुक्रुशुर्नाश्रु जहुर्न शश्वसुः । न चेलुरासुर्लिखिता इव स्थिताः । (बु. च ८-२५) एका तेजानें दुसरें तेज प्रभाहीन झालें म्हणजे त्या ठिकाणीं हतत्विष् ही संज्ञा संस्कृतात वापरतात. त्यामुळें विषादग्रस्त स्त्रियाचें हतत्विष् असें वर्णन करणें किती चूक आहे, हें कोणाहि संस्कृतज्ञाला सहज कळण्याजोगें आहे. पण कालिदासाच्या कल्पना लुटताना

अश्वघोषाला कसलेच भान रहात नसल्यामुळें त्यानें ही ढोबळ चूक करून ठेवली आहे. इतकें असूनहि कालिदासानें रघुजन्माच्या वर्णनाचा श्लोक अश्वघोषाच्या या चुकीच्या श्लोकावरूनच लिहिला असल्याचें प्रतिपादन डॉ. जॉन्स्टनप्रभृति धाडसी पंडितांनीं केलें आहे.

## अजविलापाचें स्मरण

अश्वघोष हा पदोपदीं कालिदासाचे अनुकरण करीत असूनहि आमच्या आचार्यांना आणि महामहोपाध्यायाना तो कालिदासपूर्वकालीन असल्याचा आभास निर्माण करण्याचे साहस तरी कसें होतें, हेंच मला समजत नाहीं. उदाहरणार्थ, सिद्धार्थ वनवासाला निघून गेल्यानतर त्याच्याकरितां विलाप करणाऱ्या शुद्धोदनाला स्वाभाविकपणेंच रामाकरिता विलाप करणाऱ्या दशरथाचें स्मरण झालें असलें तरी त्याच्या विलापाचें वर्णन करणाऱ्या अश्वघोषाला कालिदासाच्या अजविलापाचेंच स्मरण होतें आणि तो रामाच्या पित्याचा उल्लेख दशरथ अथवा तत्सम एखाद्या नावानें न करिता 'अजस्य राज्ञस्तनयाय' या शब्दांनीं करतो, इतकेंच नव्हे तर अजविलापाच्या भाषेंतच शुद्धोदनविलापवर्णनाचा प्रारंभ करतो. 'इति तनयवियोग जातदुःखः। क्षितिसदृश सहज विहाय धैर्यम् ॥ दशरथ इव रामशोकवश्यो। बहु विललाप नृपो विसंज्ञकल्पः ॥' हा श्लोक लिहिताना अश्वघोषाच्या डोळ्यापुढें 'विललाप स बाष्पगद्गद सहजामप्यपहाय धीरताम् ॥' हा कालिदासाचा श्लोकार्ध होता, हें उघड आहे. 'अभितप्तमयोऽपि मार्दवं भजते कैव कथा शरीरिषु ॥' हा या श्लोकाचा उत्तरार्ध त्यानें यापूर्वीच सहाव्या सर्गाच्या सत्ताविसाव्या श्लोकात वापरला आहे. 'अयोमयोऽपि हृदये किं पुनः स्नेहविक्लवे ॥'

## कालिदासाच्या अनुकरणाचीं उदाहरणें

काव्य या दृष्टीनें अश्वघोषाचीं काव्यें सामान्य असल्यानें तीं वाचण्याचा कंटाळाच येतो. त्यामुळें अश्वघोषानें किती ठिकाणीं कालिदासाचे अनुकरण केलें आहे, याचा पुरता छडा लावण्याचे काम अपुरतेंच सोडावें लागतें. तरीसुद्धा बुद्धचरित आणि सौंदरनंद हीं त्या भिक्षुकवीचीं काव्यें चाळताना सहज लक्षात आलेलीं साहश्यें एकदा एकत्रित करणें इष्ट होईल. बुद्धचरिताच्या पहिल्या सर्गातील 'वाता ववुः स्पर्शसुखा मनोज्ञाः' हा श्लोक कालिदासाच्या 'दिशः प्रसेदुर्मरुतो ववुः सुखाः' या श्लोकावरून सुचलेला आहे. पुढें ५५ व्या श्लोकांतील 'महात्मनि त्वय्युपपन्नमेतत्' हा चरण कुमारसंभवातील 'सर्वं सखे त्वय्युपपन्नमेतत्' या

चरणावरून उचललेला आहे. त्याच्यापुढें ७३ वा श्लोक शाकुंतलातील श्लोकाच्या अनुकरणानें लिहिला असल्यानें दोनहि श्लोक इथें उतरून घेणें भाग आहे. 'विदह्यमानाय जनाय लोके रागाग्निनाय विषयेंधनेन। प्रल्हादमाधास्यति धर्मवृष्ट्या वृष्ट्या महामेघ इवातपान्ते ॥' (बु. च. १-७३) 'स्मर एव तापहेतुः निर्वापयिता स एव मे जातः। दिवस इवाभ्रश्यामः तपात्यये जीवलोकस्य ॥' (शाकु ३-११) या श्लोकापुढील श्लोक अश्वघोषानें भासाच्या 'स्वप्नवासवदत्ता' नाटकातून उचललेला असल्यानें दुसऱ्याचे श्लोक आत्मसात् करण्यात तो किती प्रवीण होता, हें पुढील अवतरणावरून सिद्ध होईल. 'तृष्णार्गलं मोहतमःकपाटं द्वारं प्रजानामपयानहेतोः। विपाटयिष्यत्ययमुत्तमेन सद्धर्मताडेन दुरासदेन ॥' (बु. च. १-७४) 'सचितपक्ष्मकपाटं नयनद्वारं स्वरूपताडनेन। उद्घाट्य सा प्रविष्टा हृदयगृहं मे नृपतनूजा ॥' (स्वप्न ६-) पुढें ८८ व्या श्लोकातील 'भव इव षण्मुखजन्मना प्रतीतः।' हा चरण कालिदासाच्या 'उमावृषाकौ शरजन्मना यथा।' या चरणावरून रचलेला आहे. पुढें तिसऱ्या सर्गातील 'गच्छेति चाज्ञापयति स्म वाचा। स्नेहान्न चैनं मनसा मुमोच ॥' (बु. च. ३-७) हा श्लोकार्ध रघुवंशातील सीतात्यागाला सिद्ध झालेल्या रामाच्या वर्णनात पुढील स्वरूपात आला आहे. 'कौलीनभीतेन गृहान्निरस्ता न तेन वैदेहसुता मनस्तः ॥ (१४-८४) पुढें चौथ्या सर्गात सिद्धार्थाला वेष्टून उभ्या राहिलेल्या वारांगनांच्या वर्णनातील 'तस्थुःश्च परिवार्यैनं मन्मथाक्षिप्तचेतसः। निश्चलैः प्रीतिविकचैः पिबन्त्य इव लोचनैः ॥' (बु. च. ४-३) हा श्लोक कालिदासाच्या 'तमेव दृश्य नयनैः पिबन्त्यः नार्यो न जग्मुर्विषयांतराणि। तथा हि सर्वेंद्रियवृत्तिरासां सर्वात्मना चक्षुरिव प्रविष्टा ॥' या श्लोकाच्या अनुकरणानें लिहिला आहे. पुढें 'काचित्ताम्राधरोष्ठेन मुखेनासवगंधिना विनिशश्वास कर्णेऽस्य रहस्यं श्रूयतामिति ॥' (बु. च. ४-३१) हा श्लोक मेघदूतातील 'कर्णे लोलः कथयितुमभूदाननस्पर्शलोभात्।' (उ. मे. ४४) या चरणावरून लिहिला आहे. त्यानंतर 'मुहुर्मुहुर्मदव्याजस्रस्तनीलांशुकापरा। आलक्ष्यरशना रेजे स्फुरद्विद्युदिव क्षपाः ॥' (बु. च. ४ ३३) हा श्लोक रघुवंशातील 'अमुं सहासप्रहितेक्षणानि। व्याजार्धसंदर्शितमेखलानि। नालंविकर्तुं जनितेंद्रशंके। सुरांगनाविभ्रमचेष्टितानि ॥' (१३-४२) या श्लोकावरून लिहिला आहे. पुढें सातव्या सर्गातील 'लक्ष्मीवियुक्तोऽपि शरीरलक्ष्म्या चक्षूंषि सर्वाश्रमिणां जहार ॥' (बु. च. ७-२) हा श्लोकार्ध रघुवंशातील 'स न्यस्तचिन्हामपि राजलक्ष्मीं। तेजोविशेषानुमितां दधानः ॥' या दिलीपवर्णनाच्या अनुकरणानें लिहिला आहे. पुढें चौथ्या श्लोकातील 'तपःप्रधाना कृतबुद्धयोऽपि तं द्रष्टुमीयुर्नं

मठानभीशुः । हा श्लोकार्ध, पार्वतीच्या तपोवर्णनांतील ' दिदृक्षवस्तामृषयोऽभ्युपागमन् । न धर्मवृद्धेषु वयः समीक्षते ।। ' या श्लोकार्धाचा प्रतिध्वनि आहे. यानंतर कुमारसभवातील ' अद्यप्रभृति भूताना अधिगम्योऽस्मि शुद्धये । यदध्यासितमर्हद्भिः तद्हि तीर्थं प्रचक्षते ।। ' ( ६- ) या श्लोकावर टीका करण्याकरिता अश्वघोषानें ' स्पृष्टं हि यद्यद्गुणवद्भिरम्भस्तत्तत्पृथिव्यां यदि तीर्थमिष्टम् ।। तस्माद्गुणानेव परैमि तीर्थम् आपस्तु निःसशयम प एव ।। " ( बु च. ७-३१ ) हा श्लोक लिहिला आहे. आठव्या सर्गातील ' हतत्विषोऽन्याः शिथिलासबाहवः स्त्रियो विषादेन विचेतना इव । न चुक्रुशुर्नाश्रु जहुर्न शश्वसुर्न चेलुरासुर्लिखिता इव स्थिताः ।। " ( बु. च. ८-२५ ) हा श्लोक रघुजन्माच्या वर्णनातील ' निशीथदीपाः सहसा हतत्विषो बभूवुरालेख्यसमर्पिता इव । ' या श्लोकार्धाच्या चुकीच्या अनुकरणाने लिहिला आहे. नवव्या सर्गातील ' त द्रष्टु न हि पथि शेकतुर्न मोक्तुम् । ' ( ९-८१ ) हा चरण शाकुतलातील ( ५ १९ ) ' नच खलु परिभोक्तु नैव शक्नोमि हातुम् ' या चरणाच्या अनुकरणानें लिहिला आहे. दहाव्या सर्गाच्या चौथ्या श्लोकांतच कुमारसंभवांतील सुप्रसिद्ध ' त वीक्ष्य... शैलाधिराजतनया न ययौ न तस्थौ ' या श्लोकाचें अगदींच अडाणी अनुकरण केलें आहे. ' त प्रेक्ष्य योऽन्येन ययौ स तस्थौ । यतस्तत्र तस्थौ पथि सोऽन्वगच्छत् ।। ' ( बु. च. १०-४ ) हा श्लोकार्ध इतका भिकार आहे कीं तो वाचून प्रत्येक रसिकाला अश्वघोष भिक्षूनें कवितादेवीची विटबना आरभिलेली पाहून वीटच यावा. याच सर्गातील ' आदित्यपूर्वं विपुल कुल ते नव वयो दीप्तमिद वपुश्च ।। ' ( १०-२३ ) या श्लोकार्धात रघुवशातील एकातपत्र जगतः प्रभुत्वम् नव वयः कातमिदम् वपुश्च ।। ' या श्लोकार्धाचें अनुकरण केलें आहे. प्रस्तुत वचनातील नव वयः हे पद पुत्रोत्पत्तीनतर तिशीच्या सुमाराला वनवासी झालेल्या बुद्धाच्या वर्णनात अगदींच अनुचित आहे. कारण त्याकाळीं सोळा वर्षाला पुरुषाचा विवाह होत असे आणि चाळिशी आली कीं तो म्हातारा होत असे. पुत्रजन्मसमुत्सुक दिलीपाला तें कसें तरी लागू पडेल. पुढील श्लोक सपूर्ण उद्घृत केला पाहिजे. " यो ह्यर्थधर्मौ परिपीड्यकामः । स्यात् धर्मकामौ परिभूय चार्थः ।। कामार्थयोश्चोपरमेण धर्मः । त्याज्यः स कृत्स्नो यदि काक्षितोऽर्थः ।। ( बु च. १०-२९ ) या श्लोकात रघुवशातील पुढील श्लोकाचें शब्दशः अनुकरण आहे. ' न धर्ममर्थकामाभ्या बबाधे नच तेन तौ । नार्थं कामेन काम वा सोऽर्थेन सदृशः त्रिषु ।। ' ( रघु. १७-५७ ) अकराव्या सर्गातील ' अतोऽपि नैकान्तसुखोऽस्ति कश्चित् । नैकान्तदुःखःपुरुषः पृथिव्याम् ।। ' ( बु. च. ११-४३ )

हा श्लोकार्ध ‘ कस्यैकान्त सुखमुपनत दुःखमेकान्ततो वा । ’ या मेघदूतांतील सुप्रसिद्ध चरणाचा अनुवाद आहे. त्यानतर बाराव्या सर्गातील ‘ त्वद्दर्शनमह मन्ये तितीर्षुरिव च प्लवम् । ’ ( १२-१३ ) या वचनात रघुवंशाच्या प्रस्तावनेतील तितीर्षुर्दुस्तर मोहादुडुपेनास्मि सागरम् ॥ ’ या वचनाचा प्रतिध्वनि ऐकू येतो. या सर्गाच्या अंतीं बुद्धानें उपवास सोडून आहार स्वीकारताना ‘ शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ’ या कुमारसभवातील सूक्तीचा अनुवाद केला असून शंकर समाधि लावताना ज्या पर्यंकबधाचा अगीकार करीत, त्याचाच बुद्धानेहि आश्रय केल्याचा उल्लेख आहे.

## सौंदरनंदाचीहि तीच दशा

अश्वघोषाचें सौंदरनंद महाकाव्य बुद्धचरिताहूनहि रद्दी असल्यानें ते लक्ष देऊन वाचवत नाहीं. तरीसुद्धा तें वरवर चाळताना अश्वघोषानें कालिदासाचें अनुकरण केल्याचीं जीं ठळक उदाहरणें उपलब्ध झालीं, त्यापैकीं काहीं वाचकांना सादर करणें हे इतिहासकार या नात्यानें प्रस्तुत लेखकाचें कर्तव्यच आहे. हें कर्तव्य पार पाडण्याला त्या काव्याच्या शेवटच्या सर्गापासून प्रारभ करणें सोयीचे होईल. या काव्यातील शेवटच्या प्रवचनात शाक्यसिंह आपल्या भावाला म्हणतो, ‘ अवाप्तकार्योऽसि परा गतिं गतो न तेऽस्ति किंचित् करणीयमण्वपि ॥ अतःपर सौम्य चरानुकंपया विमोक्षयन् कृच्छ्रगतान् परानपि ॥ ’ ( सौं. १८—५४ ) या श्लोकावर भगवद्गीतेची सावली पडली असली तरी हा श्लोक रघुवंशाच्या दहाव्या सर्गातील एकतिसाव्या श्लोकाच्या अनुकरणानें लिहिला आहे. ‘ अनवाप्तमवाप्तव्य न ते किंचन विद्यते । लोकानुग्रह एवैको हेतुस्ते जन्मकर्मणोः ॥ ’ या श्लोकांतील लोकानुग्रहाकरितां पुनःपुनः जन्म घेण्याची आणि कर्म करण्याची उदात्त कल्पना जन्मभीरु शाक्यांना रुचण्याजोगी नसल्यानें अश्वघोषाने गाळली आहे. उरलेल्या श्लोकाचें त्यानें जवळ जवळ शब्दशः अनुकरण केले आहे. चौदाव्या सर्गातील पुढील श्लोकात कालिदासाचें अनुकरण नसलें तरी हा भिक्षु किती बीभत्स श्लोक लिहितो, याची वाचकाना कल्पना यावी, याकरिता कोणाहि कवीला कलकभूत असलेला हा श्लोक उतरून घेतला आहे. ‘ पुत्रमासानि खादेतां दंपती भृशदुःखितौ । एवमभ्यवहर्त्तव्यं भोजन प्रतिसख्यया ॥ ” ( सौं. १४—१३—१४ ) असले श्लोक पाहिले कीं या श्लोककाराची कालिदासाशीं तुलना करणें ही त्या कविकुलगुरूची केवढी विटंबना आहे, याची तत्काळ कल्पना येते. असो. बाराव्या सर्गातील ‘ बभूव स हि संवेगः

श्रेयसस्तस्य वृद्धये । धातोरधिरिवाख्याते पठितोऽक्षरचिंतकैः ॥ ' ( १२–९ ) या श्लोकातील कल्पना कालिदासाच्या ' धातोः स्थान इवादेश सुग्रीव सन्यवेशयत् । ' ( रघु १२–५८ ) या श्लोकार्धावरून घेतलेली आहे. दहाव्या सर्गात अश्वघोष म्हणतो, ' स्त्रियः कदाचिद् विलभेत वा न वा । ' ( १०–६२ ) हा चरण चक्क ' लभेत वा प्रार्थयिता न वा श्रियम् ' या कालिदासाच्या सुप्रसिद्ध चरणावरून लिहिलेला आहे. याच सर्गातील सत्तावन्नाव्या श्लोकात अश्वघोषानें ' यथा च लब्धा व्यसनक्षयं क्षयम् । ' या चरणात कालिदासाच्या अनुकरणाने लब्धा हा भविष्यकाळाचा प्रयोग योजला आहे. सौंदरनदाच्या दहाव्या सर्गातील स्वर्गवर्णनावर कालिदासाच्या मेघदूताची दाट छाया पसरली आहे. त्यातील एकच श्लोक येथें नमुन्याकरिता उतरून घेतों. " हारान् मणीन् उत्तमकुडलानि केयूरवर्य्याण्यथ नूपुराणि ॥ एवविधान्याभरणानि यत्र स्वर्गानुरूपाणि फलन्ति वृक्षाः ॥ " ( १०–२३ ) ' वासश्चित्र मधु नयनयोः विभ्रमादेशदक्षम् । पुष्पोद्‌भेद सह किसलयैर्भूषणाना विकल्पान् ॥ लाक्षाराग चरणकमलन्यासयोग्य च यस्याम् । एकः सूते सकलमबलामंडनं कल्पवृक्षः ॥ " ( उ. मे. १३ ) या दोन श्लोकातील सादृश्याची तुलना करण्याची आवश्यकता नाहीं. सौंदरनंदाच्या आठव्या सर्गातील स्त्री-निंदेंत अश्वघोषानें ' प्रमदानां अगतिर्न विद्यते । ' असे उद्वेगानें उद्गार काढले आहेत. या उद्गाराचें मूळ कुमारसभवातील ( ५–६४ ) ' मनोरथानामगतिर्न विद्यते । ' या चरणात आढळून येईल. सौंदरनदातील शुद्धोदन राजाच्या वर्णनातला ' यस्य सुव्यवहाराच्च रक्षणाच्च सुख प्रजाः । शिश्यिरे विगतोद्वेगाः पितुरकगता इव ॥ ' ( २–७ ) हा श्लोक दिलीपवर्णनातील ' प्रजाना विनयाधानाद्रक्षणाद्‌भरणादपि । स पिता पितरस्तासा केवल जन्महेतवः ॥ ' या श्लोकाच्या अनुकरणानें लिहिला आहे. पहिल्या सर्गातील ' तारासहस्रैरपि दीप्यमानैरनुत्थिते चंद्र इवातारिक्षम् ॥ ' ( १–६० ) हा श्लोकार्ध कालिदासाच्या ' नक्षत्रताराग्रहसंकुलापि ज्योतिष्मती चद्रमसैव रात्रिः ॥ ' या श्लोकार्धाची आठवण करून देतो. सौंदरनद हें अश्वघोषाचें पहिलेंच काव्य. बहुधा व्याकरण आणि छदःशास्त्र याचें अध्ययन सपविल्यानंतर लौकरच त्यानें या काव्यलेखनाला हात घातला असावा. त्यामुळें सौंदरनदाचा सपूर्ण दुसरा सर्ग व्याकरणाच्या क्लिष्ट प्रयोगानीं भरला असल्यानें अगदींच नीरस झाला आहे. डॉ. जॉन्स्टनसारखे अश्वघोषाचे भक्तहि या सर्गासबधीं उद्वेगानें लिहितात. 'Our enjoyment is obstructed by its unhappy resemblance to the section of a grammar which sets out the rules for the forma tion of the

various aorists' सौंदरनदाच्या सातव्या सर्गात अश्वघोषानें लिहिलें आहे कीं शंतनूच्या मृत्यूनंतर मत्स्यगंधेचा अभिलाष केल्यामुळें जनमेजयाला भीष्माच्या हातून मृत्यू आला. या जनमेजयाला वस्तुत: उग्रायुधानें मारलें आणि उग्रायुधाला भीष्मानें मारलें, अशी कथा हरिवंशात आली आहे. बुद्धचरित लिहिताना हरिवंश वाचून अश्वघोषानें आपली चूक सुधारली आहे.

कालिदासाचें अनुकरण करताना अश्वघोषानें केवळ त्याच्या कल्पनांचेंच अनुकरण केलें नसून कालिदासाच्या ग्रंथात भेटणारे दुर्मिळ प्रयोग आणि अपरिचित शब्दहि त्यानें उचलले आहेत. उदाहरणार्थ, मेघदूतात कालिदासानें वृत्ताच्या सोयीकरिता 'फलमविकलं कामुकत्वस्य लब्धा' या वचनात लब्धा असा भविष्य-काळाचा प्रयोग केला आहे. हा प्रयोग व्याकरणाला अनुसरून असला तरी वाङ्मयात विरळाच आढळतो. पण अश्वघोषाला त्याच्यानंतर होऊन गेलेल्या भट्टिकवीप्रमाणेंच व्याकरणातील क्लिष्ट प्रयोगाची आवड असल्यानें 'लब्धा कथंचित् सलिलाजलिर्मे' (बु च. १–६४) या चरणात त्यानें तो प्रयोग उचलला आहे. संस्कृत साहित्यात व्यासवाल्मीकिकालिदासानंतरच्या काळात काव्यावर व्याकरणाची कुरघोडी होऊ लागली. या प्रवृत्तीचा प्रारंभ अश्वघोषापासून झाला असून तिचा कळस पुढें भट्टिकाव्यात झाला. उदाहरणार्थ, बुद्धचरितातील पुढील श्लोकात अश्वघोषानें अव्‌धातूचा नऊ निरनिराळ्या अर्थांनीं उपयोग करण्याचा प्रयत्न केला आहे. 'अवेंद्रवत् दिव्यव शश्वत् अर्कवत् गुणै: अव श्रेय इहाव गामव। अवायुरार्यैरव सत्सुतान् अव श्रियश्च राजन् अव धर्ममात्मन:॥' असली व्याकर-णाची कसरत करण्याची सवय असणाऱ्या कवीनें लब्धा हा थोडा अपरिचित प्रयोग कालिदासाच्या कवितेंत आढळताच तेथून उचलून घेणें स्वाभाविक आहे.

## शब्दप्रयोगांचा पुरावा

सीतेला वनात सोडून येण्याची रामाची आज्ञा बजावताना लक्ष्मणानें केलेल्या भाषणात कालिदासानें निघ्न हा अपरिचित शब्द वापरला आहे. 'निघ्नस्य मे भर्तृनिदेशरौक्ष्यं देवि क्षमस्वेति बभूव नम्र:' परस्वाधीन लक्ष्मणाचें हें वचन सहृदय वाचकाच्या चित्तात चिरकाल घोळत राहणारें असल्यानें या वचनातील निघ्न शब्द अश्वघोषाच्याहि अंत:करणात ठसला आणि त्याचा त्यानें सौंदरनदातील पुढील श्लोकात उपयोग केला. 'नच प्रयाति नरकं शत्रुप्रभृतिभिर्हत:। कृष्यते तत्र निघ्नस्तु चपलैरिंद्रियैर्हत:' या श्लोकातील हत शब्दाची निरर्थक द्विरुक्ति आणि च तु

सारख्या पादपूरकाचा प्रयोग यावरून या भिक्षु कवीच्या कवित्वशक्तीची पुरेशी कल्पना येते आणि संस्कृत साहित्यांत सहसा न भेटणारा हा शब्द या एकलव्यानें कविकुलगुरूच्या काव्यातून उचलून घेतला असला पाहिजे, हें आपोआपच स्पष्ट होतें. असलाच आणखी एक शब्द म्हणजे अजविलापाच्या सर्गात नारदाच्या वीणेला कालिदासानें लाविलेला परिवादिनी हा शब्द होय. 'भ्रमरैः कुसुमानुसारिभिः परिकीर्णा परिवादिनी मुनेः । ' ( र. वं ८–३५ ) या अमर सर्गातला हा अभिनव शब्द अश्वघोषानें लगेच उचलला आणि बुद्धचरितातील पुढील श्लोकात त्याचा उपयोग केला. 'महतीं परिवादिनींच काचित् वनितालिंग्य सखीमिव प्रसुप्ताम् । विजघूर्ण चलत् सुवर्णसूत्रा वदनेनाकुल योक्त्रकेण ।। ' या श्लोकाचा चौथा चरण वृत्तदृष्ट्या सदोष आहे, हें सागायला नकोच. असल्या सदोष श्लोकावरून कालिदासानें परिवादिनी शब्द उचलला असण्यापेक्षा 'ऐशीं काव्यें कराया इकडुन तिकडुन आणलेली बुद्धि दे चक्रपाणि ' अशी प्रार्थना करणाऱ्या कवीनें तो रघुवंशातून उचलणें अधिक स्वाभाविक आणि संभवनीय होय. कालिदासाचे शब्द उचलताना अश्वघोषाला औचित्य अनौचित्याचे भानहि रहात नाहीं. कालिदासानें अग्निवर्णशृंगारवर्णनात 'अभ्यऽपद्यत स वासितासखः । पुष्पिताः कमलिनीरिव द्विपः ।। ' असा एक श्लोकार्ध ( १९–=१ ) रचला आहे. येथील वासिता शब्दाचा अर्थ स्त्री आणि करिणी असा होत असल्यानें हा शब्द इथें विशेष उचित आहे. कारण अग्निवर्णाच्या निर्दयरतिश्रमानीं पद्मिनी केव्हाच कुस्करून गेल्या असतात. पण हाहि शब्द भिक्षु अश्वघोषानें बुद्धचरितात वापरून आपल्या अरसिकपणाचें प्रदर्शन करून ठेविलें आहे. 'अथ नारीजनवृतः कुमारो व्यचरद्वनम् । वासितायूथसहितः करीव हिमवद्वनम् ।। ' ( बु. च. ४–२७ ) कामिनींच्या संगितींत आपल्या कामविन्मुखतेचें प्रदर्शन करणाऱ्या सिद्धार्थाला वासितासख करीची उपमा देणे किती अप्रयोजकपणाचें आहे, हे कालिदासाच्या शब्दरत्नाचा लोभ धरणाऱ्या अश्वघोषाव्यतिरिक्त इतराना लगेच कळून येईल.

## चीनमध्यें मेघदूताचें अनुकरण

अश्वघोष कवि खिस्तकालाच्या दुसऱ्या शतकात होऊन गेला असावा, असें त्याच्या कवितेवरून दिसतें. तो जेव्हा कालिदासाचें अनुकरण करण्यांत दंग झाला होता, त्याच्या पुढच्या पिढींतच Hsu Kan या चिनी कवीनें कालिदासाच्या अनुकरणानें स्वभाषेंतच एक मेघदूत लिहिलें होतें, असें जाइल्स याच्या

चिनी वाङ्मयाच्या इतिहासावरून समजून येतें. ' The dark years between A D 196 and 221, which witnessed the downfall of the house of Han, were illumined by the names of seven writers now jointly known as the seven Scholers of the Chien-An period. They were all poets. There was Hsu Kan, who fell under the inuflence of Buddhism and translated into Chinese the Prajnya-mulashastratika (प्रज्ञामूलशास्त्रटीका) of Nagardjuna. (नागार्जुन) The following lines are by him.

' O floating clouds that swim in heaven above,
Bear on your wings these words to him I love....
Alas you float along nor heed my pain,
And leave me here to love and long in vain.
I see other dear ones to their homes return,
And for his coming shall not 1 too yearn ?
Since my lord left ah me; unhappy day ,
My mirror's dust has not been brushed away,
My heart like running water, knows no peace,
But bleeds and bleeds forever without cease. '

मि. हर्बर्ट ए. जाइल्स याच्या ग्रंथाच्या ११९ आणि १२० या पानावरून वरील उतारा घेतला आहे. या उताऱ्यावरून असें कळून येतें कीं चीनच्या इतिहासातील एका तमोमय काळांत प्रस्तुत कवि होऊन गेला असून नागार्जुनाच्या प्रज्ञामूलशास्त्रटीका यासारख्या अवघड ग्रंथाचें स्वभाषेंत भाषांतर करण्याइतकें संस्कृतचें ज्ञान त्याला होतें. अशा कवीला संस्कृताचें अध्ययन करतांना, कालिदासाच्या अमर कृतींचा परिचय होऊन त्याच्या कल्पनांचा त्यानें आपल्या काव्यांतून उपयोग करून घेणें स्वाभाविकच आहे. असें असूनसुद्धा या अप्रसिद्ध कवीचें कालिदासानेंच अनुकरण केलें असावें, असें प्रतिपादन करण्याचें धाडस श्री. चिंताहरण चक्रवर्ती याच्यासारख्या विद्वानांनीं केलें आहे. १९२७ जूनच्या इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्लींत ते लिहितात. ' Neither can it be dogmatically asserted that the account of the Chinese poet

did not float to India in some form or other and indirectly help Kalidasa to lay the foundation of Dutakavy as in Sanskrita.'

पण इतक्या क्लिष्ट कल्पना करण्यापेक्षा ज्या काळीं संस्कृत ग्रंथाचीं रूपांतरें करण्यांत चीन देशातील पंडित दंग झाले होते, त्या काळीं त्यानींच कालिदासाच्या अनुकरणानें वरील कविता लिहिली, असें म्हटल्यास इतिहासशास्त्राचा कोणताहि अपराध व्हावयाचा नाहीं.

प्रकरण दहावें

# अथेन्सच्या कवींचा कालिदासावरील प्रभाव

कालिदासाचे ग्रथ वाचताना त्याला ग्रीक पौराणिक कथांचा आणि अथेन्स येथील विश्वविख्यात कवींच्या कृतींचा दृढ परिचय असल्याच्या खुणा ठिकठिकाणीं आढळून येतात. त्यामुळें कालिदासाचे ग्रथ पढविण्याचा व्यवसाय करणाऱ्या सहस्रावधि आचार्यांना आजपर्यंत आपल्या कविकुलगुरूवरील, अथेन्स नगरींतील कवींच्या प्रभावाची कल्पना आली नसली तरी त्यांच्या क्षेत्रावर अतिक्रमण आणि आक्रमण करण्यापूर्वी त्या सर्वांना वदन करून या अवघड विषयाचा निदान उपन्यास तरी करणें आता अपरिहार्य झालें आहे. या विषयावर पुण्याच्या ‘ पूना ओरिएटॅलिस्ट ’ या त्रैमासिकात ( जुलै ते ऑक्टोबर १९५८ ) मी एक लेख आधींच प्रसिद्ध केला आहे. त्या लेखात मालविकाग्निमित्रासबधीं काहींच विवेचन केलें नसल्याने प्रस्तुत प्रबधांत त्या नाटकापासूनच विवेचनाला प्रारभ करणें इष्ट होईल.

## आचार्यकलहाचें मूळ

मालविकाग्निमित्र हें कालिदासाचें पहिलें नाटक मानलें जातें. कालिदासानें हें नाटक रचण्यापूर्वी भाससौमिल्लकविपुत्रादि नाटककार कधींच दिवगत झाले असले तरी प्रतिभाशाली वर्तमान कवींच्या अभावीं त्यांचींच नाटकें भारतीय रगभूमीवर दाखविलीं जात या दिवगत कवींच्या सासुरवासातून नाट्यकलेची सुटका करण्याकरिता कालिदासानें शाकलनगरींतील ग्रीक रगभूमीवर लोकप्रिय झालेल्या नाटकाच्या अनुकरणानें आपलें मालविकाग्निमित्र हें नाटक लिहिलें. या नाटकातील पहिल्याच अकात विदूषक गौतमानें गणदास आणि हरदत्त या उभयतां नाट्याचार्यांमध्ये, श्रेष्ठ कोण आणि कनिष्ठ कोण या प्रश्नावरून भांडण लावून दिलें आहे. या नाट्याचार्यांच्या कलहाचा नाटकाच्या सविधानकात कवीनें अतिशय कुशलतेने उपयोग करून घेतला असला तरी रगभूमीवर हा कलह दाखवून प्रेक्षकाची करमणूक करण्याची कल्पना त्यानें अथेन्सचा सुप्रसिद्ध प्रहसनकार ॲरिस्टोफेनिस् याच्या ‘ मडूक ’ या प्रहसनातील ( Aeschylus ) एस्कुलुस् आणि (Euripides)

युरिपिडिस् या वियोगान्त नाटककारांच्या अटीतटीच्या भांडणावरून घेतलेली दिसते. या दोन नाटककारापैकीं एस्कुलुस् प्रथम निधन पावल्याने ग्रीक यमराज जो प्लूटो, त्याच्या सभेंत त्याला अग्रासन प्राप्त झालें होतें. त्यानतर सोफोक्लीजचा जेव्हां त्या सभेंत प्रवेश झाला, तेव्हा एस्कुलुस्नें आपल्या अर्धासनावर त्याला स्थान दिलें त्यामुळें चिडून युरिपिडिस्नें नाटककारांतील अग्रासनावर आपला अधिकार सागितला. तेव्हापासून युरिपिडिस् आणि एस्कुलुस् याचीं यमलोकात कैकाड्या-सारखीं भाडणें होऊ लागलीं. ‘ मंडूक ’ प्रहसनात एकदा रगभूमीवर दोन पात्रें सवाद करीत असताना अकस्मात् पडद्यामागें मोठा ध्वनि होतो. तेव्हा एक पात्र दुसऱ्याला म्हणतें. ‘ अहो, ते एस्कुलुस् आणि युरिपिडिस् एकमेकावर कडाडत आहेत. आताशा या मृताच्या सभेंतहि तीव्र स्पर्धा उत्पन्न झाली आहे. ’ मालविकाग्निमित्रातील नाट्याचार्यहि असेच पडद्यामागें कडकडतात. ‘ अलं बहु विकत्थ्य। राज्ञः समक्षमेव आवयोरधरोत्तरव्यक्तिर्भविष्यति। ’ ॲरिस्टोफेनिसच्या प्रहसनात युरिपिडिसनें प्लूटोकडे न्याय मागितला असता प्लूटोच्या सभेंतील अथेन्सच्या नागरिकाचा निर्णय मान्य करण्याचें एस्कुलुस्नें नाकारलें, कारण ‘ ‘ survival of the vulgarest ’ या महान् सिद्धाताला अनुसरून यमपुरींतील अथेन्सच्या नागरिकाना युरिपिडिस्चीं ‘ पापी ’ नाटकेंच प्रिय होतीं. इकडे आपल्यावरहि पक्षपाताचा आरोप येईल, या भीतीनें स्वत: प्लूटोहि न्याय देण्याला कचरूं लागला. अशा वेळीं प्रत्यक्ष नाट्यकलेचा देवच प्लूटोच्या भेटीला आलेला पाहून त्या दिवगत कवींचा न्याय करण्याचें काम ग्रीक यमराजानें बॅकुसकडेच सोंपविलें. त्याच्या आग्रहावरून बॅकुस्नें कविद्वयाला त्याच्या नाटकातील भाषणें म्हणावयाला लावून आणि अन्य प्रकारानींहि त्याची कसून परीक्षा घेतली. शेवटीं अग्रासनावरील एस्कुलुस्च्या अधिकारालाच नाट्यदेवानें मान्यता दिली. मालविकाग्निमित्रात धारिणी राणीसह तिचा नाट्याचार्य गणदास हा अग्निमित्राच्या राजसभेंत प्रथम प्रविष्ट झाला. पुढें राजानें दुसरी राणी केल्यानतर इरावतीचा नाट्याचार्य हरदत्त हा त्याच्याशीं स्पर्धा करूं लागला. या कलहबीजाला गौतमानें खतपाणी घातल्यानंतर या नाट्याचार्यांनीं जेव्हा परस्पराची प्रकट निंदा आरभिली आणि राजाकडे न्याय मागितला, तेव्हा राजानें स्वतः निर्णय न करता अल्पकाळापूर्वीं धारिणीच्या आश्रयाला आलेल्या भगवती कौशिकीकडे तें काम सोंपविलें. तिनें या नाट्याचार्यांनाच नाचायला न लावता त्याच्या विद्यार्थिनींना नाचायला लावून गणदासच श्रेष्ठ असल्याचा निर्णय दिला. या दोन नाट्यपूर्ण कलहाची तुलना केली असता स्पष्ट दिसून येतें कीं इथें

केवळ कलहकल्पनेचें बीजच कालिदासानें ॲरिस्टोफेनिसच्या प्रहसनावरून घेतलें नसून त्या बीजाचा विस्तारहि बहुतांशीं अथेन्सच्या कवीच्या मार्गदर्शनाला अनुसरूनच केला आहे. पण त्यांत हें व्यंग राहून गेलें आहे कीं संविधानकाच्या दृष्टीनें आवश्यक असलेल्या परिव्राजिकेलाच नाट्यचार्यांची परीक्षा घ्यावी लागते. उलटपक्षीं नाट्यकलेच्या देवानेंच एस्कुलुस् आणि युरिपिडिस् याची परीक्षा घेणें अत्यंत उचित आहे, हें सांगायला नकोच. बॅकुस् देवाच्या मानानें आपल्या परीक्षिकेला गौणपणा येऊ नये याकरिताच अग्निमित्र तिला वरचेवर भगवती या नावानें संबोधितो कीं काय, अशीहि इथें शंका येते.

## पिंगलवानराचा सदुपयोग

मालविकाग्निमित्रातील गणदास हा वस्तुतः कालिदासाचाच रंगभूमीवरील अवतार आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. कालिदास आणि गणदास या नावावरून दासप्रथा त्याच्या अंगवळणीं पडली होती कीं काय अशी शंका येते आणि कुमारसंभवातील ' अद्यप्रभृत्यवनताङ्गि तवास्मि दासः । क्रीतः तपोभिरितिवादिनि चंद्रमौलौ ॥ ' या श्लोकार्धावरून ती दृढतर होते. रंगभूमीवर अवतरताना कवीनें गणदास हें नाव साभिप्राय स्वीकारिलें असल्यास भारताच्या वायव्यसीमेवरील गणराज्यातून तो मध्यभारतात आला होता, असें अनुमान निघतें. खिस्तपूर्व पहिल्या शतकात भारताच्या वायव्यसीमेवर ग्रीक राज्येंहि अस्तित्वांत होतीं. त्यामुळें त्या भागातील विद्वानाना ग्रीक साहित्याचा आणि संस्कृतीचा परिचय असणें अगदीं स्वाभाविक होतें. उदाहरणार्थ, ' देवानामिदमामनन्ति मुनयः कान्तं क्रतुं चाक्षुषम् । ' असें जें गणदासानें नाटकाचें वर्णन केलें आहे, तें वर्णन भारतीय परंपरेपेक्षा ग्रीक परंपरेलाच अधिक लागू पडतें. कारण ग्रीकांचा एक प्रमुख देव बॅकुस् हा मदिरा आणि नाट्यकला याचाच देव असल्यानें नाटकें केल्यावांचून त्याच्या उपासनेची सांगताच होत नसे. त्यामुळें प्राचीन ग्रीक लोकात नृत्यनाट्यरंगभूमीचा अतिशय उत्कर्ष झाला होता. याप्रमाणें परिणतावस्थेला गेलेल्या ग्रीक नाटकाचें अनुकरण करूनच कालिदासानें मालविकाग्निमित्र नाटक लिहिलें असल्यानें त्यात संविधानकरचनेचे दोष दुर्मिळ आहेत. अशा दुर्मिळ दोषांपैकीं एक दोष प्रो. झाला यानीं त्याच्या ' कालिदास ' या आंग्लग्रंथात दाखवून दिला आहे. ते म्हणतात. 'The Pingal monkey episode in the fourth act of the play is an exception, it is certainly a deus

ex machina device for finding a way out of a tight situation.'
या ठिकाणीं मालविकाग्निमित्राच्या चौथ्या अंकात कालिदासानें पिंगलवानराचा केलेला उपयोग सदोष असल्याचें सांगून प्रो. झाला स्वस्थ बसले. पण कालिदासाचें गोत्र कपि असल्याने त्यानें या वानराचा उपयोग केला आहे का कवीच्या व्यवसायासह तो कपीचाहि व्यवसाय थोडाफार करीत असल्यानें त्याला या संकटप्रसंगीं कपीची आठवण झाली, याचा त्यांनीं उलगडा केला नाहीं.

## प्रियासमागमांत वानराचें विघ्न

मालविकाग्निमित्राच्या चौथ्या अंकात धारिणी राणीने तळघरात शृंखलाबद्ध करून ठेविलेल्या मालविकेला मोठ्या कुशलतेनें मुक्त करवून तिची आणि राजाची विदूषकानें भेट घडवून आणली असता अकस्मात् तिथें इरावती राणी प्रकट होते. तेव्हा अन्य रमणीच्या आराधनेंत धरलेल्या आर्द्रापराध राजाला राणीच्या क्रोधापासून वाचविण्याकरिता कवीनें प्रतीहारीकडून संदेश आणविला कीं चेंडूमागे धावणाऱ्या राजकन्या वसुलक्ष्मीला पिंगलवानरानें अगदीं घाबरें करून सोडल्यामुळें ती थरथरा कापू लागली आहे, तेव्हा तिला धीर देण्याकरिता महाराजानीं त्वरित यावें. हा संदेश ऐकून विदूषक उल्हासानें उद्गारतो. 'साधु रे पिंगलवानर साधु। परित्रातस्त्वया स्वपक्ष.।' या उद्गारावरून कवीनें या प्रसंगीं आयत्यावेळीं उधारउसनवार केली आहे, हें कोणाहि ललितलेखकाला सहज कळून येईल. या प्रसंगाशीं तुलना करण्याजोगा एक प्रसंग मूळ ग्रीकवरून प्लाउटुस्नें लाटिनमध्यें रूपांतरित केलेल्या बढाईखोर सरदारावरील नाटकात आला आहे. या सरदारानें एक सुंदरी पळवून आणून तिला आपल्या घरात कोंडून ठेविली असता तिचा प्रियकर शेजारच्या घरीं येऊन राहतो आणि पलीकडील प्रेयसीला आपल्या घरात येण्याकरिता चोरवाट करतो. पुढे त्या चोरवाटेनें एकत्र आलेल्या प्रेमिकांचा सुखसंवाद चालला असताना त्या बढाईखोर सरदाराच्या घरातील एक वानर सुटून गच्चीवर जातो आणि त्याला पकडण्याकरिता धाब्यावरून धावत असलेल्या त्याच्या सेवकाला धन्याची मैनाहि निसटून शेजारच्या घरीं तिच्या प्रियकराशीं गुजगोष्टी बोलत असलेली सांदण्यातून दिसून येते. या दोनहि नाटकातून अटकेंत सापडलेल्या नायिकेची तिच्या प्रियकराशीं गाठ पडण्याच्या प्रसंगीं नाटककाराना कपींचा उपयोग करण्याची जी बुद्धि झाली आहे, ती काकतालीय न्यायानें झालेली दिसत नाहीं. इथें कालिदासानें

ग्रीक नाटककाराचा धडा गिरविला आहे, हेंच खरें. हें विवेचन अनेकाना पटणार नाहीं. पण ही गोष्ट त्यानीं लक्षांत घ्यावी कीं आपल्या देशांत वानर हा प्राणी करमणुकीकरिता सहसा पाळीत नाहींत, भीक मागण्याकरिता मात्र पाळतात. उलटपक्षीं ग्रीसमधील कुटुबातून इतर अनेक प्राण्यासह वानरहि पाळले जात. त्यामुळें त्या देशातील कौटुंबिक नाटकातून वानराचा उल्लेख येणें स्वाभाविक आहे. असो.

## इरावतीचें मदिरापान

इथें राजाला सकटात पाडणाऱ्या इरावती राणीचें नावच मदिरायुक्त असून ( इरा = मदिरा ) ही पजाबी राणी ( इरावती = रावी ) मदिरापान करूनच रंगभूमीवर प्रवेश करिते. कालिदासकाली यवनांच्या ससर्गानें पचनद प्रातातील स्त्रियात मद्यपानाचें व्यसन पराकोटीला गेले होतें. कर्णशल्यसवादात मद्रनारींची निंदा करताना कर्ण म्हणतो, ' सौवीरक याच्यमाना माद्रिका घर्षति स्फिचौ । अदातुकामा वचन इदमाह सुदारुणम् । न मा सौवीरक कश्चित् याचेत दयित मम । पुत्र दद्या पतिं दद्या न तत् दद्या सुवीकरम् ।। ' मदिरेच्या धुदींत पतिपुत्राची हत्या करायलासुद्धा ग्रीक स्त्रिया मागेपुढें पहात नसत. हा आदर्श समोर असल्यामुळेंच इरावती राणी आपल्या काचीनें राजाला मारायला जाते. ही गोष्ट इथें सागितली पाहिजे कीं मदिरेचें नाव धारण करणाऱ्या आणि रगभूमीवर मदिरापान करणाऱ्या ग्रीक नाटकातील स्त्रिया या साऱ्या गणिका असत. कालिदासानें मात्र इरावती राणीलाच गणिकेप्रमाणेंच वर्तन करावयाला लाविलें आहे. पण लोकाचें अनुकरण करताना असली विसगति नेहमीच घडून येते.

## उर्वशीचरित्रावर ग्रीक कलम

असल्या विसगतीचा अपवाद येऊ नये म्हणून कालिदासानें विक्रमोर्वशीयात अप्सरा उर्वशीलाच नायिकेचें स्थान दिलें अ हे. उर्वशीचरित्रासबधीं अधिक विवेचन पुढें करावयाचें आहेच. इथें केवळ उर्वशीनें आयूला जन्म देताक्षणींच त्याचा जो त्याग केला, त्याचा विचार केला पाहिजे. पौराणिक परपरेप्रमाणें उर्वशीला एक सोडून सहा पुत्र होते आणि त्याच्यापैकीं कोणालाहि तिनें जन्मतः टाकल्याचा उल्लेख नाहीं. जन्मतः मुलाला टाकून देण्याची दुष्ट चाल ग्रीसमध्यें फार बोकाळली होती. ग्रीक नाटकाच्या कथानकातून तिचा उल्लेख पदोपदीं आढळतो. तेव्हा या ग्रीक चालीचें कलम कालिदासानें आपल्या उर्वशीचरित्रावर केले आहे,

हें उघड आहे. असो. प्लाउटुस्च्या ज्या नाटकातून पिंगलवानराचा संदर्भ कालिदासानें उचलला, त्याच नाटकांतून माणवक विदूषकासारख्या माकडछाप विदूषकालाहि त्यानें पाचारण करून त्याला विक्रमोर्वशीयात स्थान दिलें. याची चर्चा पुढें येईलच. इथें प्रथम मालविकाग्निमित्रातील गौतमाचा विचार केला पाहिजे.

## अकर्ता अग्निमित्र

कालिदासाच्या साऱ्या नायकामध्यें अग्निमित्र कनिष्ठ आणि त्याचा विदूषक गौतम मात्र सस्कृत साहित्यातील साऱ्याच विदूषकांमध्यें श्रेष्ठ आहे अग्निमित्राला एकीकडे मत्रिपरिषदेचा वचक वाटत होता, तर दुसरीकडे त्याच्या अतःपुरात धारिणी राणीचा अप्रतिहत अधिकार चालत होता. धारिणीचा वर्णावर भ्राता वीरसेन हा अग्निमित्राचा सेनापति आणि धारिणीचा पुत्र वसुमित्र हा प्रत्यक्ष पुष्पमित्र सेनापतीचा सेनापति. राजाच्या कामजीवनात या प्रौढ राणीला स्थानच उरलें नव्हतें. त्यामुळें पडिता कौशिकीसह धारिणी राणी येत असलेली पाहून अग्निमित्र कुत्सितपणें उद्गारतो. ‘ त्रयी विग्रहवत्येत्र सममध्यात्मविद्यया । ’ ही विग्रहवती त्रयी महाराजाचा प्रिय वयस्य जो ‘ अशोक ’ त्याला आपल्या दासीकडून लत्ताप्रहार करविते. ‘ यदि राजकार्येषु ईदृशी निपुणता आर्यपुत्रस्यततः शोभनं भवेत् । ’ असा राजाचा उपहास करावयालाहि धारिणी राणी धजते. या साऱ्या सदर्भांचा सूक्ष्म विचार केल्यानतर अशी कल्पना मनात येते कीं धारिणी राणी आणि मत्री वाहतक याना पुष्पमित्रानें अग्निमित्राचे पालक नेमले होते कीं काय ? याकरिताच पुष्पमित्रानें अग्निमित्राला मनातील राग विसरून ( विगतरोषचेतसा ) अश्वमेधाला येण्याचें आमत्रण पाठविलें आहे कीं काय ? असो.

## विदूषक गौतम आणि ग्रीक दास

या प्रश्नाची चर्चा इथेंच स्थगित करून आता गौतमचरित्राकडे वळलें पाहिजे. कारण प्रो. झाला यानीं म्हटलें आहे. ‘ As a Lover Agnimitra shows no initiative; he is abjectly dependent on his friend the Vidushhaka. The vidushhaka is in fact the soul of the drama. intelligent, shrewd, resourceful..he carries the entire plot of the drama on his broad shoulders. ’ राजकारणात नसली तरी प्रेमकारणात राजा निपुणता व्यक्त करतो, अशी धारिणी राणीची समजूत होती. पण

....१४

तिची तरुण सपत्नी इरावती हिला राजाचे प्रेमकारण अधिक कळत असल्यानें ती गौतमाला राजाचा कामतन्त्रसचिव म्हणते. अग्निमित्र हा अगदींच सचिवायत्तासिद्धि राजा असल्यानें प्रेमकारणातहि तो आपण होऊन कोणतेंहि पाऊल टाकीत नाहीं. मालविकेची प्राप्ति करून घेण्याकरिता तो सर्वस्वीं गौतमावर विसंबून राहतो. अग्निमित्राप्रमाणेंच मिनांडरच्या अनेक सुखान्त ग्रीक नाटकातील नायक नायिकेचा अभिलाष तेवढा करीत. त्यानंतर त्याचें नायिकेशीं मीलन घडवून आणण्याचें काम त्याच्या दासाचें असे. हे दास गौतमाप्रमाणेंच बुद्धिमान्, धूर्त, कारस्थानकुशल, धन्याशीं एकनिष्ठ, प्रत्युत्पन्नमति असून नाटकाचें सारें सविधानक त्याच्या कर्तृत्वावरच अवलंबून असे. गौतमाचें गुणगायन करणाऱ्या आमच्या संस्कृतच्या आचार्यांच्या ही साधी गोष्ट लक्षांत येत नाहीं कीं मिनांडरच्या ग्रीकवरून रूपांतरित केलेल्या प्लाउट्स् आणि टेरेन्स याच्या लाटिन नाटकातून गौतमाशीं अतिशय सदृश अशीं पात्रें पदोपदीं भेटतात. सामान्यतः संस्कृत नाटकातून विदूषक अप्रबुद्ध असून त्याच्या अप्रबुद्धपणामुळें विनोद निर्माण होतो. पण भासाचा संतुष्ट, शूद्रकाचा मैत्रेय, कालिदासाच्या पुढच्या दोन नाटकातील माणवक आणि माढव्य याच्या पंक्तींत गौतमाला बसविणें अगदीं अशक्य आहे. गौतम हा ग्रीक नाटकातील विनोदी आणि कारस्थानी दासाप्रमाणें उत्तरप्रत्युत्तरात अत्यंत चतुर आणि कोणत्याहि परिस्थितींत अतिशय कारस्थानकुशल असा आहे. ग्रीक नाटकातील दासासंबधीं विवेचन करताना रे. ल्यूकस कोलिन्स यानीं म्हटलें आहे. ‘ It is very remarkable how in Greek comedy the slave supplies not only the broad comic element, but also the wit of the dialogue and the fertility of expedient which make the interest of the drama.. In witty repartee and often in practical wisdom they are represented as far superior to their masters. The witty slave occupied a position in Hellenic households somewhat akin to the king's jester in later times.’ म्हणजे ‘ ग्रीक नाटकातून संभाषणचातुर्य आणि अनपेक्षित आपत्तींवर उपाययोजना करण्याचें कौशल्य पुरविण्याचें काम दासांच्याकडे सोंपविलेलें असे. या नाटकातील दास कोटिक्रमाच्या आणि व्यवहारचातुर्याच्या दृष्टीनें त्याच्या धन्यांपेक्षां फार श्रेष्ठ दाखविले आहेत. राजसभेंतील विदूषकाना मध्ययुगीन काळात जें महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें, तेंच स्थान प्राचीन ग्रीक नाटकातील दासांना लाभलें होतें. ’ या अवतरणात रे. ल्यूकस कोलिन्स

यानीं मोठ्या मार्मिकपणानें प्राचीन ग्रीक नाटकातील दासाचें पुढें मध्ययुगीन राजसभेंतील विदूषकात रूपांतर झालें असावें, अशी जी कल्पना केली आहे, ती वस्तुस्थितीला अनुसरूनच असल्याचें कालिदासाच्या गौतमावरून पूर्वींच सिद्ध होऊन गेलें आहे. पण ग्रीक नाटकाच्या अनुकरणानें निर्मिलेल्या गौतमासारखा जवळ जवळ नायकपदवीवरच अधिकार सागणारा विदूषक कालिदासकालीन राजसभेंत खपण्याजोगा नसल्यानें कवीला पुढील नाटकातून माणवकमाढव्यासारखे मूर्ख विदूषक निर्माण करावे लागले.

## गौतमाची योग्यता

अग्निमित्र गौतमाला प्रज्ञाचक्षु म्हणतो, इरावती राणी कामतंत्रसचिव म्हणते आणि एकटी धारिणी राणी मात्र ' ननु गौतमवचनम् अपि आर्यो हृदये करोति ' असा आश्चर्यानें प्रश्न करते. गौतमाची योग्यता न ओळखल्यामुळेंच अग्निमित्राच्या अंतःपुरात धारिणी राणीची प्रतारणा होत आली असली पाहिजे. नायकाचा पिता किंवा पालक याच्या नेत्रात धूळ टाकणें हें मिनाडरच्या नाटकातील दासाचें नेहमीचें कर्तव्यच असे. मालविकाग्निमित्रात धारिणीराणी ही एकप्रकारें अग्निमित्राच्या पालकाचेंच कर्तव्य पार पाडीत असल्यानें गौतमाकडून प्रवचना करून घेण्याची भूमिकाहि तिला करावी लागते. मिनाडरच्या नाटकातील अनेक नायकाचें अंतःकरण दास्यात अडकलेल्या स्त्रियानीं आकृष्ट केलें असल्यानें त्याचे दास वर्गभावनेनेंहि दासी नायिकेचें आपल्या धन्याशीं मीलन घडवून आणण्याच्या उपक्रमात उत्साहानें भाग घेत. ग्रीक नाटकातील दासाच्या आदर्शाला अनुसरून मालविका दासीशीं अग्निमित्राचें मीलन घडवून आणण्याच्या उद्योगात कालिदासाचा गौतम दग झालेला असतो. नाटकाच्या अतीं दासी नायिकेचें कुलकामिनींत रूपातर होणेंहि ग्रीक नाटकाच्या सप्रदायाला अनुसरूनच आहे. आगाऊ ग्रीक दासाप्रमाणें गौतमहि आपल्या धन्याला त्याच्या कर्तत्वशून्यतेची प्रसगविशेषीं जाणीव करून द्यावयाला चुकत नाहीं. ' दरिद्र इव आतुरो वैद्येन ओषध दीयमानमिच्छसि । ' ' भिकारी रोग्याप्रमाणें वैद्यानें आपल्याला औषध आणून द्यावें, अशी इच्छा करतो आहेस । ' अशा कर्तृत्ववान् गौतमालाहि कवीनें दिवानिद्रेंतील बरळण्यात गौप्यस्फोट करावयाला लावून हास्यास्पद केलें आहे. ही गोष्ट गौतमाच्या कर्तृत्वाशीं विसंगत असली तरी कालिदासानें स्वतःपुढें ठेविलेल्या ग्रीक आदर्शाशीं सुसगतच आहे. कारण ग्रीकवरून रूपातरित केलेल्या लाटिन नाटकातील अत्यंत धूर्त दासहि मद्यपानाच्या धुंदींत बरळून

असाच गौप्यस्फोट करीत असतात. गौतमचरित्रातील हा प्रसग रगविताना सस्कृत कवीनें त्याचेंच अनुकरण केलें आहे. नागपूरचे महामहोपाध्याय समजतात, त्याप्रमाणें भासाचें नव्हे. मालविकाग्निमित्रातील पडिता कौशिकी ही पुढें भवभूतीच्या मालतीमाधवात कामदकीच्या रूपानें अवतीर्ण झाली असली तरी गौतमाला त्यानें आपल्या नाटकात स्थान दिलें नाहीं. यावरूनहि गौतमाचें पात्र भारतीय रग-भूमीशीं किती विसगत होतें, याची कल्पना येईल.

## अशोकाचा कौशिकगोत्री मंत्री

इथें थोडें विषयातर करूनहि ही गोष्ट सागितली पाहिजे कीं पडिता कौशिकीचें पात्र अशोक राजाच्या विश्वासातील एका कौशिकगोत्री महादेव नामक व्यक्तीच्या चरित्राशीं अतिशय सदृश दिसतें. या महादेवासंबधीं बरीच माहिती कलकत्याच्या इडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली या नामाकित त्रैमासिकाच्या, बुद्धाच्या सार्धद्विसहस्राब्दीच्या निमित्तानें काढलेल्या अकात लामोत्त नावाच्या फ्रेंच विद्वानानीं सकलित केली आहे त्या लेखावरून असें कळून येतें कीं हा महादेव कौशिक गोत्री असून त्यानें कोणा गुरूकडून सन्यास घेतला नसून पडिता कौशिकीप्रमाणेंच स्वतःच्या हातानें प्रव्रज्या घेतली होती. अशोकाच्या राणीवर त्याचें इतकें वजन होतें कीं त्याचा तिच्याशीं अनैतिक सबध असल्याच्या आख्यायिका बौद्ध लेखकांनींच चिरतन केल्या आहेत अशोकाच्या काळीं पाटलीपुत्रातील अर्हत् पदाला पोंचलेले भिक्षु आणि इतर भिक्षु याच्यात निकराचीं भांडणें चालू झालीं असता तीं भाडणें तोडण्याचे काम राजाने महादेवाकडेच सोपाविलें होतें. तेव्हा राणीच्या सूचनेवरून स्वतःला अर्हत् म्हणविणाऱ्या सार्‍या भिक्षूना फुटक्या नौकेंत बसवून गगा नदींत सोडून दिलें असता ते पक्षिरूप धारण करून काश्मीरला उडून गेले, अशी आख्यायिका आहे. या महादेवानेंच अशोकाचा पुत्र महेंद्र याला दीक्षा देऊन लकेकडे धाडलें. पण तिथें जाण्यापूर्वी तो काहीं काळ विदिशा नगरीशेजारच्या गिरीवर येऊन राहिला होता स्वतः महादेवाचेहि शेवटचे दिवस माहिष्मतीच्या आसमतात गेले, त्यामुळे आणि त्याचा शिष्यगणहि मोठ्या प्रमाणावर महाराष्ट्रीय असल्यानें आकरअवतीच्या प्रातातून त्याची कीर्ति सर्वत्र पसरली होती. या महादेवाच्या चरित्रावरून कालिदासाला पडिता कौशिकीचें पात्र सुचलें आहे कीं काय अशी शका येते. अशोकाच्या एका मत्र्याचें नाव महादेवच होतें. बहुधा वर उल्लेखिलेला भिक्षु महादेव हे आणि मंत्रिमहादेव अभिन्नच असावेत. या अभिन्नतेमुळेंच कालिदासानें

पंडिता कौशिकीला सुमतिमत्र्याची भगिनी बनविलें आहे कीं काय ? कौशिकगोत्र, स्वतःच्या हातानें घेतलेली प्रव्रज्या, राणीवरील वजन आणि पांडित्यकलहाचा निर्णय करण्याचा राजाकडून मिळालेला अधिकार या सर्व गोष्टी मंत्रि महादेव आणि पंडिता कौशिकी यांना समान असल्यानें अग्निमित्राच्या राजसभेंतील पंडिता कौशिकीला अशोकाच्या राजसभेंतील पंडित, परिव्राजक आणि मंत्रि कौशिकगोत्री महादेवाची असमकालीन भगिनी मानणें अयुक्त होणार नाहीं. या महादेवाच्या चरित्रासंबधीं इतर अनेक अभद्र कथा बौद्धांच्या धर्मग्रंथांतून आढळतात पण त्यांचा इथें विचार करण्याचें कारण नाहीं. इथे इतकेंच सांगितलें म्हणजे पुरें कीं पाटलीपुत्रांतील भ्रष्ट भिक्षूंचा कुक्कुटाराम विहार पुष्यमित्रानें नष्ट न करण्याला कौशिकगोत्री महादेवाचा प्रभाव कारणीभूत झाला असेल कारण शुंगाच्या दोन गोत्रांत कौशिक गोत्र आहेच. या गोत्राच्या प्रभावानेंच कौशिकीचा अग्निमित्राच्या अंतःपुरांत प्रवेश झाला असावा.

## ऐतिहासिक विषयांतर

कालिदासानें मालविकाग्निमित्र नाटक लिहिलें, तेव्हां शुंगाचें सार्वभौम राज्य नष्ट झालें असले तरी पुष्यमित्राच्या वंशजाचीं मथुरा, पांचाल, अयोध्या आणि कदाचित् विदिशा येथील राज्यें अस्तित्वांत होतीं. या शुंगापैकीं एखाद्या शुंगाला तेव्हां पुष्यमित्राप्रमाणें दिग्विजय करण्याचीं स्वप्नें पडत असतील आणि त्याला उत्तेजन देण्याकरिता कालिदासानें मालविकाग्निमित्र नाटक लिहिलें असेल. पण ज्यावेळीं शुंगवीर कालिदासाच्या नाटकांतून आपल्या घराण्यानें यवनावर मिळविलेल्या विजयाचा पुनःप्रत्यय घेत होते, त्याच वेळीं शुंग आणि यवन यांना शक हे समानशत्रू निर्माण झाले आणि त्यानीं निःपक्षपातीपणानें उभयतांचींहि राज्यें व्यापण्याचा उपक्रम आरंभिला. प्रो. टार्न आणि ॲलन यांच्या ग्रंथावरून असें समजून येतें कीं खि. पू. ८० च्या सुमाराला शकानीं सिंध आणि सौराष्ट्र या प्रांतात प्रवेश करून तेथें आपलें राज्य स्थापलें. मग तेथून त्यानीं सिंधु नदींतून जलमार्गानेंच वर जाऊन खि. पू. ७७ च्या सुमाराला तक्षशिला आणि ७० च्या सुमाराला गांधार हे प्रांत हस्तगत केले. पुढें दहा वर्षांनीं त्यानीं काबूल घेतलें. याचवेळीं शकाधिपति मौएस् मध्यभारतांत उज्जयिनी (६२) आणि मथुरा (६०) घेण्यांत गुंतला होता. पण खि. पू. ५८ च्या सुमाराला विक्रमानें मौएस्ला मारून उज्जयिनीची मुक्तता केली आणि 'पारसीकास्ततो जेतु प्रतस्थे स्थलवर्त्मना।' या वचनांत कालिदासानें

सांगितल्याप्रमाणें ग्रीकांच्या प्रांतांतून शक पारसीकांना घालवून देण्याकरितां स्थल-मार्गानें पंजाबात आपली सेना नेली. याच प्रसंगाला अनुलक्षून 'यवनीमुखपद्मानां सेहे मधुमद न सः।' असें कालिदासानें वर्णन केलें आहे या प्रसंगीं विक्रमाच्या सैन्यानें ग्रीकांच्या राज्यात प्रवेश केला असला तरी त्याची लढाई पारसीकांशींच झाली. 'भल्लापवर्जितैस्तेषां शिरोभिः श्मश्रुलैर्महीम्। तस्तार सरघाव्याप्तैः स क्षौद्र-पटलैरिव॥' या श्लोकातील वर्णन इराणी शकानाच अक्षरशः लागू पडतें. असो, या वेळीं ग्रीकानीं सिंधु नदीवरील जलयुद्धात शकांचा पराजय केला, असें ॲलनच्या ग्रंथातील ग्रीक नाण्यावरून समजतें आणि विक्रमानें त्याचा भूमियुद्धात कांटा काढला, असे कालिदासाच्या रघुदिग्विजयावरून समजतें. अशा प्रकारें विक्रमाचा उदय होण्यापूर्वी शुंगांचें मथुरेंतील राज्य शकानीं बुडविलें होते आणि विदिशेंतील राज्यहि त्यापूर्वींच विलयाला गेलें असावें. त्यामुळें एकंदरीनेंच समकालीन पिढींतील शुंगांच्या नाकर्तेपणाचा कालिदासाला वीट आला असावा, म्हणून त्यानें नवोदित अवंति नाथाचा आश्रय स्वीकारला आणि ग्रीकांशीं सहकार्य करून शकांना जिंकणाऱ्या विक्रम राजाच्या चरित्रावर विक्रमोर्वशीय हें नाटक लिहिलें. हें ऐतिहासिक विषयांतर संपवून आता विक्रमोर्वशीयाचा विचार करू.

## खादाड विदूषक

सुखान्त ग्रीक नाटकांतून धूर्त दासांव्यतिरिक्त इतरहि अनेक विनोदविषय होणारीं पात्रें असत. असल्या प्रकारचें एक प्रमुख पात्र म्हणजे परदेशातून धन मिळवून आलेले आणि आत्मश्लाघेचें व्यसन जडलेले सेवानिवृत्त सेनाधिकारी. भारतात धनार्जन करून स्वदेशीं परतलेल्या इंग्रज 'नबाबां'चा गेल्या शतकातील थॅकरेप्रभृति इंग्रज कादंबरीकारांनीं वरील ग्रीक पात्राप्रमाणेंच उपयोग केला आहे. सुदैवानें लक्ष्मीपति बनलेले हे सेनाधिकारी आपल्या पराक्रमाच्या बढाया मारून स्वतःला समाजात हास्यास्पद करून घेत आणि मग आपल्या बढाया ऐकण्याकरितां त्यांना आश्रित जवळ करावे लागत. त्यांच्या आश्रितांपैकीं कांहीं जण आपल्या भाषणानीं धन्याचें आणि त्याच्या पाहुण्यांचेंहि मनोरंजन करण्याइतके चतुर असत. पण त्यांच्याहून खालच्या प्रतीचे आश्रित हे केवळ दुपारची अडचण दूर करण्या-करितां धन्याला जळवेप्रमाणें चिकटलेले असल्यानें त्यांच्या बुभुक्षितपणाच्या प्रदर्शनानेंच प्रेक्षकांची करमणूक करीत. सदा बुभुक्षित असलेल्या या विदूषकांना मानवाची दुसरी क्षुधा जी कामक्षुधा, ती पुरविण्याकडे लक्ष देता येत नसे. उलटपक्षीं त्यांच्या

धन्याचा जीविकार्जनाचा प्रश्न सुटला असल्यानें 'She should never have looked at me, if she meant I should not love her,' या ब्राउनिंगच्या तत्वाला अनुसरून कोणत्याहि उपलब्ध स्त्रीवर प्रेम करण्याला ते सदासर्वदा सिद्ध असत. अशा प्रसगीं, त्या स्त्रीचें प्रेम तुमच्यावर बसलें आहे असें धन्याला आश्वासन देणें, हें असल्या ग्रीक नाटकातील बुभुक्षित विदूषकाचें एक कर्तव्यच असे. ही पार्श्वभूमि लक्षात घेऊन विक्रमोर्वशीयातील औदरिक विदूषक माणवक, याच्या उद्गाराची चिकित्सा केली म्हणजे हाहि विदूषक कालिदासानें ग्रीक नाटकाच्या आदर्शानुसार निर्मिला असल्याचें उघडकीस येतें. 'दुर्लभ अप्सरेवर आसक्त झालेल्या माझ्या मनाला मी कसा धीर देऊ?' असा राजानें प्रश्न विचारला असता विदूषकानें उत्तर दिलें कीं तू जसें तिला पाहिलें आहेस, तसें तिनें पण तुला पाहिलें आहेच, तेव्हा तुला ती दुर्लभ आहे, असें मला नाहीं वाटत. माणवकानें राजाला हें जें आश्वासन दिलें आहे, तें केवळ बढाईखोर सरदारावरलि ग्रीक नाटकातील आदर्शांना अनुसरून दिलें आहे. कारण माणवक हा गौतमाप्रमाणें त्याच्या राजाचा एकनिष्ठ मित्र नाहीं. या औदरिकाला पक्कान्नें चारून राणीनें वश करून घेतलें असल्यानें तो निपुणिकेच्या द्वारा तिला सदेश पाठवितो कीं उर्वशीच्या नादापासून राजाला परावृत्त करण्याचा मी प्रयत्न करीन. पण या विश्वासघातकी विदूषकाच्या कर्तृत्वाच्या मर्यादा औशीनरी राणीला पुरत्या माहीत असल्यानें 'प्रियानुप्रसादन' व्रताच्या उद्यापनाच्या निमित्तानें ती राजावर रागावण्याच्या आपल्या अधिकारावरच पाणी सोडते. माणवक विदूषकाप्रमाणेंच या नाटकाची नायिका उर्वशीहि ग्रीकनायिकाच्या आदर्शानुसार निर्मिली असल्यानें ती जन्मताच पुत्राला टाकून देते. इथें मेनकेचा दाखला चालावयाचा नाहीं. कारण मेनका पत्नी नव्हती. पण उर्वशी पत्नी झाली होती.

## उर्वशी कीं दाफ्ने

औशीनरी राणीनें राजावर रागावण्याच्या अधिकारावर पाणी सोडल्यानंतर तो अधिकार उर्वशीला प्राप्त झाला आणि त्या अधिकाराची बजावणी करण्याकरिता रुसून कुमारवनात शिरलेल्या उर्वशीची लता बनली. उर्वशीचें हें परिवर्तन पाहूनच कालिदासाला ग्रीक सस्कृतीचा चागलाच परिचय असल्याची मला प्रथम जाणीव झाली. कारण महाभारत हरिवंशातील उर्वशीच्या आख्यानात ती लता बनल्याचा कुठेंच उल्लेख नाहीं. इतकेंच नव्हे तर आरण्यक आणि गदापर्वातील कुमाराच्या

आख्यानातून कुमारवनात प्रवेश करतील त्या स्त्रिया लता बनतील, असा त्यानें शाप दिल्याचा कोठेंहि उल्लेख नाहीं. तेव्हां उर्वशीला लता बनवितांना कालिदासानें ग्रीक पुराणातील आपोलो आणि दाफ्ने याच्या सुप्रसिद्ध कथेंतील अंतिम प्रसंगाचा उपयोग करून घेतला आहे, हें उघड आहे. शतपथातील पुरूरवा आणि उर्वशी याच्या आख्यानाची आपोलो आणि दाफ्ने यांच्या आख्यानाशीं तुलना करून मॅक्समुल्लरप्रभृति दैवतशास्त्राच्या अभ्यासकांनीं त्याच्यातील मूलभूत ऐक्य पूर्वींच दाखवून दिलें आहे. हें ऐक्य त्याच्या साहाय्यावाचून समजण्याइतका कालिदास बुद्धिमान् असल्यामुळें आपोलोला विमुख असलेल्या दाफ्नेचें लॉरेल वृक्षात रूपांतर झाल्याच्या कथेचें त्यानें पुरूरवा आणि उर्वशी याच्या स्वदेशी कथेवर कलम केलें आहे. दाफ्नेला आमरण कुमारी रहावयाचें होतें आणि आपल्या कौमार्याचें शेवटपर्यंत प्रतिपालन करण्याचें तिनें पित्याकडून अभिवचनहि मिळविलें होतें. इकडे शिशु मदनाच्या बाणानें विद्ध झालेल्या आपोलोचें मन तिच्यावर बसलें. नेहमीं ती त्याला टाळीत असे पण एके दिवशीं त्याने पाठलाग करून तिला गांठलें. त्या क्षणीं आपोलो दाफ्नेला आलिंगन देत असताना तिच्या पित्यानें प्रार्थनेला पावून तिचें लॉरेल या पुष्पहीन वृक्षात रूपांतर घडवून आणलें. आपोलो आलिंगन देत असताना दाफ्नेचें लॉरेल वृक्षात रूपांतर होत असल्याचीं चित्रेंहि फार प्रसिद्ध आहेत. या आख्यानाचें करुण पर्यवसान कालिदासाला न रुचल्यामुळेंच त्यानें पुरूरव्याच्या तोंडीं पुढील श्लोक घातला आहे. ‘ तन्वी मेघजलार्द्रपल्लवतया धौताधरेवाश्रुभिः । शून्येवाभरणैः स्वकालविरहाद्विश्रातपुष्पोद्गमा ।। चिंता मौनमिवास्थिता मधुलिहा शब्दैर्विना वर्तते । चडी मामवधूय पादपतित जातानुतापेव सा ।। ’

## प्रतिभा–उर्वशीचें परिवर्तन

उर्वशी लता बनल्याच्या आख्यानात ग्रीक पुराणांच्याप्रमाणेंच विक्रमकालीन परिस्थितीचेंहि प्रतिबिंब उमटलें आहे. आपोलोची प्रेमस्पदा दाफ्ने ही त्याला अत्यंत प्रतिकूल असल्याच्या स्मृतीमुळेंच कालिदासाचा पुरूरवा म्हणतो, ‘ अलब्धफलनीरस मम विधाय तस्मिन् जने । समागममनोरथ भवतु पचबाणः कृती ।। ’ पण कालिदासाला या नाटकात पचबाणाचें असलें कृतित्वच दाखवावयाचें नसून समकालीन इतिहासाचें प्रतिबिंबहि दाखवावयाचें होतें. त्याचा आश्रयदाता जो विक्रम राजा, त्याच्या डोळ्यादेखतच सूर्यपूजक शकांनीं उज्जयिनी–उर्वशीला आलिं-

गन दिल्यामुळें अल्पावधींतच तिचें अरण्यांत रूपांतर झाल्याचें दारुण दृश्य अवतीच्या साऱ्या पौरजानपदांनीं पाहिलें होतें, तसेंच दुष्यंत आणि राम याच्याप्रमाणे पत्नी-त्यागाला प्रवृत्त न झाल्याबद्दल विक्रमपिता दर्पण अथवा महेंद्रादित्य याला झिडकारून उज्जयिनींतील उद्यानलतांचें वनलतामध्यें परिवर्तन घडवून आणल्याचा तीव्र पश्चात्तापहि तेथील प्रजेनें अनुभविला होता. या अनुभवाला अनुलक्षूनहि लता बनलेल्या उर्वशीला पाहून पुरूरवा म्हणतो. 'चडी मामवधूय पादपतित जातानुतापेव सा।' मी हातापाया पडलों असताना ज्या कोपिष्ट चडिकेनें मला झिडकारलें, तिला आता आपल्या कृतीचा अनुताप झालेला दिसतो. उज्जयिनीच्या जनमानस-मंदिरात अशी क्रांति घडून आल्यानतरच दर्पणपुत्र विक्रमाला तिचा उद्धार सुकर झाला. या साऱ्या घटना कालिदासाच्या प्रेक्षकाच्या मनश्चक्षूसमोर मूर्तिमत उभ्या असल्यामुळेंच विक्रमोर्वशीयाच्या चौथ्या अंकातील पुरूरव्याच्या उन्मादाची परिसमाप्ति कुमारवनातील लतेचें उर्वशींत परिवर्तन घडवून आणल्यानतर केली असून या अनुसंधानाच्या अनुरोधानेंहि त्या नाटकाच्या परिसमाप्तीच्या क्षणीं भावी भीषण संग्रामाला सिद्ध राहण्याची उज्जयिनीच्या नागरिकाना गंभीर सूचना दिली आहे. पित्याच्या निधनानंतर विक्रमाला त्याच्या सिंहासनावर अभिषेक न झाल्यानें तो कुमारच राहून गेला होता आणि शकानीं उध्वस्त केलेला अवती देश हें त्याचें कुमारवनच बनलें असेल. असा. कै. खाडिलकराच्या कीचकवधासारख्या रूपकात्मक नाटकाचा परिचय असलेल्या महाराष्ट्रीय वाचकाना विक्रमोर्वशीयातील रूपक उकलून सागण्याची तादृश आवश्यकता नाहीं. पण कालिदासाच्या प्रतिभा—उर्वशीचें गुप्ताच्या उद्यानलतेंत परिवर्तन घडवून आणण्याचें श्रेय अधिकारी विद्वानांनीं आधींच सपादिलें असल्यानें असल्या बालबोध गोष्टींचाहि आतां उलगडा करावा लागतो.

## कुमारवन कीं कुमारीवन

कालिदासानें विक्रमोर्वशीयात कैलास आणि गधमादन याच्या आसपास कुमारवन असल्याचा उल्लेख केला आहे आणि मेघसदेशात कैलासाला लागून असलेल्या अलकानगरीसंनिध वैभ्राज वनाचा निर्देश केला आहे. विभ्राज नांवाच्या भोगलोलुप राजानें वैराग्यप्राप्तीनतर कैलाससंनिध ज्या वनात कठोर तप केलें, त्या वनाला वैभ्राजवन ही सज्ञा लाभल्याची कथा हरिवंशातील श्राद्धकल्पात आली आहे. 'चैत्ररथस्य नामांतरमेतत्' असें मल्लिनाथानें त्या

वनासबंधीं लिहिलें असलें तरी ती त्या महापंडिताची चूक असून ' एको ययौ च्चैत्ररथप्रदेशान् ' या चरणात कालिदासानें उल्लेखिलेला प्रदेश चित्रळ आहे. याप्रमाणें वैभ्राज वनाचा आणि चैत्ररथ प्रदेशाचा शोध लागत असला तरी कैलास आणि गंधमादन याच्या आसपास कोठें कुमारवनाचा शोध लागत नाहीं. भौगोलिक कोशकर्ते श्री. नंदलाल दे यानीं कूर्मांचलालाच कुमारवन ही संज्ञा असल्याचे स्कंदपुराणाच्या आधारानें सांगितलें असलें तरी हा कूर्मांचल कुमाऊन प्रांत असून त्याचा कैलासगंधमादनाशीं काहीं संबंध येत नाहीं. उलटपक्षीं अथेन्सची देवता आथेने ही कुमारी देवता असल्यानें त्या नगरीसन्निध एक कुमारीवन मात्र होतें त्या वनात पुरुषाना प्रवेश निषिद्ध होता, इतकेंच नव्हें तर तो गंभीर स्वरूपाचा सार्वजनिक अपराध मानला जात असे, असें सोफोक्लीजच्या oedipus at colonus या नाटकावरून समजतें. या नाटकातील कुमारीवनावरूनच कालिदासाला त्याची कुमारवनाची कल्पना सुचलेली दिसते. कारण विक्रमोर्वशीयाच्या पहिल्या अंकाची सारीच रूपरेषा कवीनें सोफोक्लीजच्या वर उल्लेखिलेल्या नाटकावरून घेतलेली आहे.

## उर्वशीहरणाचा प्रवेश

' कोलोनुस्ला आलेला युडिपुस् ' या नाटकात अथेन्सच्या आश्रयाला आलेल्या युडिपुस् राजाच्या दोघी मुलींना पळवून नेण्याची आज्ञा आपल्या सैनिकाना देऊन थीब्सचा राजा क्रेओन् हा त्याच्या अंध पित्याशीं भांडत असताना अथेन्सच्या नारींचा आक्रोश ऐकून त्या नगरीचा राजा थेसेउस् वरुणाची उपासना अर्धवट सोडून धावत रंगभूमीवर येऊन उद्गारतो ' What is this alarm ? I heard your shouts of terror at the altar of sacrifice where I was performing my solemn service to the god of the sea. ' म्हणजे ' हा आरडाओरडा कशासाठीं चालला आहे ! यज्ञवेदीपाशीं वरुणाची उपासना करीत असताना मला तुमच्या भयभीत आरोळ्या ऐकू आल्या. ' ( म्हणून मी उपासना अर्ध्यावर सोडून उठून आलों. ) या अथेन्सच्या राजाप्रमाणेंच कालिदासाचा पुरूरवाहि रंगभूमीवर येताच उर्वशीच्या मैत्रिणींना आरडाओरडा थांबविण्याची आज्ञा करतो. ' अलम् अलम् आक्रंदितेन । सूर्योपस्थानात् प्रतिनिवृत्तं पुरूरवसं माम् उपेत्य कथ्यताम् कुतो भवत्य: परित्रातव्या: इति । पुरूरव्याच्या या पहिल्या भाषणातील ' सूर्योपस्थानात् प्रतिनिवृत्तम् ' या

वचनाचा नेमका अर्थ काय याचा टीकाकाराना प्रश्नच पडला आहे. कै. शंकर पांडुरंग पंडित यांनीं म्हटलें आहे कीं हें सूर्योपस्थान काय होतें आणि कशाकरितां केलें होतें, हें संदर्भावरून समजत नाहीं. एखाद्या देवदर्शनाला जाण्याच्या संदर्भात कालिदास उपस्थान शब्द वापरतो. रघुवंशात 'पुरा शुक्रमुपस्थाय तवोर्वीं प्रतियास्यतः' या वचनात त्या अर्थानें हा शब्द वापरला आहे. 'कालिदासकालीन भारत' या इंग्रजी ग्रंथाचे लेखक श्री. भगवत्‌शरण उपाध्याय याना तर त्या शब्दावरून गुप्तकालीन सूर्यमंदिराचा बोध झाला आहे. पण विक्रमोर्वशीयाच्या प्रारंभींच आलेल्या या उद्गाराचा अर्थ, सोफोक्लीजच्या नाटकाच्या संदर्भानें लावला म्हणजे राजवाड्यातील सूर्यमंदिरात राजा प्रातःसंध्या करीत असताना उर्वशीच्या सख्याचा आक्रोश ऐकून धावून आला, असा बोध होतो. 'सूर्याचंद्रमसौ यस्य मातामहपितामहौ।' अशा पुरूरव्याच्या वाड्यात उदेपूरच्या राजवाड्याप्रमाणेंच नित्य उपासनेसाठीं एक सूर्यमंदिर असणें अगदीं स्वाभाविक आहे. सायंसंध्येच्या काहीं भागाला वरुणोपस्थान म्हणतात, यावरूनहि पुरूरव्याचें प्रभातसमयींचें सूर्योपस्थान म्हणजे प्रातःसंध्याच असल्याचें कळून येतें. अथेन्सचा थेसेउस् हा वरुणपुत्र असल्याने तो सकाळीं उठून पोसेइदोन या ग्रीक वरुणाची उपासना करीत होता. अशा उपासनेच्या क्षणीं कोणींहि एखादी इच्छा प्रदर्शित केली तर ती पूर्ण करावी, असा धर्मनिष्ठ लोकात संकेत असतो. थेसेउस् रंगभूमीवर आल्यानंतर लौकरच तो क्रेओन् राजाला अटक करतो आणि त्याचे ठग राजकन्याना घेऊन ज्या दिशेला गेले, ती दिशा दाखविण्याची आज्ञा करतो पण कालिदासानें केशी दैत्याला रंगभूमीवर आणला नसल्यानें पुरूरवा उर्वशीच्या सख्यांना विचारतो, 'अपि ज्ञायते कतमेन दिग्भागेन गतः स जाल्मः।' म्हणजे 'तो ठग कोणत्या दिशेनें गेला हें माहीत आहे का?' (रघुवंशाच्या चौथ्या सर्गात ज्या श्मश्रुल पारसीकाशीं रघूची लढाई होते, त्यानाच विक्रमोर्वशीयात कालिदासानें केशिन् ही संज्ञा दिली आहे. हेच विक्रमपित्यावर आक्रमण करणारे शक.) थेसेउस् आणि पुरूरवा हे राजे नारीहरण करणाऱ्याच्या पाठलागाला गेले असता अथेन्सच्या रमणींची आणि उर्वशीच्या सख्याची सचिंत अवस्था झाल्याचें कवींनीं वर्णन केलें असून दोघेहि राजे पळवून नेलेल्या राजकन्याना अथवा अप्सराना मुक्त करून घेऊन आले असता ग्रीक आणि संस्कृत नाटकातून त्यांचें एकाच पद्धतीनें स्वागत होतें. ग्रीक नाटकात सुटून आलेल्या राजकन्यांना त्याचा पिता प्रथम प्रेमपूर्वक आलिंगन देतो आणि नंतरच थेसेउस्‌चे आभार मानण्याचा प्रयत्न करीत

असताना अथेन्सचा राजा संकोचानें हें आभारप्रदर्शन मध्येंच थांबवितो. संस्कृत नाटकात शुद्धीवर आलेली उर्वशी आपल्या मुक्ततेनिमित्त राजाचे आभार न मानतां आधीं सख्याची चौकशी करते. त्या भेटल्यानंतर त्याना सांगते कीं 'सख्यः आधिक परिष्वजथ।' आणि राजाचे यथाविधि आभार मानण्याचे काम चित्ररथाच्या आगमनापर्यंत तसेंच राहून जातें. चित्ररथानें राजाची स्तुति केली असतां हा सारा महेंद्राचाच प्रभाव असल्याचें सांगून राजा त्या स्तुतीच्या ऋणातून मुक्त होतो आणि चित्ररथहि 'अनुत्सेकः खलुविक्रमालंकारः' असा शोध लावून त्या स्तुतींत भर घालतो. विक्रमोर्वशीयाच्या पहिल्या अंकाची कोलोनुसला आलेला युडिपुस् या ग्रीक नाटकाच्या प्रारंभाच्या भागाशीं तुलना केली असता मूळ ग्रीक नाटकाचें भावहरण करून आणि उर्वशीहरणाच्या चित्रणात अनावश्यक असलेले सारे प्रसंग गाळून कालिदासाने किती कुशलतेनें आपल्या अंकाची रचना केली आहे, हें अनपेक्षित रहस्य उघडकीस येतें.

## ॲस्पेशिया कीं उर्वशी

विक्रमोर्वशीयातील उर्वशीहरण आणि तिची मुक्तता यांची रूपरेषा कवीनें सोफोक्लीजच्या वर उल्लेखिलेल्या नाटकावरून घेतली असली तरी पुढच्या अंकातील पुरूरवा आणि उर्वशी यांच्या प्रणयवर्णनात त्यानें अथेन्सचा प्रसिद्ध पुढारी पेरिक्लीज आणि त्याची प्रेयसी गणिका ॲस्पेशिया यांच्या चरित्राचें अनुकरण केलें आहे. अथेन्सची ॲस्पेशिया गणिका ही केवळ तिच्या रूपाकरिताच नव्हें, तर सौंदर्याचें तत्वज्ञान अथवा सौंदर्यतत्वाची मीमांसाहि तिनें सॉक्रेटिससारख्या अलौकिक पुरुषाला शिकविल्यामुळें त्या नगरीच्या इतिहासात उर्वशीसारखीच प्रसिद्ध आहे. ॲस्पेशिया गणिकेच्या प्रेमपाशांत पेरिक्लीज सापडल्याची कल्पना त्याच्या पत्नीला येताच तिनें आपण होऊन पतीपासून घटस्फोट करून घेऊन त्याच्या प्रणयाचा मार्ग मोकळा करून दिला. या नाट्यपूर्ण प्रसंगाचा आपल्या नाटकांत सदुपयोग करण्याकरिता कालिदासानें उर्वशीच्या मूळ आख्यानांत नसलेली पुरूरव्याची औशीनरी राणी निर्मिली आणि घटस्फोटाचा मार्ग भारतीय परंपरेला अविदित असल्याने तिनें विक्रमोर्वशीयाच्या तिसऱ्या अंकात आपल्या पतीचा प्रणयपंथ निष्कंटक करण्याकरिता पुढील प्रतिज्ञा केली. 'अद्यप्रभृति या स्त्रियमार्यपुत्रः प्रार्थयते, या वा आर्यपुत्रस्य समागमप्रणयिनी तया मया प्रीतिबंधेन वर्तितव्यम् इति।' औशीनरी राणीनें याप्रमाणें प्रेमसंन्यास घेतल्यानंतर उर्वशी उद्गारते 'हला देव्या दत्तो

महाराजः । ततः अस्याः प्रणयवतीव शरीरसंपर्कं गतास्मि । मा खलु मा पुरोभागिनीं समर्थयस्व । ' म्हणजे ' महाराणींनीं स्वतःच माझ्या हातीं सोंपविल्यामुळें मी महाराजाशीं शरीरसंपर्क करीत आहे, एखाद्या गणिकेप्रमाणें मी आपण होऊन आपल्याशीं लगट करीत आहे, असें मानू नका ' तेव्हा पुरूरवा उत्तर देतो. ' देव्या दत्त इति यदि व्यापार गच्छसि शरीरेऽस्मिन् । प्रथम कस्यानुमते चोरितमेतत् त्वया हृदयम् । ' म्हणजे ' आता एक देवीची संमति मिळाल्याचें निमित्त सांगतेस; पण प्रथम माझें हृदय चोरलेंस, तेव्हा कोणाची अनुमति घेतली होतीस ? ' पुरूरवा आणि उर्वशी यांचे हे संवाद पेरिक्लीज आणि ॲस्पेशिया यांच्यावर अथेन्सच्या नाटककारांनीं लिहिलेल्या प्रहसनाचे प्रतिध्वनीच आहेत. ॲस्पेशिया गणिकेच्या सांगण्यावरूनच पेरिक्लीजनें अथेन्सच्या सर्वनाशाला कारणीभूत झालेलें स्पार्टाशीं युद्ध आरंभिलें, असें त्याचे चरित्रकार सांगतात. त्यामुळेंहि विक्रमोर्वशीयाच्या अंतीं कवीनें ' महान् सुरासुरसंगरो भावी । ' अशी आगामी संकटाची सूचना देऊन ठेविली आहे. कालिदासाच्या काळीं उपलब्ध ग्रीक वाङ्मयाचा अत्यल्प अंश आज उपलब्ध आहे, ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे वर एकत्रित केलेल्या सादृश्याचें खरें महत्त्व कळून येईल 'There is much charm in this dramatic tale and certain scenes are brilliantly designed.' असा या नाटकासंबंधीं विश्वनाट्य या ग्रंथाचे कर्ते प्रो. आल्लारडाइस निकोल यांचा अभिप्राय आहे.

## हरवलेली मुद्रिका मत्स्योदरांत

शाकुंतलकार कालिदासाला कोणत्या तरी मार्गानें ग्रीक वाङ्मयाचा परिचय झाला असावा, अशी शंका प्राचीन भारतीय भूगोलाचे नामांकित तज्ज्ञ श्री. सुरेंद्रनाथ मुजुमदार शास्त्री यांना जवळ जवळ चाळीस वर्षांपूर्वीच आली होती. कारण प्राचीन भूगोलाच्या अध्ययनानिमित्त हिरोडोटस् या आद्य ग्रीक इतिहासकाराचा ग्रंथ चाळताना, पोलुक्रॅटिस् राजाची त्यानें आपण होऊन समुद्रात फेंकून दिलेली मुद्रिका एका धीवरानें भेट म्हणून आणून दिलेल्या माशाच्या उदरांतून त्याला परत मिळाल्याची कथा त्यांना आढळून आली होती. या राजाचा आमासिस् नावाचा एक मित्र राजा होता. त्यानें एकदा मित्रभावानें पोलुक्रॅटिस्ला उपदेश केला, ' तुझ्या प्रत्येक अंगीकृत कार्यांत तुला आजपर्यंत यशच लाभत आलें आहे. अपयश आणि हानि यांचा तुला कधीं अनुभवहि आलेला नाहीं. पण अशा प्रकारें सतत यशस्वी होणें किंवा सुदैवी दिसणें हे कांहीं अतीं शुभदायक

ठरणार नाहीं. कारण त्यामुळें देवाना आपला मत्सर वाटतो आणि ते आपला घात करण्याला प्रवृत्त होतात. याकरिता तू तुला सर्वांत प्रिय असलेली वस्तु त्याना अर्पण कर. या निमित्तानें आपण अल्प प्रमाणात आत्मनाश करून घेतला म्हणजे देवाच्या मत्सरानें होणाऱ्या सर्वनाशापासून आपलें सरक्षण होतें. ' आमासिस्चा हा उपदेश ग्रीक विचारसरणीला अनुसरूनच असल्यामुळें एके दिवशीं भूमध्य समुद्रात नौकाविहार करीत असताना पोलुक्रॅटिस् राजानें आपले सारे मत्री आणि सामत याच्या समक्ष आपली अमूल्य मुद्रिका सागरार्पण केली. तरीसुद्धा ती वर उल्लेखिल्याप्रमाणें त्याला परत मिळाली. तेव्हा राजानें कपाळावर हात मारून घेतला आणि हा सारा इतिहास सुवर्णाक्षरानीं लिहून ठेवण्याची लेखकाला आज्ञा केली. ही सारी कथा बिहार-ओरिसा प्राच्यविद्या सस्थेच्या मुखपत्रात उद्धृत करून, कालिदासाला यवनीमुखपद्माचा आस्वाद घेताना ती परिचित झाली होती कीं काय, याचा अधिकारी तज्ज्ञानीं विचार करावा, अशी विनम्र सूचना त्या भूगोल तज्ज्ञानीं केली होती. ( खड सात, पान १७ ) पण स्वतःला कालिदास ग्रथावलीचे चिकित्सक म्हणविणाऱ्या विद्वानाना वाङ्मयनिर्मितीचा बहुतकरून अनुभव नसतो. वाङ्मयाची जातिवत अभिरुचिहि नसते आणि ग्रीकसारख्या परभाषातील अतिश्रेष्ठ वाङ्मयाचा त्यांनीं नुसता परिचयहि करून घेतलेला नसतो. तरीसुद्धा जातिवत सशोधकाच्या लेखावर आपलें अज्ञान प्रदर्शित करणारे अभिप्राय व्यक्त करण्याचा त्याना कधीं सकोचहि वाटत नाहीं. यामुळें श्री. सुरेंद्रनाथ मुजुमदार शास्त्री यानीं केलेल्या साधार सूचनेची आतापर्यंत उपेक्षा, उपहास आणि विपर्यास यानींच सभावना झाली आहे. त्यानीं दाखवून दिलेल्या सदर्भाचा उपहासपूर्वक उल्लेख करणारे विद्वान् त्याचें नावसुद्धा घेत नाहींत. पण त्यामुळें त्या नामाकित भूगोल तज्ज्ञाना लघुत्व येण्याऐवजीं कालिदासचिकित्सेचा व्यवसाय करणाऱ्याच्या विद्वत्तेचा उथळपणा मात्र व्यक्त होतो. असो.

## मिनांडरचें अनुकरण

हिरोडोटस्च्या इतिहासातील मत्स्योदरातून परत मिळालेल्या अंगठीपेक्षाहि मिनांडरच्या नाटकातील नायकाना त्यांच्या पिशाचविवाहाची आठवण करून देणाऱ्या अगठीचा कालिदासाच्या शाकुतलाशीं अधिक निकटचा संबंध आहे. मिनांडरच्या नाटकांतून त्याच्या नायकानीं उत्सवरजनींची संधि साधून अज्ञात सुंदरींशीं अंधःकारात केलेले बलात्काररूपी पिशाचविवाह आणि असल्या पिशाच-

विवाहाची स्मृति पुनश्च जागृत करणाऱ्या त्याच्या नेमक्या त्याच निशेंत हरवलेल्या मुद्रिका याचा मुक्तहस्तानें उपयोग केलेला आहे. अशा नाटकापैकीं एका नाटकाची नायिका पाफिला ही अशीच धार्मिक उत्सवाच्या निमित्तानें तमिस्र रजनींत सख्या-सह बाहेर गेली असता नायकानें वारुणीच्या धुंदींत तिला ओढून नेऊन तिच्यावर बलात्कार केला होता. पुढें त्या उभयताचा शास्त्रोक्त विवाह झाल्यानतर पाच मासातच तिला मुलगा झाला हा आपल्या पतीचाच पुत्र असल्याचें तिला अविदित असल्याने पिशाचविवाहाच्या रात्रीं काढून घेतलेल्या अगठीसह ती त्या मुलाला नवऱ्याला न कळत चव्हाट्यावर सोडून देते. तरी ती बाळंतीण झाल्याची वार्ता नवऱ्याच्या कानीं जातेच. पण त्याचें पत्नीवर फार प्रेम असल्यानें तिला घरातून घालवून देण्याऐवजीं तो स्वतःच घर सोडून जातो आणि एका गायिकेच्या सगतींत नायिकेला विसरण्याचा प्रयत्न करतो. तरीसुद्धा तो कालिदासाच्या नायकाप्रमाणे विरहानलानें दग्ध होऊ लागतो इकडे त्याची पत्नीहि आपल्या पित्याच्या अत्या-ग्रहाला मान न देता पतिसदनींच त्याची प्रतीक्षा करीत राहून जाते. पुढें योगा-योगानें अगठीच्या खुणेनें तो टाकून दिलेला मुलगा आपलाच पुत्र असल्याचें नायकाला कळून येतें आणि मुलाच्या आईचा शोध केला असता ती अन्य कोणी नसून स्वसदनीं प्रतीक्षा करीत असलेली आपलीच पत्नी असल्याचा त्याला बोध होतो. तेव्हां स्वतः पाप करून पत्नीवर आळ घेतल्याचा त्याला पराकाष्ठेचा पश्चा-त्ताप होतो. मिनाडरच्या या कथानकाचें कालिदासाच्या शाकुंतलाशीं असलेलें सादृश्य अगदीं उघड असल्यानें महाभारतांतील कथेंत कालिदासाने केलेले बदल हे मुख्यतः वर उल्लेखिलेल्या ग्रीक आदर्शांच्या अनुकरणानें केले असल्याचे स्पष्ट होतें. मिना-डरच्या या एपित्रेपोंतेस् नाटकातील नायिकेवरील आक्रमणाच्या प्रसगाला अनुलक्षूनच संस्कृत कवीनें शकुंतलेवर मधुकराकडून आक्रमण करविलें आहे. ‘ हला, परित्रायेथा माम् अनेन दुर्विनीतेन मधुकरेण अभिभूयमानाम् । ’ या शकुंतलेच्या भयार्त उद्गारात, मिनाडरची नायिका पाफिला हिच्यावर अथेन्स नगरींतील उत्सवरजनींत झालेल्या मदाध आक्रमणाचे प्रतिध्वनि ऐकू येतात. हे प्रतिध्वनि वास्तव सृष्टींतील सकटाच्या रूपकात्मक प्रतीकाला अनुलक्षून असल्यानें रम्य वाटत असले तरी कालिदासानें मधुकराच्या आक्रमणाचें जें अतिवास्तव वर्णन केलें आहे, तें पक्षिकोटींतील मधुकरां-पेक्षा मानवी कोटींतील मधुकरानाच अधिक लागू पडतें. ‘ चलापागा दृष्टिं स्पृशसि बहुशो वेपथुमतीम् । रहस्याख्यायीव स्वनसि मृदु कर्णांतिकचरः ।। करौ व्याधुन्वत्याः पिबसि रतिसर्वस्वमधरः । वय तत्वान्वेषान्मधुकर हतास्त्व खलु कृती ।। ’ हे उद्गार

काढणारा दुष्यंत, आपल्या कामनाविषयावर झडप घालण्याच्या संधीची रावणा-प्रमाणें प्रतीक्षा करणाऱ्या कामांध ग्रीक नायकाप्रमाणेंच शकुंतलेच्या आश्रमांत लपून छपून संचार करीत होता, हें विसरतां येत नाहीं. या ग्रीक मधुकरांच्या आक्रमणाचें पर्यवसान नायिकेच्या विटंबनेप्रमाणेंच नायकाच्या अंगुलीयकाचा अंगुलीशीं वियोग होण्यांत होत असल्याच्या स्मृतीमुळेंच कालिदासाच्या नायकानें शकुंतलेला अनृणी करण्याच्या निमित्तानें प्रियंवदेला आपली अंगठी देऊं केली. तेव्हां प्रियंवदेनें प्रसं-गोचित प्रत्युत्तर देऊन ती साभार नाकारली. ‘ नार्हत्येतदंगुलीयकं अंगुलिवियोगम् ।’ ज्या अंगठीच्या प्रभावानें ग्रीक नायिकाची असतीत्वाच्या अपवादापासून मुक्तता व्हावयाची, ती अंगठी वृक्षसेचनाच्या क्षुल्लक ऋणांतून शकुंतलेला मुक्त करण्या-करितां राजानें देऊं केली. याचा अर्थ इतकाच कीं ग्रीक नाटकांच्या तंत्राला अनु-सरून कवीला इथें कोणत्या तरी निमित्तानें अंगुलीयकाचा रंगभूमीवर प्रवेश घडवून आणावयाचा होता. ग्रीक नाटकांतील तंत्रांचा कालिदासानें भारतीय रंगभूमीवर कसा उपयोग केला आहे, याचा अभ्यास केल्यावांचून त्याच्या नाट्यकलेचें वास्तविक स्वरूप व्यक्त होणार नाहीं. ही गोष्ट उघडच आहे कीं ग्रीक नाटकांतील पिशाच-विवाहाच्या कथानकांतून उपयुक्त ठरलेली अंगठीची क्लृप्ति दुष्यंत आणि शकुंतला यांच्या गांधर्वविवाहाच्या आख्यानांत विजातीय आणि विसंगत वाटते. ही विसंगति संवृत करण्याकरितांच कवीला कण्वाश्रमांत दुर्वासाला आणावें लागलें. ‘ स्मरिष्यति त्वां न स बोधितोऽपि सन् । कथां प्रमत्तः प्रथमं कृतामिव ।’ या शापानें दुष्यंत आणि शकुंतला यांचा गांधर्वविवाह ग्रीक नाटकांतील पिशाचविवाहाच्या पातळीवर आणल्यानंतर ‘ अभिज्ञानाभरणेन शापो निवर्तिष्यते ’ असा उःशाप मिळवून या गांधर्वविवाहाच्या आख्यानांत कालिदासानें पिशाचविवाहांतील अभिज्ञानाभरणाची आवश्यकता निर्माण केली आहे. पण ग्रीक नाट्यशास्त्रांतील तेव्हां प्रचलित असलेल्या नियमाप्रमाणें विवाहाची स्मृति जागृत् करण्यापुरताच अभिज्ञानाभरणाचा उपयोग करणें शक्य होतें. कारण वियुक्त व्यक्तींची ओळख पटविण्यासाठीं एकट्या अंगठीलाच वेठीला धरण्याच्या रूढीचा टीकाकारांना इतका वीट आला होता कीं ॲरिस्टॉटलने ओळख पटविण्यासाठीं अंगठीचा उपयोग करणें हें शुद्ध कलाशून्यतेचें लक्षण आहे, असा अभिप्राय व्यक्त केला होता.

इथें असा एक आनुषंगिक प्रश्न उपस्थित होतो कीं तामिस्र उत्सवरजनींत मदांध ग्रीक नायकांनीं केलेल्या पिशाचविवाहाची स्पष्ट स्मृति त्यांना होत नसली तरी केव्हां केव्हां त्याची अस्पष्ट स्मृति तरी त्यांना होत होती कीं नाहीं ? पूर्ण

स्मरण आणि पूर्ण विस्मरण यांच्या सीमारेषेवर ते संचार करीत असल्याचें दृश्य ग्रीक कवींनीं स्वतः पाहिलें होतें कां नाहीं ? आणि पाहिलें असल्यास त्यांच्या नाटकांतून त्याचें प्रदर्शन त्यानीं कधीं केलें होतें का नाहीं ? ग्रीक नाटककारांच्या-पुरतें या प्रश्नाचें उत्तर देता येत नसलें तरी कालिदासानें दुष्यंताला या सीमारेषेवर सचार करतांना दाखविलें आहे. पण तिथें त्याने चालू जन्मातील स्मृतीचा उल्लेख न करतां जननातरातील स्मृतींचा उल्लेख केला आहे. 'रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान् । पर्युत्सुकी भवति यत् सुखितोऽपि जन्तुः ॥ तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम् । भावस्थिराणि जननान्तरसौहृदानि ॥' या श्लोकात कालिदासानें एर्वी तेर्वी जननान्तरसौहृदाचा उल्लेख केला आहेच. त्यामुळें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, संस्कृत साहित्यात दीपशिखा कालिदास म्हणून ओळखला जाणारा हा कवि पूर्वजन्मीं दिवाभीतांची नगरी जी अथेन्स नगरी त्या नगरींतच निवास करीत होता कीं काय ?

## शाकुंतल आणि दुस्कोलोस्

कालिदासानें शाकुतलाचें कथानक बहुतांशीं महाभारतावरून घेतलें असलें तरी त्या कथानकात त्यानें जी भर टाकली आहे, ती ग्रीक नाटकाच्या अनुकरणानें टाकली असावी, असें ठिकठिकाणीं दिसून येतें. महाभारतात शकुंतलेला कण्वानें वाढविली असली तरी त्याच्या परिवारात कोणी वडिलधारी स्त्री असून ती शकुं-तलेची काळजी घेत असे, अशी कल्पना करण्याला कांहींहि आधार नाहीं. शाकुतलातील गौतमी आत्या ही मिनाडरच्या Dyskolos या नाटकातून आमंत्रण करून आणलेली दिसते. 'Knemon is the man who made life intolerable for his wife so that after her daugther was born she went to live with Georgias her son by a former marriage. Knemon lives alone with his daughter and an old woman Simike. His daughter 'Knows no evil' and worships the Nymphs and Pan, who have rewarded her by making a young man about town, son of a rich farmer, fall helplessly in love with her when came here with a huntsman.'

या नाटकातील क्नेमोन हा मानवद्वेष्टा असल्यानें त्याचें एकांत जीवन आणि त्याच्या समवेत वैवाहिक जीवनहि त्याच्या पत्नीला असह्य होऊन आपल्या कन्येच्या

जन्मानंतर ती पतीला टाकून पूर्वपतीपासून झालेल्या पुत्राच्या आश्रयाला जाऊन राहते पुढें क्नेमोन सिमिचे नावाच्या एका वृद्धेच्या साहाय्यानें आपल्या कन्येचें पालन-पोषण करतो. या कन्येला पापी जगाचा वासहि लागलेला नसतो आणि ती वनदेव आणि वनदेवी याच्या उपासनेंत कालक्रमण करीत असते. या देवदेवींनीं मृगयेच्या निमित्तानें आपल्या मित्रासह त्या उपवनात आलेल्या एका श्रीमंत भूस्वामीच्या पुत्राला तिच्यावर प्रेम करण्याला प्रवृत्त केलें आहे. या लहानशा उताऱ्यावरूनहि मिनाडरचें दुस्कोलोस् आणि कालिदासाचें शाकुंतल याच्यातील सादृश्याची वाचकाना पुरेशी कल्पना येईल. मिनाडरच्या या नाटकात एक Nymphaion म्हणजे अप्सरस्तीर्थहि असून त्या नाटकातील प्रमुख घटना त्याच स्थानासमीप घडतात. पहिली महत्त्वाची घटना ही कीं या नाटकातील कण्व जो क्नेमोन, त्यानें आपल्या कन्येला अप्सरस्तीर्थावरून पाणी आणायला सांगितलें असताना मिनाडरचा दुष्यंत आपणच उदककुंभ भरून नायिकेच्या हातीं देतो. कालिदासाच्या दुष्यंताला हा सुयोग साधता आला नाहीं. शकुंतलेच्या वृक्षसेचनाच्या विनिमयात आपली अंगठी अर्पण करूनच त्याला आपलें प्रेम व्यक्त करावें लागतें. मिनाडरच्या नाटकातील नायकाचा शिकारी मित्र आणि विदूषक याची जागा शाकुंतलात सेनापति आणि माढव्य यांनीं भरून काढली आहे. शाकुंतलातील दुष्यंताच्या मातेनें केलेलें व्रत आणि त्याचें उद्यापन याचा उगमहि मिनाडरच्या नायकाच्या मातेनें केलेल्या व्रताच्या उद्यापनातच आहे. मिनाडरच्या नाटकातील नायकाचा विदूषक हा पहिल्या अंकानतर पुन्हा तोंडच दाखवीत नाहीं. शाकुंतलातील माढव्यहि दुसऱ्या अंकात एकवार रंगभूमीवर आल्यानंतर सहाव्या अंकात मुख्यतः मातलीचा मार खाण्या-करिताच उगवतो. मिनाडरचे नायक आपल्या ग्रीकपणाचा जसा अभिमान बाळगत असतात, तसाच कालिदासाचा दुष्यंत आपल्या आर्यपणाचा अभिमान बाळगत असतो आणि आर्य या शब्दाला लाञ्छन लागेल, असलें कृत्य न करण्याची काळजी घेत असतो. एपित्रेपोंतेस या नाटकातील मिनाडरच्या नायकानें विवाहपूर्व संबधा-पासून आपल्या पत्नीला मूल झाल्याचें ऐकल्यानंतर स्वतःच्या शुद्ध वर्तनाची प्रौढी मिरवून स्वतःच गृहत्याग केला. शाकुंतलात दुष्यंतानेंहि " आर्ये विदितम् दुष्यंत-चरितम् ' या शब्दात आपल्या निरपवाद चारित्र्याचा निर्वाळा दिला आहे.

## धूर्त विदूषक आणि भोळा विदूषक

या नाटकातील नायकाच्या विदूषक मित्रासंबधीं लिहितांना आचार्य वेब्स्टर

यांनीं म्हटलें आहे. 'It is curious that Menander makes so little use of him. The distinction between the sponger and the helper had already been made in Middle Comedy; but the plays in which the helpful parasite carried the whole intrigue are slightly or considerably later.'

म्हणजे नायकाच्या घरीं नुसता चरणारा निरुपयोगी सहचर आणि त्याला त्याच्या साऱ्या भानगडींत साहाय्य करणारा अतिधूर्त पण विदूषकाच्या वेषात वावरणारा सन्मित्र हीं दोन भिन्न पात्रें ग्रीकाच्या हास्यप्रधान नाटकाच्या मध्ययुगातच अस्तित्वात आलीं होतीं. पण यापैकीं दुसऱ्या पात्राला प्राधान्य देऊन रचलेलीं नाटकें दुस्कोलोस् नाटकाच्या थोडी मागून, कदाचित् बऱ्याच कालातरानेंहि लिहिलीं गलीं. याचा अर्थ असा होतो कीं मिनांडरनें माढव्यासारखे विदूषक आधीं निर्मिले आणि मागाहून गौतमासारख्या विदूषकाना जन्म दिला. त्याच्या उलट कालिदासानें आधीं गौतमाची निर्मिती करून भारतीय राजसभेंत त्याला स्थान नाहीं हें उमजून, मग साधाभोळा माढव्य निर्मिला.

## शापामुळें उन्नति

शाकुंतलातील दुर्वासशापासारखे शाप ग्रीक आणि संस्कृत वाङ्मयांतून सर्वत्र भेटतात. पण अशा शापाच्या प्रभावानें सामान्य मानवाचें असामान्य व्यक्तींत परिवर्तन घडून येऊ शकतें, ही जाणीव साहित्यजगतात सोफोक्लीजलाच प्रथम झाली असावी. यामुळें आंतिगोन नाटकात त्यानें उद्गार काढले आहेत. 'And ever shall this law hold good, nothing that is vast enters into the life of mortals without a curse.' कालिदाससाहित्यातील उर्वशी, यक्ष, दिलीप आणि शकुंतला या सर्वांचेंच व्यक्तित्व शापामुळें विकसित झालें आहे. शापाचा असा विकासाकरितां उपयोग करण्यात त्यानें सोफोक्लीजचें अनुकरण केलें असलें पाहिजे. आपल्या सुदीर्घ जीवनातील शेवटच्या कृतींत सोफोक्लीजनें उद्गार काढले आहेत. 'Not to be born is past all prizing best.' कालिदासानेंहि आपल्या अंतिम कृतींत म्हटलें आहे. 'ममापि च क्षपयतु नीललोहितः । पुनर्भवं परिगतशक्तिरात्मभूः ॥' युरिपिडिसप्रमाणें तात्विक विचारात दंग होण्यापेक्षां मधुकरवृत्तीनें जीवनाचा उपभोग घेण्याकडेच सोफोक्लीजच्या मनाचा कल होता. त्यामुळें समकालीन लोक त्याला ॲटिकांतील ( अथेन्स प्रांतांतील)

मधुकर म्हणत असत. उलटपक्षीं युरिपिडिसला रंगभूमीवरील तत्वज्ञ ही संज्ञा लाभली होती. या रंगभूमीवरील तत्वज्ञाची बहुधा विरुद्ध तत्वांच्या अभिमान्यांनीं हत्या केली. त्या मानानें मधुकर सोफोक्लीजचें जीवन सुखांत गेलें. या उभयता नाटककारांच्या चरित्राना अनुलक्षूनच तत्वज्ञ कालिदासानें शाकुंतलाच्या पहिल्या अंकात मधुकरानें शकुंतलेवर आक्रमण केल्यानंतर उद्गार काढले आहेत. ' वयं तत्वान्वेषान्मधुकर, हतास्त्व खलु कृती । ' आपल्याला मोहात पाडणाऱ्या व्यक्तींना मुग्ध करून त्याच्या अधरामृताचा आस्वाद घेण्यात सोफोक्लीज फार प्रवीण होता. अशा एका चुंबनाचा इतिहास सांगताना अथीनियस नावाच्या अथेन्सच्या लेखकानें म्हटलें आहे ' Sophocles asked the boy who was trying to remove a speck from the cup with his little finger, whether he could see the speck; when he said he could, he told him to blow it away so as not to wet his finger. As the boy put his face nearer the cup Sophocles brought the cup close to his own mouth, so that the boy's head should be nearer his; when it was almost touching, he put his arm round the boy's neck and kissed him. They all applauded with much shouting and laughter.' (' ग्रीक ट्रॅजिक पोएट्स ' लुकस्कृत पान १२९-३० ) याचा साराश असा कीं एका भोजनप्रसंगीं साकीचें काम करणाऱ्या एका अतिसुंदर किशोरानें सोफोक्लीजला मधुचषक आणून दिला असता त्यात किंचित् विजातीय द्रव्य दिसून आलें. तें तो करंगळीनें काढण्याच्या विचारात आहे असें पाहून मधुकर सोफोक्लीजनें फुंकर मारून तें उडविण्याची त्याला सूचना केली. सोफोक्लीजच्या सुंदर वदनांतून निघालेल्या सूचनेप्रमाणें वर्तन करण्याचा त्या भोळ्या किशोरानें प्रयत्न केला असतां त्याच्या ओठावर मुद्रा करून सोफोक्लीजनें सर्व लोकासमक्ष त्याच्यावर आपला अधिकार प्रस्थापित केला. ही कथा वाचल्यानंतर तरी कालिदासाच्या वरील चरणातील संदर्भ नाटकातील मधुकराप्रमाणें अन्य कोणत्या मधुकराला अनुलक्षून आहे, याची वाचकाना कल्पना येईल.

## हिप्पोलोतुस् आणि शाकुंतल

शाकुंतलाच्या समाप्तीप्रमाणेंच त्या नाटकाचा प्रारंभहि सोफोक्लीजच्या नाटकापासूनच झाला आहे. कालिदासाचा दुष्यंत हा केवळ शकुंतलेची मृगया करून

सर्वदमन भरताचा पिता बनल्यानें चिरस्मरणीय झाला आहे. त्याच्या उलट सोफोक्लीजचा आगामेम्नन राजा ट्रॉयवरील स्वारींत स्वदेशाचें नेतृत्व स्वीकारून चिरंतन झाला. या आगामेम्नननें एकदा आर्तेमिस् देवीच्या कुंजांतील एका मृग-शावकाचा पाठलाग करून तेथील पुजाऱ्याच्या प्रतिषेधाला न जुमानतां त्याची हत्या केली आणि आपल्यावर ईश्वरी कोप ओढवून घेतला. या इतिहासाशीं सुपरिचित असलेल्या कालिदासाच्या दुष्यंतानें आश्रममृगाच्या हत्येचा वैखानसांनीं निषेध केलेला पाहून त्याच्या विनिमयात आश्रमहरिणीचीच मृगया आरंभिली. नाहीं तरी मृगयेचें व्यसन जडलेल्या हिप्पोलुतुस्ला युरिपिडिस्नें त्याच्या वृद्ध सेवकाकरवीं व्हीनस् या रतिदेवतेला मान देण्याचा उपदेश केला होताच. हा उपदेश युरिपिडिस्च्या नायकाला मानवला नाहीं आणि कालिदासाच्या नायकाला असल्या उपदेशाची आवश्यकताहि भासली नाहीं. उलट मानवी हरिणींच्या मृगयेनें एकदा दुष्यताचें चित्त वेधून घेतल्यानतर त्याच्या सेनापतीनें त्याला परत मृगयेकडे वळविण्यासाठीं केलेला प्रयत्न मात्र वाया गेला. युरिपिडिस्चें हिप्पोलुतुस् नाटक आणि कालिदासाचें शाकुतल या विख्यात कृतींतील साम्य आणि वैषम्य सारखेंच चमत्कृतिजनक आहे. मालिनी नदीतीरावरील शीतल कुजांत मदनबाधेमुळें तळ-मळणारी शकुतला आणि आपल्या राजप्रासादाशेजारच्याच निर्झरिणीतीरावरील मचकावर जवळ जवळ उन्मादावस्थेला पोंचलेली युरिपिडिस्ची फेद्रा याच्या बाह्य परिस्थितींत अतिशय सादृश्य असलें तरी त्याच्या मानसिक परिस्थितींत आकाशपातालाइतका प्रभेद आहे. कारण निर्दोषदर्शना कन्यका शकुंतलेच्या उलट फेद्रा ही विवाहित राणी असून दोघा मुलाची माताहि आहे; तरीसुद्धा आपल्या सावत्रपुत्राच्या विषयीं पापी अभिलाषानें तिला ग्रासल्यामुळें ती कामाच्या दशामावस्थेच्या सन्निध येऊन पोंचली आहे. शकुंतलेच्या निरागस सख्या आणि फेद्रा राणीची प्रवीण पापप्रवण दासी याच्या परिस्थितींतील साम्य आणि स्वभावा-तील वैषम्यहि विदारक आहे. फेद्रा राणीला शक्य तितका दूर ठेवूं पाहणारा हिप्पोलुतुस् आणि शकुतलेच्या सान्निध्याच्या लोभानें लतावृक्षातून लपतछपत संचार करणारा दुष्यंत या उभयतातील विरोध अत्यत स्पष्ट आहे. ' अय स ते तिष्ठति संगमोत्सुको । विशंकसे भीरु यतोऽवधीरणाम् ।' या कोटींतला दुष्यंत असला तर ' श्रिया दुरापः कथमीप्सितो भवेत् । ' हें वचन खोटें ठरविण्याइतका असामान्य फेद्रा राणीचा सावत्रपुत्र होता. किंबहुना मला तर असेंच वाटतें कीं लभेत वा प्रार्थयिता न वा श्रियम् श्रिया दुरापः कथमीप्सितो भवेत् । ' या वचनांत

कालिदासानें युरिपिडिस्च्या नायकावरच टीका केली आहे. या अमानुष कोटींतील हिप्पोलुतुस्‌ला मानवी कोटींत आणण्याकरितां रासिन या फ्रेंच नाटककारानें त्याचें एका राजकन्येवर प्रेम असल्याचें दाखविलें आहे. यावरून हिप्पोलुतुस् वाचून कालिदास आणि रासिन या उभयता कवींच्या अंतःकरणात सारखीच प्रतिक्रिया झालेली दिसते.

## पांचव्या अंकांतील प्रमाद

एकदरानें पाहतां ग्रीक रगभूमीचें अनुकरण केल्यानेंच कालिदासाच्या नाटकाना सुश्लिष्ट स्वरूप प्राप्त झालें आहे. एखादा आदर्श समोर नसला म्हणजे तो किती वेंधळ्यासारखी रचना करीत असे, हें शाकुतलाच्या पाचव्या अकावरून एखाद्या नवशिक्या नाटककारालासुद्धा कळून येईल. पण आपल्या विद्वानाना वाङ्मयचिकित्सेचें अंग नाहींच म्हटलें तरी चालेल आणि त्यातून कालिदासाची चिकित्सा करताना तर सारेच आचार्य हाहा आणि हूहू या गधर्वांचे वशज बनतात. माझ्या लहानपणीं मी ' शाकुंतलाचा पाचवा अक ' या विषयावरील कै. महादेव मल्हार जोशी याचें सुप्रसिद्ध व्याख्यान ऐकलें होतें. पण त्याना किंवा त्याच्या नतर शाकुतलाची चिकित्सा करणाऱ्या इतर आचार्यांना या पांचव्या अकांत कालिदासानें जो अप्रयोजकपणाचा कळस करून ठेविला आहे, तिकडे लक्ष देण्याची बुद्धि झालेली दिसत नाहीं. या अकात शार्ङ्गरव, शारद्वत आणि गौतमी आत्या ही मडळी शकुंतलेला घेऊन दुष्यताकडे आलीं आहेत. याच्या पैकीं एकट्या शकुतलेला न ओळखण्याकरिता दुर्वासशाप कारणीभूत झाला असेल, असें गृहीत धरलें तरी जो राजा एकट्या सारथ्यासह कण्वाश्रमांत म म. मिराशींच्या मताप्रमाणें तीन चार आठवडे राहिला होता, त्याला शार्ङ्गरव आणि शारद्वत हे कण्वशिष्यहि अपरिचित असावेत आणि षण्मासापूर्वी आपण त्याच्या आश्रमांत आतिथि म्हणून राहिलों होतों याची शुद्ध नसावी, ही गोष्ट अगदींच असभवनीय आणि त्यामुळेंच हास्यास्पद वाटते. राजा आश्रमात असताना जे शिष्य त्याची सारी व्यवस्था पहात असतील, त्याचीच योजना शकुतलेला सासरीं पोंचविण्याकरिता कण्वानें केली असेल, हें तर उघड आहे मग हे दोघे शिष्य गुरूचा निरोप राजा शिरसावंद्य मानीत नाहीं, हें पाहून हतबुद्ध होतात आणि त्याला हा साधा प्रश्नहि विचारीत नाहींत कीं षण्मासांपूर्वी तू कण्वाश्रमांत राहिला होतास याची तरी तुला आठवण आहे कां ? त्या कुलपतीला शकुतला नावाची कन्या आहे हें तू वैखानसाच्या तोंडून ऐकलें होतेंस ना, आणि हें ऐकल्यानंतर तिचें दर्शन घेण्याकरिताच आश्रमांत तू प्रथम पाऊल टाकलेंस, हें तरी तुला

स्मरतें आहे ना ! ही गोष्ट खरी आहे कीं स्मर नांवाचा मनोविकार हा ज्या भावनात्मक स्मृतीवर अवलंबून असतो, ती भावनात्मक स्मृति अन्यप्रसंगामुळें पुसली गेली म्हणजे पूर्वींच्या प्रणयप्रसंगाचें फार तर बौद्धिक स्मरण होऊं शकेल, भावनात्मक स्मरण होऊं शकत नाहीं. वस्तुस्थिति अशी होती राजधानींतील दुष्यंत हा वसुमती राणीच्या कामतंत्रकौशल्यात गुरफटला गेला असल्यानें इतर कोणाहि रमणींकडे आकृष्ट होऊ शकत नव्हता. हंसपदिकेच्या गीतासंबंधीं विदूषकाजवळ बोलताना त्यानें स्वतःच उद्गार काढले आहेत. ' सकृत् कृतप्रणयोऽयं जनः । तदस्या देवीवसुमतीमंतरेण महदुपालम्भम् अवगतोऽस्मि । ' या उल्लेखापेक्षाहि सहाव्या अंकातील पुढील संवादावरून वसुमती राणीच्या प्रभावाची पूर्ण कल्पना येते. ' राजा -- वयस्य उपस्थिता देवी बहुमानगर्विता च । भवानिमां प्रतिकृतिं रक्षतु । विदूषक -- आत्मानमिति भण । यदि भवान् अंतःपुरकालकूटात् मोक्ष्यते तदा मा मेघप्रतिच्छंदे प्रासादे शब्दापय । ' ज्या राणीला विदूषकानें अंतःपुरकालकूट ही संज्ञा दिली, तिच्या प्रभावामुळेंच शकुंतलाप्रत्याख्यानाचें काळेंकुट्ट कृत्य दुष्यंताच्या हातून घडून आलें. शकुंतलेसारख्या अचतुर बालिकेच्या रतिविव्हलते-पेक्षा कामतंत्रातील नित्य नवीन कौशल्याचा आविष्कार करणाऱ्या युवती वसुमतीच्या निर्भर रतीचें दुष्यंतासारख्या रसिकाला अधिक आकर्षण वाटणें स्वाभाविक आहे. अशा प्रकारें दुष्यंताला शकुंतलेची जी बौद्धिक स्मृति व्हावयाची तीहि वसुमतीच्या प्रभावामुळें होऊं शकत नाहीं आणि भावनात्मक स्मृति ही अभिज्ञानाभरणानें, म्हणजे त्या व्यक्तीची स्मृति करून देणाऱ्या वस्तूच्या संसर्गानें व्हावी, असा उःशाप एकट्या शकुंतलेलाच नव्हे, तर साऱ्याच मानवजातीला लाभला आहे. अशी वस्तुस्थिति असली तरी षण्मासापूर्वीं ज्या प्रेयसीसह राजानें दोन तीन आठवडे तरी वनविहार केला होता आणि चौर्यरताचा अपूर्व आस्वाद घेतला होता, तिला समक्ष पाहूनहि तिची ओळख न पटणें अश्लाघ्य आहे.

## मेघसंदेशाची कल्पना

कालिदासाच्या काव्यामध्यें मेघसंदेश हें अत्यंत कलात्मक काव्य आहे. या काव्यांतील मेघाला दूत करून संदेश पाठविण्याची कल्पना कवीला आदिकवीच्या हनुमत्संदेशावरून सुचली असावी, असें सरसकट साऱ्या टीकाकारांचें मत आहे. या टीकाकारांना प्राचीन काळातील प्रणयाच्या राजकारणाचा परिचय असतां तर त्यांच्या लक्षांत आलें असतें कीं आपल्या प्रणयिनींकडे संदेश पाठविण्याकरिता

कालिदासानें नेहमीं पाणक्याचा उपयोग केला असावा, आणि त्यामुळें 'भर्तुर्मित्रं प्रियमविधवे विद्धि मामम्बुवाहम् ।' असें सकृद्दर्शनींच सांगण्याची त्याच्या दूतांना सवय झाली असावी. हें न उमगल्यामुळें कालिदासावरहि भामहानें दूतकाव्या-वरील आपल्या कडक टीकेंत कोरडे ओढले आहेत. 'अयुक्तिमद्यथा दूता जल-भृन्मारुतेंदवः । तथा भ्रमरहारीतचक्रवाकशुकादयः ।। अवाचो व्यक्तवाचश्च दूर-देशविहारिणः । कथ इत्थ प्रपद्येरन् इति युक्त्या न युज्यते ।। यदि चोत्कठया यत्तत् उन्मत्त इव भाषते । तथा भवतु भूम्नेदं सुमेधोभिः प्रयुज्यते ।। ' भामह हा साहित्य-शास्त्रकार सहाव्या शतकात होऊन गेला, तेव्हा त्याच्या हातीं मेघदूताच्या अनु-करणानें लिहिलेलीं वायु, इंदु, भ्रमर, हारीत, चक्रवाक, शुक इत्यादींना दूत करून लिहिलेलीं काव्यें होतीं. दूतकाव्याच्या या विपुलतेवरूनहि या काव्यप्रकाराचा प्रवर्तक कालिदास हा भामहाच्या पूर्वीच्या शतकात आपलीं काव्यें रचीत होता, ही कल्पना ऐतिहासिकदृष्ट्या असंभवनीय वाटते. असो. आपल्या संदेशवाहक पाणक्याचें आकाशांतील अबुवाहांत रूपातर करण्याची प्रेरणा कालिदासाला रामायणाप्रमाणेंच ॲरिस्टोफेनिसच्या मेघमडल या प्रहसनावरूनहि झालेली दिसते. या प्रहसनात मेघाचा प्रवेश होतांच नेपथ्यूनच्या उच्च कुलात जन्मलेल्या सर्वगामी जीवनदात्यांचें स्वागत करून सॉक्रेटिस म्हणतो

## मेघमंडलाचें अनुकरण

" Hear our prayers oh, gentle goddesses
Take the gifts your suppliants bring,
smile propitious on our offering
List to the mystic chant we sing. मेघमंडलातील सॉक्रेटिसाप्रमाणेंच मेघसंदेशातील यक्षकालिदासानें पुष्करावर्तकाच्या उच्च कुलांत जन्मलेल्या मेघांना कुटजकुसुमाचा अर्घ्य अर्पण करून आपल्या प्रार्थनेकडे लक्ष्य देण्याला विनविलें आहे. याहून अधिक विस्मयजनक गोष्ट ही आहे कीं ॲरिस्टोफेनिसनें मेघमंडलाच्या तोंडीं अथेन्स नगरीला उद्देशून जें गीत घातलें आहे, त्याचें कालिदासानें वक्र पंथानें जावयाला सागतांना मेघाना ऐकविलेल्या उज्जयिनीवर्णनाशीं पुष्कळच साम्य आहे. शूर नागरिकांनीं भरलेल्या अथेन्स नगरींत देवाविषयीं विश्वास आणि पूज्यभाव कसा नांदत आहे, महत्त्वाच्या धार्मिक उत्सवाच्या प्रसंगीं त्या नगरींत अविश्वासी लोक कसे अभावानेंच आढळून येतात, तिथें उंच देवालयांतील सुंदर मूर्तीपुढें

मूल्यवान् वस्तु अर्पण करणाऱ्यांची आणि प्रार्थना करणाऱ्यांची कशी दाटी झालेली असते, तिथें ग्रीकांच्या त्रियांबुस् अथवा बॅकुस् या देवाच्या तांडवनृत्याचा आणि बांसरीवादनाचा वसंत ऋतूंत कसा अभिनय केला जातो, याचें सरस आणि सश्रद्ध वर्णन ॲरिस्टोफेनिस्नें केलें आहे. या सगर्व अथेन्सवर्णनाशीं परिचित असल्यामुळेंच यक्षकालिदासानें मेघाला वक्र मार्गानें उज्जयिनीला पाठवून त्या नगरींतील धर्मजीवनासहच, तेथील कामजीवनाचेंहि वर्णन करण्याची संधि साधली, हें उघड आहे. विशेषतः ॲरिस्टोफेनिस्च्या कवितेंतील त्रियांबुस्च्या तांडवनृत्याच्या उल्लेखामुळेंच कालिदासानें महाकालाच्या सायंकालीन नृत्याचा उल्लेख केला असला पाहिजे. " पश्चादुच्चैर्भुजतरुवनं मंडलेनाभिलीनः । साध्यं तेजः प्रतिनवजपापुष्परक्तं दधानः ।। नृत्यारंभे हर पशुपतेरार्द्रनागाजिनेच्छाम् । शातोद्वेगस्तिमितनयन दृष्टभक्तिर्भवान्या ।। " " पश्चात् व्योमीं शिवभुजवना मंडलाकार घेर, । संध्यातेजातरिं तव जपावर्ण शोभूनि फार ।। नृत्यारंभीं पशुपति भुलो आर्द्रनागाजिनांना । उद्वेगासी त्यजुनि चकिता भक्ति पाहो अपर्णा ।। " ( पू. मे. ३६ ) माझ्या समजुतीप्रमाणें महाकाल काहीं उज्जयिनींत सायंकाळीं नृत्य करीत नाहीं. तेव्हा ही महाकालमंदिरांतील प्रभूच्या सध्यासमयींच्या नृत्याची कल्पना अथेन्सच्या वसंतोत्सवातील डायोनिसस्च्या नृत्याच्या उल्लेखावरून सुचलेली दिसते. मेघमंडलात सॉक्रेटिस्नें Chaos अर्थात् प्रलय, मेघ आणि जिह्वा या तीनच देवतांची उपासना करण्याचा आपल्या अनुयायांना उपदेश केला आहे. हा उपदेश आत्मसात् केल्यामुळेंच कीं काय कोण जाणें, महाकाल, मेघ आणि वाक् या तीनच दैवतांचा कालिदासाच्या काव्यावर आणि जीवनावर सर्वांत अधिक प्रभाव झालेला दिसतो.

## सॉक्रेटिसाचे विद्यार्थी आणि मेघ

मेघसंदेशातील एक अतिशय सुंदर कल्पनाहि कालिदासाला ग्रीक मेघमंडलावरूनच सुचलेली दिसते. मेघमंडलाचा उपासक जो सॉक्रेटिस्, त्याच्या विद्यालयातील काहीं विद्यार्थी अतिशय चमत्कारिक परिस्थितींत दिसून आल्यानें त्या प्रहसनाचा नायक विचारतो. ' खालीं मान लोंबत असलेले हे विद्यार्थी कोणत्या कार्यांत निमग्न झाले आहेत ? ' तेव्हा त्याला उत्तर मिळतें कीं ते पाताळांतील रहस्याचा अभ्यास करण्यात गुंतले आहेत. मग तो पुन्हा प्रश्न करतो. ' तर मग यांच्या तंगड्या आकाशात का गेल्या आहेत ? ' या प्रश्नाला उत्तर मिळतें कीं त्या परस्पर खगोलविद्येचा अभ्यास करीत आहेत. सॉक्रेटिस्च्या या विद्यार्थ्यांसारखीच

मेघसदेशांतील मेघाची एकवार अवस्था झाल्याचें कालिदासानें वर्णन केलें आहे. ' तस्याः पातु सुरगज इव व्योम्नि पश्चार्धलंबी । त्व चेदच्छस्फटिकविशद तर्कयेस्ति-गम्भः ' ( पू. मे. ) ( गगावारि गगनगजसा वाकुनी सेविताना । पूर्वार्धानें स्फटिकसलिला पश्चिमार्धे विताना ।। स्पर्शे काया तव घन निळी ' इथें ॲरिस्टोफनिसच्या मेघमड ांतील विद्यार्थ्यांशीं कालिदासाच्या मेघाचें असलेलें सादृश्य सुव्यक्तच आहे. ' Stoop to enfold with gour pitchers of gold the mystical waters of nile. ' या वचनात ॲरिस्टोफेनिसनें मेघाला खालीं वाकून नील नदींतील पाणी भरून घेण्याचा जसा उपदेश केला आहे, तसाच उपदेश कालिदासाचा यक्षहि मेघाला करीत असतो. मेघमडलांत एके ठिकाणीं डांसाच्या सोंडेंत वारा शिरून तो गुणगुण करतो का शेपटाकडून गुणगुण करतो या महत्त्वाच्या प्रश्नाची चर्चा सॉक्रेटिस आणि त्याचे शिष्य करतात मेघदूतातील ' स्रोतोरध्रध्वनित-सुभग दंतिभिः पीयमानः । ' ( शुडारध्रीं ध्वनि करित ज्या सेविती दति भव्य । ) या चरणात त्या चर्चेचा प्रतिध्वनि उमटलेला दिसतो. ॲरिस्टोफेनिसच्या दुसऱ्या एका प्रहसनातील नायकाला त्याच्या मुलानीं आणि दासानीं घरांत कोंडून ठविलें असताना तो धुराड्याच्या, मार्गानें बाहेर पडण्याचा प्रयत्न करतो आणि तिथेंहि पहारेकऱ्यानीं हटकल्यानतर ' मी धूर आहे ' असें तो उत्तर देतो. या उत्तराचा संस्कृत प्रतिध्वनि मेघदूतातील ' धूमोद्गारानुकृतिनिपुणा जर्जरा निष्पतन्ति । ' ( धूमोद्गारानुकृति करूनी चोरनि जाइ वेगें । ) या चरणात आढळून येतो. कालिदासाचा मेघ स्वतःच्या रूपानें अलकेंतील सदनांत प्रवेश करतो, पण धूम्ररूपानें बाहेर येतो.

## मेघसंदेश आणि सोफोक्लीज

सोफोक्लीजच्या आतिगोन या नाटकातील एका वृंदगीतांत मदनाला उद्देशून म्हटलें आहे. ' He who hath thee raves ' कवीचें सपूर्ण विधान असें आहे कीं आजिंक्य मदनाच्या तावडींतून अमर दवहि सुटले नाहींत, क्षणजीवी मानवाला तर त्याच्या प्रत्येक लहरीप्रमाणें वाकावें लागतें आणि ज्याला प्रेम लाभतें, तो तर भ्रमिष्टासारखा बडबडत सुटतो. इथें उल्लेखिलेल्या भ्रमिष्ट बडबडीचें सारें मेघसदेश काव्यच निदर्शन आहे. तरीसुद्धा त्याच्या नायकाला प्रेमाच्या प्रभावामुळें मी वाचाळपणा करीत आहे, असें मानू नका, असें निक्षून बजावण्याची लहर मधून मधून येतेच. ' वाचाल मा न खलु सुभगमन्यभावः कराति । ' कदाचित् दुर्दैवानें

मानव वाचाळ बनतो, या अन्य एका ग्रीक म्हणीला अनुसरून माझें वर्तन आहे, असेंहि कवीला म्हणावयाचें असेल.

## मेघसंदेश आणि युरिपिडिज

ग्रीक भाषेंत आणखी एक म्हण आहे ' One man is no man. ' ' नन्वात्मानं बहु विगणयन् अ त्मनैवावलबे । ' या वचनात कालिदासाच्या यक्षानें वरील म्हणींचाच प्रतिवाद केला आहे कीं काय अशी शंका येते कारण मी एक असलों तरी स्वत:ला बहु मानून मनाला धीर देतो, असाहि या चरणाचा अर्थ होऊं शकेल. ' Men prone to tears are good, ' या ग्रीक म्हणीचें तर कालिदासानें ' प्राय: सर्वो भवति करुणावृत्तिरार्द्रांतरात्मा । ' या चरणात जवळ जवळ अक्षरश: भाषातर केलें आहे. ' Your silence is as good as consent ' या युरिपिडिस्च्या वचनाचा ' प्रत्यादेशान्न खलु भवतो धीरतां कल्पयामि । ' हा मेघसदेशातील चरण भावानुवादच आहे. कालिदासाच्या उज्जयिनीवर्णनात काम या पुरुषार्थाला जें प्राधान्य दिलें आहे, तें कदाचित् युरिपिडिस्च्या मीडिया नाटकातील अथेन्स वर्णनाच्या अनुकरणानें दिलें असेल. कालिदासाप्रमाणें युरिपिडिसहि ' पुराणमित्येव न साधु सर्वम् । ' असें मानणारा होता त्याचीहि कालिदासाप्रमाणेंच झाडाच्या खादावर बसून तीच खादी तोडण्याबद्दल टीकाकारानीं प्रसिद्धि करून ठेविली आहे. कालिदासाप्रमाणेंच युरिपिडिसहि वाक् देवतेचा भक्त होता.

## इंद्रमंत्री मेघ

मेघसदेश आणि ग्रीक कवि याच्यातलीं इतकीं कल्पनासादृश्यें आणि वचन-सादृश्यें दाखविल्यानतर ' जानामि त्वा प्रकृतिपुरुषं कामरूप मघोन: । ' ( जाणे प्राचीपतिसचिव तू कामरूपी नर्मीचा । ) या चरणाची चिकित्सा करण्याचा मार्ग मोकळा होतो. आमच्या वेदभाष्यकारानीं तर इंद्राचा प्रमुख शत्रु जो वृत्र, तो मेघरूपी मानला आहे तेव्हां वैदिक परपरेप्रमाणें मेघ हा इंद्राचा शत्रु ठरतो. याच सप्रदायाला अनुसरून प्राचीन चरित्रकोशकारानीं इद्रानें मेघ विदारले, याच घटनेपासून इद्रचरित्राचा प्रारभ केला आहे. पुढें रामायणमहाभारताच्या काळीं इद्र हा मेघवाहन बनला तरी मेघ हा इद्र चा नर्मसचिव म्हणून त्याचें कोणीच कौतुक केलेलें आढळून येत नाहीं. वैदिक परपरेप्रमाणें इंद्र हा सायन कर्क संक्रमणाचा बिंदु असल्यानें त्याचा मेघाशीं अगदीं निकटचा सबंध आहे, हें खरें. तेव्हां कालिदासानेंच ग्रीक झेउस् अथवा लाटिन जूपिटरच्या आख्यानाचें अनुकरण

करून मेघाला इंद्राचा नर्मसचिव बनविला आहे कीं काय अशी शंका येते. जूपिटरच्या साऱ्या प्रणयलीलामध्यें मेघ त्याचा साहाय्यकर्ता असतो. 'मेघैर्मेदुरमंबरम्' अशी परिस्थिति असलेला दिवस प्रणयलीलाना अतिशय अनुकूल असल्याचें साऱ्याच कवींना सुविदित आहे. कर्कसंक्रमणासह पर्जन्यवृष्टि चालू झाल्यानंतर शरत्संपाताच्या समयीं द्राक्षें पिकतात. त्यामुळें ग्रीकाचा मदिरेचा देव जो बॅकुस्, तो जूपिटरचा पुत्रच असल्याची प्रसिद्धि आहे. या बॅकुस् अथवा डायोनिसस् देवाचा जेव्हा पृथ्वावर अवतार झाला. तेव्हा त्यानें आपल्या सुगौर स्कधावर जाभळीं वस्त्रें टाकलीं असल्याचें वर्णन आढळतें. 'असन्यस्ते सति हलभृतो मेचके वाससीव ।' ( स्कंधीं घेई हलधर जणू वस्त्रयुग्मा सुनील ) या मेघदूतातील बलरामाच्या वर्णनांत कालिदासानें त्याच कल्पनेला सदुपयोग केला आहे.

## सुवर्णवृष्टीची कल्पना

कालिदासाच्या काव्यांत आकाशातून जलवृष्टीप्रमाणेंच सुवर्णवृष्टिहि होते. रघुवशाच्या पाचव्या सर्गांत विश्वजित् यज्ञानतर अकिंचन बनलेल्या रघुराजाजवळ कौत्सानें गुरुदक्षिणेप्रीत्यर्थ द्रव्ययाचना केली असता पृथ्वीवरील धन निःशेष झालें असल्यानें कुबेरावर स्वारी करण्याचा संकल्प आणि सिद्धता करून त्यानें रात्रीं यज्ञशालेंत शयन केलें असता एकाएकीं आकाशातून त्याच्या कोशगृहात सुवर्णवृष्टि झाली. "प्रातः प्रयाणाभिमुखाय तस्मै । सविस्मयाः कोशगृहे नियुक्ताः ।। हिरण्मयीं कोशगृहस्य मध्ये । वृष्टिं शशसुः ।।" ( ५-२९ ) कालिदास गुप्तकाळीं होऊन गेला असें प्रतिपादणाऱ्या डॉ. वासुदेवशरण आगरवालानीं या श्लोकावर असें भाष्य केलें आहे कीं ही सुवर्णवृष्टीची कल्पना गुप्तयुगात सार्वत्रिक झाली होती; दिव्यावदाम या बौद्ध कथासग्रहात माधाता राजानेंहि उद्गार काढले आहेत. 'वृष्ट मे सप्ताह अंतःपुरे हिरण्यवर्षम् ।' हें वचन बौद्ध लेखकानीं कालिदासाच्या कथानकावर ताण करण्याकरिता माधात्याच्या मुखीं कोंबलें असलें पाहिजे. प्राचीन भारताच्या इतिहासात इक्ष्वाकु कुलांतच काय तो एकमेव मांधाता राजा होऊन गेला. त्याच्या चरित्रांत असली घटना घडली असल्याची प्रसिद्धि कालिदासाच्या काळीं असती तर त्याची आणि रघूची जाता जातां तुलना करावयाला रघुवंशाचा भाट चुकला नसता. कारण माधाता हा रघूचा पूर्वजच होता. तेव्हां दिव्यावदानांतील सुवर्णवृष्टीचा उल्लेख बौद्ध अवदानलेखकानीं कालिदासाच्या अनुकरणानें रघुवंशाच्या प्रसिद्धीनंतर केला आहे, हें उघड आहे. मांधात्याच्या अतःपुरांतील सुवर्णवृष्टीचा उल्लेख

अश्वघोषाच्या बुद्ध चरितांतहि आला असल्यानें ही कल्पना गुप्तकालीन मानण्याला कोणतेंहि निमित्त उरलेलें नाहीं. कालिदासाच्या या आख्यानाचें मूळ ग्रीक पुराणांतील जोव्हच्या प्रणयलीलांत आढळून येतें. आर्गोसच्या एका राजानें आपल्या एकुलत्या एक कन्येला भूमीच्या उदरांत कास्य धातूचें बदिगृह बांधून त्यांत कोंडून ठेविलें होतें. मात्र त्या बदिगृहात वारा खेळण्याकरितां एक उच्च धुराडें बांधण्याची राजानें चूक केली होती. त्या धुराड्यातून एके दिवशीं स्वतः जोव्हनें सुवर्णवृष्टीच्या रूपानें बदिगृहात प्रवेश करून राजकन्या दानाए हिच्यासह प्रणयकेलि केली. आणि तिला पुत्रदान करून तो वाहत्या पाण्याच्या रूपानें तिथून निघून गेला. या राजकन्या दानाएच्या बदिगृहात झालेल्या सुवर्णवृष्टीचें तिसियान या इटालियन चित्रकारानें काढलेलें चित्र फार प्रसिद्ध आहे. असलीं चित्रें मिनाडरच्या वारसाच्या राज्यातून कालिदासानें पाहिलीं असतील अथवा यवनीमुखपद्मातलि मधुमदाचा परिचय करून घेताना त्यानें त्या कथा ऐकल्या असतील. त्यामुळेंच त्यानें पाचव्या सर्गांत रघुराजाच्या कोशगृहात सुवर्णवृष्टि घडविली आहे. कालिदासाचा आश्रयदाता जो विक्रमादित्य, त्याला जैन परपरेप्रमाणे सुवर्णपुरुष लाभला होता त्याच्या कोशगृहात सुवर्णवृष्टि झाल्याची कथा जैन ग्रथकारहि सागत नाहींत. यावरून सुवर्णवृष्टीची कल्पना कालिदासाच्या काळीं भारतात सार्वत्रिक झाली नव्हती, हें उघड आहे. ग्रीक पुराणातील कुमारी देवता आथेने हिच्या जन्माख्यानातहि सुवर्णवृष्टीचा प्रसंग आलेला आहे. सुवर्णवृष्टीचा पहिला उल्लेख ग्रीक कवि पिंडार याच्या गीतातून आढळून येतो.

## बौद्ध वाङ्मयांत ग्रीक कल्पना

कालिदासाच्या काव्यावरून सुवर्णवृष्टीचा उल्लेख उचलणाऱ्या बौद्ध अवदान लेखकानीं दुसऱ्याहि एका ग्रीक कथेचें अनुकरण केल्याची शका सर जान मार्शल या नामांकित सशोधकाना आली होती. त्याच्या तक्षशिला ग्रथात ते म्हणतात. ‘ In its essence the story of Kunal and Tishhyarakshita is the same as that of Hippolytus and Phedra, and it is not unlikely that it was derived from the classical Greek legend Such legends must have been familiar enough among the Eurasian Greeks in the North-West. Witness for example the drama of Antigone portrayed on a vase found near Peshawar. ’ म्हणजे अशोकाचा पुत्र

कुणाल याच्यावर त्याच्या सावत्र आईचें प्रेम बसल्याची कथा आणि अथेन्सचा राजपुत्र हिप्पोलुतुस् याच्यावर त्याची सावत्र आई फेद्रा हिचें प्रेम बसल्याची कथा या मूलतः एकच आहेत. तेव्हा बौद्ध अवदानलेखकाना ही कथा लिहिण्याची प्रेरणा ग्रीक पौराणिक कथांवरून होणें अशक्य नाहीं. पेशावरजवळ सापडलेल्या मृत्कुंभावर सोफोक्लिजच्या आतिगोन या नाटकातील एक प्रसग चित्रित केला आहे, त्यावरून भारतीय ग्र काना ग्रीक वाङ्मयाचा चागलाच परिचय होता, हें सिद्ध झालें आहे. सर जॉन मार्शल यानीं उल्लेखिलेल्या हिप्पोलुतुसवरील नाटकाचा शाकुन्तलावर किती प्रभाव पडला आहे, याचें विवेचन वर आलेंच आहे.

## विक्रमकालीन सुवर्णवृष्टि

इथें ही गोष्ट स्पष्टपणें सागितली पाहिजे कीं, केवळ ग्रीक पुराणात सुवर्णवृष्टीची रम्य कल्पना आढळली, म्हणून कालिदासानें तिचा रघुवंशात उपयोग केला, असें नसून भारताच्या इतिहासात विक्रमादित्याचें युग हें एका अर्थीं प्रत्यक्ष सुवर्णवृष्टीचेंच युग होतें. खिस्तपूर्व पहिल्या शतकात अरबस्थानाच्या दक्षिण भागात अरबाचें एक अतिशय समृद्ध राज्य होतें. या राज्यावर ऑगस्टस सीझरच्या एका सेनापतीनें खि. पू. २४ या वर्षी स्वारी केली. या स्वारीच्या परिणामाची चर्चा करताना कॅंब्रिज एन्शट हिस्ट्रीच्या दहाव्या खंडात भारतीय इतिहासाच्या दृष्टीनें अतिशय अमूल्य अशी पुढील माहिती आली आहे. ' It was not, however, a cause of the rapid development of the maritime traffic of Egypt with India That development had begun even before Gallus entered Arabia, as strabo's evidence shows. While on tour in Egypt during the prefecture of his friend, he learned that whereas in the later Ptolemaic age not even twenty ships a year ventured to pass the Babel-Mandeb, now as many as 120 Alexandrian merchant vessels sailed from Myos Hormos to the Somali coast and India, bringing back valuable cargoes to be reexported from Alexandria and to enrich the exchequer by double duties for import and for export.'

म्हणजे गॅलसच्या स्वारीपासूनच इजिप्त आणि भारत यांच्यामधील व्यापारांत एकदम भरमसाट वाढ झाली असें नसून, ही वाढ तत्पूर्वीच झाली होती, असें

स्ट्राबोच्या लेखनावरून समजतें. तो म्हणतो कीं, क्लिओपात्राच्या वाडवडिलांच्या राजवटींत अलेक्झांड्रियाच्या व्यापाऱ्याची अवघीं वीस जहाजें हिंदुस्थानाकडे जात. पण तिथें रोमन साम्राज्य प्रस्थापित झाल्यापासून आता प्रतिवर्षी १२० जहाजें जाऊं लागलीं आहेत. रोमन साम्राज्यासारखें श्रीमत गिऱ्हाईक भारतीय पण्य-द्रव्याना लाभल्यानतर इजिप्त आणि अरबस्थान या देशांतील व्यापाऱ्याच्या टोळधाडीच भारताकडे वळल्या. या देशाकडून भारताला कोणत्याच पण्यपदार्थांची तादृश आवश्यकता नव्हती. त्यामुळें त्या देशाना सुवर्णाच्या विनिमयातच भारतीय पण्यद्रव्याचा क्रय करावा लागे अशा प्रकारें भारतीय व्यापाराला भरमसाट तेजी आली असतानाच वर्तमानकाळीं ज्या वाऱ्याना मान्सून वारे म्हणतात, त्या वर्षा-ऋतुतील वाऱ्याच्या नियमित गतीचा शोध लागला आणि त्यानतर रोमच्या व्यापाऱ्याच्या सुवर्णपूर्ण नौका अधिकच मोठ्या प्रमाणावर पश्चिम सागरतीरावरील बंदरांकडे येऊं लागल्या. मॉम्सेन या जर्मन इतिहासकारानीं असा अंदाज केला आहे कीं, तेव्हा रोमहून भारताकडे प्रतिवर्षीं पन्नास लक्ष तोळें सोनें येत असावें. त्याकाळीं भारतातून रोमकडे सूक्ष्म वस्त्रें, मिरीं, हस्तिदत, माणिक, मोतीं, हिरे इत्यादि पण्यद्रव्यें जहाजें भरभरून जात असत. अकस्मात् चालू झालेल्या या अत्यत लाभदायक व्यापारामुळें पश्चिम भारतातील व्यापाऱ्याच्या सदनातून सोन्याचा धूर निघू लागला आणि अशी सुवर्णवृष्टि चालू झाल्यानें विक्रमादित्यासारख्या उदार राजाच्या दातृत्वाला पूरच आला होता. विक्रमाच्या राजवटींत एकाएकीं रोमहून भारताकडे सुवर्णाचा पूर वाहू लागल्यामुळें विक्रमानें सीझरला जिंकल्याची दंतकथाहि तेव्हां प्रचलित झाली होती. ज्योतिर्विदाभरणातील विक्रमचरित्रांत या दतकथेचा प्रतिध्वनि उमटला आहे. या व्यापारात दक्षिणेकडील पाड्य राजांचाहि मोठा भाग होता. खि. पू. ३० च्या सुमाराला पाड्य राजानें रोमचा पहिला सम्राट् ऑगस्टस् सीझर याच्याकडे राष्ट्रदूतहि पाठविले होते. हे राष्ट्रदूत त्यानें बहुधा विक्रमाच्या भीतीनेंच पाठविले असावे. कालिदासकालीं दक्षिणेंत केवळ पाड्य हा एकच उल्लेखनीय राजा होता. पण तो आपल्या समुद्रावरील व्यापाराचें जलदस्यूपासून संरक्षण करू शकत नव्हता. शालिवाहनशकारभीं प्लिनी या भूगोल लेखकानें म्हटलें आहे कीं पांड्य देशाकडील बंदरांत विकत घेण्याजोगा माल असत नाहीं आणि तिकडे जलदस्यू फार आहेत. या जलदस्यूपासून आपल्या व्यापाराचें संरक्षण करण्याकरिता रोमच्या सम्राटानीं पाड्यांच्या प्रमुख बंदरांत आपल्या सैनिकांच्या दोन तुकड्या नित्य ठेविलेल्या असत. त्याच्या उलट विक्रमाच्या

राज्यांतील भृगुकच्छ अर्थात भडोच बंदरांत रोमच्या व्यापाऱ्यांना भरपूर पण्यद्रव्यें विकत घेतां घेत, उत्कृष्ट मदिरांचा आस्वाद लाभे आणि परत प्रवासासाठीं पोटभर गहू भरून घेतां येई. कालिदासाच्याकाळीं अवती आणि पाड्य या दोनच देशामध्यें रोमच्या व्यापारासाठीं चुरस लागली असल्यानें त्यानें दक्षिणेकडील राजांत एकट्या उरगपुराधीश पाड्याचाच उल्लेख केला आहे. या पाड्याच्या देशांत चचुप्रवेश करून भारतात मुसलप्रवेश करण्याच्या आशेनेंच रोमनें पाड्यांच्या राजाकडे आपले दूत ठेवलेले असत.

## भारताच्या जलमार्गांचा परिचय

पाड्य राजाच्या बदरांतून आपले सैनिक ठेवून तेथील व्यापाराचें सरक्षण करण्याचा खटाटोप रोमन लोकानीं करण्याचें महत्त्वाचें कारण म्हणजे रोमच्या लोकाना लागलेली मिऱ्याची चटक होय. रोममधील मासाहारी लोकाना मास-पचनाला मिरीं अत्यंत उपयुक्त असल्याचा शोध लागला, तेव्हापासून आपल्या पोटाच्या सुस्थितीसाठीं ते पाड्य राज्यावर अवलबून राहू लागले. रोमन लोकाना केरळ प्रातातील मिऱ्याचा मार्ग माहीत झाल्यापासून त्यानीं टायबर नदीच्या तीरावर मिऱ्याचीं प्रचड कोठारें बांधलीं आणि तीं कोठारें अखड तुडुब भरून ठेवणें हें त्याच्या व्यापाऱ्याचें आद्य कर्तव्यच होऊन बसलें होतें. रोमन लोकाना मिऱ्यांचा परिचय होण्यापूर्वी खिस्तपूर्व दुसऱ्या शतकाच्या अंतीं मिसरमधील टॉलेमी कुळातील एका राजानें भारताशीं व्यापारी सबध जोडण्याचा प्रयत्न केला होता. त्याच्या राजवटींत एका अज्ञात भारतीय नाविकाची नौका एडनजवळ फुटल्यामुळें त्याला त्या बंदरात आश्रय घ्यावा लागला. त्या ठिकाणीं मिसर देशाच्या ऐश्वर्याची कीर्ति ऐकून तो त्या देशाच्या पर्यटनाला गेला आणि तें पर्यटन संपल्यानंतर आपल्याला भारतात पोंचवून दिल्यास भारताकडे जाण्याचा मार्ग आपण ग्रीक नाविकाना दाखवून देऊं, अशी त्यानें टॉलेमी राजापाशीं गोष्ट काढली. ही कल्पना त्या राजाला रुचून त्यानें (Eudoxus) नावाच्या एका ग्रीक कर्णधाराला त्या भारतीय नाविकासह भारताकडे धाडलें. या फेरीहून परत येतांना त्या कर्णधारानें आपली नौका रेशमी वस्त्रानीं आणि इतर मूल्यवान् पदार्थांनीं भरून आणली. अशा प्रकारें खि. पू. दुसऱ्या शतकाच्या अतींच मिसरमधील व्यापारी तज्ज्ञाना भारताचा जलमार्ग सुविदित झाला होता. पण टॉलेमीच्या राज्यांत परराष्ट्रीय व्यापाराचा मक्ता स्वतः राजाकडे असल्यानें त्याच्या लहरीप्रमाणें

त्या व्यापाराला भरती ओहोटी येत असे. त्यामुळें रोमच्या सत्तेखालीं मिसर देश येईपर्यंत भारतांत खरीखुरी सुवर्णवृष्टि चालू झाली नव्हती.

## गुप्तकाल आणि रोमचा व्यापार

रोमच्या सुवर्णाची वृष्टि गुप्तकालांतहि भारतात होत होती, अशा आशयाचें अनैतिहासिक विधान डॉ. वासुदेवशरण आगरवाल यांच्यासारख्या विद्वानांनीं केलें आहे. त्याचा आता थोडा समाचार घेतला पाहिजे. सरिता आणि मानव ( Rivers and Men ) या ग्रथाचे कर्ते रॉबर्ट ब्रिटन हे गुप्ताच्या व्यापारी धोरणाची चर्चा करताना लिहितात. ' Most of the Gupta rulers were very able men, but like the sassanids in Persia they showed little interest in east west contacts. They withdrew almost completely from the monsoon trade, allowing it to be taken over again by Arab middlemen The explantion seems to be that the disintegration of Rome made this trade far less valuable and the Guptas preferred to concentrate on Southeast Asia where they had thriving colonies and trading posts and a free hand in dealing with these ' याचा सारांश असा कीं, गुप्तकालीं रोमन साम्राज्य मोडकळीस आल्यामुळें वर्षाऋतूतील वाऱ्यावर अवलंबून असलेला बहुतेक सारा व्यापार गुप्तानीं अरबाच्या हातीं सोंपवून दिला होता. आग्नेय आशियातील भारतीय उपनिवेश तेव्हा भरभराटींत असल्यानें आणि त्या भागात त्यांना नाव घेण्याजोगे प्रतिस्पर्धी नसल्यानें त्याचें सारें लक्ष तिकडेच केंद्रित झालें होतें. असो.

## यवनीरक्षित राजे

खि. पू. पहिल्या शतकाच्या उत्तरार्धात रोमचा भारताशीं मोठ्या प्रमाणावर व्यापार चालू झाला असला तरी तेवढयानें अरब व्यापाऱ्यांचा व्यापार तेव्हां बसला होता, असें समजण्याचें काहींच कारण नाहीं. उलट या व्यापारांतील शक्य तितका लाभ आपल्या वाट्याला यावा, यासाठीं त्यांनीं विश्वप्रयत्न केले असतील. ऑगस्टस् सीझरचा एक सेनापति गाल्लस यानें अरबांच्या येमेन प्रांतावर जी स्वारी केली, तिचें कारण ही व्यापारी चुरसच होय. कालिदासाच्या काळीं यवनांच्या

देशांतून भारतात सुवर्णाप्रमाणेंच सुवर्णकेशी यवनी दासींचीहि आयात होत असे. या व्यवसायात रोमन लोकांपेक्षा अरबानींच पुढाकार घेतला असावा. कारण हा व्यवसाय अजूनहि त्याचा वंशपरंपरागत व्यवसाय आहे. या सुवर्णकेशी यवनींच्याकडे राजाच्या संरक्षणाचे काम सोंपविलेले असे. कौटलीय अर्थशास्त्रात हें काम दासींच्याकडेच सोंपविलें असलें तरी तेथें यवनींचा उल्लेख नाहीं. ' बाणासनहस्ताभिः यवनीभिः वनपुष्पमालाधारिणीभिः परिवृतः । ' असा आपल्या नाटकाच्या नायकाचा रंगभूमीवर प्रवेश दाखविणारा नाटककार एकटा कालिदासच असल. पण कालिदास गुप्तकालीन होता, असें प्रतिपादन करण्याचा संकल्प अधिकारी म्हणविणाऱ्या विद्वानानीं सोडला असल्यामुळें कालिदासाच्या काळीं आर्य राजे यवनीपरिवृत अशा अवस्थेंतच जनतेपुढें येत असत, या वस्तुस्थितीकडे त्यांना डोळेझाक करणेंच भाग आहे. ग्रीकांच्या अनुकरणानेंच कालिदासानें रघुवंशातील राजांचें ' आनाकरथवर्त्मनाम् ' असें वर्णन केलें आहे, अशी माझी समजूत आहे. इक्ष्वाकुवंशातील सुप्रसिद्ध ककुत्स्थ राजानें इंद्राला वृषभ बनवून त्याच्या ककुदावर बसून असुरांना जिंकल्याची प्रसिद्धि आहे. तेंव्हा हा राजा आपल्या रथात बसून स्वर्गाला गेला नव्हता, हें उघड आहे. एकंदरीनेंच रथांतून स्वर्गाला जाण्याची इक्ष्वाकूंची परंपरा नाहीं. रघूच्या पाचव्या सर्गातच रघुराजाच्या रथाची गति वसिष्ठाच्या मंत्रांच्या प्रभावानें जळीं, स्थळीं, अंतरिक्षीं कुठेंच कुंठित होत नव्हती, असें कालिदासानें लिहिलें आहे. याचा अर्थच हा कीं, त्याचा रथ सर्वगामी असल्याची प्रसिद्धि कालिदासानेंच प्रथम केली. वैदिक परंपरेप्रमाणें अश्विनीकुमाराचा रासभरथ, उषेचा वृषभरथ आणि सूर्यनारायणाचा रथ असे तीनच रथ आकाशात चालतात. आपल्या परंपरेप्रमाणें इतर कोणतेहि रथ आकाशगामी नाहींत. कालिदासाच्या नाटकांतून दुष्यंत आणि विक्रम या उभयताचे रथ जे आकाशगामी झाले आहेत, ते केवळ युरिपीडिस्च्या नाटकांत स्वतः सूर्याची नात जी मीडिया, तिला तिच्या आजाकडून गगनगामी रथ मिळाला असल्यानें, त्या रथांत बसून ती आकाशमार्गानें संचार करीत असल्याचें दृश्य दाखविलें जात असल्यानें झाले आहेत. ग्रीक रंगभूमीवर लोकप्रिय झालेली ही क्लृप्ति कालिदासानें संस्कृत रंगभूमीवर आणली आहे, इतकेंच. माझ्या आठवणीप्रमाणें भासाच्या नाटकांतून कुठें असले आकाशगामी रथ भेटत नाहींत. ग्रीक पुराणात जूपिटरच्या पुत्रानेंहि एकवार आकाशांत रथ हांकल्याचें वर्णन येते. भारतीय देवतात ब्रह्मा हंसगामी, विष्णु गरुडगामी, कार्तिकस्वामी मयूरगामी, कुबेर हा विमानविहारी असे असलें तरी

एका रविवाचून इतर कोणाला अश्वाकडून ओढलेला आकाशगामी रथ लाभलेला नाहीं. भारतीय परपरा कालिदासाला एकतर घड माहीत नव्हत्या, नाहीं तर ग्रीकांचें अनुकरण करण्याच्या भरात त्या साऱ्या परपरा तो निःशकपणें गुडाळून ठेवीत असे, असे आतापर्यंतच्या विवेचनानें अगदीं उघड झालें आहे. भारतीय परपराच्या या अज्ञानावरून अथवा अवहेलनेवरून कालिदास ' असस्कृत ' होता, ही प्राचीन परंपरा अक्षरशः खरी ठरते, पण त्याचवेळीं त्याच्यावर सरस्वतीचा वरदहस्त होता, ही आख्यायिकाहि सत्यावर आधारलेली आहे, असें म्हणावें लागतें. कालिदाससबधींच्या आणखीहि एका आख्यायिकेत सत्याश असावा, अशी शका येते. ' दिङ्नागाना पथि परिहरन् स्थूलहस्तावलेपान् ' या मेघदूतांतील चरणावर टीका करताना दक्षिणावर्तानें म्हटलें आहे. ' दिङ्नाग इति कोऽपि आचार्यः कालिदास-प्रबधान् अन्यत्रोक्तोयम् अर्थ इति स्थूलहस्ताभिनयैः दूषयति ' प्राचीन काळीं भारतातील प्रसिद्ध विद्यापीठांच्या आठ दिशाकडील आठहि द्वारावर अष्ट दिग्गज पडित बसलेले असत. हें पडित विद्यापीठात प्रवेश करू पाहणाऱ्याची दारावरच तोंडी परीक्षा घेऊन त्याना प्रवेश द्यावयाचा कीं नाहीं, तें ठरवीत. असल्या बहुश्रुत पाडितांनीं मालविकाग्निमित्र आणि कुमारसंभव यांसारख्या ग्रथावर ' अन्यत्रोक्तोऽयम् अर्थः ' असा अभिप्राय व्यक्त केला असल्यास काहींच नवल नाहीं. दिङ्नाग ही एक विशिष्ट व्यक्ति होती, ही जी टीकाकाराची समजूत आहे, ती विद्यापीठाच्या दिग्गजपाडिताच्या परपरेला धरून नाहीं. पण त्यानीं उद्धृत केलेला आक्षेप ऐतिहासिकदृष्ट्या विचारणीय आहे, याविषयीं शका नाहीं.

## हविहरणाची कल्पना

ॲरिस्टोफेनिस्नें ' विहगम ' नावाचें एक प्रतिभासपन्न प्रहसन लिहिलें असून अथेन्सवर रुष्ट झालेल्या कांहीं नागरिकांनीं आकाशात पक्ष्याच्या साहाय्यानें एक अंतरिक्षनगरी स्थापून देवाच्याकडे जाणाऱ्या यज्ञहवींची नाकेबदी केल्याचें अद्भुत आख्यान त्यात घातलें आहे. ॲरिस्टोफेनिसनें आपल्या प्रतिभेनें निर्मिलेली अतरिक्षनगरी आतां आकाशात खरोखरीची स्थापली जाण्याचा रग दिसू लागला असल्यानें त्या प्रहसनाचें महत्त्व अधिकच वाढलें आहे. ॲरिस्टोफेनिसच्या अतरिक्ष नगरानें ऑलिंपसनिवासी देवांचे हविर्भाग वाटेंतच अडविल्यामुळें त्यांची जी दैना झाली तिचें ' विहगम ' या प्रहसनांतील वर्णन आणि तारकासुररूपी धूमकेतूच्या उदयानें आमच्या आकाशस्थ देवाची जी दीनवाणी परिस्थिति झाली, तिचें

कुमारसंभवाच्या दुसऱ्या सर्गातील वर्णन, एकमेकांशीं अतिशय सदृश आहे. कुमारसंभवातील वर्णनांत, रावणाच्या भीतीनें देवांची जी दुर्दशा झाली, तिच्या रामायणांतील वर्णनाचें अंशतः अनुकरण केलें असलें तरी कुमारसंभवाच्या दुसऱ्या सर्गातील उपहासाचा सूर रामायणातील वर्णनात नाहीं. विशेष म्हणजे तारकासुराप्रमाणें रावण कांहीं देवांचे हविर्भाग पळवीत नव्हता. ' यज्वाभिः संभृत हव्य विततेष्वध्वरेषु यः । जातवेदोमुखान्मायी मिषतामाच्छिनात्ति नः ॥ ' ( कु. स. २–४६ ) हा हवि पळविण्याबद्दलचा चडफडाट ' विहंगम ' प्रहसनातील बुभुक्षित हर्क्युलिसच्या तोंडीं शोभण्याजोगा आहे.

## यवन मदनाचें अनुकरण

कुमारसंभवांतील दुसऱ्या सर्गाच्या अंतीं इंद्रानें ज्या मदनाचें स्मरण केलें, तो हिंदुकंदर्प नसून यवनांचा क्युपिड आहे. वर विक्रमोर्वशीयाची चर्चा करतांना आपोलो आणि डाफ्ने यांच्या आख्यानाचा उल्लेख आलाच होता. त्या आख्यानाच्या आरंभीं ग्रीक पुराणातील सर्वश्रेष्ठ धनुर्धारी जो आपोलो, त्याचा, खेळांतील धनुष्यबाण घेऊन बागडणाऱ्या ग्रीक मदनाशीं अर्थात् क्युपिडशीं कलह झाल्यामुळें, व्हीनसच्या त्या अघटित घटना घडवून आणणाऱ्या चिरंजिवानीं आपोलोला आपल्या सुवर्णपुंखशरानें विंधून त्याला झिडकारणाऱ्या मुलीच्या प्रणयात पडावयाला लाविलें होतें. ग्रीक पुराणातील क्युपिडच्या चरित्राचें अनुकरण करूनच कालिदासानें भारतीय परंपरेंतील सर्वांत श्रेष्ठ धनुर्धारी जो रुद्र, त्याच्यावर शरसंधान करण्याला मदनाला प्रवृत्त केलें आहे. कुमारसंभवातील मदन अहंकाराच्या भरात उद्गारतो, ' तव प्रसादात् कुसुमायुधोऽपि सहायमेकं मधुमेव लब्ध्वा ॥ कुर्यां हरस्यापि पिनाकपाणेः धैर्यच्युतिं के मम धन्विनोऽन्ये ॥ " ( कु. स. ३–१० ) मदनाच्या या उद्धत उद्गारात ग्रीक क्युपिडनें आपोलोला दिलेल्या उद्दाम उत्तराचे प्रतिध्वनि स्पष्ट ऐकूं येतात. मात्र ते ऐकू यावयाला हिंदु आणि ग्रीक परंपरांचा श्रोत्यांना परिचय असावा लागतो. यवन क्युपिडच्या हातात खेळातलें कां होईना, पण खरोखरीचें धनुष्य असतें. त्याच्या उलट हिंदु मदनाच्या हातांत केवळ रूपकात्मक धनुष्य असतें. व्हीनसचा पुत्र आपल्या इच्छेप्रमाणें, अथवा मातेच्या सांगण्याप्रमाणें कोणाहि देवाला अथवा मानवाला विंधू शकतो आणि त्याचा शर दुर्निवार असतो. त्याच्या उलट हिंदु मदन हा वस्तुतः कोणत्याहि व्यक्तीवर शरसंधान करीत नाहीं, इतकेंच नव्हे तर त्याचा शर दुर्निवार असल्याची परंपराहि

आपल्या देशात प्रचलित नाहीं. शेवटची सांगण्याजोगी गोष्ट ही कीं कोणताहि यवन देव आपल्या शंभूप्रमाणें दुसऱ्या देवाला जाळून टाकीत नाहीं. विभिन्न देशांतील देवतांचीं चरित्रें वस्तुतः त्या त्या देशातील कविसंकेत असतात. हे कविसंकेत ज्या समाजात परंपरेनें दृढमूल झालेले नसतात, तिथें ते प्रचलित करण्याचा प्रयत्न केल्यास त्यांचें विडंबन मात्र होतें. असाच प्रकार कुमारसंभवात घडून आला आहे. मदनाचा बाण दुर्निवार असल्याची यवनपरंपरा आणि शंकरानें मदनदहन केल्याची हिंदु परंपरा याचा मेळ बसत नसल्यानें कुमारसंभवाच्या तिसऱ्या सर्गात मदनानें बाण सोडण्याची सिद्धता करण्यातच इतका दीर्घसूत्रीपणा केला कीं त्याचा बाण सुटण्यापूर्वींच शंभूनें त्याला भस्मावशेष करून टाकला. कालिदासाचें अनुकरण करणाऱ्या अश्वघोषाला तर काव्य कशाशीं खातात, हेंच कळत नसल्यामुळें त्याने बुद्धावर प्रत्यक्ष बाण पडून तो विफल झाल्याची प्रौढी ( शैलेंद्रपुत्रीं प्रति येन विद्धो। देवोऽपि शंभुश्चलितो बभूव।। न चिंतयत्येष तमेव बाणम् । किंस्यादचित्तो न शरः स एषः ।। ) ( बु च. १३-१६ ) मिरवली आहे. मदनानें एखाद्या व्यक्तीवर बाण सोडण्याच्या कल्पनेच्या असल्या विडंबनानीं ही कल्पना भारतीय नसून कालिदासानें ती यवनाकडून उसनी आणली असल्याचें सुव्यक्त होतें. आपला मदन पुष्पधन्वा असला तरी मल्लिकापुष्प, चंद्रकिरण, चूतमंजरी, कोकिलगान आणि दाक्षिणानिल हे त्याचे सुप्रसिद्ध पंचशर शरासनावरून सोडताहि येत नाहींत आणि एखाद्या व्यक्तीवर रोखलेहि जात नाहींत. हे शर साऱ्या समाजावरच रोखलेले असतात. तेव्हा इंद्राच्या सांगण्यावरून मदनानें शंकरावर शरसंधान केल्याचें आख्यान हें भारतीय परंपरेतलें नसून व्यक्तित्ववादी यवनाच्या परंपरेंतीलच असावें, हें उघड आहे. आपल्या इंद्राला एखाद्या प्रतिस्पर्ध्याचा कांटा काढावयाचा असल्यास त्या कार्यावर तो सामान्यतः मदनापेक्षा रंभामेनकादि अप्सरांचीच योजना करीत असे. विक्रमोर्वशीयांत कालिदासानेंच म्हटलें आहे, ' उर्वशी सुकुमार प्रहरण महेंद्रस्य। ' ही सारी भारतीय परंपरा लक्षात घेतली म्हणजे शंकरावर इंद्रानें मदनाची केलेली योजना किती अप्रयोजक होती, हें दिसून येईल. या कार्यांत मदनाचा जो बळी गेला, तोहि ' स्वधर्मे निधनं श्रेयः। ' या कोटींतला नसून ' परधर्मो भयावहः। ' याच कोटींत पडणारा होता. कुमाराच्या तिसऱ्या सर्गातच कालिदासानें ' त्रियंबकं संयमिनं ददर्श। ' या चरणांत डायोनिसस् अथवा बॅकुस् याच्या त्रिअंबुस् या नावाचें अनुकरण करून आपल्या प्रतिभेचें मूळपीठ हिमालयावर नसून ऑलिंपस् पर्वतावर असल्याचें सांगून ठेविलें आहे. कुमारसंभवाच्या सातव्या सर्गाच्या

पहिल्या श्लोकातील जामित्र हा शब्द ग्रीक दियामेत्रोन् याचें संस्कृतीकरण आहे, ही गोष्ट सार्‍या ज्योतिर्षीजनांना सुविदित आहे. असल्या खाणाखुणांवरून मदनानें शंकरावर शर रोखल्याचें आख्यान कालिदासानें ग्रीक परंपरेंतून उसनें आणल्याचें सिद्ध होतें. मदनानें सोडलेला शर लागून प्रणयांत पडलेला एकहि नायक अद्यापि मला प्राचीन संस्कृत वाङ्मयांत आढळलेला नाहीं.

## दोन सर्गांतील विरोध

बरें, हें उसनें आणलेलें आख्यान स्वतः कालिदासाच्या तरी पुरतें पचनीं पडलें होतें, असेंहि दिसून येत नाहीं. कुमारसंभवाच्या तिसर्‍या सर्गांत पुष्पधन्व्यानें आपला शर शंकरावर रोखल्यानंतर तो सुटण्यापूर्वीच चंद्रशेखराच्या भावना प्रक्षुब्ध होऊं लागल्या. तेव्हां ईश्वरानें आपल्या चेतोविकृतीच्या हेतूचा अर्थात् उगमाचा शोध करण्याकरिता सभोंवतीं दृष्टिक्षेप केला असता आपल्यावर शर सोडण्याला सिद्ध झालेला मदन त्याच्या दृष्टिपथांत आला. तत्क्षणीं प्रभूच्या तृतीय नेत्रांतून निघालेल्या कृशानूच्या प्रभावानें मदनाला भस्मावशेष केलें. म्हणजे तिसर्‍या सर्गांत तरी मदनाला आपला बाण सोडण्यालाहि अवधि मिळाला नाहीं. पण त्याच्या उलट पांचव्या सर्गांत बटुवेषधारी शिवाला पार्वतीची सखी बनवून सांगते, ‘ असह्य हुंकारनिवर्तितः पुरा । पुरारिमप्राप्तमुखः शिलीमुखः ।। इमां हृदि व्यायतपातम-क्षिणोत् । विशीर्णमूर्तेरपि पुष्पधन्वनः ।। ’ म्हणजे भवनेत्रांतील कृशानूनें पुष्पधन्वा भस्मसात् झाला तरी त्याचा बाण जळून गेला नाहींच तो शंकराच्या हृदयाचा वेध घ्यायलाच आला होता, पण प्रभूच्या असह्य हुंकारामुळें परतून त्यानें पार्वतीचें हृदय विंधिलें म्हणे. हें कुमाराच्या पांचव्या सर्गांतील कालिदासाचें नवविधान तिसर्‍या सर्गांतील आद्यविधानाशीं विसंगत असल्यामुळें समकालीन समीक्षकांनीं कालि-दासाचे वाभाडे काढले असले पाहिजेत आणि त्यामुळेंच पश्चात्तप्त कालिदासानें रघु-वंशाच्या प्रस्तावनेंत पुढील वास्तववादी उद्गार काढले आहेत. ‘ मंदः कवियशः-प्रार्थी गमिष्याम्युपहास्यताम् ।। ’ पुष्पधन्व्याच्या आक्रमणालाहि शंकराचें हृदय जिंकतां आलें नाहीं, हें पाहून पार्वतीची आपल्या हृदयेश्वराला प्राप्त करून घेण्याची मनीषा अगदीं अनावर झाली, असें कदाचित् कवीला म्हणावयाचें असेल. पण नवशिके-पणामुळे त्यानें जो श्लोक लिहून ठेविला आहे, त्याचा अर्थ तसा होत नाहीं. अशा प्रकारें ग्रीक परंपरेच्या प्रभावाला बळी पडलेल्या या कवीच्या हातून कुमारसंभवां-तील तारकासुरवधाचें ग्रीकविरोधी आख्यान लिहिलें गेलें नाहीं, यांत कांहींच नवल

नाहीं. भारतावर आक्रमण करणाऱ्या ग्रीक राजात मेनाद्र, आपोलोदोतुस् हे सारेच स्वतःला तारक म्हणजे सोतेर म्हणवीत असत.

## अशोकाचे धर्माधिकारी

कालिदासाला मौर्यांच्या धर्मकारणाची आणि राजकारणाची उत्कृष्ट माहिती होती, इतकेंच नव्हे तर त्यानें अशोकाचे शिलालेख आणि स्तभलेख अतिशय चिकित्सक बुद्धीनें वाचले होते. उदाहरणार्थ, शाकुंतलाच्या पहिल्या अंकांत राजा आश्रमकन्यासमोर प्रकट होताना म्हणतो. 'यः पौरवेण राज्ञा धर्माधिकारे नियुक्तः सोऽहं आश्रमिणां अविघ्नक्रियोपालभाय धर्मारण्य इदं आयातः ॥' म्हणजे पौरव राजानें मला धर्माधिकारावर नेमलें असल्यानें आश्रमांतील धर्मक्रिया निर्विघ्नपणें चालत आहेत कीं नाहींत, हें पाहण्याकरिता पर्यवेक्षक या नात्यानें मीं इथें आलों आहे. कौटल्याच्या अर्थशास्त्रांत अशा प्रकारच्या धर्माधिकाऱ्याचा कोठेंच उल्लेख येत नाहीं; इतकेंच नव्हे तर आपण स्वतःच हे अधिकारी पहिल्याप्रथम नेमल्याचा अशोकानें अभिमानानें उल्लेख केला आहे. हे अधिकारी ग्रीक गुनाइकोनोमोस् अथवा रोमन् सेन्सॉर या अधिकाऱ्याच्या अनुकरणानें निर्माण केले होते, हें उघड आहे. मिनाडरप्रभृति ग्रीक सुखान्त नाटककार या अधिकाऱ्यांचा आपल्याला नाटकातून सामान्यतः उपहासपूर्वकच उल्लेख करितात. प्रजेचा धर्मच्छळ करण्याकरिता आणि अनियंत्रित राजसत्ता स्थापण्याकरिता रोमच्या सम्राटांना या अधिकाऱ्याचा अतिशय उपयोग झाला. अशोकाच्या राज्यातहि हे अधिकारी वर उल्लेखिलेले उद्योग करून आपली उपयुक्तता राजाला पटवून देत असतीलच. पुष्पमित्राच्या साम्राज्यात या अधिकाऱ्याना स्थान मिळाले होतें कीं नाहीं, याची माहिती उपलब्ध नाहीं. पुढे तर या अधिकाऱ्याचा लोपच झाला. अशोकाच्या या धर्मकारणाप्रमाणेंच त्याच्या परराष्ट्रीय राजकारणाचाहि कालिदासाला पुरेसा परिचय होता. कुमारसंभवात इंद्रानें तारकासुराची म्हणजे मौर्य सम्राटांनीं ग्रीक तारकासुराची कशी आराधना आरंभिली होती, याचें वर्णन करताना कवि म्हणतो, 'तत्कृतानुग्रहापेक्षी त मुहुर्दूतहारितैः । अनुकूलयतींद्रोऽपि कल्पद्रुमविभूषणैः ॥ इत्थम् आराध्यमानोऽपि क्लिश्नाति भुवनत्रयम् । शाम्येत् प्रत्यपकारेण नोपकारेण दुर्जनः ॥' तारकासुराकडे पुनः पुनः दूताकडून कल्पद्रुमाचीं विभूषणें पाठवून त्याला अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न मौर्य सम्राट् करीत होता. अशी आराधना चालली असतानासुद्धा तो दुर्जन त्रिभुवनाला उपद्रव देत होताच. कारण दुर्जनाची शांति उपकारानें होत नसून प्रत्य-

पकारानेंच होते. या श्लोकातून कालिदासानें वर्णिल्याप्रमाणें अशोक राजा ग्रीक तारकासुराकडे वारवार दूत पाठवून आणि त्याच्या प्रजेवर परोपकार करून त्याना आपल्या पक्षाला अनूकूल करून घेण्याचा प्रयत्न करीत होता. इतकेंच नव्हे तर त्यानें आपल्या पुत्रपौत्राना आपलेंच धोरण वशपरपरेनें चालविण्याची आज्ञा करून ग्रीका-विरुद्ध प्रत्यपकाराचें धोरण स्वीकारावयाचें नाहीं, असें बजावून ठेविलें होते. शुगाभिमानी कालिदासाला हा सारा इतिहास सुविदित असल्यामुळेंच अशोकपथी राजकारणाचें आविष्करण करणारे वरील श्लोक त्यानें लिहिले आहेत.

## आक्षेपार्ह आठवा सर्ग

आनदवर्धनादि श्रेष्ठ साहित्यशास्त्रज्ञाच्या दृष्टीनें कुमारसभवाचा आठवा सर्ग हा हीन अभिरुचीचा द्योतक आहे. या सर्गातल्यासारखेंच जगन्मातापित्याच्या रतोत्सवाचें वर्णन स्टोइक पथाचा आद्य आचार्य झेनो, याचा शिष्य खुसिप्पुस् यानें केले असल्याचा उल्लेख ग्रीक इतिहासात आढळतो. ‘ Diogenes Laertius reports a tradition that his account of the intercourse of Zeus and Hera was regarded as most obscene, and more appropriate to harlots than deities. ( अलेक्झाडरपासून कॉन्स्टटाइनपर्यंत ले. अर्नेस्ट बार्कर, पान न. ४३ ) खुसिप्पुस् हा स्टोइक् पथाचा तिसरा आचार्य झाल्यामुळें त्याच्या लेखनाचा ग्रीक लोकात पुष्कळच प्रसार झाला असला पाहिजे. आज-कालहि इग्लिश, फ्रेंच अश्लील वाङ्मयाचीं हस्तलिखितें आपल्या देशात कशीं प्रसृत होतात, हें ज्यांना माहीत असेल, त्याना ख्रुसिप्पुस्च्या अश्लील लेखनाचा पंजाबातील ग्रीक राज्यांतून किती मोठ्या प्रमाणावर प्रसार झाला असेल, याची कल्पना येईल. ‘ The gay or fantastic aspects of love-making are confined to the Gods. They have their own rules and their own licence. ’ म्हणजे प्रणयक्रीडेचें वर्णनच करावयाचें झाल्यास, तें देवदेवींच्या प्रणयाचेंच करावें, म्हणजे त्यात अतिशयोक्तीचा दोष येत नाहीं अशी ग्रीकाची समजूत होती.



प्रकरण अकरावें

# कालिदासाचा मेघसंदेश

## कामिनींचे चार आदर्श

कालिदासाचा मेघसदेश हातीं घेतला म्हणजे प्राचीन भारताच्या मानानें अर्वाचीन भारतात प्रणयाच्या आर्ततेचा आणि आर्द्रतेचा अभाव असल्याची मनाला जाणीव होते. कारण प्राचीन भारतातील काम आणि रति या देवतांच्या स्थानावर आता अर्थ आणि मति याची स्थापना झाली असल्यानें अर्वाचीन भारतांतील किशोरी आणि युवती रतिव्हीनससारख्या प्रणयदेवताची उपासना वर्ज्य करून मोठ्या प्रमाणावर शारदामिनर्व्हाच्या सारख्या विद्यादेवीच्या उपासिका बनत आहेत. ग्रीकरोमन समाजानें आकृति, प्रकृति आणि कृति याच्या अनुरोधानें अगनांचे जूनो, व्हीनस, मिनर्व्हा आणि डायाना असे चार आदर्श कल्पिलेले आहेत. त्यापैकीं जूपिटरची मानिनी गृहिणी जूनो ही आपल्यातली सती, व्हल्कनची रूपसम्राज्ञी पत्नी व्हीनस ही रति, जुपिटरच्या शीर्षापासून जन्मलेली मिनर्व्हा ही शारदा आणि युद्धप्रिय डायाना ही दुर्गा असे आपल्यातहि चार आदर्श कल्पिता येतील. या चार आदर्श देवतापैकीं मिनर्व्हा-शारदेला सस्कृत काव्यातील प्रणयिनी नायिकेच्या तनूवर आवश्यक असलेले स्तननितबाचें वैभव अभावानें लाभलेलें असतें. आणि आपणासारीखें करीती तात्काळ या न्यायानें ही देवता आपल्या उपासिकांसहि आपलाच आकार अर्पण करते. हा अनुभव काहीं मला आज नवीन आलेला नाहीं. एका पिढीपूर्वींच चद्रप्रभेच्या दुसऱ्या शतकात मी म्हटलें आहे. ' नसे तव तनु प्रभे, प्रणयदेवतेच्या परी । तरी यवनशारदा असशि तू मिनर्व्हा खरी ।। तव प्रिय खगापरी भ्रमविसी कवीसी तमीं, । उलूकसम त्यामुळें बनतसे जनद्वेष्य मी ।। मति प्रिय तुला, तरी मज गमे जरा शीत ती । तव स्मरणि लोपता स्वमति हर्ष होई किती ।। भुलेल कवि कें वि तें हृदयगुह्य सर्वोत्तम ? । विचार वितरी जरा, वितरि भावना यौवन ।। " असल्या अकालजरेच्या छायेनें आच्छन्न झालेल्या बुद्धि-वादिनींच्या वर्तुळात सचार करणाऱ्या कालिदासभक्ताला आपल्या आदर्श-कवीच्या

भावनांशीं सहजरीतीनें समरस होता येणार नाहीं. तरीसुद्धां कालिदासकविता नव वयः । असला अनुभव आज घेणाऱ्या पिढीला कालिदासकालीन वातावरणाची थोडीफार कल्पना यावी, यासाठीं हा प्रबंध लिहिण्याचा उपक्रम करीत आहे.

## वेदाभ्यासजडाची टीका

पण इथें दुसरी शंका अशी येते कीं, दाशराज्ञ युद्धाच्या इतिहासकारानें आपल्या कवितेला हात लाविला तर तें कवीला कितपत रुचेल ? कारण स्वतःच्या नायिकासृष्टीसंबंधीं कालिदासानें विक्रमोर्वशीयात पुढील अविस्मरणीय उद्गार काढले आहेत.

" अस्याः सर्गविधौ प्रजापतिरभूत् चंद्रो नु कांतिप्रदः । शृंगारैकरसः स्वयं नु मदनो मासो नु पुष्पाकरः । वेदाभ्यासजडः कथं नु विषयव्यावृत्तकौतूहलो । निर्मातुं प्रभवेन्मनोहरमिदं रूपं पुराणो मुनिः ।। ' असल्या श्लोकातून नायिकेचें वर्णन करण्याच्या निमित्तानें स्वतःच्या कवितेचें वर्णन करण्याची कालिदासाची सवय सुविदित असल्यानें माझ्यासारख्या वेदाभ्यासकाला त्याच्या कवितेला स्पर्श करण्याचा संकोचच वाटतो. पण असल्या संकोचाची कल्पनाहि ज्याच्या मनाला कधीं शिवली नाहीं, अशा प्रो. कीथसारख्या विख्यात वेदाभ्यासजडानीं ' पद्दा उघडिलें हृदयाला, आत सुखें घाला भाला, ' अशी काव्यप्रकाशनानंतर कवीची अगतिक अवस्था होत असल्याचा दुरुपयोग करून यापूर्वींच कालिदासाच्या हृदयात भाला घातला आहे. विरही यक्षाचे विरहतरंग हा मेघसंदेशाचा विषय नसून नवपरिणीत वधूपासून एकाएकीं अनपेक्षितरीत्या वियुक्त झालेल्या यक्षानें आपल्या प्राणप्रियेला विरहवेदनाची निदारुणता निस्सीम करणाऱ्या वर्षा ऋतूत प्राणधारणा करण्याला साहाय्यभूत होण्यासाठीं धाडलेला संदेश हा त्याचा वास्तविक विषय असल्याचें लक्षातसुद्धां न घेता प्रो. कीथ यानीं निःशंकपणें कालिदासावर शस्त्र चालविलें आहे. ' मेघसंदेशा 'तील नायकनायिकासंबधीं विवेचन करताना ते म्हणतात—

## कीथ यांचे आक्षेप

" Their severance is but temporary, their reunion certain and the grief of the hero seems thus to modern feeling less than manly, for to us, as to the greatest of Greek historians, courage to endure what is sent by heaven appears the duty of

man. Schiller, who in his Maria Stuart makes the captive queen bid the clouds as they fly south, greet the land of her happy youth, uses the 'motif' in more effective guise. The hapless queen is well aware that for her there is no more chance of seeing again the fair land of France and her position evokes true pathos.' म्हणजे कालिदासाच्या यक्षयक्षिणींचा वियोग केवळ तात्कालिक आहे, त्याचें पुनर्मीलन निश्चित आहे. अर्थात्, या विरही द्वद्वापैकीं कोणीहि विरह-वेदनांना किंवा कामज्वराला बळी पडलें नाहीं, तरच त्याचें पुनर्मीलन होऊं शकेल आणि याकरिताच कालिदासानें आपल्या यक्षाला 'दयिताजीवितालबनार्थी,' बनविलें आहे, ही गोष्ट प्रो. कीथ सपशेल विसरून गेले आहेत. असो. अशा परिस्थितींत दैवानें आपल्यावर आणलेली आपदा मुकाट्यानें सोसणें हेंच त्याचें खरें कर्तव्य. पण कालिदासाचा यक्ष प्रो. कीथ याच्या या आदर्शाप्रमाणें किंवा आदेशाप्रमाणें न वागता आपल्या प्रियेला सदेश पाठवितो, या वैगुण्यामुळें त्याना तो किंपुरुषच वाटतो. मला स्वत:ला तर 'मेघसदेश' पाठविणारा कालिदासाचा नायक हा विद्युत्सदेश पाठविणाऱ्या शास्त्रज्ञाचा अग्रदूतच वाटतो. पण ही अवांतर गोष्ट आहे. त्याच्या उलट जर्मन कवि शिल्लेरची नायिका स्कॉटलडची मेरी स्टुअर्ट ही जेव्हा बदिशालेंतुन दक्षिणगामी मेघांच्या द्वारा आपल्या यौवनाच्या यक्षभूमीला अथवा आनदभुवन फ्रान्सला अतिम सदेश पाठविते, तेव्हा मात्र त्या सदेशाने खऱ्या करुणरसाचा परिपोष होतो. कारण आपल्या पतीचा देश पुन्हा पाहण्याची तिला आशा उरली नव्हती.

## शिल्लेरचा मेघसंदेश

वरील उताऱ्यांत प्रो. कीथ यानीं कालिदासावर घेतलेले आक्षेप किती फोल आहेत, हें मी जाता जाता दाखविलेंच आहे. पण ज्या प्रसगीं शिल्लेर कवीनें खऱ्या करुणरसाचा परिपोष केला असल्याचा आभास प्रो. कीथ यानीं निर्माण केला आहे. त्या प्रसगाचा आता परिचय करून घेतला पाहिजे. मी स्वतः मेरी स्टुअर्ट हें नाटक वाचलें नाहीं. पण शिल्लेरच्या एका इग्रजी चरित्रांत त्याच्या मेघसदेशाचा पुढील अनुवाद पाहिला आहे.

" And yonder clouds that southward drive,
They seek the distant sea of France.

Ye ships of air, that freely roam,
Oh greet for me my youth's dear home.
Beneath the yoke I sadly bend,
I cannot other herald send.
Your path hath ever open been,
Not ruled are ye by this stern queen."

मेरी राणीच्या या उद्‌गारात शिल्लरनें कालिदासाची कल्पना उसनी घेऊन करुणरसाचा परिपोष कितपत केला आहे, याची वाचकाना आता कल्पना आलीच असेल. एवढाच जर मूळ जर्मन नाटकातला संदेश असला तर मला या प्रसगीं मेरी राणीप्रमाणेंच तिच्या कवीचीहि कींव करावीशी वाटतें. सावरकराच्या 'सागरास' या कवितेशींसुद्धां मेरी राणीच्या या उद्‌गाराची तुलना करतां येणार नाहीं. मग कालिदासाच्या मेघसंदेशाशीं त्याची तुलना करण्याची गोष्ट दूरच राहिली. या उद्‌गारांच्या पुढचा प्रसगहि प्रो. कीथ याच्या प्रतिपादनाशीं विसगतच आहे. 'Queen's maid still expostulates, but Mary turns aside her warnings, pointing to a fisherman who trims his boat, and trying to persuade herself that he may perhaps bear her to her friends.' म्हणजे राणीची दासी कल्पनातरगावर वहात जाण्याबद्दल तिचा निषेध करीत असताना, समुद्रतीरावर नौका दुरुस्त करीत असलेल्या एका कोळयाकडे अंगुलिनिर्देश करून ती म्हणते कीं, हा कोळीसुद्धा कदाचित् मला माझ्या मित्र-मंडळींत नेऊन सोडील. असल्या तुच्छ तुलनानीं प्रो. कीथ याच्यासारख्या ब्रिटिश संस्कृतज्ञाच्या पक्षपातीपणाचा प्रत्यक्ष प्रत्यय येतो. एवढयाकरिताच हा संदर्भ शोधण्याचा खटाटोप करावा लागला. असो.

## परिस्थितींतील प्रभेद

कालिदासाचा यक्ष प्रियावियोगानें व्यथित होतो. एवढयावरून प्रो. कीथ याच्या मनात त्याच्याविषयीं अपौरुषेय वर्तनाचा अपवाद येऊ शकतो, ही घटनाच 'मेघसंदेशा'च्या काळातील परिस्थितीविषयींच्या त्याच्या अज्ञानाची द्योतक आहे. त्याना ही गोष्ट कळायला हवी होती कीं, कालिदासाचा 'मेघसंदेश' हा वर्तमान-काळच्या विद्युत् संदेशाच्या आणि विद्युद्दीपाच्या युगात प्राचीन भारतातील तमिस्र युगाचें एक प्रतीकच भासत असल्यानें प्रस्तुत काळाच्या दृष्टीनें या काव्याची

चिकित्सा करण्याचा प्रयत्न व्यर्थ आहे. कारण वर उल्लेख केल्याप्रमाणें कालिदासाच्या काळीं तमिस्र युगातील ज्या काम आणि रति या दैवताची महा समारोहानें आराधना चालू होती, त्याच्या स्थानावर आता प्रकाशयुगातील अर्थ आणि मति या दैवतांची प्राणप्रतिष्ठा झाली आहे. आजकालच्या आकाशवाणीच्या आणि चलत्‌चित्रपटाच्या विरस आणि विद्रूप विश्वातील विकृत वासनाच्या प्रदर्शनांत, कालिदासकालीन ग्रहतारामंडित आणि निःशब्दतिमिरवेष्टित कामजीवनात जी अव्याज आतुरता आणि आर्द्रता अनुभवाला येते, तिचा लवलेशसुद्धा आढळून येत नाहीं.

## सामाजिक जीवनाचा अभाव

कालिदासकालीन नवपरिणीताच्या कामार्ततेचें आणखी एक महत्त्वाचें कारण हें आहे कीं, तेव्हा विवाहित बालेला तिच्या कामजीवनाव्यतिरिक्त इतर काहीं धार्मिक किंवा सामाजिक जीवन होतें, असें निदान कालिदासाच्या ग्रथावरून तरी दिसून येत नाहीं. इंग्लंडात दुसऱ्या चार्लस्‌च्या राजवटींत क्रॉम्वेलच्या प्यूरिटन पथाविरुद्ध जशी प्रतिक्रिया झाली होती, तिच्यासारखीच प्रतिक्रिया मौर्ययुगातील भिक्षु राज्याविरुद्ध शुंगयुगातील भारतात झाली होती. त्या युगातील सनातन धर्माच्या अनुयायाचें सास्कृतिक जीवन बौद्धादि पाखडाच्या आक्रमणामुळें पूर्वींच नष्टप्राय झालें होतें आणि त्या नष्टप्राय झालेल्या वैदिक सास्कृतिक जीवनाचा अभाव पौराणिक हिंदु धर्माच्या अभ्युदयानें उल्लेख करण्याइतपतहि भरून काढला नव्हता. त्यामुळें कालिदासाच्या काळची कामजीवनापासून वंचित झालेली विरहिणी अगदींच एकाकी असे. इतकेंच नव्हे, तर तिचें एकाकित्वहि त्या काळीं उदयाला येत असलेल्या बौद्ध तत्त्वज्ञानातील शून्यवादाइतकें शून्य असे. कवींद्रवचनसमुच्चयातील एका अनामिक कवीनें म्हटले आहे, ‘ प्रकटयति क्षणभग पश्यति सर्वं जगद्‌गत शून्यम् । आचरति स्मृतिबाह्य जाता सा बौद्धबुद्धिरिव ।। ’ कालिदासाच्या काळीं प्रोषितभर्तृकेला शून्यवादाचें प्रतीक मानत असले तर तिच्या प्रवासी पतीला बहुधा ‘ सर्वं दुःख, सर्वं क्षणिकं ’ या तत्वाचे प्रतिनिधि मानीत असावेत. ही वस्तुस्थिति लक्षात घेतल्यावांचून ‘ मेघसंदेशा ’ची पार्श्वभूमि कळणें अशक्य आहे. असो. ‘ प्रत्यासन्ने नभसि ’ या उल्लेखाप्रमाणें जो नभोमास अथवा श्रावणमास जवळ आल्यामुळें कालिदासाच्या यक्षाला आपल्या विरहिणी बालेच्या जीविताविषयीं शंका वाटूं लागली, तो श्रावण तर आता नववधूच्या आणि प्रवीण गृहिणींच्या उत्सवांनीं आणि व्रतांनीं गजबजलेला असतो. कालिदासकालीन नववधू सद्यःकालीन नववधू-

प्रमाणें श्रावणातला पहिला मगळवार उलटताच माहेरीं जात असती तर मेघ-सदेशाच्या नायकाला विरहाची व्यथा निमूटपणें न सोसण्याबद्दल प्रो. कीथ याचीं बोलणीं खावीं लागलीं नसतीं. उलट त्यानेंहि असाच सदेश पाठविला असता कीं, तू श्रावणात मगळागौरीची, भाद्रपदात हरितालिकेची, आश्विनात महालक्ष्मीची आणि कार्तिकात तुळशीसहित महाविष्णूची मनोभावानें उपासना कर. त्यांच्या कृपाप्रसादाने शापाचा अवधि सपताच आपलें लागलीच मीलन होईल. असें न कळविता तो तिला सदेश काय पाठवितो. तर ' शापान्तो मे भुजगशयनादुत्थिते शार्ङ्गपाणौ शेषान् मासान् गमय चतुरो लोचने मीलयित्वा ' म्हणजे आज हिंदूंच्या व्रतानीं आणि उत्सवानीं आनदमुखर झालेला काळ तू निमीलितलोचना होऊन कसातरी व्यतीत कर. याचा एक अर्थ असा होतो कीं, स्वतःच्या श्रेष्ठत्वाच्या समजुतीनें साऱ्या जगाशीं संबध तोडलेल्या समाजबाह्य दपतीच्या विरहांतील वेदना-पूर्ण जीवनाचें चित्रण कालिदासानें मेघसदेशात केलें आहे. 'नन्वात्मान बहु विगणयन् आत्मनैवालबे । तत्कल्याणि त्वमपि नितरा मा गमः कातरत्वम ।। ' या वचनावरून आणि स्वतः यक्षाच्या देवयोनीवरून वरील कल्पनेला थोडा दुजोराहि मिळतो. पण या वचनाचा दुसराहि अर्थ करतां येईल. सर्वस्त्री स्वावलबी व्यक्तीलाच प्रणयात पडून परवशतेचे आणि परावलबनाचें किंवा परस्परावलबनाचें सयुक्तसुख सपूर्णपणें अनुभवता येतें. या सुखाची एकदा चटक लागलेला आपला प्रियतम आतां कोणावर अवलबून रहात आहे, अशी मनाला अत्यत व्यग्र करणारी चिंता प्रियेला जडू नये, म्हणूनहि यक्षानें असा सदेश पाठविला असेल. पण त्यापेक्षा आजकालचीं बहुतेक सारीं व्रतें आणि उत्सव तेव्हा अस्तित्वातच आले नसावेत आणि आपलें धार्मिक आणि सामाजिक जीवन वर्षाऋतूतील सर्व सकटांवर मात करण्याइतकें प्रभावी बनलें नसावें, हेंच खरें. ' निद्रा शनैः केशवमभ्युपैति द्रुतं नदी सागरमभ्युपैति

हृष्टा बलाकाघनमभ्युपैति । काता सकामा प्रियमभ्युपैति ।।

प्रोष्ठपद मासात म्हणजे भाद्रपदात वर्षा ऋतूचें आगमन होत असतांना रामानें केलेल्या या वर्णनात आणि श्रावणात त्याच ऋतूचें आगमन होत असताना कालिदासाच्या यक्षानें केलेल्या वर्षावर्णनात वस्तुतः काहींच भेद आढळून येत नाहीं. यामुळें रामगिर्याश्रमातील विरही यक्षाला विरही रामाच्या जीवनाशीं सहज समरस होता आलें. पण तितक्या सहज रीतीनें अर्वाचीन विरही नायकांना कालि-दासाच्या यक्षाशीं समरस होतां येत नाहीं.

## भारतीय प्रियांची विरहभीरुता

आपल्या प्रेयसीच्या विरहभीरुतेचें वर्णन करताना ' विक्रमोर्वशीया 'त राजा उर्वशीला उद्देशून म्हणतो, ' श्रमखेदसुप्तमपि मा शयने या गम्यसे प्रवासगतम् । सा त्व प्रिये सहेथाः कथ मदीय चिरवियोगम् ।। ' मीलनाच्या क्षणींसुद्धा अतिस्नेहानें पापशकी अशा भीरु, भारतीय प्रेयसीला आश्वासनें देऊन तिचें समाधान करणें अवघड जातें. त्यामुळें ती विरहानलात दग्ध होत असता तिचें पदोपदीं परोपरीनें स्मरण होऊन प्रियकराचा शोक अनावर झाला तर त्यात नवल काय ? मीर कवीनें म्हटलेंच आहे. ' वस्लमें रग उड गया मेरा । क्या जुदाईको मुह दिखाऊगा ।। मीलनाच्या प्रसगींच माझ्या मुखावरील रग उडून गेला तर विरहाला मी मुख तरी कसें दाखवू ? मीर कवीचा हा अनुभव कालिदासाच्या यक्षालाहि आला होता. त्याच्या बाहुपाशात निद्रामग्न झालेली प्रेयसी एकदा स्फुदस्फुदून रडतच जागी झाली. तेव्हा पुनः पुनः खोदून विचारल्यानतर तिनें एकदाचें उत्तर दिलें. " दृष्टः स्वप्ने कितव रमयन् काम् अपि त्व मयेति । " पण कामी जनाच्या हृदयाची प्रो. कीथ याच्यासारख्या स्कॉटलडच्या दऱ्याखोऱ्यातील अर्थप्रधान लोकाना कल्पना तरी कशी येणार ? असल्याच अरसिकांना अनुलक्षून अमरुककवीनें पुढील मार्मिक श्लोक लिहिला आहे.

" धीर वारिधरस्य वारिकिरतः श्रुत्वा निशीथे ध्वनिम् ।
दीर्घोच्छ्वासमुदश्रुणा विरहिणीं बाला चिर ध्यायता ।
अध्वन्येन विमुक्तकंठमखिला रात्रिं तथाक्रदितम् ।
ग्रामीणैः पुनरध्वगस्य वसतिर्ग्रामे निषिद्धा यथा ।।

धीरें वर्षतसे पयोधर तमीं ऐकूनि त्याचा ध्वनि ।
दीर्घोच्छ्वासविसर्जनीं विरहिणी बाला मनीं आणुनी ।।
कठी पाथ विमुक्तकंठरुदनीं ऐशी तदा यामिनी ।
पाथाची वसति निषिद्ध करिती ग्रामस्थ कीं तेथुनी ।। "

प्रो. कीथ याचा जन्म बहुधा याच खेड्यात झाला असावा. भारतीय बालाच्या विरहभीरुतेची यथार्थ कल्पना वाचकाना अमरुक कवीच्या पुढील श्लोकावरून येईल.

" प्रहरविरतौ मध्ये वाह्नस्ततोऽपि परेण वा ।
किमुत सकले याते वाह्नि प्रिय त्वमिहैष्यसि ।।

इति दिनशतप्राप्यं देश प्रियस्य यियासतो ।
हरति गमन बालालापैः सबाष्प गलज्जलैः ।। ”
प्रहर सरता, मध्यान्हीं वा, तया पुढतीं हि वा, ।
दिन सकल कीं जाता येणें घडेल प्रिया वदा ।।
शत दिन पथीं लागे ऐशा विदेशिंहि जावया ।
रमण सजता रोधी बाला सबाष्पवचें तया ।।

अशा सरलेचा विश्वासघात करून विदेशीं जाण्याची तर गोष्ट दूरच राहिली पण अलकेंतल्या अलकेंतसुद्धा धनपतीच्या कामानिमित्तहि कालिदासाचा यक्ष प्रियेपासून फार वेळ दूर राहू शकत नव्हता, असें कवीनें मेघसदेशाच्या पहिल्याच ओळींत सकृद्दर्शनीं सागितलें आहे. ‘ कश्चित्कांताविरहगुरुणा स्वाधिकारात्प्रमत्तः । ’ असल्याच प्रसगाला अनुलक्षून अमीर मीनाईनें म्हटलें आहे. ‘ बदा अगर कसूर न करता तो कसूर था. ’ कालिदासाच्या यक्षानें धनपतीचा अपराध केला नसता तर तो प्रणयाच्या राज्यात अपराध ठरला असता. दुसऱ्या एका उर्दू कवीनें म्हटलें आहे. ‘ ऐ, बूतों, तुमसे आख चुराए हो कभीं । हश्रमेंभी, मुझे अल्लाका दीदार न हो ।। ’ हे सुदरींनो, तुमच्यावरून दृष्टि काढून मी जर ती अन्यत्र लाविली तर अतिम न्यायदिनाच्या प्रसगींसुद्धा मला अल्लाचें दर्शन न होवो.

## विरहांत प्रतिभेची जागृति

इथें मला अशी शका येते कीं, केवळ भारतीय बालाच्या विरहभीरुतेमुळें यक्षकालिदासाच्या हातून धनपतीच्या कामात दुर्लक्ष झालें होतें कीं प्रियाविरहाच्या क्षणीं तिच्या स्मृतीसहच प्रतिभा जागृत झाल्यामुळें त्याच्याकडून सरकारी कामात दुर्लक्ष घडलें होतें ! ‘ कोण्या एका यक्षें केलें अलक्ष अपुल्या कामीं । तेणें कोपुनि शापी त्यातें धनद तयाचा स्वामी. ’ या कै. कृष्णशास्त्र्यांच्या अनुवादात कांताविरहभीरुतेचा उल्लेख नसल्यामुळें ती शका दृढमूल होते. पुष्कळदा प्रियेच्या प्रभावानेंच प्रथम प्रतिभा प्रकट होते, पण प्रकट होणाऱ्या प्रतिभेचा विषय प्रिया हाच असला म्हणजे प्रियेच्या वास्तविक अस्तित्वात तिच्या काल्पनिक अस्तित्वाची भर पडून या परस्परावलबी, पण परस्परविरोधी प्रियापैकीं कोणत्या प्रियेची केव्हा आराधना करावयाची, तसेंच परस्पराचा मत्सर करणाऱ्या या दोन प्रियाशीं एकट्या प्रेमिक कवीनें प्रामाणिक कसें रहावयाचें, असा त्याला प्रश्नच पडतो. ‘ लक्ष्मीस्वयंवर ’

नाटकांत अभिनय करणाऱ्या ' विक्रमोर्वशीयां 'तील उर्वशीनें पुरुषोत्तम नांवाच्या स्थानीं पुरूरव्याचें नाव घेऊन असाच वास्तव जीवन आणि कलात्मक जीवन याचा सकर केला आहे. प्रियेच्या वास्तव आणि अवास्तव जगतातील अस्तित्वाचा ' विक्रमोर्वशीया 'तील उर्वशीप्रमाणेंच एकसमयावच्छेदेंकरून अनुभव येऊ लागला म्हणजे प्रेमिक कवीचें मन उन्मादावस्थेच्या प्रलयलोकाकडे जाऊ लागतें आणि कवीची प्रियाहि त्याच्या काव्यलोकातील स्वर्गीय पण शापित अशा ' एकांताच्या कुमारवनामध्यें ' प्रविष्ट होऊन तेथील कल्पलता बनून जाते या दृष्टीनें कोणी अद्यापि ' विक्रमोर्वशीया 'चा विचार केला नसावा. ' यदृच्छया त्व सकृदप्यवध्ययोः । पथि स्थिता सुदरि यस्य नेत्रयोः ॥ त्वया विना सोऽपि समुत्सुको भवेत् ' । या श्लोकातला अवध्य अर्थात् प्रतिसृष्टिशक्तिसंपन्न नेत्राचा उल्लेख अतिशय महत्त्वाचा आहे. अशा नेत्राना चिरतन बदी करून ठेवण्याला एक कटाक्षच पुरतो. हसरत मोहानीनें म्हटलें आहे, ' यकहि बार हुवे वजह गिरफ्तारिए दिल । इल्तिफात उनकी निगाहोंने दूबारा न किया ' म्हणजे मनाला अटक करण्याकरिता एकदाच तिनें दृष्टिक्षेप केला, दुसऱ्यादा कटाक्ष टाकण्याचें तिला कारणच पडलें नाहीं. हसरतच्या ध्यानात ही गोष्ट येत नाहीं कीं तिच्या पहिल्या कटाक्षाची स्मृतिच अन्य कटाक्षाच्या मार्गातील अतराय होऊन बसते. सहृदयाचा अनुभव असाच आहे. " मदीय मनिं सचरे मदिर यौवनीं जो स्मर । वदे ' प्रियतमेविना अपर सर्व तूं विस्मर '॥ अतां विरहमंदिरीं अतिथि होउनी नेहमीं । बने स्मृतिच विघ्न कीं स्वपनसगिनीसंगमीं. " ' विक्रमोर्वशीया 'च्या चौथ्या अकात उर्वशीची स्मृतिच पुरूरव्याच्या पुनर्मीलनातील विघ्न होऊन बसली होती. अशा परिस्थितींत क्षणभर तरी त्या संगमनीय मण्यानें त्याचें मनोहरण केलें, तेव्हाच त्याचें उर्वशीशीं पुनर्मीलन होऊं शकलें. बहुधा ' विक्रमोर्वशीया'तील या अनुभवानें सावध होऊन ' मेघसंदेशा'तील कविनायकानें धनपतीकडून शाप संपादन करून कवितेच्या कल्पलोकातील प्रियेच्या आराधनेला अत्यत उपयुक्त अशा रामगिर्याश्रमात वाल्मीकीच्या महाकाव्याचें नित्य पठण करण्याचा नियम करून निवास केला असावा. अलकेंतील ' कमलभक्षका 'च्या समाजादून रामगिर्याश्रमातील पवित्र आश्रमांत यक्षकालिदासाचें स्थलातर झालें नसतें तर ' मेघसदेशा 'सारखें अमर काव्य पृथ्वीतलावर अवतीर्णच झालें नसतें. यापुढें जाऊन यक्षकालिदासाची कुचेष्टा करणाऱ्या कीथ महाशयाच्या अनुयायाना मला असें सागावयाचें आहे कीं, रामगिर्याश्रमांत ' मेघसंदेशा 'ची रचना

झाली नसती तर कालिदासाच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें या प्रेमी दंपतीचें पुनर्मीलनहि झालें नसतें.

## दोन मीलनांतील अंतर

या कविकुलगुरूंच्या विचारसरणीप्रमाणें मीलनापूर्वीच्या वियोगात उभय प्रेमिकातील अंतर हें त्यांच्या समागमातील विघ्न असलें तरी प्रथम मीलनानंतरच्या वियोगात काळ हा प्रेमिकाचा वैरी असतो. प्रेमिकाच्या प्रथममीलनाच्या प्रसंगीं त्या उभयतामध्यें अंतरानें आणलेल्या अंतरायाचें निराकरण करावयाचें असतें तर त्यांच्या पुनर्मीलनाच्या प्रसंगीं त्या विरहार्त दंपतीमध्यें काळानें आणलेल्या अंतरायाचें निराकरण करावयाचें असतें. या दोन मीलनात इतका प्रभेद कशानें पडतो, याचा विचार केला पाहिजे. प्रथममीलनाच्या प्रसंगीं कामनापूर्तीचा स्वर्ग प्राप्त करून घेणें हें प्रेमिकाचें उद्दिष्ट असतें. पण ही गोष्ट तेव्हां त्यांना माहीत नसते कीं प्रथम मीलनाचा अनुभव येताच हा स्वर्ग लोप पावतो. कारण हा स्वर्ग उभय प्रेमिकांतील अंतरावर अवलंबून असतो आणि तें अंतर नष्ट होताच तो स्वर्ग पण नष्ट होतो. आजकालच्या प्रणयजीवनांत प्रणयी युग्मातील या अंतराची अवहेलना होत असल्यानें अनेकदा कामनापूर्तीची इच्छाच नष्ट होऊन हा स्वर्ग लुप्त होतो. असो. कालिदासाच्या मताप्रमाणें प्रीतीचा पहिला उपचार जें चुंबन, त्याची अलौकिक माधुरी तें अचुंबित राहण्यांतच असते. चुंबनाच्या प्रसंगीं प्रियेच्या मुखकमलाकडे प्रेमिकाचें मुख जात असताना प्रियेची मुद्रा एका क्षणात असंख्य रूपें धारण करून त्याला चकवूं पहात असते आणि यामुळें त्याच्या कामनेची आतुरता देहाच्या मर्यादा कशी उल्लंघूं पहात असते, स्वेद आणि कंप यांच्या अतिरेकानें प्रियेला एखाद्या अप्सरेची शोभा कशी प्राप्त होते, तिच्या मादक गंधाच्या आघ्राणानें आपली इहलोकाची स्मृति कशी विवश होते, इत्यादि अनुभवावरच चुंबनाचें अलौकिक आल्हादकारित्व अवलंबून असतें. एकदा ओठाना ओठ भिडले, नेत्राना प्रियेचें रूप आणि रूपांतरें दिसेनाशीं झालीं, कुस्करलेल्या नाकपुड्याना तिचा गंध येत नाहींसा झाला म्हणजे चुंबनाचें सुख, तें प्राप्त करून घेण्याची तळमळ आणि तें न लाभल्याची निराशा याचा बहुतांशीं निरास होतो. त्यामुळें गडकऱ्यांच्या 'ओसाड आडातील' एकाच 'फुला' प्रमाणें विरस आणि भ्रमरहित होऊन प्रेमिक प्रियेपासून दूर सरतो. कालिदासानें शाकुंतलात अचुंबित चुंबनाचा जो प्रसंग दाखविला आहे तो केवळ साहित्यशास्त्राच्या आदर्शानुसार

नसून उपभोग घेण्याच्या शास्त्रांतील एका प्रमुख प्रमेयाचेंहि त्यानें त्या ठिकाणीं प्रदर्शन केलें आहे. असो. इंद्रियोपभोगाचा आनंद हा आकर्षण आणि विकर्षण या तत्त्वाच्या अधीन असतो आणि त्याचा सारा भर पुनरुक्तीवर असतो. या पुनरुक्तीचा वीट येऊ नये म्हणून कालिदासानें 'ऋतुसंहारां'त षड्ऋतूंच्या चित्राविचित्र सृष्टिसौंदर्याच्या पार्श्वभूमीवर विंध्य पर्वताच्या परिसरांतील प्रणयजीवनाचीं चित्रें रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. पण अशा प्रकारें पार्श्वभूमि बदलून किंवा देशांतरीं प्रवास करीत असतांना पुनः पुनः प्रणयिनी बदलून प्रणयजीवनाला पहिल्या मधुचंद्राच्या अनुभवाचा अलौकिकपणा पुन: प्राप्त करून घेतां येत नाहीं. याप्रमाणें इंद्रियोपभोगाची अपूर्वाई नष्ट होणें हेंच काळानें आणलेलें प्रणयाच्या मार्गांतील विघ्न होय. या निर्वाणप्राप्तीनंतर प्रणयाचें पुनरुज्जीवन करावयाचें असल्यास प्रेमिकांना या उपभोगांना नवजीवन प्राप्त करून देणारी आकर्षणविकर्षणाच्या भौतिक नियमांपलीकडील अभिनव सृष्टि निर्माण करावी लागते. ही अभिनव सृष्टि अर्थात् कल्पनेची सृष्टि होय. पण कल्पनेला वास्तविक जगाचा आणि वर्तमानकाळाचा उपभोग घेता येत नसल्यानें प्रथम मनासह सर्व इंद्रियांना मोहनिद्रेत निमग्न करणें आणि मग त्यांना अवास्तव जगात आणि अवर्तमानकाळांत जाग आणणें, त्याचप्रमाणें विषयभोगाच्या क्षणिक आनंदाची कलेच्या चिरंतन आनंदात परिणति घडवून आणणें, हीच कल्पनेची उपभोग घेण्याची प्रक्रिया होऊन बसते. कारण कल्पनेचें जग हेंच कलेचें जग. याच विचारसरणीच्या अनुरोधानें कालिदासानें शाकुंतलाच्या पाचव्या अंकांत दुष्यंताची 'साक्षात्प्रियामुपगतामपहाय पूर्वम् । चित्रार्पितां पुनरिमां बहु मन्यमानः ।।' या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें वास्तव विश्वातील मोहनिद्रा आणि सहाव्या अंकांत कलेच्या जगातील जागृति दाखविली आहे. कलेच्या स्वर्गांतच प्रणयी जनांचें पुनर्मीलन घडून येणें शक्य आहे, असाहि कालिदासाचा अभिप्राय असल्याचें अनुमान 'शाकुंतला'च्या शेवटच्या अंकावरून आणि 'मेघसंदेशां'तील शेवटच्या श्लोकावरून काढता येतें.

## कालिदासकालीन विदिशा

असल्या आध्यात्मिक कलाप्रधान विचारसरणीशीं सर्वस्वीं विसंगत असें वर्तन कालिदासकालापूर्वींच्या अर्धशतकात शुंग साम्राज्याच्या अंतिम अधिपतींनीं आणि त्यांच्या दिगंतविख्यात विदिशा राजधानींतील नागरिकांनीं चालविलें होतें.

शुंगयुगातील उद्दाम कामजीवनाचें प्रतीक म्हणून कालिदासाला 'मेघसंदेशां' त दशार्ण देशाची राजधानी विदिशा आणि तिच्या शेजारचा 'नीचैः गिरिः' याचा उल्लेख करणें भाग पडलें आहे.

"तेषा दिक्षु प्रथितविदिशालक्षणा राजधानीम् ।
गत्वा सद्यः फलमविकल कामुकत्वस्य लब्धा ।।
तीरोपान्तस्ततिनतसुभग पास्यसि स्वादु यस्मात् ।
सभ्रूभग मुखमिव पयो वेत्रवत्याश्चलोर्मि ।।

नीचैराख्य गिरिमधिवसेः तत्र विश्रामहेतोः ।
त्वत्संपर्कात् पुलकितमिव प्रौढपुष्पैः कदंबैः ।।
यः पुण्यस्त्रीरतिपरिमलोद्गारिभिर्नागराणाम् ।
उद्दामानि प्रथयति शिलावेश्मभिर्यौवनानि ।"

आपल्या पुण्यनगरीचा अनुभव असा आहे कीं राजधानीसन्निध असलेल्या टेकड्यातून तेथील नागरिकांच्या जाग्रत् दैवतांचें निवासस्थान असतें आणि त्या दैवतांचे नैमित्तिक उत्सव हें त्या राजधानींतील सांस्कृतिक जीवनाचें एक महत्त्वाचें अंग असतें. याच्या उलट विदिशा नगरीशेजारच्या नीचैः गिरीचा त्याच्या नांवाला शोभेल, असाच उपयोग कालिदासकालीं चालू होता. विदिशेच्या शुंग घराण्यातील शेवटच्या सम्राटाचा अन्त त्याच्या उद्दाम कामजीवनात कसा झाला, हें बाणभट्टानें सांगितलेंच आहे. 'अतिस्त्रीसगरतं अनगपरवश शुग अमात्यो वसुदेवो देवभूति दासीदुहित्रा देवीव्यजनया वीतजीवित अकारयत् ।' कालिदासकृत 'मालविकाग्निमित्रा'च्या नायकाचा आत्मज अथवा अग्रज सुमित्र याचा अन्त नर्तकच्छद्मधारी मूलदेवानें केल्याचा उल्लेखहि हर्षचारित्रांत आला आहे. असल्या उद्दाम कामजीवनाची परंपरा प्रचलित असलेल्या विदिशेच्या वैभवावर विनाशाची विषण्ण छाया पडल्यानंतर गुप्तकाळांतील विदिशेच्या विजेत्यांनीं पूर्वीच्या पण्यस्त्रीरतिपरिमलित अशा नीचैः गिरीवर सुंदर लेणीं खोदून तिथें धर्माची पुनश्च प्राणप्रतिष्ठा केली. 'गुप्तविषयक मोहिनी' या लेखात म. म. मिराशी लिहितात 'द्वितीय चंद्रगुप्ताचा माडलिक महाराज सनकानीक यानें भिलसाजवळच्या उदयगिरी टेकडींत (प्राचीन नीचैः गिरिः) सहा क्रमांकाचें लेणें कोरविलें. त्यांत विष्णु आणि महिषासुरमर्दिनी यांच्या मूर्ति कोरल्या आहेत. त्यांत त्याचा लेखहि आहे. तेथील पांच क्रमांकाच्या लेण्यांत विष्णूच्या वराह अवताराची सुप्रसिद्ध मूर्ति आहे. इतर लेण्यांत कार्तिकेय,

एकमुखलिंग आणि अष्टमातृका कोरल्या आहेत. उदयगिरीचीं हीं लेणीं गुप्तकालीन होत, यांत संशय नाहीं. " म. म. मिराशींनीं उदयगिरींतील लेण्याची जी माहिती आपल्याला पुरविली आहे, तिच्याशीं सर्वस्वीं विसंगत असें ' मेघसंदेशा 'तील वर्णन असून उलटपक्षीं शुंग सम्राटाच्या इतिहासाशीं तें पूर्णपणें सुसंगत असें आहे. तरीसुद्धा या वस्तुस्थितीवरून निघणारीं अनुमानें म. म. मिराशी मान्य करणार नाहींत, असें प्रश्नज्योतिषावरून मी आताच सांगू शकतों. असो.

## कामाचा धर्मार्थविरोध

शुंग युगांत काम या पुरुषार्थाचा धर्म आणि अर्थ या दोन्ही पुरुषार्थांशीं बहुधा विरोध येत असावा. उर्दू कवितेंत मुख्यतः प्रेम आणि धर्म याचाच विरोध वर्णिलेला असतो. ' सख्त काफिर था जिसने पहले मीर । मजहबे इश्कको इख्तियार किया । ' म्हणजे प्रथम ज्यानें प्रेमाच्या पथानें जावयाचें ठरविलें, तो अगदीं पुरता काफिर असला पाहिजे. पण कालिदासाच्या विरहभीरु आणि कौलीनभीरु यक्षावर धनपतीचा क्रोध झाला होता, हें ' धनपतिक्रोधविश्लेषितस्य ' या पदावरून स्पष्ट आहे. कवि कालिदासाला श्रीची प्रतिकूलता पदोपदीं जाणवत होती, असें ' न स्यात् अन्योऽप्यहमिवजनो यः पराधीनवृत्तिः ' ' निसर्गभिन्नास्पदमेकसंस्थम् । अस्मिन् द्वयं श्रीश्च सरस्वतीच ॥ ' अथवा ' संगत श्रीसरस्वत्योर्भूतयेऽस्तु सदा सताम् ॥ ' यासारख्या वचनावरून स्पष्ट दिसतें. या वचनांतील सरस्वती आणि श्री याचा विरोध म्हणजे प्रतिभा आणि प्रतिष्ठा या तत्त्वांतील विरोध होय. प्रतिभा ही इतराना आपलें अनुकरण करावयाला लावते आणि प्रतिष्ठा ही त्यांना आपलें अनुसरण करावयाला लावते प्रतिभासंपन्न व्यक्ति प्रतिभेच्या प्रभावानें अन्य जनाना वश करून घेतात. उलटपक्षीं प्रतिष्ठा प्राप्त झाल्यानें प्रभावी बनलेल्या व्यक्ति इतरे-जनांना आपलें दास्य करावयाला लावतात. ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे प्रतिभा आणि प्रतिष्ठा यांच्यांतील विरोध हा शोपेनहौएरच्या तत्त्वज्ञानांतील बुद्धि आणि इच्छाशक्ति याच्यातील सनातन विरोध असल्याचें सुव्यक्त होतें. इच्छाशक्तीच्या दास्यांतून बुद्धि स्वतंत्र होऊन तिनें मानवाला आत्मविस्मृत बनविल्यावांचून आणि परिणामीं जीवनाचा विश्वासघात करावयाला लाविल्यावाचून कलेची निर्मिति होऊं शकत नाहीं, असा शोपेनहौएरचा सिद्धात आहे.

'The intellect which has arisen merely for the service of the will, and with almost all men remains in that service in

which and in its product its life is consumed, is in all arts and sciences illegitimately used, and in this use is placed the progress and the honour of the human race,'

म्हणजे मानवाला जी बुद्धि लाभली आहे, ती मुख्यतः जीवनाचें दास्य करण्याकरितां लाभली आहे. आणि त्याप्रमाणें सामान्य जनाची बुद्धि अगदीं आयुष्याच्या अन्तापर्यंतसुद्धा या दास्यातून कधीं मुक्त होत नाहीं. पण कांहीं अपवादात्मक व्यक्तींना अतिरिक्त बुद्धीची देणगी मिळाल्यानें त्या व्यक्ति प्रचलित जीवनाकडे पाठ फिरवून प्रतिसृष्टीची निर्मिति करण्याच्या उद्योगाला लागतात. या त्यांच्या अवैध कर्तृत्वानें मानव समाजाची प्रगति आणि कीर्ति होऊ शकते. 'मेघसंदेशा'तील यक्षाला जो शाप लाभला होता, तसलाच शाप आपल्या प्रचलित जीवनाकडे पाठ फिरविणाऱ्या शकुंतलेलाहि लाभला होता. ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे कथानकरचनेंतील एक क्लृप्ति म्हणून कालिदास शापाचा उपयोग करीत नसून या शापाचें तत्त्वज्ञानच त्याच्या जीवनाच्या तत्त्वज्ञानाशीं एकजीव झालें असल्याचें आदळून येतें. तात्कालिक दृष्टीनें पाहू गेल्यास या शापामुळें शापित व्यक्तीच्या जीवनात प्रथम इतकेंच परिवर्तन घडून येतें कीं विकासवादातील नैसर्गिक निर्वाचनाच्या ( natural selection ) तत्त्वाकडे आणि जीवनार्थ कलहाच्या व्यवसायाकडे दुर्लक्ष करून यौन निर्वाचनाच्या तत्त्वाला प्राधान्य देणाऱ्या त्या व्यक्तींवर काहीं काळापर्यंत कामजीवनापासून प्रवंचित होणाचा प्रसंग येतो. पण त्यामुळेंच त्या प्रवंचित कामजीवनाचें प्रतिभेच्या राज्यात चिरतन स्मारक उभें रहातें. फिराक कवीनें म्हटलेंच आहे, 'अहले जनून को वसअत कुछ और मिल गये | दिल बढ गये हैं पावोंमे जजीर देखकर' म्हणजे उद्भ्रांत व्यक्तीला आता नवा उपनिवेशच लाभला आहे; कारण पायात शृंखला पडल्यानें त्याच्या हृदयाचा विस्तार वाढला आहे. कालिदासाच्या साऱ्या साहित्यावर काश्मीर देशातील प्रत्यभिज्ञा सिद्धाताचा फार मोठा प्रभाव पडला असल्याचें यापूर्वींच अनेक पंडितानीं दाखवून दिलें आहे. या प्रत्यभिज्ञासिद्धाताचें शोपेनहॉएरच्या इच्छाशक्तीच्या तत्त्वज्ञानाशीं अतिशय सादृश्य आहे. यासाठीं या दोन तत्त्वज्ञानाच्या मूलभूत सिद्धातांशीं परिचय करून घेतल्यावाचून त्याच्या ग्रथाची रचना आणि त्याचप्रमाणें कालिदासाची एकंदर भूमिका याची यथार्थ कल्पना योणार नाहीं. पण हा विषय प्रस्तुत प्रबंधाच्या कक्षेबाहेरचा असल्यानें ही चर्चा इथेंच स्थगित करणें भाग आहे.

## मेघसंदेशाचा खरा नायक

एका काल्पनिक यक्षाला कालिदासानें मेघदूताचा नायक बनविला असला तरी त्या अमर काव्याचा खरा नायक प्रणयाच्या धुदींत अर्थयुगांतील कर्तव्याकडे दुर्लक्ष करणारा स्वतः कविच आहे, हें सागायला नको. सामाजिक कर्तव्यांकडे कवि लोक नेहमीच न्यूनाधिक प्रमाणात दुर्लक्ष करीत असतात. त्यामुळें कवि आणि समाज याचे सबंधहि कधीं फारसे चागले नसतात. समाजाचें अंतिम ध्येय समाजहित हेंच असल्यानें समाज हा नेहमीच स्वतःला स्वतःचें ध्येय समजत असतो. त्याच्या उलट कवि हा समाजाला आपलें अधिष्ठान मात्र मानतो. त्यामुळें जीवनाचा विचार कर्तव्यकर्माच्या दृष्टीनें, पापपुण्याच्या दृष्टीनें करण्याची समाजाची प्रवृत्ति असते. त्याच्या उलट सौंदर्योपासनेच्या दृष्टीनें, कलेच्या दृष्टीनें, विशेषतः प्रतिभेला प्रेरणा देणाऱ्या प्रणयजीवनाच्या दृष्टीनें आपल्या आयुष्याकडे पाहण्याची कवीची प्रवृत्ति असते. यामुळें इंग्लडफ्रान्ससारख्या मनःपूत आचरणाच्या देशातूनसुद्धा कवींना आणि त्याच्यासारख्या इतर कलावताना नेहमीं बोहेमियन म्हणजे भटके, उडाणटप्पू, समाजबाह्य अशाच सज्ञा देतात.

## चिरंतन प्रवासी

कालिदासासारखे सौंदर्योपासक हे मनोजगतांत काय किंवा दृश्य जगतात काय नेहमी प्रवासीच असतात. ‘ कायदा पाळा गतीचा, थाबला तो सपला ’ हाच त्याच्या जीवनाचा नियम. त्यातून कालिदासाचें मन समकालीन विलासांना विमुख नसलें तरी आपल्या आयुष्याला अचानक रम्योदात्त स्वरूप प्राप्त करून देऊं शकेल, अशा आदर्श प्रणयाच्या चिंतनात निमग्न झालें होतें. एका राजकन्येशीं त्याचा विवाह झाला होता, असें आख्यायिका सागतात. स्वतः विक्रमादित्याच्या भगिनीला उद्देशून त्यानें मेघदूत लिहिलें, अशी परपरा प्रचलित आहे. या परंपरेंत तथ्य असो, किंवा नसो, त्याचें मन हें नेहमीच भूतकालीन आदर्श प्रणयाच्या चिंतनांत तल्लीन झालेलें दिसे आणि त्याचे चरण या पुरातन प्रणयाच्या लीलाभूमिवर संचार करीत असलेले आढळून येत. उदाहरणार्थ, राजकन्या मालविकेचा राजकारणाशीं संलग्न असलेला प्रणय, अप्सरा उर्वशीचा अनिर्बंध प्रणय, आश्रमकन्या शकुंतलेचा नैसर्गिक प्रणय, किंवा विदर्भ राजकुमारी इंदुमतीचा स्वयवर अथवा मेघदूतात उल्लेखिलेल्या उदयनकथेंतील वासवदत्तेचा कलासक्त प्रणय असल्या विभिन्न प्रकारांच्या प्रणयाच्या चिंतनांत त्याची प्रतिभा नेहमीच निमग्न होत असे. आपल्यापूर्वीं ज्यांनीं भगवान्

कामदेवाच्या उपासनेप्रीत्यर्थ सर्वस्व पणाला लाविलें होतें, त्याच्या विषयीं त्याला उत्कट सहानुभूति वाटे. अशा प्रकारें आदर्श आणि अलौकिक प्रणयांच्या चिंतनात निमग्न झालेले सौंदर्योपासक हे स्वाभाविकपणेंच दिवसाच्या कर्तव्याला विमुख आणि विनिद्र बनतात. हे सौंदर्योपासक नैसर्गिक निर्वाचनाच्या प्रभावक्षेत्रातून बाहेर पडून ज्या यौन निर्वाचनाच्या प्रभावक्षेत्रांत प्रविष्ट होतात, त्या क्षेत्रांतील दिवसाचा आरंभच मुळीं सूर्यास्तानंतर होतो. रात्रिवर्णनांत महाकवि भारवीनें म्हटलें आहे.

एकतामिव गतस्य विवेकः । कस्यचित् न महतोऽप्युपलेभे ।।
भास्वता निदधिरे भुवनानाम् । आत्मनीव पतितेन विशेषाः ।।

भारवीच्या म्हणण्याप्रमाणें निशेच्या प्रभावानें वास्तव जगातील सारे भेदाभेद आणि विशेष विलुप्त होऊन हें जगत् स्वप्न जगताच्या अभिसाराला निघालें, म्हणजे रवींद्रनाथाच्या 'क्षुधित पाषाण' या कथेंतील नायकाप्रमाणें सौंदर्योपासकांच्या अंतःकरणात जन्मांतरसौहृदाचें अतींद्रिय अनुभव जाग्रत् होऊन जें आकस्मिक परिवर्तन घडून येतें, त्याची प्रणयप्रभावानें नुसता निद्रानाशाचा विकारहि ज्याना कधीं जन्मात जडला नाहीं, अशा अभाग्याना कल्पना तरी कशी येणार ? या सौंदर्योपासक निशाचराना समानधर्म्यांच्या व्यतिरिक्त इतर सर्व व्यक्ति निद्रेच्या साम्राज्यात निरर्थक जीवन जगत असलेल्या दिसू लागतात. असल्या दीपशिखा कालिदासाना असा अभिमान वाटू लागतो कीं, या निद्रामग्न समाजात आपणच तेवढे जाग्रत् चिरप्रवासी, निद्रातुराच्या मदालसा महाराणीविरुद्ध विद्रोहाचा ध्वज उभारून तिच्या साम्राज्यात सर्वत्र संचार करीत आहोत. याच साम्राज्यांतील बंदि-शालेंत आपली जन्मान्तरींची आदर्श प्रणयिनी आपल्या आकस्मिक आगमनाचें तेंच तें स्वप्न पुनः पुनः अनुभवण्यांत दंग झाली आहे, धर्म आणि अर्थ यानीं तिच्यांत आणि आपल्यात अलघ्य अंतराय निर्माण केले आहेत, तिच्याकडे जावयाच्या मार्गांवर कनिष्ठ कामजीवनातील मोहिनीचें दुर्निवार मोहजाल पसरलें आहे, आणि हा अंतरायसंकुल पथ अंतहीन आशा आणि अजेय आदर्श याचें पाथेय घेऊन आपण क्रमीत आहोत.

कालिदासानें पूर्वमेघांत 'ज्ञातास्वादो विवृतजघनां को विहातु समर्थः ।' किंवा 'यः पण्यस्त्रीरतिपरिमलोद्गारिभिः नागराणाम् । उद्दामानि प्रथयति शिला-वेश्मभिः यौवनानि ।' अथवा 'लोलापांगैर्यदि न रमसे लोचनैः वञ्चितोऽसि ।'

यांसारखीं जीं वर्णनें समाविष्ट केलीं आहेत, तीं मुख्यतः अलकेच्या मार्गावरील मोहजाल उल्लंघून जाणें किती दुष्कर आहे, हें दाखविण्यासाठींच घातलेलीं आहेत. उत्तर मेघाच्या रूपानें तर कालिदासानें आपल्या अतहीन आशेचा आणि अजेय आदर्शाचा चिरंतन जयस्तभच उभारलेला आहे.

कालिदासाच्या यक्षासारखे आदर्शवादी सौंदर्योपासक हे नेहमीच व्यवहार-चतुर जनाच्या उपहासाचें आणि उपरोधाचें प्रसगविशेषीं उपद्रवाचेंहि लक्ष्य बनतात यात काहींच नवल नाहीं. कविराय गालिब यानींहि एकदा सखेद उद्‌गार काढले आहेत कीं, मी स्वतः यौवनात प्रवेश करून प्रेमवेडा बनण्यापूर्वीं इतर प्रेमवेड्याना खडे मारीत होतों. ( याद आता है के हमने भी बचपनमें मजनू पर संग उठाया था । नक्की ओळी स्मरत नाहींत. ) या सौंदर्योपासक भ्रात कवींना व्यवहारांत प्रत्यक्ष लाभ काय होतो, हें पुढील श्लोकांत सागितलें आहे.

सा तन्वीति घनस्तनीति विकसल्लीलाब्जनेत्रेतिच ।
स्वैर संचरतीति वक्ति मधुरा वाच विचित्रामपि ।।
इत्थ विद्रुमपाटलाधरपुटां सीमान्तिनीं ध्यायतो ।
रोमाचो रुदित स्मित प्रलपित पाथस्य सजायते ।

रोमांच रुदन, स्मित आणि प्रलाप याचाच प्रणयभ्रांत मनाला प्रत्यक्ष लाभ व्हावयाचा, हें ठरलेलेंच आहे. पण या वस्तुस्थितीचें निमित्त करून प्रेमिकाचा उपहास करणाऱ्याना जोश कवीनें उत्तर दिलें आहे.

'इश्कमें कहते हैं के हैरान हो जाते हैं । यह नहीं कहते के इनसान हो जाते हैं ।'

म्हणजे प्रणयचिंतेनें मानव उद्‌भ्रांत होतो, असें सारेच सागतात. पण हे शहाणे असें नाहीं सागत कीं, त्यामुळेंच त्याला मानव्य प्राप्त होतें. या व्यवहार-वाद्याना प्रेमिक लोक बहुधा कधींच भीक घालीत नाहींत. त्याच्या मनावर थोडाफार परिणाम होतो, तो त्याच्यातल्या शून्यवाद्याचा. झेबुनिसेच्या पुढील करुण उद्‌गारांत याच शून्यवादाचा प्रतिध्वनि ऐकू येतो.

'गुफ्तम् अज् इश्के बुतान् । ऐ दिल चह हासिल कर्दह ।
गुफ़् मारा दिल बजूज । नालाहए हेच नीस्त ।।'

'मना, रूपसम्राज्ञींच्या प्रणयापासून तुला निश्चित प्राप्ति काय झाली ! ' मनानें उत्तर दिलें, 'अश्रु आणि निश्वास या व्यतिरिक्त कांहींहि नाहीं.'

झेबुनिसेच्या या महाशून्याच्या उलट कालिदासाच्या दुष्यंताच्या पुढील उद्गारांत क्षणिकवादाची छटा आढळून येते.

'स्वप्नो नु माया नु मतिभ्रमो नु । क्लिष्टं नु तावत् फलमेव पुण्यम् ।
असनिवृत्यै तदतीतमेते । मनोरथानामतटप्रपातः ।। '

पण खरेच का या जगात मनोरथाना कांहींच अर्थ नसेल! या सृष्टीच्या जीवनात अर्थयुगाची अमावास्या ओलांडून कामयुगाची कोजागिरी कधींच कां उगवणार नसेल! पुराकालांतील उर्वशी, शकुतला, इंदुमती, वासवदत्ता आणि मालविका या साऱ्याच सुंदरींचा पुनर्भव नीललोहितानें सपवून का टाकला असेल! अर्जुनबृहन्नडेनें झिडकारिल्यापासून उर्वशीच्या अभिसाराची निशा नित्याचीच कां उजाडली असेल! दुर्दैवाने या साऱ्या प्रश्नाना प्रतिकूल उत्तरें मिळालीं तरी विदग्ध मदनाप्रमाणें विदेही बनलेल्या या आदर्श सुदरींना स्वहृदयातील रक्त समर्पण करून पुनश्च पृथ्वीवर साकार केल्यास आपल्या आदर्श प्रणयिनीच्या समागमाचें सुख लाभल्यावाचून कसें राहील ? याच प्रतिज्ञेनें आपल्या अमर नायिकाची सृष्टि करणाऱ्या कालिदासाला त्याच्या आदर्श प्रणयाचा शोध लागला होता, असें शाकुतलाच्या सहाव्या अकांतील सानुमतीच्या उद्गारावरून कळून येतें. 'अथवा ईदृशोऽनुरागोऽभिज्ञानमपेक्षते, कथमिवैतत् । असा हा पराकोटीला गेलेला अनुराग बाह्य अभिज्ञानाची अपेक्षा करतो, हें किती विचित्र आहे!' 'मेघदूतांत' अर्थयुगाच्या अभिशापामुळें प्रेमिकांत अतराय निर्माण झाला असल्यानें असा बाह्य अभिज्ञानाचा प्रश्न उद्भवत नाहीं. त्याच्या उलट 'शाकुतला'त धर्माच्या प्रभावानें प्रेमिकाचा विच्छेद घडवून आणला असल्यानें बाह्य अभिज्ञानाची आवश्यकता निर्माण झाली आहे कीं काय, हा विचार करण्याजोगा प्रश्न आहे. असो.

## ऋतुसंहारावरील आक्षेप

'मेघसदेशा'तील ज्या कांतेच्या आसक्तीमुळें यक्षकालिदासावर धनपतीचा क्रोध झाला, त्या आसक्तीची 'ऋतुसहार' काव्यावरून पुरेशी कल्पना येऊं शकते. 'मेघदूताती'ल प्रियाविरह ही केवळ ऋतुसहारांतील अतिरेकाला गेलेल्या प्रियासक्तीची प्रतिक्रिया आहे, असेंसुद्धा म्हणतां येईल. एका अर्थी ऋतुसहारातील षड्ऋतूचें वर्णन हा कालिदासाचा कालचक्रातील प्रवास असून 'मेघसदेशा'तील प्रवास हा दिक्चक्रातील प्रवास आहे. ऋतुसंहारांतील अतिरिक्त प्रियासक्तीला रवींद्रनाथाच्या निखिलेशानें दोष दिला आहे. 'कालिदासेर ऋतु-

संहार काव्येर उपर बराबर आमार एकटी घृणा आछे. पृथिवीर समस्त फूलेर साजि, समस्त फलेर डालि, केवल मात्र प्रेयसीर काछे पडे, पचशरेर पूजार उपचार जोगाचे, जगतेर आनदलीलाके एमन करे मानुष क्षुण्ण करते पारे कि ! ' म्हणजे ' कालिदासाच्या ऋतुसंहार काव्याचा मला सकारण तिरस्कार वाटत आला आहे. पृथ्वींतील साऱ्या फुलाचे साज, साऱ्या फळाचे सभार एकट्या प्रेयसीच्या चरणीं अर्पण होऊन पचशराच्या पूजेचीं साधनें बनत आहेत, साऱ्या जगाच्या आनंद-लीलेला इतकी क्षुण्ण, इतकी वैचित्र्यशून्य मानव करू शकतो तरी कसा ! ' पण असा प्रश्न रवींद्रनाथाना कां पडावा याचेंच मला आश्चर्य वाटतें. ' स्वतत्र मनुजाप्रती जग जरी दिसे विस्तृत । असे प्रणयपूजका तरि अतीव आकुचित. । ' ही वस्तु-स्थिति साऱ्याच कवींना सुविदित आहे. ऋतुसंहारात प्रियासक्तीचा अतिरेक झाला आहे असें गृहीत धरलें तरी प्रत्येक कवीच्या विकासात हें ऋतुसहाराचें युग एकदा येऊन जातेंच. मात्र या युगाचें स्मारक सर्वच कवींच्या जीवनात चिरतन होईल, असें नाहीं. यौवनाच्या आरभीं जेव्हा शब्दस्पर्शरूपरसगधाचें मायाजाल मनावर पसरलेलें असतें आणि Nun du bist meine, and das meine ist meiner als jemals म्हणजे आता तू माझी झाल्यानें प्रत्येक वस्तु मला दुप्पट माझी वाटू लागली आहे, अशी कवीची मन:स्थिति असते. अशा समयीं प्रत्येक ऋतूंतील विशिष्ट सृष्टिसौंदर्यसुरेच्या सयुक्त सेवनाने प्रतिक्षणीं प्रणयाला अपूर्वता प्राप्त करून देण्याची कामना अनावर झाल्यास त्यात नवल काय ? अशा या ऋतुसहाराच्या युगांत सर्व कर्तव्यकर्मांचें विस्मरण होणें, कविसदनातील धन स्मृतिशेष होणें, धनदानें त्याच्यावर कोप करणें आणि त्याला सुधारण्याचा एकमेव मार्ग म्हणून कवीला प्रवासाला धाडणें या साऱ्या घटना अत्यत स्वाभाविक आहेत. मला नेहमींच अशी शका येते कीं प्रवासाला निघण्यापूर्वीं कालिदासाची प्रतिभा त्याच्या हृदयारण्याला उल्लघून गेलीच नसावी. हें हृदयारण्य विरहानलानें दग्ध आणि विदग्ध झाल्यावांचून कवीच्या प्रतिभेला अन्य हृदयारण्यांचें सौंदर्य आणि त्यातून आगमननिर्गमनाचे मार्ग विदित होत नाहींत. कवीची इतकी प्रगति झाली म्हणजे तो सर्वसाक्षी ईश्वरा-प्रमाणें सर्व पापपुण्याचें निरीक्षण करीत समाजात सचार करण्याला समर्थ होतो. पण तत्पूर्वीं मालार्मेनें म्हटल्याप्रमाणें ( Il se promene lisant au livre de luimeme ) स्वतःचा हृदयग्रथ वाचीत वाचीतच तो समाजांत वावरत असून समाजाचें अवलोकन करता न भ्रमत असतो.

## पथिक आणि कल्पनाविलासी

पथ आणि पथिक याचा सबध कल्पना आणि कल्पनाविलासी व्यक्ति यांच्या सबधासारखाच असतो. पथ मानवाला त्याच्या सकुचित क्षितिजापासून मुक्त करून देशांतराच्या प्रवासाला नेतो. तर कल्पना मानवाला युगातराच्या प्रवासाला नेते. पथ आणि कल्पना स्वतः अचल राहून मनुष्याच्या मनांत अविश्राम गति निर्माण करतात. या उभयताच्या साहाय्यानें मानव दिक् आणि काल यांचा अशेष उपभोग घेतो. अतहीन पथ, अनत काल, अविश्राम गति, कोणा आनदविव्हल विधात्यानें मानवाला या महाशून्याचें आधिपत्य अर्पण केलें आहे न कळे. पण या असीम वैभवाचीच त्याला पुढें भीति वाटू लागते. हें वैभव काहीं स्वतःच ध्येय नव्हे. अंतहीन पथ झाला तरी तो जननातरींच्या प्रियेच्या निवासस्थानाकडे जाण्यासाठींच नाहीं का ? या आदर्श प्रणयिनीच्या ध्यानातच अनत कालाची सार्थकता नाहीं का ? ही अविश्राम गति प्रियतमेच्या दर्शनाची उत्सुकताच व्यक्त करीत नाहीं का ? त्या आदर्श जीवनदेवतेच्या अभावीं हें शून्य जीवन किती भयानक ! आपल्या भ्रात जीवनाचें हें वास्तविक स्वरूप कळून आल्यानतर भ्रमणशील कवीचें मन आपल्या निवासस्थानाकडे परत वळतें. कालिदासाच्या यक्षाप्रमाणें भ्रमणाप्रीत्यर्थ बाहेर पडण्यापूर्वी कवीला त्याच्या जीवनदेवतेचा साक्षात्कार झाला नसला तरी 'तुझें आहे तुजपाशीं । व्यर्थ कारे भ्रमतोसी ।' असा अंतिम अनुभव येऊन तोहि स्वसदनाकडे वळतो.

## प्रवासाचा पश्चात्ताप

कवीचें भ्रात मन जेव्हा स्वतःच्या निवासस्थानाकडे वळतें, तेव्हां प्रवासात पाहिलेलीं दृश्यें आणि घेतलेले उपभोग त्याला क्षुद्र वाटू लागतात. त्याच मानानें आपल्या मूलस्थानातील जीवन त्याला ऐश्वर्यपूर्ण आणि पावित्र्यपूर्ण वाटू लागतें. या अनुभवाची चर्चा करतांना

Der Gruene Heinrich' या ग्रथांत केलेरनें लिहिलें आहे, 'If you are ever parted from your home, and all that is dear to you, and wander about in a strange country, if you have seen much and experienced much, if you have cares and sorrows, and are, perhaps utterly wretched and forlorn, you will some night inevitably dream, that you are approaching your home,

you will see it shining and glittering in the loveliest colours, lovely and gracious figures will come fo meet you and then you will suddenly discover that you are ragged, naked and covered with dust. An indescribable feeling of shame and fear overcomes you, you try to cover yourself, to hide, and you wake up bathed in sweat. ' म्हणजे तुम्हाला जर कधीं देशत्याग करावा लागला, आपल्या प्रिय जनाचा आणि प्रियतम सस्कृतीचा वियोग सहन करावा लागला, त्याचप्रमाणें अगदीं परक्या देशांत निराश्रित निर्वासिताचें अत्यत कष्टमय जीवन कठावें लागलें तर कधीं ना कधीं तरी तुम्हाला असें स्वप्न पडेल कीं आपण आपल्या मूलस्थानाकडे परत आलों आहोंत, आपलें मूलस्थान एखाद्या वैभवशाली राजधानीप्रमाणें चमकत आणि शोभत आहे, उत्सववेष धारण केलेले सुदर प्रियजन आपल्याला भेटायला येत आहेत आणि त्याच्याकडे पाहून एकदम आपल्याला वाटेल कीं आपण अगदीं उघडे, नागडे, धुळीनें माखलेले आहोत आणि अशा प्रसगीं लाजेनें मेल्यासारखें होऊन आपलें अग झाकण्याचा प्रयत्न करीत असताना एकदम आपल्याला जाग येईल.

## हिमालयाचा कवि कालिदास

हें सारें विवेचन केलेरनें होमरच्या ऑडेसी या काव्यातील युलिसिस आणि नाउसिका यांच्या भेटीच्या प्रसंगाचें विशदीकरण करताना केलें आहे. पेनिलोपच्या पुनर्भेटीसाठीं आतुर झालेल्या युलिसिसच्या चारित्रातील काहीं प्रसंगाची मेघदूताच्या कथावस्तूशीं तुलना करण्याजोगी आहे. पण तत्पूर्वीं इथें ओघानेंच येणारा कालिदासाच्या मूलस्थानाचा प्रश्न सोडविला पाहिजे. कालिदासानें आपलें पहिलें काव्य ' ऋतुसहार ' हें विंध्य पर्वताच्या परिसरात लिहिलें असलें तरी त्या पर्वतावर त्याचें हिमालयाइतकें प्रेम असलेलें दिसून येत नाहीं. त्याच्या उलट कालिदासानें देवताचा आत्मा म्हणून ज्या हिमालयाचा उल्लेख केला आहे, तो पर्वत त्याच्या काव्याचाहि आत्मा आहे. ऋतुसहार आणि मालविकाग्निमित्र या विंध्य आणि विदर्भ प्रदेशातील दोन ग्रंथांव्यतिरिक्त कालिदासाच्या इतर सर्व कृतींच्या सविधानकाचा हिमालयाशीं प्रामुख्यानें सबंध येतो. मेघदूताचा अतिम सर्ग आणि कुमारसभवाचा आद्य सर्ग हिमालयालाच वाहिलेला आहे. कालिदास हिमालयाचा कवि, त्या पुण्यप्रदेशातील दैवतांचा पूजारी आणि भारताच्या उत्तरद्वाराचा पहारेकरी आहे. कालिदासाचा

हिमालयाशीं असलेला निकटचा संबध लक्षात घेतला म्हणजे हिमालयांतील शारदेचें निवासस्थान जें काश्मीर, तेंच त्याचें जन्मस्थान असलें पाहिजे हें उघड होतें. कालिदास हा शारदादेशीय असल्यामुळेंच शारदेनें त्याला 'त्वमेवाहं न संशयः' असें उत्तर दिल्याची आख्यायिका प्रचलित झाली आहे.

या पवित्र शारदाक्षेत्रांत चिरप्रवासानतर परत येताना कालिदासाला स्वसदनीं आपलें स्वागत कसें होईल, याविषयीं शंका आली असल्यास नवल नाहीं. यासाठींच त्यानें प्रियेला संदेश पाठविला आहे. 'मा कौलीनात् असितनयने मयि अविश्वासिनी भूः।' कालिदासाच्या चरित्रासबधीं अनेक कुत्सित आख्यायिका आजहि प्रचलित आहेत. तसल्या कांहीं आख्यायिका तेव्हाहि प्रचलित होत्या, असें वरील वचनावरून वाटतें. या साऱ्या लोकापवादाना तत्कालीन कौलीन वाङ्मयातहि स्थान मिळालें असेल. कारण नीचैःगिरीपासून कैलासशिखरापर्यंत संचार करण्याला कालिदासाची प्रतिभा समर्थ असली तरी इतर कविब्रुवाच्या प्रतिभेला नीचैःगिरीवरच नित्य निवास करावासे वाटणें स्वाभाविक आहे. कौलीन वाङ्मयाचा एकदरीने पुरुषापेक्षा स्त्रियांनाच अधिक उपद्रव होतो. अरसिकांकडून अपमान पावलेल्या भवभूतीनें म्हटलें आहे, 'यथा स्त्रीणा तथा वाचा साधुत्वे दुर्जनो जनः॥' पण आपल्या वाग्देवतेच्या असाधुत्वदोषाचा एखाद्या सुविदित स्त्रीच्या असाधुत्वदोषाच्या प्रदर्शनानें परिहार होतो, हें अलीकडील लेखकानीं शोधून काढलेलें दुर्जनमनाचें रहस्य उदात्त वातावरणात वावरणाऱ्या त्या अव्यवहारी कवीला कळणें अशक्य होतें. असो. कालिदासाच्या काव्यात असल्या कौलीनाला स्थान लाभलें नसलें तरी त्याच्या पूर्वमेघात अर्वाचीन वार्ताहरांच्या कौशल्याची पदोपदीं जाणीव होते. तथापि सरस्वतीचें तीर्थसेवन केल्यानें त्याचें सारस्वत त्याच्या मेघाप्रमाणेंच वर्णानें कृष्ण, पण अन्तःशुद्ध असेंच राहून गेलें आहे. त्यामुळें नीचैः गिरीपासून कैलास शिखरापर्यंत कालिदासाच्या प्रतिभेच्या संगतींत प्रतिक्षणीं प्रति भेच्या अधिकाधिक उच्च वातावरणात विहार करतांना मनाला इतका विस्मयानंद होतो.

---

प्रकरण बारावें

# भास आणि कालिदास

## भास नि कालिदास यांच्यांतील मतभेद

कालिदास हा राजकवि असल्यानें रघुवंशातील राजांचीं चरित्रें तत्कालीन लोकांना परंपरेनें जशीं माहीत होतीं, तशीं त्यानें वर्णिलीं नसतील, अशी शंका मला पूर्वींच आली होती. पण ती शंका प्रकटपणें व्यक्त करण्याला इतके दिवस कांहीं आधार मिळाला नव्हता, पण तो परवा एकाएकीं प्रतिमा नाटक चाळत असतांना सांपडला आहे. भासाच्या या नाटकाकडे संशोधकाचें लक्ष यापूर्वीं जें गेलें, तें केवळ रघुवंशांत दिलेलींच रामाच्या पूर्वजांचीं नांवें प्रतिमा नाटकांतहि आढळ-तात, यामुळे गेलें. पण त्यांच्या चरित्राविषयीं भासानें रघुवंशाहून अगदीं भिन्न माहिती दिली आहे, ही गोष्ट त्यांच्या लक्षांत कशी आली नाहीं, देव जाणें

रघुवंशांत कालिदासानें रघूच्या हातून विश्वजित् यज्ञ झाल्याचें वर्णन केलें आहे. याच्या उलट भासानें "विश्वजितो यज्ञस्य प्रवर्तयिता प्रज्वलितधर्मप्रदीपो दिलीपः" असा दिलीपाचा उल्लेख केला आहे. रघूच्या हातून एखादा मोठा पराक्रम घडला असावा, अशी शंकासुद्धा भासाच्या रघुवर्णनावरून येत नाहीं. कारण 'संवेशनोत्थापनयोरनेकब्राह्मणजनसहस्रप्रयुक्तपुण्याहशब्दरवो रघुः' एव-ढाच त्यानें रघूचा पराक्रम सांगितला आहे. यावरून रघूच्या यज्ञांतून सहस्रावधि ब्राह्मण जेवत होते, इतकाच बोध होतो. रघूच्या पुढें अजाचें जें वर्णन आलें आहे तें सकृत्दर्शनीं कालिदासाच्या वर्णनाशीं सदृश वाटलें तरी त्यांत महत्त्वाचा प्रभेद आहे. कारण 'प्रियावियोगनिर्वेदपरित्यक्तराज्यभारोऽवभृथस्नानप्रशांतरजा अजः' म्हणजे पत्नीवियोगानंतर अजानें अवभृथस्नानांत निमग्न होऊन आपल्या राजस भावनाची आग शमविली. या वाक्यावरून जरी रघुवंशाशीं विसंवाद उत्पन्न होत नाहीं, तरी भरताच्या त्यापुढील वाक्यावरून कालिदासाच्या अजचरित्रांत आणि पूर्वपरंपरेंत प्रभेद असावा अशी शंका येते. भरतानें अजाच्या प्रतिमेला वंदन करतांना म्हटलें आहे 'नमोऽस्तु श्लाघनीयपश्चात्तापाय' या वाक्यावरून

स्वाभाविकपणेंच असा संशय येतो कीं, आपल्या पत्नीच्या निधनाला स्वतः अजच कारणीभूत झाला असला पाहिजे. त्यावाचून काहीं त्याचा नातू भरत त्याच्या पश्चात्तापाचा उल्लेख करीत नाहीं. रघुवंशातील अजराजाच्या आख्यानावरूनहि वरील संशयाला दुजोरा मिळतो. कारण त्या आख्यानांतहि कालिदासानें अजपत्नी इंदुमती ही शापभ्रष्ट अप्सरा असून तिच्या शापाची समाप्ति होताच ती स्वर्गलोकीं निघून गेली, असें वर्णन केलें आहे. कालिदासाच्या काव्यातून नायकाचे दोष छपविण्यासाठीं शापांचा उपयोग केला जातो, हें आतां सुधीजनांना कळून चुकलें आहे. दुष्यंताच्या दुर्वर्तनावर पांघरूण घालण्यासाठीं दुर्वासाच्या शापाचा जसा त्यानें उपयोग केला आहे, तसाच अजाच्या अविवेकी कामुकतेचा शोचनीय परिणाम लपविण्यासाठीं त्यानें इंदुमतीला शाप झाल्याची कथा रचली आहे शापाची ढाल पुढें करून अजाचा बचाव केल्याबद्दल मी कालिदासाला दोष देत नाहीं. कारण राजकवि या नात्यानेंच नव्हे, तर केवळ कवि या नात्यानेंहि रसहानि होऊं न देता कथा सांगणें हें त्याचें कर्तव्यच होतें. मात्र त्याच्या कथानकावरून आपण आपली वंचना करून घेऊं नये.

## दिलीपाची महती

अज आणि इंदुमती याच्या आख्यायिकांतून कालिदासानें केलेल्या फेरफाराचें साहित्यिकदृष्ट्या समर्थन करता येतें. पण दिलीप आणि रघु याना जें कालिदासानें कमी अधिक महत्त्व दिलें आहे, त्याचें समर्थन ऐतिहासिक किंवा साहित्यिकदृष्ट्या होऊंच शकत नाहीं. दिलीपापेक्षा रघूला अधिक महत्त्व देऊन कालिदासाला आपल्या वाचकांच्या मनचक्षूंपुढें समकालीन घटनांचें चित्र उभें करावयाचें होतें असें गृहीत धरल्यावाचून रघुवंशाच्या पहिल्या पाच सर्गांचा उलगडाच होत नाहीं. रघुकुलाच्या इतिहासात दिलीपाचें किती महत्त्व आहे, याची सामान्य वाचकाना मुळींच माहिती नसल्यानें कालिदासानें त्याला किती गौणपणा दिला आहे, याची त्याना कल्पनाहि येत नाहीं. भारतातील द्रोणपर्वाच्या षोडशराजीय आख्यानांत दिलीप राजाविषयीं पुढील माहिती आली आहे. दिलीप हा पृथ्वीवरचा कुबेरच होता. त्यानें शेंकडों यज्ञ केले. यज्ञप्रक्रिया याच्या यज्ञांमुळेंच निश्चित झाली. सारी पृथ्वी यानें ब्राह्मणांना दान केली होती. सम्राट् आणि चक्रवर्ती म्हणून याचा निर्देश असतो. षोडशराजीय आख्यानातील सोळा चक्रवर्ती राजाच्या मालिकेंत याचा समावेश झाला असून रघूचा झालेला नाहीं, एवढ्या-

वरूनहि दिलीप आणि रघु याच्या ख्यातींत किती अंतर होतें, हें अर्वाचीन वाचकांना कळून येईल.

## दिलीपाचें श्रेय रघूला !

रघुवंशामध्यें दिलीपानें रघूला जन्म दिला, इतकेंच काय तें त्याचें महत्त्व आहे. त्याच्या अश्वमेधांचें श्रेयहि कालिदासानें पर्यायानें रघूलाच दिलें आहे. कारण रघु त्याच्या अश्वाचें संरक्षण करीत होता आणि प्रसंगविशेषीं त्या अश्वाकरितां प्रत्यक्ष इंद्राशीं युद्ध करावयालाहि धजला म्हणून दिलीपाला यज्ञफल प्राप्त झालें. अशा प्रकारें पद्धतशीर रीतीनें दिलीपाचें महत्त्व कमी करून रघूचें महत्त्व वाढविण्यानें, रघूचा पिता आणि रघु याच्या चरित्राच्या निमित्तानें विक्रमाचा पिता आणि विक्रम यांचीं वर्णनें लिहिण्याचा कालिदासाचा हेतु उघड होत आहे. नाहीं तर महाभारतासारख्या ग्रंथानीं आदरिलेल्या परंपरेंत त्याला फेरफार करण्याचें काहींच कारण नव्हतें.

## कालिदासानें केलेलें विक्रमाचें वर्णन

रघूच्या निमित्तानें कालिदासानें विक्रमाचें वर्णन केलें आहे, ही कल्पना अनेक संशोधकांनीं यापूर्वीं मांडली आहे. पण दिलीपराजाचें चरित्र हें विक्रमाच्या पित्याचें काव्यमय चरित्र मानलें पाहिजे, हें आजपर्यंत एकाच्याहि लक्ष्यांत आलें नाहीं. यामुळें कालिदासाचा विक्रमादित्य हा गुप्त घराण्यांतील विक्रमादित्य असला पाहिजे, असें म्हणण्याचें अनैतिहासिक धारिष्ट त्याना होतें. कालिदासाच्या ग्रंथांतून संततीचा ध्यास लागलेल्या राजाचीं वर्णनें आढळतात, त्यावरून विक्रम हा आपल्या पित्याचा अेकुलता अेक पुत्र होता, असें स्वाभाविक अनुमान काढावें लागतें. ही कसोटी गुप्त घराण्यातील विक्रमाना लाविली तर त्याच्यापैकीं अेकीहि कालिदासाचा विक्रम नव्हे असें निश्चितपणें सांगता येतें. कारण बंधूचें वैपुल्य आणि त्यामुळें उद्भवलेले गृहकलह हे मोंगलांच्या प्रमाणेंच गुप्त घराण्याचेंहि वैशिष्ट्य आहे. डॉ. दांडेकरांच्यासारख्या गुप्ताच्या अितिहासकारांनीं या दृष्टीनें विचार केला तर त्यांना कालिदासाचा विक्रम कोण होता, हें लगेच कळून येईल. पण महाविद्यालयातील पंडित हे सामान्यतः विश्वविद्यालयांतील मंडळांतून प्रचलित असलेल्या मतांच्या पुनरावृत्तीवर जगत असतात. यामुळें त्याना कधीं स्वतंत्र विचार करण्याची आवश्यकता भासत नाहीं. पुनरावृत्ति हें त्याचें जीवन असलें तरी आम्हां लेखकांचें

तें मरण असतें. यामुळें लेखकांना नेहमींच आपली चिकित्सक बुद्धि जागृत ठेवावी लागते.

## जैन वाङ्मयाचा संदर्भ

रघुवंशातील दिलीपचरित्र हें विक्रमाच्या पित्याचेंच चरित्र असावें, असें मानण्याला जैन वाङ्मयांतहि अेक निमित्त सापडतें. विक्रमाचा पिता गर्दभिल्ल राजा हा अरण्यांत भटकत असता व्याघ्राच्या भक्ष्यस्थानीं पडला, असें जैन ग्रंथकारानीं लिहिलें आहे. या प्रवादाच्या विरुद्ध प्रचार करण्याकरिता कालिदासानें रघूच्या दुसऱ्या सर्गांतील दिलीप आणि सिंह याची कथा रचली असावी, अशी शंका येते. पण या कल्पनेंत कितपत तथ्य आहे, हें आजच ठरवितां येत नाहीं.

## लेखाचें प्रयोजन!

कालिदासानें रघुवंशाची रचना कोणत्या हेतूनें केली आहे, या प्रश्नाची अितकी कसून चिकित्सा करण्याचें मुख्य कारण म्हणजे विक्रमसंवत्प्रवर्तक विक्रमादित्याची समकालीन माहिती कालिदासाच्या ग्रंथातूनच आणि त्यातहि मुख्यत: रघुवंशातूनच मिळू शकते. विक्रमाच्या अस्तित्वावर स्वतःला चिकित्सक म्हणविणाऱ्या अनेक विद्वानाचा विश्वास नाहीं, हें मला माहीत आहे. यामुळें या चिकित्सकांनीं रघुवंशासारख्या सुबोध काव्याची कितपत चिकित्सा केली आहे हें दाखवून त्यांच्या चिकित्सकपणाच्या मर्यादा किती आकुंचित आहेत, याची त्याना जाणीव देणें भाग होतें. तेवढें कार्य या संक्षिप्त लेखानें झालें तरी पुरें !



प्रकरण तेरावें

# मूळचा गणपति निकुंभ

## गणपतीची निकुंभ संज्ञा

हिंदुस्थानच्या अितिहासांत सम्राट् विक्रमादित्याचा काळ हा एक अत्यंत महत्त्वाचा काळ होऊन गेला. या काळासंबंधीं थोडीफार समकालीन माहिती कविकुलगुरु कालिदासाच्या ग्रंथांतून मिळू शकते. पण त्या माहितीचा यथायोग्य उपयोग करण्यापूर्वी स्वतत्र प्रमाणानीं कालिदासाचा काळ नक्की ठरविणें आवश्यक आहे. कांहीं दिवसापूर्वी या विषयासंबधीं हिंदुस्थान सरकारच्या पुराणवस्तुसंशोधन विभागाचे पूर्वीचे प्रमुख रावबहादुर दीक्षित यांच्याशीं चर्चा चालली असतां मी असें एक विधान केलें होतें कीं, कालिदासाच्या काळीं गणपतीला निकुंभ म्हणत असत आणि तेव्हां त्याला अद्यापि पचायतनातील देवपणा आलेला नव्हता. त्यावेळीं स्वाभाविकपणेंच रावबहादुरानीं या विधानाचे आधार विचारले. पण तेव्हां ते आधार मला आठवत नसल्यामुळें तो प्रश्न तसाच राहून गेला. त्यानंतर काश्मीरविषयक कांहीं माहिती वाचत असताना त्या विधानाचे कांहीं आधार अचानक आढळून आले. त्यामुळें आज याच विषयावर लिहावयाचें ठरविलें आहे.

## रघुवंशांतील निकुंभ

कालिदासाच्या ग्रंथांतून गणपतीचा उल्लेख कोठेंहि आढळून येत नाहीं. मालविकाग्निमित्रातील गणदास या शब्दावरूनहि तेव्हा गणपतीची उपासना प्रचलित होती, असें म्हणता येणार नाहीं. कारण गणपति हा गणराज, गणाचा ईश असल्यानें त्याच्या नावाचा सक्षेप नुसता गण हा होऊं शकत नाहीं. निकुभ हें गणपतीचें पूर्वीचें नावहि कालिदासानें उपयोगांत आणलेलें आढळतें. रघुवंशाच्या दुसऱ्या सर्गातील सिंहानें दिलीप राजाला स्वतःचा परिचय करून देताना ‘कुंभोदरं नाम निकुंभमित्रम् ’ म्हणजे निकुभाचा मित्र कुंभोदर अशी आपली ओळख दिली आहे. या ओळखीवरून त्या काळीं निकुभ पुरेसा प्रसिद्ध होता, असें अनुमान काढता येतें. वर आलेल्या अवतरणाचें स्पष्टीकरण करताना पंडित लक्ष्मीधर कल्लांनीं

'नीलमत' या काश्मीरी पुराणग्रंथाच्या आधारानें असें सांगितलें आहे कीं, निकुंभ हा पांच कोटि पिशाचांचा अधिपति असून तो कुबेराचा अंकित होता. पण हें वर्णन रघुवंशांत भेटणाऱ्या निकुंभाला लागूं पडत नाहीं. कारण दुसऱ्या सर्गांत कुंभोदर सिंह हा स्वतःला अष्टमूर्ति शंकराचा किंकर म्हणवितो, तेव्हा त्याचा मित्र निकुंभहि स्वतः शंभूचाच साक्षात् सेवक असण्याचा संभव अधिक आहे. याविषयीं वायुपुराणांत आधारहि सापडतो. या पुराणाच्या उत्तरार्धांतील तिसाव्या अध्यायात निकुंभासंबधीं पुढील कथा आली आहे. एकदा पार्वतीचा माहेरीं अपमान झाल्यामुळे तिनें शंकराजवळ असा हट्ट धरला कीं, इतःपर हिमालयात न राहता आपण एखाद्या नगरात जाऊन राहू या. तेव्हा शंकरानें निकुंभाला आज्ञा केली कीं, तू काशीला जाऊन ती नगरी ओस पाड, म्हणजे आम्हां दोघांना रहावयाला तेथें जागा होईल. या आज्ञेप्रमाणें निकुंभानें काशीकडे प्रयाण केलें आणि त्या नगरीच्या बाहेर त्यानें निवास केला. हा नवा देव प्रकट झालेला पाहून काशीच्या साऱ्या नागरिकांनीं त्याची आराधना आरंभिली आणि निकुंभानेंहि त्यांच्या साऱ्या इच्छा पूर्ण करताना कधीं चालढकल केली नाहीं. होता होता या नव्या देवाची कीर्ति काशीच्या राणीच्या कानावर गेली त्या राणीला नव्हता मुलगा, तेव्हा पुत्रप्राप्तीच्या आशेनें तिनेंहि निकुंभाची आराधना आरंभिली. पण राणीनें कितीहि नवससायास केले तरी निकुंभ तिच्यावर प्रसन्न होईना. तेव्हा वर्षानुवर्षे सेवा करूनसुद्धां हा देव आपल्याला पुत्र देत नाहीं, हें पाहून एके दिवशीं राजानें संतापानें निकुंभाचें देऊळ पाडून टाकण्याची आपल्या सेवकाना आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें त्यांनीं देवळाचा विध्वंस केल्याबरोबर या संधीची वाटच पहात बसलेल्या निकुंभानें काशीच्या राजाकडे जाऊन त्याला शाप दिला कीं, मी तुझें कांहींहि वांकडें केलें नसतांना माझें तू देऊळ पाडून टाकलेंस तर इतःपर त्या देवळाप्रमाणेंच तुझी नगरीहि ओस पडेल. अशा रीतीनें त्यानें शंकराची आज्ञा पाळून त्याला रहावयाला काशी नगरी मिळवून दिली. या साऱ्या आख्यानांत वायुपुराणकर्त्यानें निकुंभाला गणेश्वर, गणेश, गणपति इत्यादि संज्ञा लाविल्या आहेत. तेव्हा निकुंभ हाच मूळचा गणेश होय, याविषयीं कोणतीहि शंका घेण्याचें कारण नाहीं.

## आधीं बुद्ध कीं गणपति

मला वाटतें कीं बौद्ध धर्माच्या ऱ्हासकाळांत बुद्धाचें माहात्म्य कमी करण्याकरितां बुद्धिदात्या गणेशाचें माहात्म्य वाढविलें गेलें. लिपि शिकतांना श्रीगणेशायनमः

ओं नमः सिद्धम् हें जें मंगलाचरण प्रथम करावें लागतें, त्यावरूनहि ती शंका दृढमूल होते. या दोन वंदनवचनांपैकीं दुसरें वचनच पुरातन दिसतें. कारण ओम्पासून प्रारंभ करण्याची वहिवाट अधिक जुनी आहे. मुंजीच्या वेळीं तरी ओम् भवति करावी लागते, हें ज्यांना माहीत आहे; त्याना माझें म्हणणें लगेच पटेल.

## प्राचीन निकुंभाचें रूपांतर

प्राचीन निकुंभाचें अर्वाचीन गणपतींत परिवर्तन होण्यापूर्वी शंकराच्या किंकरत्वापासून त्याची मुक्तता होऊन तो उमामहेश्वराचा पुत्र बनला. वायुपुराणातील निकुंभ हा शंकराचा पुत्र नाहीं, हें वर सांगितलेल्या कथेवरून उघडच आहे. कारण लग्नानंतर लौकरच स्वतःसाठीं घर शोधण्याकरिता शंकरानें त्याला काशीला धाडलें होतें. कालिदासकाळींहि शंकराला षडाननावाचून दुसरा पुत्र नव्हता, असें त्याच्या काव्यातील व्यंजनांवरून वाटतें. उमामहेश्वरांना स्कंदजन्मानें, किंवा शचीपुरंदराना जयंतजन्मानें जसा आनंद झाला, तसाच आनंद सुदक्षिणादिलीपाना रघूच्या जन्मामुळें झाला. या उपमांवरून इथें उल्लेखिलेले पुत्र आपापल्या मातापित्यांचे एकुलते एक आहेत, असें अनुमान सहजच निघतें.

## गणपतीचें विघ्नकर्तृत्व

गणपति हा शंकराचा पुत्र बनण्यापूर्वीचें त्याचें चरित्र बृहत्कथाकारालाहि माहीत आहे. कथासरित्सागरांतील लावाणकलंबकांत फलभूतिकथा आणि कालरात्रि कथा याच्यामध्यें गणपतिकथाहि आली आहे. या कथेंत अशी माहिती आढळते कीं पार्वतीनें शंकराची प्राप्ति करून घेतल्यानंतर पुत्रप्राप्तीची अिच्छा केली. पण आपली मनःकामना सफळ होण्याकरितां ज्या विघ्नेश्वराची पूजा करणें आवश्यक होतें, त्याची पूजा करायला मात्र ती विसरली. त्यामुळें पुढें शंकरपार्वतींच्या समागमांत विघ्न आलें आणि शंकरानें अग्नीच्या ठिकाणीं आपल्या वीर्याची स्थापना केली. असा आपला मनोभंग झाल्यावर पार्वतीनें शंकराला त्याचें कारण विचारलें. तेव्हां शंकरानें तिला सांगितलें कीं, तू विघ्नेश्वराची पूजा करावयाला विसरलीस, त्याचा हा परिणाम आहे. या कथेच्या पुढेंच अिंद्र सेनानीच्या प्राप्तीसाठीं खटपट करीत असतांना त्याचें आणि स्कंदाचें युद्ध जुंपल्याची कथा आली आहे. या कथेंतहि शंकरानें अिंद्राला गजमुखाची आराधना करण्याचा उपदेश केला आहे. कथासरित्सागर हें बृहत्कथेचें शब्दशः भाषांतर नाहीं. त्यामुळें अर्वाचीन गणपति चरित्रांतील किती भाग बृहत्कथाकाराला माहीत होता, हे नक्की सांगता येत नाहीं.

तथापि त्याच्या काळीं गणपति हा शंकराचा पुत्र बनला नव्हता, अितकें मात्र निश्चितपणें कळून येतें. गणपतीनें आपलें माहात्म्य मुख्यतः आपल्या विघ्नकर्तृत्वामुळें वाढविलें, असें कथासरित्सागरावरून समजतें. ऐतिहासिक दृष्ट्या या माहितीचा अर्थ काय होऊं शकतो, हें पुन्हा केव्हां तरी तपासावें लागेल. बहुधा गणराज्यांचें भारताच्या राजकीय रंगभूमीवरून निष्क्रमण होण्याच्या काळातच गणरायांना देव्हाऱ्यात स्थान मिळालें असावें. पण या प्रश्नाचा अधिक विचार करावा लागेल.

## गणपति नांवाचा प्रचार

गणराज्यांचा विनाश गुप्तकालीं झाला. याच काळातील राजांच्या नांवांतून गणपति हें देवतावाचक नांव प्रथम आढळतें. हें नाव राजकुलातून आढळण्यापूर्वी निदान शंभर वर्षें तरी गणपतीची उपासना भारतांत प्रचलित झाली असावी, असें सध्या अनुमान करतां येतें. या एका पुराव्यावरूनहि कालिदास गुप्तांचा समकालीन नसून खिस्तापूर्वी होऊन गेलेल्या सम्राट् विक्रमादित्याचा समकालीन होता, हें सिद्ध होतें.



प्रकरण चौदावें

# देवपुत्र कनिष्क हाच गणेश

## बुद्धाचा वंश आणि उपदेश

१९५१ मधील फेब्रुवारीच्या ‘ सह्याद्रीं’त ‘ बुद्धाचा वश ’ या विषयावर एक लेख लिहून मी असें दाखवून दिलें होतें कीं गौतम बुद्ध हा पीतवर्णी मोंगोलियन् समाजात जन्माला आला होता आणि तेव्हा उत्तरपूर्व भारतातील आर्यांचा पीतवर्णी टोळ्याशीं जो प्राणातिक लढा चालू होता, त्यात बुद्धाची सहानुभूति पूर्णपणें पीतवर्णी समाजाच्या पक्षाला होती. इतकेंच नव्हे तर मगधांतील आर्यसमाजाचा अपकर्ष व्हावा, आणि मोंगोलियन् समाजाचा उत्कर्ष व्हावा, या हेतूनेंच बुद्धानें आपला सारा धर्मप्रचार चालविला होता. त्या लेखातील हीं महत्त्वाचीं प्रमेयें भारतीय विद्याभवनाच्या वतीनें नतर प्रसिद्ध झालेल्या ‘ Age of Imperial unity ’ (‘ साम्राज्ययुग ’) या ग्रथाचे एक प्रमुख संपादक डॉ. रमेशचद्र मुजुमदार यानींहि बहुताशीं मान्य केलीं आहेत. त्या ग्रंथाच्या ३६३ व्या पानावर ते लिहितात : ‘ The Eastern part of India, even when Aryanised, preserved considerable differences from midlands in point of Language, ethnic elements and culture and this undoubtedly explains the origin of the two heterodox sects in this very region The Shakya clan had probably a Mongolian strain in their blood. ’ म्हणजे “ पूर्वभारतांत आर्य संस्कृतीचा प्रसार झाल्यानतरसुद्धा इतर आर्यावर्तात आणि त्या भागांत भाषा, वश आणि सस्कृति या सर्वांच्या दृष्टीनें महत्त्वाचे प्रभेद राहून गेले होते. यामुळेंच त्या भागात बौद्ध आणि जैन या वेदविरोधी पथाचा प्रादुर्भाव झाला. ज्या शाक्य समाजात गौतम बुद्ध जन्माला आला, त्या समाजांत बहुधा मोंगोलियन् रक्ताचें मिश्रण झालें होतें. ” ‘ साम्राज्ययुगा ’च्या मुख्य संपादकांनीं ऐतिहासिक सत्याला इतपत मान दिला असला तरीसुद्धा बुद्धाच्या देखतच तत्कालीन मगधसम्राट् अजातशत्रु यानें पाटलीपुत्राचा दुर्ग बाधून त्या दुर्गाच्या आश्रयानें

लिच्छवी, शाक्य, मल्ल इत्यादि पीतवर्णी टोळ्यावर जो अविस्मरणीय विजय मिळविला, त्याचें वास्तविक महत्त्व त्या अधिकारी इतिहासलेखकांना अद्यापि कळून आलेलें नाहीं. अजातशत्रूच्या मृत्यूनंतर पराजित पीतवर्णी टोळ्यांच्या नायकांनीं कोलेरियन् समाजातील मुंडाच्या नेतृत्वाखालीं त्याचा पुत्र उदायी याच्याविरुद्ध बंड उभारलें आणि पुढें मारेकऱ्याच्या हातून उदायीची हत्या झाल्यानतर पाटलीपुत्र हस्तगत करून तेथें अनार्य-राज्य प्रस्थापित केलें. भारतीय आर्यांच्या मगधातील वर्चस्वाला मोंगोलियन् आणि कोलेरियन् टोळ्यांनीं चालविलेला विरोध बुद्धनिर्वाणानतर सरासरी शंभर वर्षेपर्यंत तसाच चालू राहिला. सरते शेवटीं शैशुनागि काकवर्ण राजानें या अनार्य टोळ्याचा सपूर्ण पराजय करून या विरोधाचीं पाळेंमुळें खणून कादलीं. या कामात काकवर्ण राजाला प्राप्त झालेलें यश इतकें चिरस्थायी होतें कीं, त्यानतर तो स्वतःहि उदायीप्रमाणेंच मारेकऱ्याना बळी पडला तरी त्याच्यामागें त्या अनार्य टोळ्याना मगधात अराजक निर्माण करता आलें नाहीं. याप्रमाणें पूर्वभारतात शेंकडो वर्षें चाललेल्या सग्रामामध्यें पीतवर्णी मोंगोलियन् टोळ्याचा सपूर्ण पराजय झाल्यानतर त्यांनीं भारतीय सीमेवर आक्रमण करण्याकरिता ईशान्य सीमेपेक्षां वायव्य सीमाच अधिक उपयुक्त असल्याचें ग्रीकशकादिकाच्या उदाहरणावरून ओळखून तिकडेच आपलाहि मोर्चा वळविला. भारतावरील कुषाणांच्या आक्रमणाची पूर्वपीठिका लक्षात घेतल्यावाचून तत्कालीन इतिहासाचा उलगडा होणार नाहीं, अशा समजुतीनेंच कीं कायकोण जाणे, प्राचीन बौद्ध लेखकांनीं कुषाणसम्राट् कनिष्क हा गौतमबुद्धाच्या वशातील असल्याचा उल्लेख करून ठेविला आहे.

## कनिष्क=बाणासुर=जालंधर

बुद्धोत्तर भारताच्या इतिहासात कनिष्काच्या इतकें विराट् व्यक्तित्व असलेला अन्य कोणीच सम्राट् झाला नाहीं. आणि भारतातील सनातनी समाजावर त्याच्याइतका अन्य कोणत्याच सम्राटाचा प्रभाव पण पडला नाहीं, हें ‘ हरिवशा ’त बाणासुराच्या नांवानें, ‘ पद्मपुराणा ’त जालधर दैत्याच्या नावानें, किंवा ‘ गणेशपुराणा ’त सिंधु दैत्याच्या नावानें सनातनी हिंदूनीं आपल्या सर्वांत श्रेष्ठ शत्रूचीं जीं अविस्मरणीय आख्यानें लिहून ठेविला आहेत, त्यांवरून स्पष्ट कळून येतें. त्याचें वर्णन करताना ‘ भागवत ’कारांनीं ‘ शिवभक्तिरतः सदा । मान्यो वदान्यो धीमाश्च सत्यसधो दृढवतः ।। ’ असें सार्थ आणि साभिप्राय शब्द वापरले आहेत. ‘ पद्मपुराण ’कारानींहि जालंधराच्या म्हणजे कनिष्काच्या राज्याची अगदीं निर्मत्सर

मनानें स्तुति केली आहे. ' मगल तत्र सर्वेषा न कश्चित् वधबंधनम् । मरण न च हिंसाऽस्ति न कश्चित् केन बाध्यते ।। ' ही केवळ अर्थवादात्मक स्तुति आहे, असें कोणी समजतील. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. कनिष्काचा एक महाक्षत्रप रुद्रदामन् याच्या शिलालेखात त्यानें स्वतः अशीच प्रतिज्ञा करून ती पाळल्याचा उल्लेख आढळतो. ' सर्ववर्णैरभिगम्य रक्षणार्थं पतित्वे वृतेन, आप्राणोच्छ्वासात् पुरुषवध-निवृत्तिकृतप्रतिज्ञेन अन्यत्र संग्रामेषु ' म्हणजे ' प्राणात प्राण असेपर्यंत संग्रामाव्यतिरिक्त अन्य प्रसगीं पुरुषवध करणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून ' ती खरी केल्याचें स्पृहणीय उदाहरण घालून दिल्याचा उल्लेख आला आहे. प्राणिहिंसेवरील निर्बंध न पाळल्याबद्दल अशोकानें मानवाना देहान्तशासन केल्यामुळें राज्याभिषेकात ही प्रतिज्ञा घालावी लागली. गुप्त सम्राट् तर देहान्तशासनच काय, पण नुसता देहदंडसुद्धा अपराध्याना करीत नसत, असें फाहियान या चिनी प्रवाश्यानें लिहून ठेविलें आहे. ' एव जालधरः कृत्वा देवान् स्ववशवर्तिनः । धर्मेण पालयामास प्रजाः पुत्रान् इवौरसान् ।। ' ' पद्मपुराणा 'तील जालधराख्यानांत परस्त्रीलोलुपतेमुळें जालधराचा अधःपात झाला असें वर्णन आलें असलें तरी तें पातक जालधर देशाच्या पहिल्या सम्राटाच्या हातून घडलें नसून त्याच्या वंशजाच्या हातून घडलें होतें, ही वस्तुस्थिति त्या पुराणकाराना सुविदित होती. पण कुषाण घराण्याचा उदयास्त एकाच आख्यानात समाविष्ट करताना त्यांनीं तिकडे थोडें दुर्लक्ष केलें आहे.

कनिष्काचें साम्राज्य मध्य आशियापासून मगधापर्यंत पसरलें असताना पद्म-पुराणकार आणि भारतातील बौद्धपथाचा इतिहास लिहिणारे लामा तारानाथ हे त्याला अनुक्रमें जालधर आणि जालधराधीश का म्हणतात, याचा प्रथम विचार केला पाहिजे. ' पद्मपुराण ' काराच्या मताप्रमाणें जालंधर देश व्यापण्यापासून कनिष्काच्या कर्तृत्वाचा प्रारभ झाला आणि त्यामुळेंच बहुधा त्याला जालधर ही सज्ञा चिकटली असावी. ' पद्मपुराणा 'च्या उत्तरखडांतील पाचव्या अध्यायात भार्गवानें जालधराचा पिता जो सिंधु, त्याला उपदेश करताना म्हटलें आहे : " तवात्मजो विक्रमेण त्रैलोक्यं भोक्ष्यते ध्रुवम् । जबुद्वीपे महापीठ योगिनीगणसेवितम् । आप्लावित त्वयेदानीं मुंच जालधरालयम् । तत्र राज्यं प्रयच्छास्मै तनयाय महार्णव । अजेयश्चाप्यबद्धश्च तत्रस्थोऽय भविष्यति ।। " अर्थात् " तुझा पुत्र आपल्या परा-क्रमानें त्रैलोक्याचा उपभोग घेईल. जबुद्वीपांतील योगिनीगणसेवित जालंधर नामक महापीठ आता तू जें व्यापलें आहेस, तें मोकळें करून तुझ्या पुत्राला दे. जाल-धराचा राजा झाला म्हणजे तो अजेय आणि अबद्ध होईल. "

## यौधेय–त्रिगर्त

येथें पहिला महत्त्वाचा प्रश्न हा उद्भवतो कीं प्राचीन काळचा जालंधर देश कोठें होता ? कोशावरून जालधर देशाला ' त्रिगर्त ' असेंहि अपरनाम असल्याचें कळून येतें. या त्रिगर्तांची वसति आधुनिक पजाबातील लाहोर, जालंधर आणि कांग्रा या जिल्ह्यातून होती. यौधेयत्रिगर्तांच्या जोडीचा पाणिनीच्या सूत्रांतून एकत्र उल्लेख येत असल्यामुळें त्या दोन आयुधजीवि गणाचा प्रदेश परस्परासन्निध असून त्याचें परस्पराशीं सख्यहि होतें, असें दिसतें. महाभारतात त्रिगर्तांच्या शौर्याची अतिशय स्तुति केली असूनहि खिस्तोत्तर काळातील भारताच्या इतिहासात त्याचा नुसता उल्लेखहि आढळत नाहीं. आपल्या इतिहासातील हें कोडें उलगड-ण्याचा आजपर्यंत कोणी प्रयत्नहि केला नाहीं. पण मला वाटतें कीं ' पद्मपुराणा ' तील वर उतरून घेतलेल्या श्लोकावरून हें कोडें उलगडता येतें. त्या श्लोकांतील माहितीवरून असें कळून येतें कीं कनिष्काचें जेव्हा स्वाऱ्या करण्याचें वय झालें, तेव्हा जालधर अथवा त्रिगर्त देशात सर्वत्र जलप्रलय होऊन त्याला महार्णवाचें स्वरूप प्राप्त झालें होतें. अशा आणीबाणीच्या प्रसगी त्रिगर्तांना यौधेयानीं आपल्या देशात आश्रय दिला. त्यामुळें यौधेय आणि त्रिगर्त हे समाज जवळजवळ अभिन्न आणि एकजीव होऊन गेले. म्हणून कुषाणकाळातील युद्धातून एकट्या यौधेयाचेंच नाव ऐकू येतें. मात्र त्रिगर्तांच्या पृथक् अस्तित्वाची खूण म्हणून त्याच्या प्रदेशात पाडलेल्या यौधेयाच्या नाण्यावर ' त्रि ' हें अक्षर खोदलेलें असतें. यौधेयाच्या काहीं नाण्यावर ' त्रि ' आणि ' द्वि ' हीं अक्षरें आढळून येतात, ही गोष्ट जनरल कनिंगहॅम् यानीं उघडकीला आणल्याला सरासरी एक शतक लोटलें असलें तरी त्या अक्षराचा आमच्या इतिहासकाराना अद्यापि अर्थ लावता येत नाहीं. असो. त्या अक्षरापैकीं ' त्रि ' हें अक्षर त्रिगर्तांचें निदर्शक आहे, हें एकदां ओळखलें म्हणजे ' द्वि ' हें अक्षर द्विगर्तांचें निदर्शक असल्याचें लगेच लक्षात येतें. हा द्विगर्त गण डोग्रा रजपुताच्या रूपानें अजून टिकून राहिला आहे, इतकेंच नव्हे तर आपल्या शौर्याची कीर्तिहि त्यानें अजून टिकविली आहे, हें उत्तरेकडील विद्वानांना सुविदित आहेच. या सर्व गोष्टी लक्षात घेतल्या म्हणजे त्रिगर्तांच्या पश्चिमेकडील प्रदेश व्यापून बसलेल्या कुषाणांनीं एका जळप्रलयानंतर रावी नदी ओलांडून त्रिगर्तांचा सारा देश व्यापून टाकला आणि कुषाणाच्या या आक्रमणाचा नेता कनिष्क असल्यानें ' पद्मपुराण ' कारांनीं त्याला जालंधर ही संज्ञा दिली, हा इतिहास उजेडांत येतो.

## स्त्रीराज्य भोगणारा कनक

आपल्या पुराणकारांना कनिष्काच्या राज्याची चागली माहिती होती. हें 'विष्णुपुराणां'तील इतिहासकथनांत 'स्त्रीराज्यत्रैराज्यमूषिकजानपदान् कनकाह्वयः भोक्ष्यति' असा जो उल्लेख आला आहे, त्यावरूनहि सिद्ध होतें. येथें उल्लेखिलेला कनक हा दक्षिणेंतील कदब घराण्यापैकीं कगवर्मा असावा, असें कै. काशीप्रसाद जायस्वाल यानीं आपल्या इतिहासांत ठरविलें असलें तरी तिथें त्याची दिशाभूल झाली आहे. स्त्रीराज्याचें स्थान निश्चित करताना श्री. नंदलाल दे हे आपल्या भौगोलिक कोशात लिहितातः 'That an Amazonian Kingdom existed in the trans-Himalayan valley of the Sutlaj, as stated by Hiuen Tisiang is confirmed by Atkinson's Himalays Districts.' म्हणजे सतलज नदीच्या उगमाकडील हिमालयाच्या प्रदेशात युआन च्वागनें म्हटल्याप्रमाणें खरोखरीचें एक स्त्रीराज्य होतें, ही गोष्ट अॅट्किन्सन्च्या हिमालयांतील जिल्ह्याच्या वर्णनावरून सिद्ध झाली आहे. स्त्रीराज्यानतरचें त्रैराज्य हें एकट्या त्रैगर्तांचें राज्य होऊं शकेल, किंवा वर सुचविल्याप्रमाणें त्रिगर्त-द्विगर्त-यौधेयाचें सयुक्त राज्य असूं शकेल. सिंधूच्या उत्तरभागाला प्राचीन काळीं मूषिक ही सज्ञा होती. या सज्ञेचा उल्लेख टॉलेमी, स्ट्राबो याच्यासारख्या ग्रीक-रोमन लेखकांनींहि केला आहे. परस्पराशीं सलग्न असलेल्या या तीन देशांवर राज्य करणारा कनक हा महाराज-कनिकलेखातील कनिक म्हणजे कनिष्कच आहे, हें सिद्ध करण्याचीहि आवश्यकता नाहीं. वरील अवतरणातील 'त्रैराज्य' शब्दाच्या अर्थाविषयीं कोणाला शका आल्यास वायु आणि ब्रह्माड पुराणातील 'स्त्रीराष्ट्र भोजकाश्चैव भोक्ष्यते कनकाह्वयः' या वचनानें तो दूर होईल. यौधेय हे यादवकुळातले असल्यानें यादवाचीं भोज, शूर, इत्यादि नावेंहि त्याना लावीत असत. या नावापैकीं शूर हें नाव त्याना अत्यत प्रिय असून त्या नांवाला साजेशीच आपली कीर्ति असावी, याविषयीं त्यांचा फार कटाक्ष होता. कनिष्काचा एक महाक्षत्रप रुद्रदामन् यानें यौधेयांचा पराजय केल्याची बढाई सागतांना 'सर्वक्षत्राविष्कृतवीरशब्दजातोत्सेक-अविधेयानाम्' म्हणजे साऱ्या क्षत्रियांमध्यें वीर या वैशिष्ट्यपूर्ण सज्ञेनें ओळखले जात असल्यामुळें उद्दाम झालेले यौधेय, असें त्यांचें वर्णन केलें आहे. यौधेय हा गण असल्यानें त्याच्यात एकछत्री राजे नव्हते. त्यांच्या एका महाराज महासेनापतीचा उल्लेख मात्र एका शिलालेखांत आढळतो. त्यामुळें देवसेनापति स्कंद कार्तिकेयाचीच तें मुखत्वेंकरून उपासना करीत असत. महाचीन, मध्य आशिया

आणि अफगाणिस्थान या सर्व देशांतून आलेल्या शककुषाणाच्या टोळधाडीनें रुद्र-दामनाच्या नेतृत्वाखालीं खिस्ताब्द १५० च्या सुमाराला यौधेयांचा पराजय करून त्याचा उच्छेद केल्याची बढाई मारली असली तरी त्यानतर एका शतकाच्या आतच यौधेयानीं कुषाणाची सत्ता झुगारून देऊन आणि आपलीं स्वतत्र नाणीं पाडून पुनश्च एकवार यौधेयगणाच्या विजयाची दुदुभि वाजविली, असें डॉ. आळतेकरांनीं आपल्या सशोधनानें सिद्ध केलें आहे. त्यांनीं रचलेल्या पायावरच देवपुत्र कनिष्काच्या पुराणोक्त इतिहासाची उभारणी कशी करता येईल, याची रूपरेखा तरी या अधिकारी इतिहास-लेखकाना दाखवावी, या अपेक्षेनेंच मी माझ्या साहसी सशोधनाला आज प्रवृत्त झालों आहें.

## कार्तिकस्वामीचें रुधिरपुर

कार्तिकेयाचे महाभक्त असलेल्या यौधेयांचा कुषाण साम्राज्याच्या आद्यंतांशीं असलेला अविच्छेद्य सबध लक्षांत घेतला म्हणजे हरिवशादि पुराणांतून संगृहीत केलेला कुषाणाचा इतिहास आपल्याला थोडाफार उलगडूं लागतो. हरिवशातील बाणासुराच्या आख्यानाच्या आरभींच जनमेजयानें वैशंपायनाला विचारलें आहे. ‘ कथ च देवदेवस्य पुत्रत्वमसुरो गतः । ’ म्हणजे या असुराला देवदेवाच्या पुत्राची पदवी कशी प्राप्त झाली ? हा प्रश्न वाचताच कोणाहि इतिहाससंशोधकाला या आख्यानाच्या ऐतिहासिक महत्त्वाची कल्पना यावयाला पाहिजे. या प्रश्नाला वैशपायनानें दिलेलें उत्तर वाचलें कीं आपण समकालीन ऐतिहासिक पुराव्याच्या क्षेत्रात सचार करीत असल्याची मनाला जाणीव होते.

“ दृष्ट्वा वपुः कुमारस्य क्रीडतश्च महात्मनः । बलिपुत्रो महावीर्यो विस्मय परमंगतः ।
तस्य बुद्धिः समुत्पन्ना तपश्चर्तुं सुदुष्करम् । रुद्रस्याराधनार्थाय देवस्य स्याम् यथा सुतः॥”

म्हणजे देवासन्निध एकुलता एक कार्तिकस्वामी क्रीडा करीत असलेला पाहून बलिपुत्रालाहि आपण देवपुत्र बनण्याची इच्छा झाली आणि आपल्या तपस्वी भक्ताची मनीषा नेहमींच सफळ करणाऱ्या शकरानें थोड्याफार विलबानें ती सफळहि केली. त्यानें पार्वतीला सांगितलें: “ कनीयान् कार्तिकेयस्य पुत्रोऽय प्रतिगृह्यताम् । ” म्हणजे “ कार्तिकेयाचा धाकटा भाऊ म्हणून तूं याचा स्वीकार कर. ” कारण ‘ यत्रोत्थितो महासेनः सोऽग्निजो रुधिरे पुरे । तत्रोद्देशे पुरं चास्य भविष्यति न सशयः ’ म्हणजे “ कार्तिकेयाचा उदय ज्या रुधिरपुरात झाला, त्याच देशांत याची राजधानी होईल, याविषयीं संशय नाहीं. ’ येथें उल्लेखिलेलें रुधिरपुर म्हणजे

महाभारतांत कार्तिकेयाला अत्यंत प्रिय म्हटलेलें रोहितक अथात् आधुनिक पंजाबातील रोहटक असलें पाहिजे. सभापर्वांत नकुलाच्या दिग्विजयाचें वर्णन करतांना महाभारतकारांनीं म्हटलें आहे: " पहिल्यानें नकुल रोहितक पर्वताप्रत प्राप्त झाला. तो रमणीय पर्वत धनधान्यधेनूनीं संपन्न असून कार्तिकेयाला मोठा प्रिय आहे. " खिस्तकालाच्या तिसऱ्या शतकात सहारानपूर, डेहराडून, दिल्ली, रोहटक, कांग्रा, लुधियाना इत्यादि जिल्ह्यातून यौधेयाचीच सत्ता चालत होती, असें त्या प्रदेशांतून यौधेयाचीं नाणीं विपुल प्रमाणात सापडल्याने सिद्ध झालें आहे. यौधेय हे मुख्यत: सतलज आणि यमुना यांच्या तीरावरील प्रदेशात रहात असत. त्रिगर्तांची वसति विशेषत: रावी आणि सतलज याच्या मधील प्रदेशात होती. 'द्वि' आणि 'त्रि' या अक्षरांनीं अंकित असलेलीं यौधेयाचीं नाणीं सामान्यत: सतलज नदीच्या पश्चिमेला सांपडतात, असें डॉ. विमलाचरण लाहा यानीं आपल्या प्राचीन भारतातील कुलावरील ग्रथात लिहिलें आहे. ही माहिती खरी असल्यास तीं नाणीं यौधेयात समाविष्ट झालेल्या त्रिगर्तद्विगर्तांतच प्रामुख्याने चालत असल्याचें समजून येतें आणि त्या अक्षराचा मीं लावलेला अर्थ खरा असल्याचें प्रत्यतर मिळतें. असो. कार्तिकस्वामीला प्रिय असलेल्या प्रदेशातच दिल्लीचाहि समावेश होतो. त्या नगरीच्या लक्ष्मी त्याच्या माता कृत्तिकाच बसलेल्या आहेत, याचा येथें उल्लेख केल्यावाचून राहवत नाहीं. ज्योतिषशास्त्रदृष्ट्या रोहितक प्रदेशावर कृत्तिकाचें आधिपत्य चालत असल्यामुळें हा विशिष्ट प्रदेश कार्तिकेयाला अत्यत प्रिय असणे साहजिक आहे.

## देवपुत्र या पदवीचें मूळ

कार्तिकस्वामीच्या रुधिरपुराची चर्चा सपवून आता वरील श्लोकातील देवपुत्राकडे वळलें पाहिजे भारताच्या प्राचीन इतिहासात स्वत:ला देवपुत्र म्हणवून घेणाऱ्या एकमेव कुषाण घराण्याची मातृभूमि महाचीनच्या परिसरात असल्यामुळें तेथील सस्कृति आणि महत्त्वाकांक्षा त्यांच्या हाडींमासीं खिळल्या होत्या. आपल्या घराण्याची देवपुत्र ही पदवीहि कुषाणांनीं चीनमधूनच आणली होती. या देवपुत्र पदवीचें ऐतिहासिक महत्त्व लक्षांत न आल्यामुळें आजपर्यंत भारतीय विद्वान् बाणासुराच्या शोधाप्रीत्यर्थ इराकच्या यात्रा करीत आले आहेत. उदाहरणार्थ, 'प्राचीन भारतीय साहित्यमें पुरातन इराककी राजधानीयाँ' ( विशाल-भारत, जून, १९५० ) या लेखात श्री. अमृत पंड्या लिहितात : " हरिवंशपुराणोल्लिखित बाणासुरकी राजधानी शोणितपूर या रुधिरपूर इराककी 'निनेवा' है. बाणासुर

संभवत: असीरियन् राजवंशावली का असुर बानीपाल है. ' हा उल्लेख मी नागरी प्रचारिणी सभेच्या पत्रिकेवरून ( २००७ सं. अंक ३ ) घेतला आहे. मूळ लेख मीं पाहिलेला नाहीं. या अवतरणावरून तरी वरील लेखात खऱ्या ऐतिहासिक संशोधनापेक्षा आपल्या कल्पनाशक्तीलाच श्री. पंड्यांनीं अधिक वाव दिलेला दिसतो.

## शंकराच्या जटा

संस्कृत वाङ्मयातील असुरांसंबंधीं असा एक सामान्य नियम घालून देता येईल कीं, ज्या असुराचा उल्लेख वेदब्राह्मणातून आढळतो, त्याचें मूळ इराक-इराणात शोधणें शहाणपणाचें असलें तरी पुराणातून शंकराच्या वरानें मदोन्मत्त झालेले जे नवीन असुर भेटतात, ते सारे वंशानें मोंगोलियन् अथवा कोलेरियन् असण्याचा आणि, त्याचें वसतिस्थान भारताबाहेर असल्यास, तें चीनच्या परिसरात असण्याचा संभव अधिक. हिमालयनिवासी शंकराचा हिमालयाच्या उत्तरेकडील मोंगोलियन् वंशाशीं असलेला निकटचा संबंध आजपर्यंत आपल्या इतिहाससंशोधकांच्या ध्यानात का आला नाहीं, मला कळत नाहीं. फार काय, शंकराच्या ' जटा 'सुद्धा मोंगलच आहेत. बाबर बादशहाचा मावसभाऊ मिर्झा हैदर यानें लिहिलेल्या मोंगलांच्या इतिहासावरून असें कळतें कीं हिमालयाच्या उत्तरेकडील चिनी तुर्कस्थानातील मोंगलांना आणि त्यांच्या देशालाहि जटा म्हणत असत. महाभारताच्या आरण्यकपर्वांत बद्रिकाश्रमाजवळ पांडवांना आणि द्रौपदीला जटासुरानें पळवून नेण्याचा प्रयत्न केल्याचें एक आख्यानहि आहे. त्यावरून मिर्झा हैदरच्या ग्रथांतील ' जटा ' अगदीं बद्रिकाश्रमापर्यंत पसरले होते, हें कळून येतें. आणि मग गंगावतरणाच्या प्रसंगीं शंकरानें गंगेला कोणत्या जटामध्यें गुरफटून टाकलें, किंवा दक्षयज्ञविध्वंसनाच्या प्रसंगीं शंकरानें कोणत्या जटा आपटून वीरभद्राला निर्माण केलें, याचा स्वाभाविक रीतीनें उलगडा होतो. हे स्वतःला जटा म्हणविणारे मोंगल वीरभद्राच्या काळीं हिंसक यज्ञविरोधक होते आणि गौतम बुद्धाच्या काळीं अहिंसेचा अंगरखा पांघरलेले यज्ञविरोधक बनले इतकेंच काय तें !

## नेपाळांतील मोंगल कुळें

वॉल्टर हॅमिल्टनच्या ' जिओग्रॉफिकल, स्टॅटिस्टिकल अँड हिस्टॉरिकल डिस्क्रिप्शन ऑफ इंडिया ' या ग्रथाच्या दुसऱ्या खंडांतील ६६८ पानावरील माहितीवरून असें समजतें कीं, किरात, जरा, कीचक हीं सारीं नेपाळांतील मोंगोलियन् टोळ्यांचीं नावें आहेत. यांच्यापैकीं किराताच्या रूपानें शंकर अर्जुनाशीं

लढला. पाडवांच्या काळीं कीचकांनीं ...य देश कसा व्यापून टाकला होता, हें सर्वांना माहीत आहेच. हे कीचक ‘ किपृचक ’ या नांवानें अजून मध्य आशियांत राहतात. मिर्झा हैदरच्या ग्रथावरून असें समजतें कीं ‘ किपृचक ’ ही श्वेत हूणांचीच एक सज्ञा आहे. या श्वेत हूणापैकीं भारतावर स्वारी करणारे तोरमण आणि मिहिरगुल राजे शिवभक्त म्हणून ओळखले जातात. बुद्धाप्रमाणेंच शंकरहि यज्ञाचा आणि मदनाचा शत्रु मानला जात असल्यानें मोंगोलियन् समाजांत त्या उभयताच्या उपासनांची स्वाभाविकपणेंच एक अद्भुत खिचडी बनली होती. डॉ. रघुवीर यांना त्यांच्या चीनच्या प्रवासात बौद्धशैव पथाच्या संमिश्रणाचा कसा साक्षात्कार झाला, हें त्यानीं आपल्या ‘ सरस्वतीविहारा ’च्या ( कार्तिक शुक्ल प्रतिपदा, स. २०१२ ) एका अकात वर्णिलें आहे. फार काय, पेकिंग राजधानीच्या मध्यवर्तींत अजूनहि महाकालाचें पुरातन मंदिर अस्तित्वात असल्याचें अनपेक्षित दृश्य त्याना तिथें पहावयास मिळालें. यावरून अशी मात्र कोणी कल्पना करू नये कीं कोणा भारतीय सम्राटाला चीन जिंकण्याची इच्छा झाल्यामुळें त्यानें पेकिंगला आपले प्रचारक पाठवून महाकालमंदिराच्या निमित्तानें भारताच्या हितसबंधीं लोकाचें तिथें एक केंद्र निर्माण करून ठेविलें होतें !

## चिनी आक्रमकांचीं केंद्रें

त्याच्या उलट, कुषाणमोंगलांच्या भारतावरील आक्रमणाला विशाल स्वरूप प्राप्त होण्यापूर्वींच त्याच्या पक्षाला मिळालेल्या सनातन धर्माच्या शत्रूंनीं आपल्या देशांत मोंगलाच्या एकजटा, महाचीनतारा, उग्रतारा, महानीलसरस्वती—इत्यादि देवताची आयात करून त्याच्या आक्रमणाची भूमिका सिद्ध करून ठेविली होती. एकजटा देवीची उपासना तर स्वतः आर्यनागार्जुनपादानीं भोट देशातून उद्धार करून ( ‘ आर्यनागार्जुनपादैः भोटेषु उद्धृतम् ’ ) आणली होती, असा स्पष्ट उल्लेख सांपडतो. या साऱ्या चिनी देवतांच्या प्रचारामागील भूमिका काय होती, हें कै. महामहोपाध्याय हरप्रसादशास्त्री यानीं कुब्जिकातत्रातील म्हणजे खुजा मोंगोलियन् लोकांसाठीं लिहिलेल्या एका तंत्रांतील ‘ गच्छ त्व भारते वर्षे अधिकाराय सर्वतः । पीठोपपीटस्थानेषु कुरु सृष्टिमनेकधा ’ हा श्लोक उद्धृत करून स्पष्ट दाखवून दिलें आहे. या वचनावरून या तान्त्रिकांचीं महापीठें म्हणजे भारतशत्रूचीं केंद्रे होतीं, हें रहस्य अगदीं स्फुटरहस्य झालें आहे. कनिष्कानें जालधर देश व्यापण्यापूर्वींच जालधर हें तान्त्रिकाचें महापीठ आणि योगिनीगणसेवित असें देशद्रोह्यांचें एक प्रमुख

केंद्र बनलें होतें, हें पद्मपुराणांतील वर उतरून घेतलेल्या श्लोकांवरून स्पष्ट झालेंच आहे. या साऱ्या गोष्टी लक्षात घेतल्या म्हणजे श्री. अमृत पंड्यासारख्या अभ्यासकाना सहज कळून येईल कीं, हरिवंशादि पुराणांतून बाणाला असुर म्हटलें असलें तरी त्याच्या राजधानीच्या शोधासाठीं इराकला जाण्याची फारशी आवश्यकता नाहीं.

## कनिष्काचें कटोर घराणें

बाणासुराच्या राजधानींत पीतवर्णांचें प्राबल्य होतें, ही गोष्ट हरिवंशकारांनीं अगत्यपूर्वक सांगितली आहे. बाणासुराच्या राजधानीला पोंचल्यावर बलरामाला 'चोंहीकडे निस्तेज ही पिवळी छटा फैलावली' असल्याचें विचित्र दृश्य दिसूं लागलें, तेंव्हा त्यानें कृष्णाला विचारलें: 'सर्वे कनकवर्णाभाः संवृत्ताः स्म न संशयः। किमिदं ब्रूहि नस्तत्व किं मेरोः पार्श्वगा वयम् ॥' म्हणजे "आम्हा सर्वांवर पिवळी छटा दिसू लागली आहे, तर आपण मेरु पर्वतासन्निध आलों आहोंत कीं काय?" तेंव्हा कृष्णानें उत्तर दिलें कीं आपण बाणासुराच्या नगरीसान्निध आलों असल्यानें असला भास होऊं लागला आहे. त्याचप्रमाणें पावसाळ्याचे चार मास लोटल्यानतर अनिरुद्ध बाणाच्या अटकेंत असल्याची वार्ता कृष्णाला कळली आणि त्यानतर तो शोणितपुरावर चालून गेला, या भागवतातील माहितीवरूनहि बाणाची राजधानी भारतीय आर्यांच्या नेहमींच्या युद्धक्षेत्रात असल्याचें अनुमान निघतें. कृष्ण जेंव्हा बाणासुराला मारायला सिद्ध झाला, तेंव्हा ('तन्माता कोटरा नाम नग्ना मुक्तशिरोरुहा। पुरोऽवतस्थे कृष्णस्य पुत्रप्राणरिरक्षया') बाणासुराची माता कोटरा ही पुत्राचा प्राण वाचविण्याकरिता विवस्त्र होऊन कृष्णापुढे उभी राहिली, ह्या भागवतातील वचनावरून बाणाची माताहि भारतीय असल्याचें कळून येतें. कारण मोंगल लोक चित्रळ आणि त्याच्या शेजारचा काफिरिस्थान या प्रदेशांना कटोर ही संज्ञा लावीत असत, असें बाबर बादशहाच्या आत्मचरित्रावरून आणि इतर अनेक ग्रंथावरून समजतें. अल्बिरुणीनें तर कनिष्काच्या घराण्यालाच कटोर घराणें म्हटलें आहे. याचें कारण असें दिसतें कीं कुषाण साम्राज्य प्रस्थापित होण्यापूर्वीं युएची टोळीच्या पाच शाखांचीं जीं पांच निरनिराळीं लहान लहान राज्यें होतीं, त्यात कनिष्काच्या कुषाण शाखेचें राज्य चित्रळ आणि काफिरिस्थान याच प्रदेशात होतें.

## बाणासुराचीं त्रिपुरे

हरिवंश आणि पद्म या पुराणानीं बाणासुराला अनुक्रमें शोणितपुर आणि जालधर येथील राजा म्हटलें असलें तरी मत्स्यपुराणकारांनीं त्याला 'त्रि'पुराचें

आधिपत्य अर्पण केलें आहे. कारण बाणासुर कनिष्काची एक राजधानी चीनच्या सीमेवरील मोंगोलियन् वस्तीच्या भागात होता. दुसरी मध्य आशियांत आणि तिसरी भारतांतील त्रिगर्तोच्या प्रांतात होती या शेवटच्या राजधानीला अनुलक्षूनच मत्स्यपुराणकारांनीं नेहमींचें परंपरागत त्रिपुरासुराचें आख्यान अन्यत्र वर्णिलें असूनहि बाणासुराला ' त्रि 'पुराचा अधिपति बनविलें आहे. या पुराणाच्या १८७ व्या अध्यायात नर्मदातीरनिवासी महेश्वराला ऋषि सांगतात : " अतिवीर्यो महाघोरो दानवो बलदर्पितः । बाणो नामेति विख्यातो यस्य वै त्रिपुरं महत् ।। गगने सतत दिव्यं भ्रमते तेन तेजसा । ततो भीता विरूपाक्ष त्वामेव शरण गताः ।। " म्हणजे त्रिपुराचा अधिपति जो बाण, त्याच्यापासून या नर्मदातीरनिवासी मुनींना भय उत्पन्न झालें होतें ' आश्वास्य स तु तान् सर्वान् नर्मदातटमाश्रितः । चिंतयामास देवेशस्तद्वध प्रति मानद ।। ' तेव्हा त्या साऱ्या ऋषींना आश्वासन देऊन नर्मदातीर-निवासी देवेशानें बाणाचा कांटा कसा काढावा, याचा विचार आरंभिला. शककुषाणाचें आक्रमण चालू असताना भारतीय शैवाचें केंद्रस्थान कैलासमानसक्षेत्रापासून ढळून नर्मदातीरावरील दऱ्याखोऱ्यात आलें होतें, ही ऐतिहासिक दृष्ट्या अतिशय महत्त्वाची घटना आहे. ' गणेशपुराणा 'तहि शंकरानें कैलासाचा त्याग करून दक्षिणेंतील त्रिसंध्या क्षेत्राचा आश्रय केल्याचा उल्लेख आढळतो. तोहि या शक-कुषाणाच्या आक्रमणालाच अनुलक्षून आहे. उत्तरेंतील सनातनी शैवानीं या काळीं नर्मदातीरीं आश्रय घेण्याचें मुख्य कारण म्हणजे तिथें त्याना दक्षिणापथांतील शैवपंथी शालिवाहन राजाचा आधार लाभत होता. ' गाथासप्तशतीं 'त म्हटलेंच आहे 'आपन्नानि कुलानि द्वावेव जानीत उन्नतिं नेतुम् । गौर्या हृदयदयितोऽथवा शालिवाहन-नरेन्द्रः ।। ' शकांच्या आक्रमणानें आपन्नविपन्न झालेल्या शालिवाहनकुलाचा गौतमी-पुत्रानें पुनरुद्धार केल्यानतर ही गाथा रचली गेली आहे, हें उघड आहे. असो.

## कनिष्काची राणी अनौपम्या

ऋषींचें गाऱ्हाणें ऐकून देवानें नारदाला बोलावून त्याला आज्ञा केली : " गच्छ नारद तत्रैव यत्रैतत् त्रिपुर महत् । बाणस्य दानवेंद्रस्य शीघ्र गत्वा च तत्कुरु ।। ता भर्तृदेवतास्तत्र स्त्रियश्चाप्सरसा समाः । तासा वै तेजसा विप्र भ्रमते त्रिपुरं दिवि ।। तत्र गत्वा तु विप्रेंद्र मतिमन्यां प्रचोदय । देवस्य वचन श्रुत्वा मुनिस्त्वरित-विक्रमः ।। स्त्रीणा हृदयनाशाय प्रविष्टस्तत्पुर प्रति । " म्हणजे बाणासुराच्या नगरीं-

तील स्त्रियाची मति अन्यत्र प्रचलित केल्यावाचून त्याचा पराजय करता येणार नाहीं, असें ओळखून शकरानें नारदाला त्या कामगिरीवर पाठविलें, हा कानमत्र घेऊन त्रिपुरनगरीला गेलेल्या नारदानें बाणासुराची पत्नी अनौपम्या हिची भेट घेऊन तिला व्रतवैकल्याच्या नादीं लावलें आणि आपलीच भक्ति करण्याचा उपदेश केला " एव तासा मनो हृत्वा सर्वासा तु पतिव्रतात् ।जगाम भरतश्रेष्ठ स्वकीयस्थानक पुनः॥" नारदाच्या या अगदींच किरकोळ कामगिरीमुळें अनौपम्येच्या पातिव्रत्याचा भग कसा झाला, ते आमच्या अर्वाचीन वाचकाना समजणें अवघड आहे. तरीसुद्धा ' He for God only and she for God in him ' या मिल्टनच्या ' नष्टनदना'तील ओळीचें स्वारस्य त्याना समजलें असलें, तर ' मत्स्यपुराण'काराच्या म्हणण्याचा आशय त्याना कळू शकेल. इतकेंच नव्हे तर अनौपम्येची जी थोडीफार माहिती उपलब्ध आहे, तिच्याशीं मत्स्यपुराणातील आख्यान अत्यंत सुसगत आहे. आपल्या अनुपस्थितींत आपली पत्नी परपुरुषाच्या नादीं लागली असल्याची शका जरी सैनिकाला आली तरी तो आघाडीवर लढण्याला सर्वस्वीं निरुपयोगी होतो, असें आधुनिक मानसशास्त्रज्ञाच्याहि आता अनुभवाला आलें आहे या मानसशास्त्रातील अनुभवाचा विस्तार पद्मपुराणकारानीं जालधरपत्नी वृंदा हिच्या आख्यानात केला आहे. पण नुसत्या परपुरुषाच्या चिंतनानेंच नव्हे तर, तर परात्पर पुरुषाच्या चिंतनानेंहि स्त्रीच्या पातिव्रत्याला बाधा पोंचते, असें मिल्टनप्रमाणेंच मत्स्यपुराणकाराचेंहि मत होतें. असो. नारदाच्या उपदेशानें अनौपम्या आणि तिच्या सख्या याची मति चळल्यानतर शकरानें आता पुन्हा त्रिपुरातक होण्याचा समय सन्निध आला असें ओळखून त्या नगरीवर बाण सोडला. त्या बाणानें आपलीं तीनहि पुरें जळू लागलेलीं पाहून बाणासुर शकराला शरण गेला. तेव्हा देवानें कृपा करून त्याचें आणि त्याच्या तीन पुरांपैकीं एकाचें सरक्षण केलें, असें मत्स्यपुराणात सागितलें आहे. हे आख्यान अर्थात् कुषाणकुळाच्या इतिहासावरच आधारलेलें आहे या कुषाणाचीं मूळची टोळी जी युएची ती महाचीनच्या खोतान प्रातात नादत असताना तिचें हूणाशीं वैर झालें होतें. त्या हूणानीं एका युद्धात युएची कुळाच्या खोतान आणि मध्य आशिया या देशातील राजधान्याचा सपूर्ण विध्वस केला. तेव्हा काहीं काळ त्याना भारतावाचून अन्यत्र आधार उरला नव्हता. या घटनेप्रमाणेंच बाणासुराची पत्नी अनौपम्या हिचें नाव ऐतिहासिक असावें, असें वाटतें. ' सर्वतथागताधिष्ठानबुद्धक्षेत्रसदर्शनव्यूहम् ' नावाच्या एका सुप्रसिद्ध महायान-सूत्रात अनोपमा महायक्षिणीला प्राप्त झालेला मत्र आणि तो मत्र साध्य करून

घेण्याकरिता तथागताची आराधना करण्याचा तिनें वर्णिलेला विधि सविस्तर सांगितला आहे. ( इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली, वर्ष नववें, पान ५७५ ). या अनोपमेच्या महायक्षिणी या नांवावरून ती यक्षाची राणी होती, हें उघड आहे. कुषाण घराण्याची जननी असलेल्या ज्या चिनी टोळीला तिच्या इंग्रजी अक्षर-वाटिकेवरून आपण युएची अशी संज्ञा देतो, तिलाच बौद्ध इतिहासकार ' यक्ष ' म्हणत असत. ' मंजुश्रीमूलकल्प 'कारांनीं कनिष्काच्या पूर्वजांना यक्षराजेच म्हटलें आहे. या यक्षघराण्यातीलच एक राणी अनोपमा महायक्षिणी असली पाहिजे, हें तिच्या महा या विशेषणावरून उघड आहे आणि तिचा उल्लेख बौद्धांच्या महायान-सूत्रांतून नवीन उपासनेच्या निमित्ताने येत असल्यानें एकतर ती कनिष्ककालीन असावी, नाहींतर तदुत्तरकालीन असावी, असें अनुमान काढणें अपरिहार्य होतें. महायानसूत्रांतून अनोपमा महायक्षिणीसंबंधीं उपलब्ध होणाऱ्या माहितींत मत्स्य-पुराणातील माहितीची भर टाकली म्हणजे ती कनिष्काचीच राणी होती, असें म्हणावें लागतें. कनिष्क प्रथम बौद्ध धर्माला अनुकूल नव्हता, अशी तिबेटी परंपरा आहे. तेव्हां मागाहून तो या महायक्षिणीच्या प्रभावाला बळी पडला असावा. कनिष्काची राजधानी जालंधर हें बौद्धयोगिनींचें महापीठ होतें, हें वर आलेंच आहे.

## योगिनींचीं महापीठें

येथे आता बौद्ध योगिनींच्या महापीठाची थोडी माहिती सांगितली पाहिजे. बौद्ध तंत्राप्रमाणें कामरूप, पूर्णगिरी, उड्डियान आणि जालंधर हीं त्यांच्या योगिनींचीं चार महापीठें होतीं. पण भारतीय इतिहासाच्या दृष्टीनें पाहिल्यास शककुषाणादि आक्रमकांचीं परदेशाशीं दळणवळण ठेवण्याचीं हीं प्रमुख केंद्रें होतीं. उड्डियान हें एका बाजूनें बल्ख आणि समर्कंद या प्रांताशीं आणि दुसऱ्या बाजूनें पामीर, खोतान, काशगर या प्रांताशीं संबंध ठेवण्याचें प्रमुख केंद्र असून तें अखंड भारताच्या सीमा-प्रांतांतील स्वात नदीच्या खोऱ्यात होतें. जालंधर नगराकडून शिपकीच्या घाटातून तिबेटाकडे जाण्याचा राजमार्ग होता. कामरूप अथवा आसाम हें पूर्वभारतातील देशद्रोही मोंगोलियनांचें भारताबाहेरील मोंगोलियनांशीं संबंध ठेवण्याचें केंद्रस्थान पूर्वीं होतें आणि आताहि आहे. पूर्णगिरी कोठें होतें हें मात्र आज सांगतां येत नाहीं. असल्या महत्त्वाच्या केंद्रांतून बौद्ध योगिनींचीं महापीठें स्थापून मोंगोलियन वंशाचे कुषाण नेते भारतावर आपलें सांस्कृतिक आणि राजकीय अधिराज्य प्रस्थापित करू पहात होते.

## चिनी अनाचारांचा प्रचार

ही केवळ माझी स्वतःची कल्पना नसून कुषाणकाळांत भारतामध्यें चीनाचार म्हणजे वस्तुतः चीनमधील लाओत्से या आचार्यांच्या टाओ नामक गुप्त पंथातून प्रचलित असलेले अनाचार रूढ करून येथील आर्यांना पीतवर्णी वंशाचे दास्य स्वेच्छेनें स्वीकारावयाला लावण्याचा पद्धतशीर प्रयत्न चालू होता. इतकेंच नव्हे तर असल्या प्रचाराला बळी पडून पूर्णपणें चिनी बनलेल्या पंजाबच्या एका भागाला तेव्हा चीनभुक्ति म्हणजे चिनी प्रांत हें नावहि चिकटलें होतें, असें युआन् च्वांगच्या ग्रंथावरून समजतें असल्यानेच मोंगोलियनांचे दास बनलेल्या भारतीयांमध्ये गुह्यसमाजासारखीं ओंगळ तंत्रें निर्माण झालीं. खरें म्हणजे या विशिष्ट दृष्टीनें तारातंत्र, महाचीनक्रम, कुब्जिकाम्नाय, गुह्यसमाज, जयद्रथयामल, कुलालिकातंत्र इत्यादि वज्रयानी तंत्रांचा बौद्ध वाङ्मयाच्या हिंदु अभ्यासकांनीं समाचार घ्यावयाला पाहिजे. उदाहरणार्थ, तारातंत्रात असें सांगितलें आहे कीं एकदा बुद्धदर्शनासाठीं उत्सुक झालेला वसिष्ठ भारत आणि तिबेट या दोनहि देशांत बुद्धाचा शोध न लागल्यामुळें चीनला गेला असतां तेथें बुद्धानें त्याला चिनी पद्धतीनें तारादेवीची उपासना करण्याचा विधि सांगितला. याचा ऐतिहासिक अर्थ इतकाच कीं आगाखानी मुसलमान जितक्या कुटिलपणानें आपल्या पंथाचा प्रसार करण्याकरिता कलकीच्या नावाचा दुरुपयोग करतात, तितक्याच कुटिलपणानें तेव्हाचे चिनी प्रचारक आपल्या अनाचाराचा प्रचार करण्याकरिता वसिष्ठादिकांच्या नावाचा दुरुपयोग करीत असत. हिंदु संशोधकांच्यामध्यें एकट्या डॉ विनयतोष भट्टाचार्यांनीं मोंगोलियनांच्या या ओंगळ प्रचारावर प्रकाश टाकला आहे अनंगवज्र नामक भिक्षूच्या ‘ प्रज्ञोपाय-विनिश्चयसिद्धि ’ या डॉ. भट्टाचार्यांनीं संपादिलेल्या ग्रंथात पुढील मुक्ताफळें आढळतातः “ प्रज्ञापारमिता सेव्या सर्वथा मुक्तिकांक्षिभिः । परमार्थे स्थिता शुद्धा संवृत्या तनुधारिणी ॥ ललनारूपमास्थाय सर्वत्रैव व्यवस्थिता । अतोऽर्थं वज्रनाथेन प्रोक्ता बाह्यार्थसंभवा ॥ जनयित्रीं स्वसारं च स्वपुत्रीं भागिनेयिकाम् । कामयन् तत्त्वयोगेन लघु सिध्येत साधकः ॥ ” बुद्ध ज्या शाक्य-कुलांत जन्माला आला, त्या कुलांत भगिनीशीं विवाह करण्याची पद्धति रूढ होती, ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे त्याच्या अनुयायांत अनंगवज्रासारखे लेखक निघणें आणि त्यांनीं कनिष्ककालीं नवीनच रूढ झालेल्या प्रज्ञापारमिताशास्त्राची अशी शोभा करणें अगदीं स्वाभाविक आहे. या ओंगळ श्लोकाचा आध्यात्मिक अर्थ वेगळा आहे, असें तज्ज्ञ लोक

सागतात. पण ज्यांना आपलें अध्यात्म या भाषेत प्रकट करावेंसें वाटतें, त्यांनीं आणि त्याच्या अनुयायांनीं सामान्य जनतेंत आपल्याविषयीं काहीं अप्रिय समजुती दृढ झाल्या तर त्याचा विषाद मानण्याचें कारण नाहीं. डॉ. विनयतोष भट्टाचार्यांना तर मोंगोलियन भिक्षूंच्या बीभत्स प्रचाराचा आणि आचाराचा इतका उद्वेग आला कीं त्याचा सरसकट सहार करून भारतातील हीं अनाचाराचीं केंद्रें समूळ नष्ट करण्याबद्दल त्यानीं मुसलमानाना पर्यायानें धन्यवादच दिले आहेत: 'The Muhammadans with one stroke of their sword Purged India for good of these horrible priests of immorality and lawlessness by killng every monk they could meet on the streets.' असलीं विधानें करून त्यानीं सशोधनात्मक लेखनाच्या मर्यादाचें अतिक्रमण केल्याबद्दल इतर हिंदु सशोधकानीं डॉ भट्टाचार्यांना दोष दिला आहे, हेंहि इथें सागितलें पाहिजे.

## योगिनी कीं वारविलासिनी ?

असल्या तत्राना अनुसरणाऱ्या बौद्ध योगिनींचीं वर्णनें वाचलीं म्हणजे कै. चित्तरजन दास यानीं वारविलासिनीला दिलेली योगिनी ही सज्ञा अगदीं यथार्थ आहे, असें वाटतें. या योगिनींना सरसकट लामा ही सज्ञा लावीत असत आणि त्याचें कार्य म्हणजे विरोधी पथातील तरुणाना आपल्या जाळ्यात पकडून त्याना ताटाखालचे माजर बनविणें हेंच होतें. या लामायोगिनींपैकीं कांहीं ' आलापेनापि चुबति। चुंबिका सा तु विज्ञेया योगिनीबलदर्पिता ।। ' म्हणजे प्रथमालापाच्या क्षणींच चुबन घेणाऱ्या आणि योगबलानें उद्दाम झालेल्या अशा असल्यानें त्याना ' चुबिका ' म्हणत असत. काहीं ' हसते रमते चैव मार्गमाक्रम्य तिष्ठति ' या कोटींतल्या असल्यानें त्याना इग्रजींतील ' Street walker ' हीच सज्ञा देणें योग्य होईल. असल्या योगिनींचा पुरेसा अनुभव असल्यामुळें अनिरुद्धहरणानतर हरिवशकारानीं कृष्णाच्या तोंडीं पुढील उद्गार घातले आहेत : " दैत्यदानवांच्या स्त्रिया पुंश्चली आणि मायासपन्न असल्यामुळें अनिरुद्धाला त्यानींच पळवून नेलें असावें, याविषयीं सशय नाहीं. " अनिरुद्धाला पळवून आणणारी उषेची सखी चित्ररेखा ही जशी अप्सरा होती, तशीच योगिनीहि होती, असें हरिवंशानें स्पष्ट सागितलें आहे. कृष्ण आणि बाणासुर याच्या युद्धात, शकरानें ज्या लबादेवीला बाणाच्या संरक्षणार्थ भवानीच्या सागण्यावरून पाठविलें, ती लबादेवी वर उल्लेखिलेल्या लामायोगिनींपैकीं असावी. ' ततस्त्र्यक्षो वचः श्रुत्वा देवीं लबामथाब्रवीत्। गच्छैहि लबे शीघ्र त्व बाणसरक्षणं प्रति ।। " असो.

## कनिष्काला बलिपुत्र बाणासुर कां बनविलें ?

मत्स्य आणि हरिवंश या पुराणांनीं कनिष्काला बाणासुर आणि बलिपुत्र का बनविलें याचा उलगडा भविष्यपुराणातील पुढील आख्यानानें होण्याजोगा आहे. "कलिर्भास्करमाराध्य तपसा ध्यानतत्पर: । पंचववर्षांतरे सूर्य: तस्मै च कलये मुदा ।। शकाख्यं नाम पुरुषं ददौ तद्भक्तितोषित: । तदा प्रसन्न: स कलि: शकाय च महात्मने । तैत्तिरं नगरं प्रेम्णा ददौ हर्षितमानस: ।। तत्र गोपान् दस्युगणान् वशीकृत्य महाबली । आर्यदेशविनाशाय कृत्वोद्योगं पुन: पुन: । हतवान् भूपतीन् बाणैस्तस्मात् ते स्वल्पजीविन: ।।" म्हणजे 'कलीनें पांच वर्षेपर्यंत मन:-पूर्वक सूर्योपासना केल्यानंतर सूर्यानें त्याला शक नामक पुरुष दिला. हा पुरुष कलीच्या अगदीं मनासारखा असल्यामुळें त्यानें हर्षभरानें त्याला तैत्तिर नगर दिलें. तिथें गोप आणि दस्यु यांना एकत्रित करून त्या महाबली शकानें आर्यदेशविनाशार्थ पुन: पुन: आक्रमणें आरंभिलीं आणि आर्यभूपतींचा बाणांनीं संहार केला, त्यामुळें ते सारे अल्पायु झाले.' या अवतरणावरून शकस्थान आणि तार्तारी (तैत्तिर) येथील शककुषाणांनीं आर्यदेशविनाशार्थ पुन: पुन: चालविलेल्या आक्रमणाची भविष्यपुराणकारांना किती विश्वसनीय माहिती होती, याची आधुनिक इतिहास-कारांना थोडीफार तरी कल्पना येईल. या आक्रमकांचें प्रमुख शस्त्र धनुष्यबाण असल्यामुळें आपल्या पुराणकारांनीं त्यांना बाणासुर बनविलें आहे. या बाणासुराला बलिपुत्र बनविण्याचें आणखी एक कारण येथें सांगण्याजोगें आहे. पद्मपुराण, विष्णुधर्मोत्तर पुराण इत्यादि ग्रंथांतून बल्खला बाष्कला अशी संज्ञा दिलेली आढळते. ही संज्ञा पूर्व इराणातील बाष्कल खोऱ्यावरून आणि तथील बाष्कली भाषेवरून उद्भवलेली दिसते. भारतात येण्यापूर्वी स्वत: कनिष्क त्याच प्रांतात रहात असल्या-मुळें 'मंजुश्रीमूलकल्प' या बौद्धग्रंथातील त्याच्या वर्णनात 'काश्मीद्वारपर्यंत बष्कलाद्यं सकाविषम् । योजनशतस्तं तु राजा भुक्तेऽथ भूतलम् ।।' म्हणजे बष्कलापासून प्रारंभ करून काविष प्रांतासह काश्मीद्वारापर्यंतच्या अर्थात् जम्मू-पर्यंतच्या राज्याचा हा राजा उपभोग घेईल, असा निर्देश आला आहे. या बाष्कली कनिष्काच्या साम्राज्यविस्ताराच्या मानानें त्याचें सैन्य अगदीं मर्यादित दिसतें. "सप्तसप्तति सहस्राणि लक्षौ द्वौ तस्य भूपते: । भविष्यति न संदेहो तस्मिन् काले युगाधमे ।" या बौद्ध संस्कृतातील श्लोकावरून असें समजतें कीं त्याच्या सैन्यात दोन लक्ष पायदळ आणि ७७००० स्वार होते. कै. काशीप्रसाद जायस्वाल यांना

या आकडयांचा बोधच झाला नव्हता. पण मीं वर सुचविलेला अर्थ व्हिन्सेंन्ट स्मिथच्या माहितीशीं सुसगत आहे. त्यानीं असें सांगितलें आहे कीं युएची गण चीनच्या परिसरांतून बाहेर पडला, तेव्हा त्यात एक लक्षापासून दोन लक्षापर्यंत धनुर्धारी वीर होते. त्याचप्रमाणें कनिष्कापूर्वीच्या कुषाण राजानें चीनवर स्वारी करण्याकरिता सत्तर सहस्र घोडदळ धाडलें होतें. तेव्हा 'मजुश्रीमूलकल्प'-कारानीं निस्सदेह म्हणून सागितलेल्या माहितींत बरेंच तथ्य दिसतें.

## चिनी ग्रंथकारांचे उद्गार

युएचीसारख्या एका क्षुद्र गणाला भारतासारख्या विस्तीर्ण देशावर आक्रमण करण्याचें धाडस कसें झालें, हें सागताना 'हू हान शू' या तत्कालीन चिनी ग्रथाच्या कर्त्यांनीं पुढील मननीय उद्गार काढले आहेत. "Ils sont plus faible que Les Youetche; ils pratiquent le religion du Buddhe, aussi est devenu chez eux une habitude de ne pas tuer et de ne pas batailler." म्हणजे 'भारतीय लोक युएचींच्या मानानें दुर्बल आहेत, कारण ते धर्मानें बौद्ध असल्यामुळें हत्या न करण्याची आणि युद्धेंहि न करण्याची त्याना संवयच लागून गेली आहे. त्यामुळे क्षुद्र टोळ्यानासुद्धा भारतावर आक्रमणें करतांना फारसें भय वाटत नसे.' अशोकपथी राजकारणाचें आणि धर्मप्रचाराचे हे स्वाभाविक परिणाम असल्यामुळें त्याच्यावर अधिक टीका करण्याची आवश्यकता नाहीं. मात्र असली मूल्यवान् समकालीन माहिती अधिकारी विद्वानाच्या ग्रथातून जोंपर्यंत उपलब्ध होत नाहीं, तोंपर्यंत माझ्यासारख्या अनधिकारी व्यक्तीलाहि या विषयावर लेखणी चालविणें भाग आहे बौद्ध धर्माच्या प्रसारामुळें विदेशी विजिगीषूना भारतात मुक्तद्वार लाभत असल्यामुळें मेनाद्रसारखे सुसस्कृत ग्रीक आणि कनिष्कासारखे महाधूर्त मोंगोलियन सम्राट् आपल्या साम्राज्यातील बौद्धपथी जनतेचा शक्य तितका पाठपुरावा करीत असत. असल्या विदेशी सम्राटाच्या प्रलोभनाना देशातील इतर नीच आणि देशद्रोही लोक बळी पडले तरी यौधेयत्रिगर्तादि मानधन गणांना ते कधींच वश करून घेऊ शकले नाहींत. हे गण आपल्या सनातन परपरेपासून पद-च्युत झाले नाहींत, म्हणूनच शककुषाणाच्या भीषण आक्रमणातून आत्मसरक्षण करून घेऊन ते हिंदुत्वाचा आणि भारताचा पुनरुद्धार करण्याला समर्थ झाले.

## कनिष्क आणि गणेशोपासना

या यौधेयाना वश करून घेण्याकरिता आपण स्वतःच, त्यांचा देव जो

स्कंदकार्तिकेय, त्याचा धाकटा भाऊ बनण्याचा अगदीं अपूर्व उपाय कनिष्कानें शोधून काढला. हा उपाय इतका अपूर्व होता कीं आजपर्यंत कोणाहि इतिहासकाराला कनिष्काच्या या अद्भुत कर्तृत्वाची कल्पनासुद्धा आलेली नाहीं. आणि त्यामुळें त्याना हुविष्क राजाच्या नाण्यावरील धनुर्धारी गणेश देवतेचा अद्यापि बोध झालेला नाहीं. कनिष्क राजा आपल्या राजवटीच्या प्रारंभीं बौद्ध धर्माला अनुकूल नव्हता, अशी तिबेटी परपरा आहे. तो स्वतःला कार्तिकेयाचा धाकटा भाऊ म्हणवून घेत होता, असें हरिवंशातील वर उतरून घेतलेल्या श्लोकावरून समजतें. 'प्रमाथगणवश्यस्य प्रथमः स्यामह विभो' म्हणजे 'तुझ्या गणाचें प्रमुखपद मला लाभू दे' असा वर बाणानें शंकरापाशीं मागितला होता, असेंहि हरिवंशकारानीं सागितलें आहे बाणासुराला देवपद प्राप्त झालें, असें त्याची चतुर्भुज मूर्ति उपलब्ध झाल्याचें वृत्त पुराणवस्तुसरक्षकविभागाच्या १९०६ च्या प्रतिवृतात आल्यावरून समजतें. या चतुर्भुज बाणासुराचें लिंग इतकें स्पष्ट दिसत आहे कीं तेवढयावरून डॉ. ब्लोक आणि मौल्वी कुरेशी याच्यासारख्या अहिंदु अधिकाऱ्यानासुद्धा ही मूर्ति लिंगपूजकाच्या पथातील असल्याचें सहज कळून आलें. तरीसुद्धां केवळ चार भुजाच्या सादृश्यावरून ती मूर्ति चतुर्भुज विष्णूचीच असली पाहिजे, असें काहीं हिंदु सशोधकानीं आग्रहानें प्रतिपादिलें आहे पण 'चत्वारोऽस्य भुजाः शिष्टा भविष्यन्त्यजरामराः । पार्षदमुख्यो भवतो न कुतश्चिद्भयोऽसुरः' असा भागवतात सागितल्याप्रमाणें विष्णूनें बाणाला वर दिला असल्याची परपरा या हिंदु सशोधकाना विदित असल्याचीं लक्षणें दिसत नाहीत. बाणासुराची वर उल्लेखिलेली मूर्ति गुप्तकालाच्या प्रारंभींची म्हणजेच कुषाणसाम्राज्याच्या शेवटच्या दिवसातली आहे. असें तज्ज्ञ सागतात. कनिष्कानतरचा कुषाण सम्राट् हुविष्क याच्या काहीं नाण्यावर धनुर्धारी बाणासुराची प्रतिमा असून तिच्या शेजारीं प्राचीन ब्राह्मी लिपींत गणेश हीं अक्षरें कोरलेलीं आहेत One unique copper-coin of Huvishka has the figure of an archer standing right holding a bow as long as himself, with string inwards, legend right in peculiar characters which look like old Brahmi for Ganesha:' ( व्हिन्सेंट स्मिथचा नाण्यावरील प्रबध ). या मुद्रेंतील धनुर्धारी प्रतिमेला नाणें पाडणाऱ्यानें गणेश म्हटलें असलें तरी हरिवंश आणि भागवत या पुराणातील कनिष्कबाणासुराच्या आख्यानाशीं अपरिचित असलेले सारे अधिकारी सशोधक हा खरोखरीचा गणेश नसून वस्तुतः आकाशातील मृगावर बाण सोडणारा रुद्रलुब्धकच असला पाहिजे, असें

आग्रहानें प्रतिपादीत आहेत, कनिष्क राजा हा भारताच्या वायव्यसीमेवरील सारीं गणराज्यें जिंकून खरोखरीच गणेश बनला होता, याची या संशोधकांना कल्पनाहि नाहीं. कनिष्क राजा स्वतःला गणेश म्हणवीत असल्यामुळें आर्यदेव नावाच्या एका बौद्ध भिक्षूनें त्याला टोमणा मारला होता कीं तू वस्तुतः गणाचा दास असून उगीच गणेश म्हणवून ऐट का करतोस ? पण ही ऐट तो मुख्यतः राजकीय कारणाकरिताच करीत होता, हे गणेशाच्या उत्क्रांतीवरून तज्ज्ञांना सहज समजण्याजोगे आहे. आपली पौराणिक परंपरा असे सांगते कीं गणेश हा प्रथम मनुजमुखीच होता, पण एकदा रागानें शिवानें त्याचें शिर कापलें आणि मग पार्वतीच्या विनंतीवरून उत्तरेकडे डोकें ठेवून निजलेल्या गजासुराचें शिर कापून त्यानें तें गणेशाला चिकटविलें. सुप्रसिद्ध संशोधक प्रो. स्टेन कोनोव ( स्तेन कण्व ) यानीं कनिष्कावरील लेखात अशी माहिती पुरविली आहे कीं तार्तार युएर्चीच्या ज्या टोळीनें भारतात साम्राज्य स्थापिलें तिला तत्कालीन खरोष्ट्री लेखातून आणि तिबेटी परंपरांतून गज या नावानें संबोधिलें आहे. मिर्झा हैदरच्या मोगलाच्या इतिहासात, किंवा शम्स उल उलेमा गनी यानीं अजमीरच्या खाजा चिश्तीवर नागपूर विद्यापीठाच्या पत्रिकेंत लिहिलेल्या लेखांतहि या तार्तार गजाचा उल्लेख आलेला आहे. तेंव्हा कनिष्काच्या मृत्यूला काहीं काळ लोटल्यानंतर गणेशाचें मनुजमुख लुप्त होऊन त्या ठिकाणीं गजटोळीच्या गजमुखाची स्थापना झाली, हें उघड आहे. या गजमुखाचें वाहन मूषकच कां, याचाहि उलगडा कनिष्काच्या इतिहासावरूनच होऊ शकतो. कारण कनिष्काच्या काळीं उत्तर सिंधप्रांताला मूषिक जनपद म्हणत असत, हें मी वर दाखविलेंच आहे. या मूषकाचें गजाशीं विशेष सख्य असल्यानें गणेश जेंव्हा गजमुख बनला, तेंव्हाच त्याचें वाहन म्हणून मूषकहि त्याच्या शेजारीं येऊन बसला. या सार्‍या गोष्टी लक्षात घेतल्या म्हणजे आपल्या गणेशोपासनेशीं कनिष्काचा आणि त्याच्या वंशाचा अतिशय निकटचा संबंध असल्याचें उघडकीस येतें युएर्चीच्या पांच टोळ्या असल्यानें अगदीं आरंभीं गजाननाला पांच सोंडा असत.

## गणेश कनिष्क विरुद्ध गुणेश महोत्कट

कनिष्कानें जेंव्हा आपण कार्तिकेयाचे कनिष्ठ बंधु असल्याचा प्रचार आरंभिला, तेंव्हा शंकराला स्कंदावाचून अन्य पुत्र लाभला नव्हता, ही महत्त्वाची गोष्ट आपल्या अधिकारी इतिहासलेखकांच्या ध्यानींमनींसुद्धा नसेल. नाहींतर त्यानीं ' उमावृषाकौ शरजन्मना यथा यथा जयंतेन शचीपुरंदरौ ' अशल्या ओळींतून

एकुलता एक पुत्र असलेल्या इंद्राच्या पक्तींत शंकराला बसविणाऱ्या कालिदासाला कनिष्कोत्तरकालीन ठरविलेंच नसतें ऋग्वेदात 'गणानां त्वा गणपतिं हवामहे' असें ब्रह्मणस्पतीला म्हटलें असलें, किंवा अथर्वशीर्ष उपनिषदात विनायक देवतेचा उल्लेख आढळत असला तरी ब्रह्मणस्पतीसारखी मंगलदेवता आणि विघ्नराज-विनायकासारख्या उग्रदेवता यांचें एकीकरण होऊन शंकराचा पुत्र या नात्यानें आणि गणेश-गजाननादि नावानीं मंगलमूर्तीची सध्या चालू असलेली उपासना कुषाण काळातच प्रथम चालू झाली. 'साम्राज्ययुग' लिहिणाऱ्या अधिकारी इतिहासलेखकानींहि गजाननासबंधीं लिहिताना असेंच म्हटलें आहे कीं, 'His real popularity came slightly later.' म्हणजे त्याच्या खऱ्या लोकप्रियतेचें युग कुषाणाच्या अंतानंतर लौकरच आले. भारतात गजाननाची उपासना लोकप्रिय होण्याचा काळ त्यानीं इतका अचूक सांगितला असूनहि ऐतिहासिक दृष्टीच्या अभावीं देवपुत्र कनिष्क हाच पहिला गणेश आणि आपल्या प्रचलित गणेशपुराणां-तील गुणेश देवाचा कट्टा शत्रु होता, याची त्याना कल्पनाहि आलेली नाहीं. फार काय भाद्रपद शुद्ध चतुर्थी ही एक विनायकी चतुर्थी असून त्या दिवशीं ज्या विघ्नहर्त्या, बुद्धिदात्याची जयंती आपण साजरी करतो, त्याचें नाव गणेश नसून गुणेश आहे, किंवा रामदासाच्या भाषेंत तो 'ईश सर्वां गुणाचा' आहे, याची कोणाला आठवणहि नसते. या गुणेशानें ज्या सिंधु असुराला मारण्याकरितां अवतार धारण केला होता, त्या असुरानें 'ममैव प्रतिमा कृत्वा पूजयन्तु गृहे गृहे' म्हणजे 'माझीच प्रतिमा करून तिची घरोघरीं पूजा करीत जा' असा आपल्या प्रजेला आदेश देऊन त्याची बजावणीहि कडक रीतीनें चालविली होती, असेंहि गणेशपुराणकारानीं सांगितलें आहे. या उल्लेखावरूनहि देवपुत्र कनिष्कानें स्वतःच्या गणेश या नावानें प्रतिमा करवून त्याची उपासना कशी प्रचलित केली, या घटने-वर पुरेसा प्रकाश पडतो. राजाच्या मूर्तीची पूजाअर्चा करण्याची कल्पना आज आपल्याला चमत्कारिक वाटत असली तरी पूर्वी ती अनेक देशातून रूढ होती. स्वतः कनिष्काच्या कालीं रोमच्या सम्राटाच्या मूर्तींची पूजाअर्चा होत असे. या रोमन सम्राटाची 'कायसर' ही पदवीहि कनिष्क कुलात प्रचलित होती. कदाचित् त्याच्या उदाहरणावरूनहि कनिष्काला ही कल्पना सुचली असावी.

## देवांतक आणि नरांतक

गणेशपुराणकाराच्या मताप्रमाणें महोत्कट विनायकाचा अवतार हा देवांतक आणि नरांतक या असुराचा कांटा काढण्याकरिता झाला होता. यापैकीं देवांतक

हे बौद्ध होते आणि नरांतक म्हणजे चंगीजखान आणि तैमूरलंग यांचे जे पूर्वज कुषाणकाळात भारतावर राज्य करीत होते, तेच होते यांची सारी संस्कृति ही भूत-संस्कृति म्हणजे भूटियालोकांची संस्कृति होती, असें गणेशपुराणकारांनीं स्पष्ट सांगि-तलें आहे. त्या काळीं सिद्ध नागार्जुनासारखी अलौकिक भारतीय व्यक्तिसुद्धा भोट देशांतील संस्कृतीचा भारतात प्रसार करण्यात धन्यता मानीत असे, हें वर आलेंच आहे. तेव्हा गणेशपुराणातील विनायकाच्या शत्रूंच्या नावावरूनच देवांतक बौद्ध आणि नरांतक मोंगोलियन यांच्या संयुक्त आक्रमणापासून भारताचें परित्राण करण्याकरिता विनायकाचा अवतार झाला, ही गोष्ट उघड आहे नरांतक मोंगो-लियनांनी विनायकाला मारण्याकरिता पाठविलेल्या असुरात अंभासुर हा सर्वश्रेष्ठ असुर होता. ' येन राज्येऽभिषिक्तौ तौ देवांतकनरांतकौ ' म्हणजे ज्याने देवांतक आणि नरांतक यांना राज्याधिकार प्राप्त करून दिला, असें त्याचें गणेश-पुराणकारांनीं वर्णन केलें आहे. हा अंभासुरहि स्वतः कनिष्कच होता, असें जनरल कनिंगहॅम यांनीं पुराणवस्तुसंरक्षकविभागाच्या १८६३–६४ च्या प्रति-वृत्तात गेल्या शतकातच लिहून ठेविलें आहे पंजाबांतील अंब नावाच्या खेड्या-संबंधीं लिहिताना ते म्हणतात: " According to the statements of the people, the place was founded by Raja Amba about the beg-inning of the Christian era. This date would make Amba and his brothers contemporary with Hushka, Jushka and Kanishka with whom on other grounds I am inclined to identify them." पंजाबात अंब, कप इत्यादि बंधूंच्या अंतःकलहाची एक लोककथा लोकप्रिय आहे. त्या कथेंतील अंब राजाच्या नगराचा उल्लेख जनरल कनिंगहॅम यांना टॉलेमीच्या भूगोलातहि आढळल्यावरून त्यांनी त्या नगराचा काळ ख्रिस्ती शतकाच्या पहिल्या दुसऱ्या शतकातला ठरविला असून त्या काळीं होऊन गेलेला कनिष्क राजा हाच अंबराजा असावा, असाहि त्यांचा ग्रह झाला होता पण या प्रश्नाची येथें चर्चा करण्याला सवड नाहीं, असें सांगून त्यांनीं तो विषय तसाच सोडून दिला असल्याने त्यांच्या अमूल्य माहितीला निदान मी तरी मुकलों आहें.

विनायकाचा, किंवा त्याच्या उपासकाचा मुख्य शत्रू कनिष्क असल्याचा आणखी एक पुरावा भाद्रपद शुद्ध चतुर्थीला गणेशाच्या मूर्तीची स्थापना केल्यानंतर त्या दिवशीं चंद्रदर्शन न घेण्याची जी परंपरा अजून आपल्यात प्रचलित आहे, तिच्यावरून उपलब्ध होतो. तिबेटी परंपरेवरून असें समजतें कीं कनिष्काचें नाव चंद्रकनिष्क असेंच होतें. महाराजकनिकलेख या काव्यात ' हे राजचंद्रा, तू चंद्रा-

प्रमाणेंच वर्तन कर, ' असा कवीनें कनिष्काला उपदेशहि केला आहे. पद्मपुराणातील जालधराख्यानात कनिष्काला सिंधुपुत्र आणि लक्ष्मीचा भाऊ बनविण्याचें कारणहि हेंच आहे. अशा प्रकारें चद्राचें कनिष्काशीं त्या काळीं तादात्म्य होऊन गेलें असल्यानें विनायकाच्या अथवा गणेशाच्या उपासकांनीं आपल्या इष्टदेवतेच्या जयतीला त्याच्या शत्रूचें स्मरण करून देणाऱ्या चद्राचें दर्शनहि न घेण्याचा नियम केला. आणि आचार पाळणाऱ्या लोकात तो नियम अजूनहि पाळला जातो. सकष्टी आणि विनायकी चतुर्थी या दोन व्रतामधील भेदाचें मूळहि हेंच असलें पाहिजे. कनिष्कानें जी गणेशोपासना रूढ केली, तिच्यात म्हणजे सकष्टीच्या व्रतात प्रथम चद्रदर्शन घेऊन मग गणेशाची पूजा करावयाची असते सकष्टीचें व्रत ज्याला फलदायक होतें, त्यानें विनायकी चतुर्थी करू नये, अशी जी सामान्य समजूत आहे. तिचें कारणहि या दोन उपासनामधील विरोधातच आहे.

## विनायकोपासना

पजाबातील कुषाणविरोधी युद्धाचें नेतृत्व मुख्यत: यौधेयत्रिगर्तादि आयुधजीवी सघांकडे असलें तरी पजाबच्या दक्षिणेकडील प्रांतातील विदेशी आक्रमकाना विरोध करण्यात मुख्यत: ब्राह्मणानींच पुढाकार घेतला होता. मौर्यांच्या अस्तानतर परचक्राचा प्राणपणानें प्रतिकार करणारीं शुग-शालिवाहन वाकाटकादि घराणीं ब्राह्मणवर्णाचींच होतीं परचक्राचा प्राणपणानें प्रतिकार करणाऱ्या घराण्यावर वेळोवेळीं प्राणसकटें ओढवत असत, हें सागायलाच नको अशा परिस्थितींत त्याचीं राज्ययत्रे मोडून पडलीं म्हणजे जनतेला कोणीच नायक उरत नसे असल्या निर्नायकीच्या काळात शालिवाहनादि राजाना शक्य तितकें साहाय्य करणाऱ्या ब्रह्मवृदानें विनायकाच्या उपासनेच्या निमित्तानें जनतेची सघटना केली. गुणेशाला असुराच्या विरुद्ध मिळालेला पहिला महत्त्वाचा विजय ' भीमाया दक्षिणतटे कृष्णाया उत्तरे तीरे ' म्हणजे भीमेच्या दक्षिणेला आणि कृष्णेच्या उत्तरेला असलेल्या प्रदेशात मिळाला असें गणेशपुराणानें सागितलें आहे. या उल्लेखावरून आणि अष्टविनायकाचीं मोरगाव, थेऊर, जुन्नर इत्यादि स्थानें सारीं पुण्याच्या आसपासच आहेत, यावरून महाराष्ट्रातील गणेशोत्सवाचें आजचें केंद्र हेंच शालिवाहनकाळातील विनायकोपासनेचें आणि शककुषाणविरोधी युद्धाचें प्रमुख केंद्र असल्याचें उघडकीस येतें. विनायकोपासना स्कदोपासनेंतूनच तेव्हा विकास पावत होती, असें विनायकाच्या मयूरेश आणि मोरेश्वर या गणेशपुराणातील नावावरून आणि मोरगावसारख्या त्याच्या क्षेत्रावरून सिद्ध होतें. महाराष्ट्रात शालिवाहनांच्या शककुषाणाशीं अतिशय

अटीतटीच्या लढाया झाल्या आणि एके काळीं शकानीं जुन्नरसारखीं पुणें प्रांतातील प्रमुख नगरें व्यापिलीं असता गौतमीपुत्रासारख्या शालिवाहन नरेंद्रानें महाराष्ट्राचा अधःपात थांबवून नहपानाच्या खगराट कुळाचा उच्छेद केला. या पराजयानंतर जालंधर दैत्यानें घस्मर नावाचा दूत पाठवून इंद्राकडे हरण करून नेलेल्या रत्नाची आणि जिंकलेल्या प्रदेशाची मागणी केली. याचा ऐतिहासिक अर्थ असा कीं, कुषाण सम्राटानीं चष्टनाचा पिता घस्मोटिक याला शालिवाहनाविरुद्ध धाडून त्यानीं जिंकलेले प्रांत परत मिळविण्याचा प्रयत्न केला. जालंधराच्या आख्यानांतील घस्मर हें नाव इतकें वैशिष्ट्यपूर्ण आहे कीं, तेवढ्यावरूनहि जाणत्या संशोधकांना त्या आख्यानाच्या ऐतिहासिक महत्त्वाची कल्पना यावी. पण पद्मपुराण वाचण्याचे श्रम अधिकारी इतिहासलेखक कशाला घेतील ?

## हनिष्यामोऽखिलान् अहीन्

पंजाबातील कार्तिकेयोपासक यौधेयादि गणांपेक्षाहि दक्षिणेकडील विनायकोपासक हे शककुषाणाचे वट्टे शत्रू होते, असें बौद्धांच्य 'मंजुश्रीमूलकल्पा'तील एका मंत्रात विनायकाचा अंतक या नात्यानें षण्मुखाला आवाहन केलें आहे, त्यावरून कळून येतें. 'नमः समन्तबुद्धानाम् अप्रतिहतशासनानाम् । तद्यथा — हें, हें, महाक्रोध, षण्मुख, षट्चरण, सर्वविघ्नघातक, हू हु, किं चिरायसि, विनायकजीवितान्तकर, दुःस्वप्नं मे नाशय, लघ, लघ, समयमनुस्मर फट् फट् स्वाहा।' याच ग्रंथात कार्तिकेयमंत्र आणि वैनायकी सिद्धि यांच्या साधनेला विंध्य-प्रदेश विशेष उपयुक्त असल्याचाहि उल्लेख आढळतो. 'मंजुश्रीमूलकल्पा'तील ही माहिती विनायकोपासनेच्या इतिहासाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची आहे. विंध्यपर्वताच्या परिसरात उदयास आलेल्या नागकुलोत्पन्न राजानीं शककुषाणाविरोधी युद्धात प्रामुख्यानें भाग घेतला असावा, असें कै. काशीप्रसाद जायस्वाल यांचें मत होतें. या मतावर डॉ. आळतेकरानीं असा आक्षेप घेतला आहे कीं नागकुलोत्पन्न राजांचें कुषाणाशीं युद्ध झाल्याचे प्रत्यक्ष उल्लेख कोठेंच आढळत नाहींत पण मला वाटतें कीं गणेशपुराणातील पुढील अवतरणात शककुषाणानीं नागावर केलेल्या अत्याचाराचा प्रतिध्वनि ऐकू येतो. 'आज्ञापयामास च तं तत्रस्थं स नरांतकः । यदैव विकृतिं पश्येदुरगाणां तदैवहि ॥ दूतमुखात्सूचयस्व हनिष्यामोऽखिलानहीन् ।'' म्हणजे "नागलोकानीं काहीं बिघाड (विकृति) आरंभिला तर तो तत्काळ दूतमुखानें मला कळवा, मग लगेच मी सर्व नागाचा संहार करीन,' असें नरांतकानें तत्रस्थ अधिकाऱ्यांना सांगून ठेविलें होतें. उज्जयिनींत राज्य करणारे शक हे जालंधर

नगरात राज्य करणाऱ्या कुषाणाचे म्हणजे पद्मपुराणातील सिंधुपुत्र जालधराचे किंवा गणेशपुराणांतील सिंधुदैत्याचे अंकित असल्यामुळें पुराणकारांनीं नाग आणि शालिवाहन कुलाच्या शकाशीं झालेल्या युद्धाचा सिंधु अथवा सिंधुपुत्र या असुराशीं झालेल्या युद्धातच समावेश केलेला आहे. निरनिराळ्या पुराणातून उपलब्ध होणारा हा पुरावा लक्षात घेतला म्हणजे पंजाबातील कार्तिकेयोपासक यौधेयादि गण, विंध्याचलाच्या परिसरातील शिवोपासक नाग आणि पुणें प्रांतांतील विनायकोपासक महाराष्ट्रीय या तीन समाजांनींच शककुषाणविरोधी युद्धातून प्रामुख्यानें भाग घेऊन शालिवाहनशकाच्या पहिल्या दुसऱ्या शतकात भारतात घुसलेल्या मोंगोलियन वंशाच्या आक्रमकांचा उच्छेद केला, हें ऐतिहासिक तथ्य उघडकीस येतें याच शककुषाणाच्या वंशजांनीं औरंगजेबाच्या काळीं महाराष्ट्रावर पुनश्च आक्रमण केलें असता कुषाणकालीन इतिहासाची कशी पुनरावृत्ति झाली, हें सर्वांना माहीत आहेच.

विनायक आणि गुहेश यांच्या उलट गणेश-गजाननाचा असुराशीं निकटचा संबंध असल्याचें पुराणातील कथांवरून दिसून येते. त्रिपुरातील शिवभक्त असुरांना ' गाणपत्य ' लाभलें म्हणजे मागाहून ते गणपतीचें उपासक बनले, असें लिंगपुराणानें सांगितलें आहे असुरांनीं यज्ञयाग करून देवतुल्य बनू नये, म्हणून असुरांची दिशाभूल करण्याकरिता गजाननानें अवतार घेतला, असेंहि त्या पुराणाचें म्हणणें आहे. जालधर असुराची पत्नी वृंदा ही कामुक बुद्धीनें गजाननाकडे गेल्याचाहि उल्लेख ' प्राचीन चरित्रकोशा 'त आढळतो. या आख्यानावरूनहि गजाननाचा असुराशीं असलेला निकट संबंध उघडकीला येतो. कारण प्राचीनकाळीं पश्चिम गांधाराला वृंद म्हणत असत या वृंद देशाची राजकन्या जी वृंदा, तिचेंच खरें नाव अनौपम्या असे होतें ही स्वतःला गणेश म्हणून घेणाऱ्या कनिष्काची पत्नीच असल्यानें ती त्याच्याकडे कामुक बुद्धीने जात असल्यास त्यात काहींच नवल नाहीं. पण पुढें कनिष्काची गणेशोपासना ही प्राचीन परंपरागत विनायकोपासनेशीं एकजीव झाल्यानंतर उदयाला आलेल्या पुराणकारांना वृंदा आणि गणेश यांच्या परस्परसंबंधाचें कोडें उलगडणें अशक्यच होतें, म्हणून त्यांनीं वृंदेचा विष्णूशीं संबंध जोडणारीं आख्यानें लिहून त्या पेंचप्रसंगातून आपली सुटका करून घेतली. कनिष्क हाच गणेश असल्यामुळें गणेशाच्या मूर्ति चिनी तुर्कस्थानात आणि इतर पीतवर्णी देशातून सापडतात. पण आमच्या विद्वानांस ही कल्पनाच नाहीं.



प्रकरण पधरावें

# कवि आणि कालिदास

कालिदास– कवि, ए कवि, ऊठ ना लौकर.

कवि– मला कवि म्हणून ओळखणारा तू कोण ? मी तर स्वतःला कवि म्हणवीत नाहीं.

कालिदास– कविकुलगुरुच मी माझ्या विद्यार्थ्यांना मी चांगला ओळखतों.

कवि– पण गुरुवर्य, आपण इतके अपरात्रीं का आलात ?

कालिदास– मी तर बोलून चालून दीपशिखा कालिदास निशाचराच्याच कोटींतला. माझा संचार रात्रींच व्हावयाचा

कवि– मीहि तसा निशाचर आहे म्हणा थेडें आधीं ओंकारेश्वराच्या स्मशानातच आपली गाठ पडली असती.

कालिदास– पण तिथें तुजजवळ माझी ग्रंथावली कोठून असणार ? ' मद्भक्ता यत्र गायन्ति । तत्र तिष्ठामि नारद ॥ ' या न्यायानें माझ्या ग्रंथावलीचें निरपेक्ष अध्ययन जिथें चालतें, तिथेंच माझ्या विद्यार्थ्यांना भेटण्यात मला आनंद वाटतो

कवि– तसा मी आपल्या सेवेला नेहमीच सिद्ध असतों. मग आज अपरात्रीं झोपेंतून उठविण्याचा अनुग्रह का केलात ?

कालिदास– तुझें ' अशोक ते कालिदास ' हें पुस्तक सारें छापून झालें तरी तू अजून माझ्या चरित्राविषयीं काहाच लिहिलें नाहींस माझ्या खऱ्या स्वरूपानें लोकात प्रकट होण्याची हीहि संधि वाया जाऊ नये, म्हणून मला तुला उठवावं लागलें.

कवि– आज जगातल्या शेंकडों विद्यापीठांतील सहस्रावधि आचार्य आपल्या विद्यार्थ्यांना तुमचें चरित्र आणि वाङ्मय शिकवीत असताना आपण माझ्याकडे का आलात ? अथेन्सच्या कवींच्या अनुकरणानें आपण वाङ्मयरचना केलीत, असा आरोप मी आपल्यावर केला आहे, हें माहीत आहे ना !

कालिदास– मला सारें माहीत आहे. पण मी मूळचा अथर्ववेदी ब्राह्मण. आमच्यात व्रात्याचे स्तोम फार. तेव्हा मी थोडा व्रात्यपणा करून अथर्ववेदापेक्षा अथेन्सच्या कवींचाच अधिक व्यासंग केला तर त्यात नवल काय !

कवि– तें खरें आजकालचे नामांकित कवि टी. एस् इलियट म्हणतात. ' Verse stands in constant need of a cross. The serious writer of verse must be prepared to cross himself with the best verse of other languages and the best prose of all languages. ' म्हणजे कवितेला दुसऱ्या कवितेशीं संकर करण्याची नेहमींच आवश्यकता असते. गंभीर काव्य रचणाऱ्या कवीनें तर अन्य भाषातील सर्वोत्कृष्ट काव्यें आणि सर्वच भाषातील सर्वोत्कृष्ट गद्य यांचा स्वतःच्या काव्याशीं संकर घडवून आणला पाहिजे. हें सारे खरें. पण आपण अथर्ववेदी असल्याच्या आणखी कांही खुणा आपल्या काव्यात आढळतात का ?

कालिदास– होय. कुमारसंभवात शिवाचें बटुब्रह्मचारी या स्वरुपात वर्णन आलें असून साऱ्या वेदामध्यें एकट्या अथर्ववेदातच ब्रह्मचारिन् या देवाची उपासना आढळून येते इतकेंच नव्हे तर तिष्ययुगातील कालींचे उपासक बहुधा अथर्ववेदीच असत

कवि– बरें. त्या काळचे राजपुरोहितहि सारे अथर्वनिधिच असत. अशा एखाद्या अथर्वनिधींचा आश्रय आपल्याला लाभला होता काय ?

कालिदास– होय. बाळपणींच अनाथ झाल्यामुळें मला एका अथर्वनिधीनेंच आश्रय दिला होता. पण या घोरवेदाच्या अनुयायापेक्षा सामवेदाच्या अनुयायातच मी रमत असे. लहानपणीं मला नृत्य, नाट्य, चित्र, संगीत यांचीच फार आवड होती. या कलांच्या भक्तासह मी देशोदेशीं प्रवास करीत असे. या प्रवासातच मला यवनी आणि यवनानी यांचा परिचय झाला होता.

कवि– हां. त्या यवनानी लिपीमुळेंच इकार आणि उकार वापरणाऱ्या लिपीचा आपल्याला परिचय झाला नव्हता, असें वाटतें त्यामुळेंच आपण इकार आणि उकार पुसून ग्रंथशुद्धि केल्याची कथा रूढ झाली असली पाहिजे

कालिदास– होय. ही कथा आणि तिच्यावरून रूढ झालेला जामातृशुद्धि हा प्रयोग माझ्या श्वशुरदेशातच टिकून राहिला आहे.

कवि– एका राजकन्येशीं आपला विवाह झाला होता, अशी किंवदन्ती आहे. ती कितपत खरी आहे ?

कालिदास– माझ्या चुकीवरून जामातृशुद्धि हा शब्दप्रयोग रूढ झाला, यावरून मी थोरामोठ्यांचा जावई होतो, हें नाहीं कां दिसून येत ?

कवि— असल्या थोरामोठ्याच्या घरातील मुली पतीचा अपमान करतात म्हणे. तसा काहीं आपल्याला अनुभव आला होता का ?

कालिदास— आपलें नाम आणि रूप याचा अहंकार बाळगणाऱ्या माझ्या पत्नीचें नाव लुप्त होऊन माझें नाव चिरंतन झालें आहे, एवढयावरून तुला नाहीं का कळत ? प्राय: स्व महिमानं क्षोभात् प्रतिपद्यते हि जनः । मनःक्षोभामुळेंच स्वतःच्या कर्तृत्वाची ओळख पटल्यानंतर मला या सुभाषिताचा आविष्कार झाला.

कवि— आणि भवितव्यानां द्वाराणि भवन्ति सर्वत्र, या सूत्राचा साक्षात्कार करून घेण्याकरिता प्रवासाला निघालात. पण या प्रवासात आपण बौद्धांच्या विहारातून तर वसती केली नव्हती ना ?

कालिदास— का बरें ? तुला अशी शंका का आली ?

कवि— अहो, बौद्ध संस्कृताच्या अनुकरणानें तुमचें संस्कृत भ्रष्ट झालें, असें एक रामगिरीशेजारीं निवास करणारे महामहोपाध्याय लिहितात, म्हणून विचारलें. त्यांनीं तुमच्या च्युतसंस्कृतित्वावर पानेंच्या पाने खरडलीं आहेत.

कालिदास— माझें च्युतसंस्कृतित्व सिद्ध करावयाला निघालेल्या महामहोपाध्यायांना महाभारतरामायणाचासुद्धा परिचय नसतो. ' द्वारकायां सुभद्रा च कामयानेन कामिनी । वासुदेवस्यानुमते प्राप्ता चैव किरीटिना ।। ' असें महाभारतकार निरूपण करीत असतांना महामहोपाध्याय वासुदेवशर्मा मला कामयान शब्द वापरल्याबद्दल दोष देतात. ऋतुसंहारातील ' प्रागेव ' या शब्दप्रयोगावरील यांचें भाष्य तर यहून अद्भुत आहे सुंदरकांडांत आपल्या अरण्यागमनाचें आख्यान हनुमंताला सांगतांना सीता म्हणते ' साऽहं तस्याग्रतस्तूर्णम् प्रस्थिता वनचारिणी । न हि मे तेन हीनाया वास स्वर्गेऽपि रोचते । प्रागेव तु महाभागः सौमित्रिः मित्रनंदनः ।। पूर्वजस्यानुयात्रार्थे कुशचीरैरलंकृतः ।। ' ( ५–३४–२७–२८ ) इयें सीता चक्क सांगत आहे कीं रामाला वनवासगमनाची आज्ञा होताच माहि त्याचें अनुसरण करण्यास सिद्ध झाले, सौमित्रि तर माझ्या आधींच कुशचीरांनीं अलंकृत झाला होता. या श्लोकातील प्रागेव शब्दप्रयोगाचे अनुकरण करून मी ऋतुसंहारात लिहिलें. ' कुंदैः सविभ्रमवधूहसितावदातैः उद्योतितान्युपवनानि मनोहराणि ।। चित्त मुनेरपि हरन्ति निवृत्तराग प्रागेव रागमलिनानि मनांसि यूनाम् ।। ' या ठिकाणीं प्रागेव याचा मुनिचित्तापहरणात् प्रागेव असा टीकाकारानीं केलेला सरळ अर्थ सोडून

.. २०

महामहोपाध्याय वासुदेवशर्मा त्याचा किमुत असा स्वकपोलकल्पित अर्थ करतात आणि त्याच्या आग्रप्रभूच्या इच्छेला अनुसरून मला भिक्षु अश्वघोषाचा दासानुदास बनवितात. प्राकृताभिमानी आंध्रभृत्याच्या राज्यातसुद्धा माझ्या कवितेला इतके वाईट दिवस आले नव्हते.

कवि–या भानगडींची आम्हाला काहींच कल्पना नव्हती. त्या नागपुरी महामहोपाध्यायाच्या 'प्रागेव' प्रयोगावरील प्रवचनानें आमचे कै. रंगाचार्य रड्डीसुद्धा चकले होते त्यांनीं म्हटलें होतें कीं त्यावरून लेखकाच्या सूक्ष्म वाचनाची जाणीव होऊन एकप्रकारें आदर वाटतो अर्थात् त्याचा किमुत हा अर्थ मान्य केला तरी त्यावरून त्याचीं अनुमानें खरीं ठरत नाहींत, हें त्यांनीं फार चांगलें दाखवून दिलें होतें. पण त्यांनीं त्या महामहोपाध्यायांवर सूक्ष्म वाचनाचा जो आरोप केला होता, त्याचें परभारेंच सुंदरकांडातील अवतरणानें निराकरण झालें, हे छान झाले

कालिदास–यांच्या सूक्ष्म वाचनाचें आणि संशोधनाचें 'कोड'कौतुक पुरे झालें या साऱ्या गुप्तकालवाद्यांनीं असें प्रतिपादन चालविलें आहे कीं गुप्ताच्या दिग्विजयाच्या अनुकरणाने मी रघुदिग्विजयाचा चौथा सर्ग लिहिला. मला असें वाटतें कीं या साऱ्या गुप्तकालवाद्यांनीं या पुण्यनगरींतच एक इतिहासपरिषद भरवावी आणि त्या परिषदेंत एकाच प्रश्नाचा उलगडा करावा. तो म्हणजे चंद्रगुप्तविक्रमादित्याच्या राजकवीनें आपल्या आश्रयदात्याचा जो सर्वांत मोठा पराक्रम, अर्थात् शकाचा उच्छेद आणि अवंती प्रांताची मुक्तता, नेमका त्याचाच उल्लेख रघु-दिग्विजयाच्या सर्गांतून का वगळला? खरा विक्रम राजा अवंतीचा अधिपति म्हणून विख्यात असल्यानें उज्जयिनी जिंकल्यावर चंद्रगुप्तानें पहिल्या शकविजेत्याचें विक्रमादित्य हें नाव स्वतः धारण केले. इतकेंच नव्हे तर खऱ्या विक्रमाचा पिता जो महेंद्रादित्य त्याचें नांव चंद्रगुप्ताचा पुत्र कुमारगुप्त यानें उचललें शकाच्या उच्छेदानंतर त्याच्याशीं लढणाऱ्या पहिल्या स्वातंत्र्यवीराचीं नावे आपण धारण करणें गुप्तसम्राटांना भूषणास्पद वाटलें, यावरूनच महेंद्रादित्य आणि विक्रमादित्य यांची कीर्ति उज्जयिनींत किती दृढमूल झाली होती, हें कळून येतें.

कवि–आतां आपण कुमारगुप्ताचा उल्लेख केलात. त्याच्याच जन्मोत्सवा-निमित्त कुमारसंभव काव्य रचलें गेलें, असें गुप्तकालवादी सांगतात. त्यात कितपत तथ्य आहे?

कालिदास—महामहोपाध्याय वासुदेवशर्मांना नुसतें कुमारसभव हें नांव दिसलें आणि त्यानीं त्याचा कुमारगुप्ताशीं सबध जोडला. पण कुमारगुप्तानें धारण केलेलें महेंद्रादित्य हें नाव विक्रमाच्या पुत्राचें नसून त्याच्या पित्यानें आहे, हें मी विक्र-मोर्वशीयात परोपरीनें सागितले आहे. ( दिष्ट्या महेंद्रोपकारपर्याप्तेन विक्रममहिम्ना वर्धते भवान् ) ( श्रूयता महेंद्रसदेशः ) ( उपनीयता स्वय महेंद्रेण सभृतः कुमारस्या-युषो यौवराज्याभिषेकः ) गुप्तघराण्यात एकहि महेंद्रपुत्र विक्रम होऊन गेला नस-ल्यानें माझ्या विक्रमोर्वशीय नाटकाचा त्या घराण्याशीं ओढून ताणूनहि सबध आणता येत नाहीं. याच्या सूक्ष्म वाचनाचे आणि सशोधनाचे असले किती तरी नमुने सागता येतील. अनेक दुरितें करून राज्यसपादन केलेल्या चंद्रगुप्ताच्या सभेंत ‘ दुरितैरपि कर्तुमात्मसात् प्रयतन्ते नृपसूनवोहि यत् । तदुपस्थितमग्रहीदजः पितुरा-ज्ञेति न भोगतृष्णया ।। ’ हा श्लोक मी म्हटला आणि याच्या राणीनें दोन नवरे केले असतांना ‘ भूयो यथा मे जननातरेऽपि त्वमेव भर्ता नच विप्रयोगः । ’ हा सीतासदेश तिला ऐकवून तिची कुचेष्टा केली, असले अनेक पराक्रम त्यांनीं माझ्याकडून करविले आहेत. मी लहानपणी झाडाच्या खादीवर बसून तीच खादी कुऱ्हाडीनें तोडत होतों, पण हा कार्यक्रम सारखा सारखाच करणाऱ्याला अल्पा-युषी व्हावें लागतें. विक्रमादित्याच्या सान्निध्यात त्याच्या मित्राच्या नर्मकथा चालू असताना दुरून राणीच्या नूपुराचा रुणत्कार कानीं आला कीं आम्हाला तेथून पळ काढावा लागे. स्वतः श्रीविक्रमादित्यानेंच म्हटलें आहे.

‘ शय्यागार व्रजन्त्याश्चतुरसहचरीमुग्धमुग्धोक्तिमिश्रम् ।
प्राणेशायाः स्मरज्यारणितामिव समाकर्ण्य मजीरघोषम् ।।
यामिन्याः पूर्वयामे विगलति विततौत्सुक्यमुज्जृभमाणे ।
धन्यो निद्राच्छलेन श्लथयति सुहृदा नर्मगोष्ठीप्रबधः ।। ’

म्हणजे स्मरशरासनाच्या प्रत्यचेच्या ठायीं असलेल्या नूपुराचा रुणत्कार कानीं येताच नायकानें निद्रेचें कपटनाटक करून आपल्या मित्राच्या नर्मकथा थाबवून त्याना निरोप द्यावा. असें आमच्या प्रभूना नूपुरध्वनीचें वेड असल्यामुळें मी माल-विकाग्निमित्रात पुढील गीति घातली आहे ‘ अनुचितनूपुरविरह नार्हसि तपनीय-पीठिकालबि । चरण रुजापरीत कलभाषिणि मा च पीडयितुम् ।। ’

कवि—हा, आपल्या काळीं रामचरित्राच्या प्रभावानें नूपुराचें प्रस्थ फार होतें. कारण लक्ष्मणानें सागितलें होतें ना. ‘ नाह जानामि केयूरे नाह जानामि कुडले।

नूपुरे त्वभिजानामि नित्य पादाभिवदनात् ।। ' आता आपण विक्रमाच्या राणीचा उल्लेख केलात, पण आपल्या काव्यातून तिचा कोठें सदर्भ आला आहे का ?

कालिदास—होय. इंदुमतीस्वयंवराच्या सर्गांतील अवतिनाथाच्या वर्णनात 'बबध सा नोत्तमसौकुमार्या । कुमुद्वती भानुमतीव भावम् ।। ही जी उपमा घातली आहे, ती विक्रमाच्या भानुमती पत्नीलाच अनुलक्षून घातली आहे. चद्रगुप्ताच्या ध्रुवस्वामिनी किंवा कुबेरनागा या राण्याचे सदर्भ माझ्या काव्यात कोठे चुकूनसुद्धा आढळावयाचे नाहींत.

कवि—पहा बरें, नाहीं तर चद्रगुप्ताची कुबेरनागा हीच आपल्या मेघसदेशान्ती नायिका यक्षी, असें कोणी तरी म्हणतील.

कालिदास—इतकेंच नव्हे तर तिच्यावर प्रेम करण्याच्या अपराधाकरिता चद्रगुप्तानें मला तिच्या कन्येच्या राज्यात रामगिरीवर डाबून ठेविलें होतें, असेंसुद्धा हे सशोधक म्हणावयाला चुकावयाचे नाहींत. नाहीं तरी मला गुप्तकालात आणण्याकरिता या सशोधकार्नी ' आषाढस्य प्रशमदिवसे ' या खऱ्या पाठाच्या स्थानीं ' आषाढस्य प्रथमदिवसे ' हा पाठ रूढ केला आहेच.

कवि—विक्रमाच्या राणीचा मजीरध्वनि ऐकून तुम्हाला पळ काढावा लागत असला तरी त्याच्या मातेच्या चरित्राचा तरी तुमच्या चित्तावर प्रभाव पडला असेल ?

कालिदास—होय त्या तपस्विनीच्या प्रभावामुळेंच उमा आणि शकुतला याचें विभूतिमत्व मी माझ्या कृतींतून प्रकट करू शकलों. नाहीं तर

'वाचि श्री माथुरीणा जनकजनपदस्थायिनीना कटाक्षे ।
दते वगागनाना सुललित जघने चोत्कलप्रेयसीनाम् ।।
तैलगीना नितबे सजलघनरुचौ करलीकेशपाशे ।
कर्नाटीना कटौ च स्फुरति रतिपतिर्गुर्जरीणा स्तनेषु ।। '

असल्या अवलोकनात आमचें आयुष्य वाया गेलें असतें.

—•—